

# समय सुचकता

मद्रदेशचा राजा प्रचंड याच्याजवळ खूप मोठे सैन्य व त्याचबरोबर पुष्कळ संपत्तीपण होती. राजा प्रचंड आपल्या शेजार-पाजारच्या राज्यात सलोख्याचे संबंध जोडण्याकरिता आपल्या निवडक राज-दूतांना पाठवित असे.

काही वर्षापूर्वी राजा प्रचंडनी कौशांबी व विदेह ह्या दोन्ही राज्यांकरिता वज्रसेन नावांचा राजदूत नेमला होता. त्यांनी पुष्कळ वर्षे आपली जबाबदारी ओळखून त्या पदाचा सांभाळ केला. परंतु अचानक त्याचे निधन झाले.

तेव्हा राजानी दोन्हीं राज्यांकरिता एक नवीन राजदूत नेमण्याचा विचार केला. त्याकरिता राजानी काही योग्य व्यक्तिना बोलावून त्यांची परिक्षा घेतली. त्यात विकार आणि ललित नावांच्या दोन व्यक्ति यशस्वी झाल्या.

त्या दोघांपैकी राजदूतपदासाठी कोण योग्य ठरेल हे समजण्याकरिता राजानी विचारपूर्वक एक परिक्षा घेण्याचे ठरविले व त्या दोघांना बोलावून घेतले. राजानी सांगितले–"मी तुमच्यावर एक महत्वाची जबाबदारी सोपवणार आहे?" आणि विकारकडे वळून पहात म्हणाला–"तू आज आपल्याबरोबर आवश्यक तेवढे सैन्य व नजराणा घेऊन कौशांबी राजाकडे जा व मैत्रीसंबंध जोडून त्यांना आपली भेट देऊन परत ये.

तसेच ललितलाही विदेह राज्यात जाऊन तेथील राजाकडे सलोखा संपादन करुन त्यांना नजराणा अर्पण करुन परत यायला सांगितले. राजाचा संदेश मिळताच व राजानी दिलेली वेळेची मुदत ऐकताच दोघेही निवडक सैन्य व उपयुक्त नजराणा घेऊन निघाले.

संपदा गाडगीळ

बरोबर नेलेला नजराणा व सैन्य घेवून ललित वेळेच्या आधीच राजधानीत परत आला व राजाला जावून भेटला.

राजा प्रचंडनी ललितला विचारले–"विदेह राजानी आमच्या वस्तू स्वीकारण्याचे नाकारले काय? त्याच बरोबर मैत्री संबंध पण होवू शकले नाहीत काय?"

"महाराज, एका शेजारच्याच राजा बरोबर कसले संबंध जोडायचे ही गोष्ट आपल्या मोठेपणाला लाजवणारी होईल नां? नजराणा बरोबर घेऊन जाताना ही गोष्ट माझ्या लक्षात आली नाही. परंतु विदेह राजाला भेटताच ही गोष्ट माझ्या लक्षात आली म्हणून मी भेट-वस्तु राजाला अर्पण न करता व आपल्याबरोबर मैत्रीसंबंध जोडण्याचे न सांगताच तेथून निघून आलो. ललितने उत्तर दिले.

हे उत्तर ऐकताच दरबारातील लोकांना आश्चर्यंच वाटले, परंतु राजाला आश्चर्य वाटले नाही. ललितला विदेह देशाशी सलोख्याचे संबंध जोडण्याकरिता पाठवले होते परंतु ललितने राजा विरुद्ध व्यवहार केला तेव्हां राजा ललितला राजदूताचे पद देणार नाही. असे सर्व दरबारी लोकांना वाटले.

विकार तर राजानी दिलेल्या वेळच्या नंतर दोन दिवसांनी कौशांबी राजानी दिलेला नजराणा घेऊन राजधानीत परत आला. राजानी विकारला पहाताच विचारले–"तू दिलेल्या वेळात न येता



नंतर कां आलास? कौशांबी राजानी आपल्याबरोबर सलोख्याचे संबंध जोडण्याचे कबूल केले आहे काय?"

विजयगर्वानी विकार म्हणाला–"राजा, मी कौशांबी राजाला आपल्याबरोबर सलोख्याचे संबंध जोडण्याकरिता खूप विनवले व त्यांनी आपला नजराणा स्विकार करून, सोबत आपल्याकरिता अमुल्याअशा भेटवस्तु व तसेच दासदासी पाठवल्या आहेत. आजपर्यंतचा अतिथि सत्कार पाहूनच माझ्यावर एक प्रकारचे दडपण आले.

ह्यावर सर्व दरबारी त्याची स्तुती व अभिनंदन करू लागले. तेव्हां राजानी त्यांना थांबवून सांगितले–"मी राजदूताच्या पदासाठी ललितची निवड केली आहे. ही गोष्ट आपल्या लोकांपैकी बऱ्याच जणांना आश्चर्यकारक वाटले. परंतु ललितनी केलेला राजाबरोबरचा व्यवहारच योग्य आहे.

विदेहराज्य आपल्या करिता मांडलिक राज्य म्हणजे शेजारचेच राज्य आहे. तेव्हां त्याच्याबरोबर आपल्याला मैत्रीपूर्ण संबंध जोडण्याची काहीच जरूर नाही. परंतु त्याला प्रथम माहित झाले नाही तेथे जाताच त्याच्या ते लक्षात आले. तेव्हां त्यांनी आपला नजराणा अर्पण केला नाही व तो परत आला."

"कौशांबी सुद्धा आपले शेजारचेच राज्य आहे. परंतु विकारनी ही गोष्ट जाणून घेतली नाही व राजाला आपला नजराणा अर्पण केला आणि उपयोगी नसलेल्या गोष्टी घेऊन मैत्रीसंबंध जोडून परत आला. त्यामुळे असे स्पष्ट झाले. राजदूताच्या ठिकाणी लागणारी समय सुचकता त्याच्यापाशी नाही त्यामुळे विश्वास ठेवणे कठिण आहे. की; मद्र देशाची अश्या व्यक्तिकडून अब्रु राखली जाईल." असे राजा प्रचंडनी सांगितले.

राजाच्या सांगण्यावरुन सर्व दरबारी लोकांना व जनतेला समजले की, ललित एक हुषार विवेकशील व्यक्ति आहे आणि विकारच्या मुळे कशी चुकी झाली.







# सुलक्षणी

कुंतलदेशाचा राजा रविवर्मा याच्या दरबारी खजिनदाराची जागा रिकामी होती. राजा योग्य व्यक्तिच्या शोधात होता, तेव्हां राणीने आपल्या लहान भावाची तारीफ करीत सांगितले–"ही गोष्ट पैश्याची आहे, तेव्हां दुसऱ्या बाहेरच्या माणसाला ठेवण्यापेक्षां आपलाच माणूस तेथे ठेवला तर अधिक विश्वासपात्र होईल."

पण राजाला ही गोष्ट बिलकुल आवडली नाही. कारण खजिन्यातील धन काही कारणानी कमी-जास्त झाले तर निष्कारण आपल्या मेव्हण्याबरोबरच वैर निर्माण व्हायला कारण होईल. तेव्हां राजानी उत्तर दिले–"चांगलीच गोष्ट आहे पण मी विचार करून सांगतो!"

दुसऱ्या दिवशी सेनापतिने राजासमोर एक प्रश्न विचारला–"महाराज, माझा छोटा भाऊ शिकलेला आहे. परंतु युद्धकलेत तो प्राविण्य मिळवू शकला नाही. त्याला खजिनदाराची नोकरी दिलीत तर मी सेनापति व भाऊ खजिनदार होवू आणि आपली सेवा करण्याचे भाग्य आम्हाला मिळेल.

परंतु राजाला तेही योग्य वाटले नाही. मोठा भाऊ सेनापति व लहान भाऊ खजिनदार बनल्यावर त्यांचेच वर्चस्व वाढेल.

त्याच वेळेस विष्णुशर्मा नावाच्या तरुणांनी राजाची भेट घेतली व आपला विचार प्रकट केला. "महाराज, मी गणित शास्त्रात प्राविण्य संपादन केले आहे. तेव्हां माझी योग्य ती परीक्षा घेऊन मला आपल्या पदरी खजिनदाराची जागा द्या.

राजानी विष्णुशर्माची अनेकतऱ्हेनी परीक्षा घेतली व त्याच्या उत्तरांवर संतुष्ट होऊन त्याला खजिनदाराच्या जागी नेमले. परंतु ही नेमणूक राणीच्या व सेनापतीच्या

रागाला कारणीभूत झाली. थोडया दिवसांनी राणीने राजाला विचारले–"आपण विष्णुशर्माला मोठा हुशार व ईमानदार समजून खजिनदाराच्या जागी नेमले आहे. तो एक नंबरचा चोरटा आहे. माझी आतांच खात्री झाली की,थोडया वेळापूर्वीच नोकरीच्या शोधात आलेल्या एका माणसाकडून एक हजार नाणी चोरून घेतली. घरी जाताना तो ती घेऊन जाईल तरी आपण वेळ न दवडता तावडतोब खजिन्यात जाऊन हिशोब पहावा. तो आपल्याला एक हजार नाणी जास्त असलेली दिसतील.

राजानी तावडतोब खजिन्यात जाऊन हिशोब पाहिला. परंतु तो अगदी बरोबर होता. एकही नाणे जास्त नव्हते. विष्णुशर्माची पण झडती घेतली तेव्हां त्याच्याजवळ काहीहि सापडले नाहीं. आपली झडती घेतलेली पाहून विष्णुशर्माला जरा आश्चर्यच वाटले. पण राजांनी त्याच्यावर संतुष्ट होत सांगितले की तुझ्या झडतीचे कारण तुला मागावून सांगण्यात येईल.

राणीनी आपल्या सखीच्याकडून बातमी मागविली परंतु कोणत्याच गोष्टीचा उलगडा लागला नाही. असे काय झाले राणीलाच कळेना. कारण राणीने आपल्या एका दासीला खजिन्यांत एक हजार नाण्यांची थैली गुपचूप ठेवून येण्यास सांगितले होते. तेव्हां ती एक हजार नाणी गेली कोठे?

त्याचप्रमाणे सेनापतीनेही एका विश्वासू नोकरांकरवी खजिन्यातून एक हजार नाणी चोरून नेली होती. तेव्हां सेनापतीच्या मनात भलतीच शंका येऊ लागली. कारण त्याच्या चोरण्यांनी खजिन्यातील एक हजार नाणी कमी व्हावयास पाहिजे होती. ती नाणी कमी कशी झाली नाहीत?

अशा तऱ्हेने दोघांनी ईर्ष्येने दुसऱ्या चांगल्या नीतिवान माणसाला वाईट ठरवण्याचे योजले परंतु ती योजना परस्परां कडूनच फसली गेली त्यांना ती गोष्टी उघड न करता गप्प बसावे लागले. जसे चोरी करण्याकरिता भोक पाडायला गेलेला चोर भोकांतून विंचू चावला तरी गप्पच बसतो तसे.






**ए**क दिवस मकरद्वीपचा राजा मंदरदेव आपल्या उद्यानात हिंडत असताना त्याला किल्ल्याच्या दरवाजाजवळ लोकांचा गोंगाट व सैनिक त्यानां दमदाटी करीत असतांनचा आवाज ऐकू आला. अचानक होणाऱ्या गडबडगोंगाटामूळे राजाला आश्चर्य वाटले. त्याचे काय कारण असावे हे समजून घेण्याकरीता राजा आपल्या उद्यानातून बाहेर पडून किल्ल्याच्या दरवाजाकडे जावू लागला.

राजा मंदरदेवनी बाहेर पाहिले तर, मंत्री जनतेला शांत रहाण्याविषयी सुचना देत होते, सैनिकांनी राजाला आलेले पहाताच ती खबर मंत्र्यांना दिली. तेव्हां मंत्री राजापाशी आले.

"हा काय गडबडगोंधळ आहे?" राजानी मंत्र्याजवळ विचारणा केली, मंत्र्यांनी काहीएक क्षण किल्ल्याच्या दरवाजाकडे पाहिले व म्हणाले–"राजा, अजूनपर्यंत एका गोष्टीचा उलगडा होऊ शकत नाही, परंतु माझा असा विचार आहे की ह्यात कांहीतरी खरे असण्याचा संभव असावा. आपल्या सर्वांनाच माहित आहे की कांही दिवसापासून कुंडलीनी द्वीपात थोडी अराजकता पसरू लागली आहे. परंतु जेव्हां मासेमाऱ्यांकडून बातमी मिळाली की, नरवाहनमिश्र नावांच्या सेनापतीने त्या द्वीपाचा राज्याधिकार हस्तगत केला. व तो आपल्या राज्यावर चाल करुन येत आहे. तेव्हां ही बातमी कळताच आपली



जनता घाबरून गेली आहे त्यानां मी शांत रहाण्याविषयी सुचना देत होतो.

राजा मंदरदेव डोके हलवून गप्प राहिला, परंतु त्यालाही मंत्र्यानी सांगितलेल्या गोष्टीत काहितरी सत्य असावे असे वाटू लागले ती विचारमग्न झाला, राजा धोका असण्याविषयी विचार करित असावा असे वाटून मंत्र्यानी राजाला सांगितले— "महाराज, पुढील संरक्षणाकरिता चांगला उपाय शोधून मी सेनापतीकडे आधीच निरोप पाठविला आहे. ती गोष्ट खरी किंवा खोटी ह्याविषयी आपल्याला गुप्तचराकडून संध्याकाळपर्यंत माहिती मिळेल आणि ती वेळ आता होतच आली आहे.

मंदरदेवनी मंत्र्याकडे प्रश्नार्थक नजरेनें पाहिले व थोडे थांबून म्हणाले "चांगली गोष्ट आहे?" ह्याविषयी माहिती मिळताच बातमी खरी असल्यास मला कळवा मी वाट पहातो." असे म्हणून राजा राजमहलाकडे जावू लागला.

राजा गेल्यानंतर मंत्री सरळ तटानजीक जावून, त्याच्यावर चढून लांबवर पाहू लागला. तटावरून दूरवरचा समुद्र व त्यामधून जाणाऱ्या बोटींचा पत्ता लागत असे. मंत्र्याच्या कल्पनेप्रमाणे समुद्रात एका बोटीचे निशाण दिसत होते. थोड्यावेळात ही गोष्ट नक्की झाली की बोट मराल द्विपानजीक येत आहे.

तिकडे सेनापतीनी मंत्रीच्या संदेशानुसार द्वीपांच्या जवळपासच्या सर्व सैन्येला एकत्रित केले. मरालद्वीपाच्या चोहोकडे पाणी असल्यामुळे जवळपासच्या राजांपासून नेहमीच धोका होता. तेंव्हां मरालद्वीपाच्या राजांनी राज्यातील प्रत्येक पुरुषाला सैनिकी शिक्षण दिले होते.

सेनापती निवडक सेनिकांना घेऊन द्वीपाजवळच्या किनाऱ्याशी गेला. मराल द्वीपचा नौकादल जरूरत पडल्यास लढण्यास तयार होता. प्रत्येक नावीकाला ढोलांचा व शंखनादाचा आवाज ऐकताच आपापल्या नावेच्या जागी येण्याची सुचना देऊन ठेवली होती.

किल्ल्याच्या तटावरुन सर्व तयारी होत असलेली त्यांनी पाहिली. सेनापतीची सावधानता व कर्तव्यनिष्ठा पाहून मंत्री आनंदीत झाला. त्याचा आनंद थोड्यावेळापुरताच होता कारण त्याची जागा हळूहळू भीतीनी घेतली. गुप्तचरांच्या बोटींमागे थोड्या दूर अंतरावर काळेकभिन्न ढग हळूहळू पसरत असल्याचे दिसू लागले पूर्ववादळाची व पावसाची लक्षणे असावीत असे मंत्रीला वाटले परंतु दुसऱ्या क्षणीच हे काही पावसाचे ढग नाहीत तर काही योध्यांनी स्वतःह्याच्या बोटी एकत्रीत करून मरालद्वीपाजवळ आणल्या आहेत व बोटीच्या धूराड्यातून धूर बाहेर येत आहे असे दिसले. थोड्या वेळातच गुप्तचरांच्या बोटीवर तेलात भिजवून पेटलेले बाण अचानक येऊन पडू लागले.

तेव्हां मासेमारी लोकांनी सांगीतलेली गोष्ट खरीच आहे हे मंत्रीना स्पष्ट झाले. काहीही न कळवता असा अचानक हल्ला करण्याचा संप्रदाय नविनच कुंडलीनी राज्याचा अधिकार प्राप्त झालेल राजा नरवाहन मिश्रनी नविनच सुरु केला होता. मंत्रीनी रागांनी दांत ओठ खाल्ले. दोनशे वर्षापूर्वी अश्याच प्रकारे युद्ध घोषणा न करता अनेक राज्ये शाक्तेय नावाच्या मांत्रिकांनीं लूटली होती. त्यावेळेस काही राजांनी शाक्तेय हा कांही राजवंशी घराण्यातला नाही तर एक मांत्रिक आहे असे समजून आपापली राज्ये सांभाळली होती





अश्या तऱ्हेने त्यांनी अधर्मपूर्ण राज्य केले. मंत्री अश्या विचारात गर्क होता तोच मरालद्वीपच्या नौकादलांनी आपल्या बोटींवर हल्ला होणार आहे असे समजून मोठमोठ्यां आरोळ्यांनी आपल्या बोटी चालू केल्या थोड्या वेळांतच समुद्राच्या मध्यावर थोड्या दूरवर कुंडलीनीद्वीपाच्या बोटींमध्ये घनघोर लढाई सुरु झाली.

ते कळताच काही सैनिक किल्ल्याच्या तटावर चढून गेले. कोणत्याही कारणांसाठी मरालद्विपाचे सैन्य हरले तर नगराची रक्षा करण्यांकरिता आधीपासूनच सावधानतेचा इशारा देण्यासाठी काही सैनिक बुर्जांवर पाठविण्यात आले. त्यातीलच एकाला मंत्र्यानी बोलांवून युद्ध समाचार पोहोचवण्यासाठी राजाकडे पाठवले.

समुद्रामध्ये दोन्ही नौकादलाचे घनघोर भीषण युद्ध चालू होते. दोन्ही सैन्यातील लोक प्राणाची पर्वा न करता लढत होते. दोन्हीं सैन्यातल्या लोकांनी बाणांना कपडे गुडांळून त्यावर तेल ओतून आग लावून एकमेकांच्या बोटींवर टाकण्यास सुरवात केली. ज्या ज्या बोटींना आग लागत होती त्या त्या बोटीतील सैनिक समुद्रात उड्या मारून जीव वांचवू लागले. परंतु शत्रुपक्षातील सैनिक जळणाऱ्या बोटींची आग विझवून त्याच्यावर आपला अधिकार गाजवू लागले.

किल्ल्याच्या बुरुजावरून हे सर्व दृष्य पहात असलेल्या मंत्र्याची जय मिळण्याची आशा थोडी थोडी कमी होवू लागली. मंत्रीच्या मनात एकच आशा निर्माण झाली की, गुप्तचरांनी भरलेली एक नांव जर समुद्रपार गुप्तपणे गेली तर कुंडलीनीद्विपात होणारी प्रजेची हालत व नरवाहन मिश्रची राज्यव्यवस्था व तेथील जनतेवर होणारा त्याचा परिणाम कळू शकेल. परंतु मंत्री खूप काळजीत पडला.

एवढ्यात मंत्र्याच्या पाठीमागुन कोणी आल्याचा आवाज आला. त्याने मान वळवून पाठीमागे पाहिले तेव्हां राजाकडे युद्धांचा



समाचार द्यायला पाठवलेला सैनिक धांपा टाकीत त्याच्याकडेच येत होता.

"काय झाले ? धांपा टाकीत कां. आलास ? मंत्रीनी काळजी वाटून विचारले.

"राजाचा काहीच ठावठिकाणा लागत नाही !" सैनिकांनी घाबरलेल्या स्वरांत सांगितले.

"हि गोष्ट तुला कोठून समजली ?" मंत्रीनो कठोर आवाजांत विचारले.

"महापुरुषा, मी राजमहालात जाऊन पाहिले तेव्हां तेथे खूपच गोंधळ उडालेला दिसला दासीनीं येऊन सांगितले की, काही वेळापूर्वीच राजाच्या महालातून एक कर्कश कानठळी बसणारा आवाज आला. तेव्हां राजभटांनी सर्व राजमहालात शोधून पाहिले परंतु राजा कोठेही दिसला नाही." सैनिकांनी एका दमात ही गोष्ट मंत्रीला सांगितले.

राजाच्या अंगरक्षकाचे नाहीसे होण्याचा समाचार ऐकताच मंत्रीच्या मनांत राजाला काहीतरी दगाफटका बसला असावा अशी शंका निर्माण झाली. मंत्रीनी विचार केला की, बहुदा कुंडलिनीराज्यावर अधिकार करणारा राजा नरवाहन मिश्र ह्यांनीच काहितरी नाविन षडयंत्रांचा प्रभाव करून राजाला पळविले असणार. त्याच बरोबर मंत्र्याला असापण एक विचार आला की जेव्हां राजा राजमहालात दिसत नाही तेव्हां किल्ल्याच्या आजूबाजूलाच कोठेतरी राजाला पळवून नेले असणार.

अशी शंका येताच मंत्री आपल्या बरोबर कांही सैनिक घेऊन किल्ल्याच्या तटाबाहेर आला आणि बुरुजाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत धावत जावून वांकून खंदकाकडे पाहू लागला तेव्हां खंदकापासून थोडया अंतरावर किल्ल्याच्या भिंतीवरुन एक दोरीखाली लोबंत असलेली दिसली तसेच दोरीवरुन तीन माणसे उतरतानां पण दिसली.

त्याच क्षणी मंत्रीच्या जवळच उभा असलेला सैनिक जोराने किंचाळला—





"महामंत्री ते पहा, महाराज व त्यांचे अंगरक्षक !"

आता काय केले पाहिजे ? मंत्र्यासमोर एक गहन प्रश्न उभा राहिला ! पाहिजे तर तो किल्ल्याच्या भिंतीवर लटकणारी दोरी कापून टाकू शकला असता, परंतु त्याच बरोबर राजा आणि त्याला बंदी बनवून नेणारे त्याचेच द्रोही अंगरक्षक एकसाथ खंदकात पडतील तर असे न करता नसते सध्या पहाण्याशिवाय गत्यंतर नाही ते दोन्ही अंगरक्षक राजाला बंदी करून बेरोकटोक दुष्मनाच्या राज्यात घेऊन जातील.

मंत्री महाशय सतत ह्याच विचारात मग्न असताना एक सैनिक मोठ्याने ओरडला—"महामंत्री तिकडे पहा ! खंदकाच्या किनाऱ्यावर तीन घोडे जय्यत तयार ठेवलेले दिसत आहेत."

मंत्रीनी आपली नजर तिकडे वळविली तेव्हां लगाम कसून तयार राहिलेले घोडे त्यांना दिसून आले. तेव्हां मंत्रीला कळले की, राजाला बंदी करण्याकरिता नरवाहन मिश्रनी आधीपासूनच आपले सेवक राजमहालात पाठवले होते. त्यांनी समुद्राकडे दूरवर पाहिले तेव्हां गुप्तहेरांनी भरलेली बोट किनाऱ्या नजवीक येऊन पोहोचत होती. आणि कुंडलिनी द्वीपाच्या दोन बोटी सुद्धां वेगाने किनाऱ्याजवळ येत होत्या.

मंत्रीला वाटू लागले की आता परिस्थिती फारच कठिण झाली आहे. त्यांनी सैनिकांकडे वळून आदेश दिला—"तुमच्या पैकी चार पांच सैनिकांनी घोड्यावर स्वार होवून राजाच्या रक्षणार्थ जा ! इथल्या झालेल्या वाईट परिस्थितीची खबर बाहेरच्या जनतेला कळून देऊ नका. जाण्याची घाई करा."

मंत्रीचा इशारा मिळताच कांही सैनिक किल्ल्याच्या बुरुजावरून खाली उतरून घोडे घेऊन राजाच्या रक्षणार्थ निघाले. मंत्रीनी खंदकाच्या बाजूला पाहिले. तेव्हां राजाला

त्याचे द्रोही अंगरक्षक खंदक पार करून घोडे जेथे तयार ठेवले होते त्याबाजूला घेऊन चाललेले दिसले.

राजा पुढे चालत होता व त्याच्या मागून अंगरक्षक हातात तलवारी घेऊन त्याच्या पाठोपाठ चालत जात होते. थोड्या वेळातच त्यातल्या एका अंगरक्षकानी राजाला एका घोड्यावर चढवले व ते आपल्या घोड्यावर राजाचा घोडा निघताच चढून बसेल आणि सर्वजण निघाले. मंत्र्यानां कळले की, ते सैनिक राजाला समुद्र किनाऱ्याजवळच घेऊन जात आहेत.

इकडे राजाच्या रक्षणार्थ निघालेले चार सैनिक घोड्यावर बसून किल्ल्याच्या प्रवेश दारांतून बाहेर पडून राजाला बन्दीस्त करून घेऊन चाललेल्या राजद्रोह्याच्या बाजूला आपले घोडे पिटाळू लागले. तेव-ढ्यात घोड्यांच्या टापांचा जवळून येत असलेला आवाज ऐकून राजाच्या द्रोह्यांनी मान वळवून मागे पाहिले व राजाच्या रक्षणार्थं येत असलेले सैनिक पाहून त्यांनी राजाच्या पाठीला तलवारीचे टोक भिडवून राजाला आपल्या घोड्याला वेगानी नेण्याचा इशारा देवू लागले.

किल्ल्याच्या बुरुजावरून हे सर्व दृष्य पाहून व राजाला बन्दिस्त करून घेऊन चालले पाहून त्यांनी काहीक्षण राजाकडे दृष्टी स्थिर ठेवून पाहिले, आणि समुद्र-किनाऱ्याजवळ जवळ येणाऱ्या शत्रूच्या बोटी बघून त्यांनी जोरांत हांका मारत विचारले–"मराल देवी ! तू सुद्धां आपल्या भक्तांची अशीच कठोर परिक्षा घेत आहेस कां?" असे म्हणत छातीवर हात ठेवून मंत्रीनी आपली दृष्टी आकाशाकडे लावली.

दुसऱ्याच क्षणी आकाशात मोठे मोठे-काळेढग जमून आले व भयंकर अशा गर्जनेनी व विजांच्या चमकांनी काही क्षणातच पाऊस कोसळू लागला. अश्या भयंकर आवाजानी मरालद्वीपचा परिसर दुमदुमू लागला. मंत्री आश्चर्य चकित होवून उभ्या उभ्याच हा प्राकृतिक बदल पाहू लागला. (पुढील अंकी)



# नटाचा प्रभाव

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले व नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा! काही लोक आपल्या उपजिवीके-साठी म्हणून जो व्यवसाय करतात त्यात अपार धन-दौलत व प्रतिष्ठा मिळवूनही तिचा अचानक त्याग करून निघून जातात. ह्याचे उदाहरण म्हणून मी कृष्णकांत नावाच्या एका प्रसिद्ध नटाची कहाणी तुला सांगतो ती लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

पुष्पक देशाचा राजा पुष्पदंत खूप अत्याचारी होता. तेव्हां गजेन्द्र नावाच्या एका तरुणाने प्रजेशी संगनमत करून त्यांच्या सहकार्यांनी राजाला गादीवरून खाली उतरवले व राज्य करू लागला. पुष्पक



राज्यावर गजेन्द्रचे वारसच आता राज्य-कारभार पहात. गजेन्द्रराजाबद्दल बऱ्याच कविनी व लेखकांनी कविता व कथा लिहिल्या आहेत.

पुष्पक देशात कृष्णकांत नावाचा प्रसिद्ध नट होता गजेन्द्रच्या अद्भुत साहस शौर्याच्या कारकिर्दिमूळे कृष्णकांत त्यांकडे आकृष्ट झाला. त्याने स्वतःहानी एक नाटक लिहीले व गावातल्या कांही तरुणांना गोळा करून ते नाटक बसवले व गावोगांव जाऊन नाटक प्रदर्शित केले. गजेन्द्रच्या पार्टचा तो स्वतःहा अभिनय करी लोकही त्याचे नाटक उत्साहानी पहात, व म्हणत कृष्णकांतमूळेच पूर्वराजा गजेन्द्रच्या पराक्रमाच्या व देशप्रेमाच्या गोष्टी जनतेला समजत आहेत.

राजा नरेन्द्र ह्याला कृष्णकांत बद्दल माहिती मिळाली राजानी त्याला दरबारात बोलावून त्याचे नाटक दाखविण्यास सांगीतले नाटक पाहून राजा खुष झाला. त्याचे अभिनंदन करून त्याची राज्यदरबारात अभिनेता म्हणून नियुक्ती केली. कृष्णकांत तसा राजदरबारी होता. सहा महिने हिंडून गावोगांव तो आपले नाटक प्रदर्शित करत असे.

एकदा एका गावांत आपले नाटक दाखवित असताना, एक तरुणी त्याच्याकडे आली व स्वतःहा बरोबर एक मुलगी आणुन तिच्याकडे बोट दाखवून म्हणाली ही माझी बहिण आपल्याबरोबर लग्न करू इच्छित आहे. आपल्या अभिनयावर ती खुष आहे तेव्हां तुम्हांला एक विनंती करते तुम्ही आमच्या गावी येऊन माझ्या आई-वडिलांपाशी लग्नाची बोलणी करावीत.

त्यानंतर तिने आपले नांव, गावं पत्ता व आपल्या आईवडिलांचे नावं सांगून शेवटी "माझ्या बहिणीचे नांव मालती आहे असे सांगितले!"

मालती दिसायला अत्यंत सुंदर होती. त्यामूळेच कृष्णकांतने त्यांच्या निमंत्रणाचा स्विकार केला. तो मालतीच्या गांवी





जाण्याकरिता निघाला. तो रस्ता जंगलातून होता. कृष्णकांतची सर्व नाटक मंडळीपण त्याच्या बरोबर होती.

मालतीच्या आईवडिलांनी कृष्णकांतचा मोठ्या प्रेमाने आदर-सत्कार केला. ते म्हणाले–"तुम्ही आमचे जांवई होणार परंतु आमची एक अट तुम्हांला मान्य करावी लागेल ती म्हणजे ह्यापुढे तुम्ही नाटके वगैरे बंद करून घरीच राहिले पाहिजे."

मालतीच्या आई-वडिलांची भरपूर इस्टेट होती. व्यवसाय होते ते होणाऱ्या जावयांनी घरातंच राहून त्याच इस्टेटीची व मालमत्तेची देखभाल करावी असे त्याना वाटले.

परंतु कृष्णकांतने मालतीला सांगितले– "मी एक प्रसिद्ध नट आहे. माझ्या कलेला मी असे व्यर्थ सोडून देणार नाही. तुझ्या आई-वडिलांना तर मी नाटक केलेले अजिबात चालणार नाही तरी अश्या अवस्थेत मी कसा राहू. तुझा काय विचार आहे?"

मालतीने पण स्पष्टपणे सांगितले तुमचे नाटक करणे मलाही पसंत नाही. त्यांनी तिला सात दिवसाची मुदत दिली व भेटण्याचे सांगून तो आपल्या गावी निघाला. ह्यावेळेस तो एकटाच प्रवास करू लागला. तेव्हां जंगलातल्या चार दरोडेखोरांनी त्याला वाटेत अडवले कृष्णकांतनी ह्यावेळेस जरीचे किमती कपडे अंगावर घातले होते. त्याच्या हातात सोन्याचे कडे व गळयांत सोन्याची साखळीपण होती. दरोडेखोरांना पहाताच त्याला भितीने कांपरे भरले.

तेव्हां एका दरोडेखोराने त्याला सुरीचे धारदार टोक दाखवून दरडावून सांगितले लवकरात लवकर तुझ्या अंगावरचे सर्व सोन्याचे दागीने व जरीचे कपडे आमच्या स्वाधिन कर.

त्याच क्षणी अनपेक्षितपणे एक तरुण युवक तेथे येऊन पोहोचला तो निःशस्त्र होता. त्यांनी मांडी ठोकून दरोडेखोरांना



बोलावले कृष्णकांतने त्या तरुणाला पूर्वी कधीही पाहिले नव्हते.

तो तरुण दरोडेखोरांबरोबर लढू लागला. तो एक निपुण असा मल्लयोध्या सारखा त्याच्या बरोबर लढत होता. शेवटी एका दरोडेखोराच्या हातून त्याने तलवार हिसकावून घेतली. ते पहाताच बाकी सर्व दरोडेखोर घाबरुन पळून गेले.

"तुम्ही कोण आहात? ऐन वेळेस देवासारखे धाऊन येऊन तुम्ही मला वाचवलेत." कृष्णकांतने त्या तरुणास विचारले.

"माझे नाव एकाग्र आहे. मी यथाशक्ति अन्याय आणि अत्याचार ह्यांना आळा घालण्याकडे माझे लक्ष केंद्रित केले आहे." त्या तरुणाने उत्तर दिले.

"तुम्ही इथे ह्यावेळेस कसे आणि कां आलात?" कृष्णकांतने विचारले.

"मी असे ऐकले आहे की; शेजारच्या-गावांत एक कृष्णकांत नावाचा प्रसिद्ध अभिनेता आला आहे तरी त्याच्या दर्शनाच्या इच्छेने मी निघालो." एकाग्रने उत्तर दिले.

कृष्णकांतने प्रथमत: आपली ओळख करून देण्याचा विचार केला. परंतु फिरून त्याला त्या तरुणाची गंमत करण्याची इच्छा झाली. "त्या फालतू नाटके करणाऱ्या नटाची आणि तुमची काय बरोबरी?"

"ते फक्त नाटकच करणारे नाहीत तर एक अवतार पुरुष आहेत. गजेन्द्राच्या रूपात त्यांना मी पाहिले त्यावेळेस माझ्या शरिरात जी एक प्रकारची भावना उसळली? त्याच दिवशी मी निश्चय केला की; गजेन्द्रासारखीच दुःखी जनतेची मी मदत करीन. मी कृष्णकांतना भेटून त्यांना विनंती करणार आहे की इतरानांही आपल्या नाटकांनी प्रत्येक ठिकाणी दाखवून प्रभावित करावे." एकाग्रनी सांगितले.

तुम्ही हे नाटक पाहिलेत तेव्हांच ही गोष्ट त्यानां कां नाही विचारलीत? कृष्णकांतने विचारले.

"प्रथमत: मी गजेन्द्राच्या सारखाच तयार होईन असे वाटले मी जे साहसाचे काम केले आहे. त्यांची प्रशंसा होईल ह्या अनुभवामुळे मला त्यानां भेटण्याची प्रेरणा उत्पन्न झाली म्हणून मी त्यानां भेटण्यास जात आहे." एकाग्रने सांगितले.

हे ऐकून कृष्णकांतचा चेहरा पांढरा पडला. तो म्हणाला—"मी पण त्यानां भेटण्याकरिता त्या गांवी गेलो तेथे ते नव्हते. ते राजधानीच्या ठिकाणी गेले आहेत. त्यांनी एकाग्रला सांगितले त्यानंतर कृष्णकांत मालतीच्या गांवी पोहोचला व तिला म्हणाला—"मालती तुला मिळवण्या-करिता ह्यापुढे मी नाटके करण्याचे सोडून दिले आहे.

इथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! कृष्णकांतने तांतडीने आपला निर्णय बदलून मालती बरोबर विवाह बेत कां आंखला? तो नाटक करण्याला कंटाळला होता कां? त्याला यशप्रतिष्ठा ऐवजी उपेक्षाच अनुभवायला मिळाली? यां शंकेचें समाधानकारक उत्तर माहित असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

त्यावर विक्रमादित्य म्हणाला—"त्यांनी गजेन्द्राच्या रुपानी कित्येक तरुणांना अन्याय आणि अत्याचार ह्यावर बंधन घालून शूर वीर बनवले. परंतू जेव्हां दरोडेखोर समोर आले तेव्हां एखाद्या भित्र्या पळपुट्याप्रमाणे त्याची स्वत:ह्याची स्थिती झाली. गजेन्द्राचा पार्ट करून सुद्धा त्याच्यावर त्याचा प्रभाव पडला नाही तेव्हां हे जनतेला समजेल, कारण आज-पर्यंत तो गजेन्द्रांचा अभिनय करुनच स्वत:ह्याचा प्रभाव पाडत होता. तेव्हां तो प्रभाव नाहीसा होइल ह्या भितीने त्याने मालतीशी विवाह करुन अज्ञात रुपाने जिवन जगण्याचा निश्चय केला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# खरे कारण

एका जमीनदाराकडे एक माणूस स्वयंपाकी म्हणून लागला. जमिनदाराला माणूस खूप भोळा असावा असे वाटले. जमिनदाराने त्याला अनेक प्रश्न विचारून त्याच्याकडून माहिती मिळवण्याचा प्रयत्न केला. माहिती पुरेशी न मिळाल्याने तो नेहमी शंकीत राहिला शेवटी याने स्वयंपाक्याला विचारले–तुम्ही सांगता बऱ्याच ठिकाणी स्वयंपाक केला आहे. तर प्रत्येक ठिकाणची नोकरी सुटण्याची काय कारणे? तुम्ही नेहमी गैरहजर रहात होता का?

"स्वयंपाकी आणि तो सुद्धा नेहमी गैरहजर राहिला तर घरच्यांना किती त्रास सोसावा लागेल हो?"

"स्वयंपाक करतांना कसा झाला हे चाखून पहात सर्व पदार्थच संपवून टाकत असाल अशी काही वाईट सवय असेल?" जमिनदाराने विचारले.

स्वयंपाक करताना किती खाऊ शकेन? आणि घरातल्या सर्वांनी खाऊन जे उरते ते सर्व खातोच की?

"स्वयंपाकाला लागणारे सामान चोरण्याची सवय असेल." जमिनदारानी विचारले.

"जेव्हा सर्व स्वयंपाकघर माझ्याच ताब्यात असते तर मी असे का करीन?"

"सर्व ठिकाणची कामे तुम्ही सोडून का दिलीत?" जमिनदाराने खोचून विचारले.

"माझे मन स्थिर रहात नाही, मी जेव्हा तेव्हा विसरुन जातो की; मी एक स्वयंपाकी आहे आणि मग बागकाम किंवा घोड्याच्या खरारा करण्याकरीता निघून जातो तेव्हा ह्या कारणांनी माझी नोकरी नेहमी सुटते. स्वयंपाक्यानी उत्तर दिले.





# मंत्र्याचे पद

चित्रपुरी राज्याचा मंत्री सोमेश्वर हा दोन पिढ्यांपासून तेथील राजांना योग्य अशा राज्यकारभारात मार्गदर्शन करीत असे. तो एक सार्थ मंत्रीपद विभूषित होता.

जेव्हां सोमेश्वर सत्तर वर्षाचा झाला. तेव्हां त्यांनी मंत्री पदावरून नियुक्त होत असल्याचे राजा अवंतला सांगितले. चार वर्षापासून राजा अवंत राज्यकारभार पाहात होता.

अतिशय योग्य आणि राज्यावर भक्ति असलेल्या अश्या वृद्धमंत्र्याला नियुक्त होत असतांना पाहून राजाला खूप वाईट वाटले. तरी पण त्यांनी दिनवाणेपणाने सांगितले. "महामंत्री आपणच आपल्या जागेवर योग्य अश्या मंत्र्याची नेमणूक करावी."

सोमेश्वरानी राजाला सांगितले आमच्या पिढीची माणसे आता राहिली नाहीत नविन पिढीची सुरवात आहे. तरी नविन पिढीबद्दल शक्ति व सामर्थ्य मी जाणत नाही तरी आपणच विचारपूर्वक मंत्री पदाची निवडणूक करावी.

तेव्हां राजानी गावांत सगळीकडे दवंडी पिटवीली. योग्य मंत्री पदाची निवडणुक, ती दवंडी ऐकून राज्यातील शिकलेले लोक मंत्रीपदाच्या निवडणुकी करिता तेथे जमले. त्यात अनंतवर्मा, कपिलनाथ आणि राममिश्र ह्या नावांचे तरुण राजाला मंत्रीपदाला योग्य होतील असे वाटले.

राजा अवंतने खूप विचार करून एक निर्णय घेतला व सर्वांच्या आधी राजानी अनंतवर्माला आपण बोलावले असल्याचा निरोप धाडला. अनंतवर्मा आल्यावर राजाने त्याला प्रश्न विचारला मंत्रीपदावर असताना तुमच्याकडे एक गरिब कुटूंब आले व त्यांनी तुम्हाला आम्ही दोन

दिवसांपासून उपाशी आहोत आम्हांला काहितरी मदत करा म्हणून सांगितले तर तुम्ही त्यावेळेला काय कराल?''

अनंतवर्मा थोडावेळ विचार करुन म्हणाला–''महाराज मी त्या गरिब कुटूंबाला अशी मदत करेन की ते कुटूंब कधीही उपाशी राहाणार नाही.''

त्यानंतर राजांनी कपिलनाथला तसेच बोलावणे धाडून तोच प्रश्न केला व सांगितले तेव्हां कपिलनाथनी थोडा विचार केला–''महाराज मी प्रथम त्या कुटूंबाविषयी माहिती काढून त्यांना मदत करीन त्याच बरोबर राज्यात इतरत्र उपाशी कोणी सापडले तर त्यांनाही उपाशी सोडणार नाही.'' असे कपिलनाथनी सांगितले.

मग राजांनी राममिश्रलापण तसेच बोलावणे पाठवून तोच प्रश्न केला. तेव्हां राममिश्र म्हणाला–''महाराज, जर मी मंत्रिपदावर असतांना राज्यात कोणी उपाशी, अनवाणी, आणि कपडे नसलेला आहे अशी जर मला माहिती मिळाली तर मी माझ्या मंत्रीपदाचा राजीनामा देईन.'' हे ऐकून राजाला आश्चर्य वाटले व त्यांनी विचारले–''आपल्या मंत्रिपदाचा राजीनामा द्याल? असे का?''

आपल्या अनेक वर्षांच्या कारकिर्दीत व वृद्ध महामंत्र्यांच्या मार्गदर्शनामुळे आजपर्यंत आपले राज्य सुसंपन्न राहिले आहे. तेव्हां अश्या राज्यव्यवस्थेमूळे व आजपर्यंत कोणी उपाशी, भुकेला वस्त्र नसलेला असा नाही. तरी अश्या अवस्थेत मी मंत्री झाल्यावर जर तशी परिस्थिती निर्माण झाली तर मी त्या पदाला लायक नाही असे समजून मी त्याचा त्याग करीन आणि त्या पदाकरीता कोणी योग्य व समर्थ व्यक्ति शोधून काढण्याचा प्रयत्न करीन. राममिश्रनी उत्तर दिले.

त्याचे हे उत्तर ऐकून राजाला खूप आनंद झाला. व त्या दिवसांपासून राममिश्रला चित्रपुरीच्या मंत्रीपदाचा मान मिळाला.





# जावयांवरचे संकट

सकाळी उठल्या उठल्याच आपली सासु व मेहुणी येणार असल्याची बातमी ऐकून नारायणचा चेहरा पाढंरा पडला. नारायणनी दहा दिवसांपासूनच आपली पत्नी रुक्मिणी हिच्यासह शहरात घर घेवून संसार थाटला होता.

नारायणनी आपल्या बायकोला विचारले तुझ्या घरातील लोकांना दहा दिवसात तुला पाहिले नाही तर कासावीस व्हायला होते कां?

"तसे काही कारण नसावे, कारण माझ्या आईची तब्बेत ठिक नसल्याचे मी ऐकले तेव्हां तिने हवापाणी बदलण्याचा विचार करुन इकडे येण्याचे ठरवले असावे. तसाच माझ्या वडिलांनी विचार केला की माझी बहिण शहरात राहीली तर काही चांगली स्थळे येऊन लग्न जमण्याची पण शक्यता आहे.'' असे रुक्मिणीनी हसून उत्तर दिले.

हे ऐकतांच नारायणचा जीव खालीवर होऊ लागला, कारण त्याला जो पगार मिळत होता त्यात चार जणांची पोटे भागण्यासारखी नव्हती. परंतु नारायण संकोची वृत्तीचा असल्यामुळे तो गप्प राहिला.

थोड्या वेळांनी नारायणची सासू व मेव्हणी आली. घरात पोहोचते नाही तोच सासूनी दमलागल्याचा आव आणून एक ग्लासभर दूध मागून प्याले. व नंतर म्हणाली–''मुली, तुझे वडिलच सांगत असत की, आपल्याला मुलगा नाही झाला तर काय झाले? जांवईच आपला मुलगा आहे. तुझ्या वडिलांनी आपल्या मुलीचे लग्न करुन देण्याची जबाबदारी व माझ्या करीता डॉक्टरी इलाज ह्या करितां दोघींचा भाइ आपल्या जावयावर टाकला आहे.

मेव्हणीच्या लग्नांची जबाबदारी ऐकताच नारायणचा जीव घाबरून गेला. तरीपण

रा. रा. पंडीत

हसत हसत म्हणाला–"हि काय मोठी जबाबदारी आहे!"

"आई, मी घरातून निघतांनाच म्हटले नव्हते कां? की माझ्या बहिणीचे मन म्हणजे अमृतासारखे आहे मेहुणे तर साक्षात देवच, देव!" असे म्हणतच ती कॉटवर उडी टाकून बसली. एक आठवडा होऊन गेला. परंतू सासूच्या आजाराचे काही एक कारण हाती लागेना तीला उत्तमोत्तम जेवण दिले जात होते. तरी पण ती असा व ही एक आवं आणत होती की जणूकांही दिवस भर उपवास होत आहे. तसा नारायण शहरात मध्यवस्तीत रहात होता. त्यामुळे तीचा आजूबाजूच्या चारचौघींना जमवून गप्पा-टप्पात वेळ छान जात होता.

महिना संपत नाही तोच नारायण इकडून-तिकडून कर्ज काढे. एके दिवशी त्याच्या मित्रांनी त्याला सांगितले–"हे बघ, नारायण वाईट संगतीमुळे माणसाचा नाश होवू लागतो. तेव्हां तू काय तो विचार कर."

नारायणनी आश्चर्यचकित होवून विचारले–"तुम्हांला कोणी सांगितले की मी वाईट मार्ग आक्रमू लागलो आहे म्हणून?"

"तू जे कर्ज घेत आहेस त्यावरूनच कळते आहे?" वीरभद्रनी उत्तर दिले. त्यावर नारायणनी त्याची सर्व हालत वीरभद्रला सांगितली वीरभद्रनी विचार केला व सांगितले–"हे बघ, शहराच्या एका बाजूला माझ्या कांकाचे घर आहे. ते तू घे, भाडे सुद्धा एकदम स्वस्त आहे." आणि त्यापासून होणाऱ्या फायद्याच्या गोष्टी समजावून सांगितल्या.

दुसऱ्याच दिवशी नारायणनी घरमालकांनी घर सोडायला सांगितले असल्याचे सांगितले व तो सहकुटूंब सहपरिवार मित्राच्या काकाच्या घरी येऊन राहू लागला. त्या घरात विहीर नव्हती तेव्हां सर्व घरातील पाणी गल्लीच्या कोपऱ्यावरच्या नळावरुन भरावे लागत होते.

जवळपासच्या बायकांबरोबर गप्पा मारून वेळ काढावा म्हटल्यास आजूबाजूला कोणीच नव्हते त्यामुळे नारायणच्या सासूचा वेळ मोठा कठीण जावू लागला मेव्हणीनी तर जंगलातल्या घरात आम्ही वेळ कसा काढू म्हणून तक्रार सांगू लागली. तेव्हां रुक्मिणीनी घरातील कामकाज सुद्धां त्यांना सांगून करून घेऊ लागली.

"साहेब, आपण सांगितलेला उपाय अतिशय उत्तम तऱ्हेने लागू पडला असे नारायणनी वीरभद्रची स्तुती करत सांगितले.

मित्रा, अजून काहींच घडले नाही तर मी संध्याकाळी तुमच्या घरी येतो तेव्हां तुझ्या सासुला माझी ओळख मी एक डॉक्टर आहे अशी करून दे मग बघ.

संध्याकाळी नारायण वीरभद्रला घरी घेवून आला. वीरभद्रनी नारायणच्या सासुला तपासण्याचे खोटे नाटक केले व म्हणाला–"आई, आपली तब्येत एकदम बिघडली आहे. तेव्हां कमीतकमी तीन महीने आपल्याला मीठ-मिरची व मसाले खाता येणार





नाहीत तेव्हां उकडलेल्या भाज्या व मूठ-भर तांदूळांचा भात एवढेच खावे लागणार आणि जर का हे पथ्य तुम्ही पाळले नाहीत तर त्यातून भयंकर काहीतरी होईल. तेव्हां जशी तुमची इच्छा.

असे ऐकताच नारायणची सासू गर्भ-गळीत झाली. नंतर नारायणनी आपल्या मेव्हणीला आपल्या जवळ बोलावले तेव्हां वीरभद्र म्हणाला–"हे बघ मुली! अश्या लहान वयात लठ्ठपणा फार वाईट तुला त्यामुळे हृदयविकार होण्याची शक्यता आहे. नारायण, तीला रोज दोन, तीन मैल पळायला पाठवत जा आणि सांग भात खाणे एकदम बंद, पण पोळी खायला हरकत नाही. असे सांगून वीरभद्र निघून गेला.

वीरभद्रनी सांगितलेला उपाय एकच आठवडाभर चालला. मुलीनी आपल्या आईला सांगितले–"आई, इथे अजून राहिले तर माझ्या लग्नाचे तर दूरच राहीले पण मी मरून जाईन असे वाटते.

माझी परिस्थिती पण तुझ्याहून काही कमी वाईट नाही. असे म्हणत आई डोळे पुसू लागली. ते ऐकून नारायण म्हणाला–"हे तुम्ही असे काय म्हणू लागला आहात? इतक्या लवकर चाललात सासऱ्यांनी तुमच्या दोघींची जबाबदारी माझ्यावर टाकली आहे. तेव्हां त्याचे काय होणार?

तेव्हां सासुने चिडून सांगितले–"मुला तुला वेड तर नाही लागले? मुलीचे लग्न आणि पत्नीचा इलाज करण्याची जबाबदारी तुझ्या सासऱ्याची आहे. आणि स्वतःहाची जबाबदारी दुसऱ्याच्यावर लादून ती करणारा तुझ्यासारखा मूर्ख मी अजुनपर्यंत तरी पाहिला नाही." असे म्हणतच सासुने एक भाड्याची गाडी बोलावली व त्यात आपण आपल्या मुलीलाबरोबर बसवून घेऊन गावी निघुन गेली.

ह्यानंतर दुसऱ्याच दिवशी नारायण आपल्या उपयुक्त अश्या पूर्वीच्या जुन्या घरांत आपल्या बायकोसह येऊन राहू लागला.





# मंत्राचा महिमा

**ज्या** वेळी ब्रह्मदत्त काशीवर राज्य करत होते. त्यावेळेस बोधिसत्वानी एका गावांत चाभांराच्या रूपानी जन्म घेतला. आपला व्यवसाय करत असतानांच ते एका ऋषीच्या आश्रयाला जाऊन राहिले व त्यांच्याकडून त्यांनी एक अपूर्व असा मंत्र शिकून घेतला.

त्या मंत्राच्या प्रभावानी बोधिसत्व कोणत्याही वेळी कोणत्याही आंब्यांच्या झाडावर आंबे लागल्याचे दाखवू शकत होते, ते रोज सकाळी एक वाकडी काठी खांद्यांवर घेऊन जगंलातील एखाद्या आंब्याच्या झाडा-पाशी जात व झाडांपासून सात फूटावर उभे राहून एक मंत्र म्हणत. त्यानंतर त्या फांद्यांवर मंत्रून ठेवलेले पाणी शिंपडत दुसऱ्या क्षणीच त्या फांद्यातून नविन कोंब फूटन त्यावर हळूहळू फूले येऊन आंबे लागत.

एक दिवस बोधिसत्व असेच जंगलात जाऊन आंब्यांच्या झाडावर फळे उगवण्याचे काम करित असतानांच काम मिळविण्याचा शोध करित करित एक सुनंद नावांचा तरुण ब्राह्मण त्याना येत असतांना दिसला. तो तरुण जंगलाजवळच असलेल्या अग्रहार नावांच्या गावचा रहिवासी होता. त्याला लिहायला वाचायला चांगले येत नव्हते. परंतु तो नेहमीच असे स्वप्न बघत असे की, कोणत्यातरी देवीची कृपा होऊन आपण पंडित व्हावे व सोने चांदी संपत्ती मिळून आपण आयुष्यभर वैभवात रहावे. बोधिसत्व जेव्हां जंगलातून घरी परत आले. तेव्हां त्या तरुणानी त्यांच्या हातातील वाकडी काठी व आंब्यांनी भरलेली टोपली आत घरामध्ये नेऊन पोहोचवली व नंतर आपली ओळख करून देत त्यांच्या घरातील सर्व कामे मोठ्या आशेने करण्याचे धाडस दाखवले.

जातक कथा



थोडे दिवस लोटले. एके दिवशी बोधिसत्व आपल्या बायकोला म्हणाले–"तुला माहित आहे का? हा मुलगा का येऊन राहिला आहे?" त्याच्या मनांत बाराहि महिने आंब्याची निर्मिती करण्याचा मंत्र शिकण्याची इच्छा आहे. हा खूप लोभी आहे. मी त्याला हा मंत्र शिकविला तर तो मंत्र ह्याच्या थोडेच दिवस कामास येईल.

सुनंदच्या कामावर बोधिसत्वांची बायको खूप आनंदीत होती. तिला सुनंदची दया आली. तीने एक दिवस आपल्या पतिला सांगितले–"हा मुलगा आपल्या घरचे सर्व कामकाज करतो. तेव्हां मंत्र त्याला कां उपयोगी पडणार नाही आणि जर मंत्र उपयोगी पडणार नसला तर तो त्याचा दोष होईल. तेव्हां तुम्ही त्याला जरूर मंत्रविद्या शिकवा."

बोधिसत्वांनी थोडा वेळ विचार केला व त्यांनी आपल्या पत्नीच्या विचाराशी सहमत दाखवून त्याला मंत्रविद्या शिकविण्याचे ठरवले.

दुसऱ्या दिवशी बोधिसत्वानी त्या मुलाला बोलावून घेतले व म्हणाले–"मुला, हा एक अपूर्व असा मंत्र आहे. तर तू ह्या मत्राचा उपयोग योग्य कारणासाठी केलास. तर तुला पुष्कळ धन मिळून तू सुखी होशील. परंतु एक गोष्ट लक्षात ठेव कोणीही तुला या मंत्राचे रहस्य विचारले तर ते तू कोणालाही सांगता उपयोगी नाही आणि जर का तू ते रहस्य सांगितलेस तर त्या मंत्राचा महिमा नाहिसा होईल" असे समजावून सांगून बोधिसत्वानी त्या मुलांस मंत्रोपदेश दिला.

मंत्रविद्या शिकून सुनंद आपल्या घरी परत आला व आंब्याची सृष्टी करून धन कमावून तो दिवस घालवू लागला.

अशा तऱ्हेने आंब्यांचे दिवस नसतांनाही जे आंबे विकले जात होते त्यातील एक आंबा काशीचा राजा त्याच्या हाती गेला. त्याला अत्यंत आश्चर्य वाटले. त्यांनी हा आंबे निर्माण करणारा कोण आहे? त्याचा ठावठिकाणा शोधून त्याला बोलावणे धाडले. राजानी सुनंदला विचारले–"तू आंब्याचे दिवस नसतांनाही आंबे कसे निर्माण करू शकतोस? हि देवी शक्तिही नाही आणि मानवी शक्तिपण नाही. खरे काय ते कारण सांग."

सुनंत अत्यंत आनदन म्हणाला–"राजा, मीच ते आंबे ऋतु नसतांनाही उत्पन्न करू शकतो. त्याची निर्मीती मी स्वतःहाच करतो त्याचा एक महामंत्र आहे. त्या मंत्राच्या महिमेमूळे मी आंब्यांचा ऋतु नसतांनाही आंबे निर्माण करू शकतो."

हे उत्तर ऐकून राजाला अत्यंत आश्चर्य वाटले व राजा म्हणाला–"अच्छ तर अशी गोष्ट आहे माझ्या मनांत त्या मंत्राची शक्ति स्वतः पहाण्याची इच्छा आहे तर तू माझ्या बागेतल्या आंब्यांच्या झाडावर आंबे निर्माण करून दाखवू शकतोस कां?"

सुनंदने खुशीने होकार दिला. दुसऱ्या दिवशी राजा आपल्या सर्व परिवारासह बागेत येऊन पाहोचला. तेव्हां सुनंद एका आंब्यांच्या झाडापासून सात फूटावर उभा होता. त्याने मंत्रपाठ करून कमंडलूतले पाणी आंब्यांच्या झाडाच्या फांद्यांवर शिपडले तत्क्षणीच शेकडो आंबे झाडावरून खाली पडू लागले.

ही अद्भुत गोष्ट राजा व त्याचा परिवार आश्चर्यचकित होऊन पाहू लागले. ह्या गोष्टीचा राजानी सुनंदची प्रशंसा करून सत्कार केला.



त्यानंतर राजाने सुनंदला विचारले-"असा महति जाणणारा महाज्ञानी कोण आहे?"

सुनंदला काय उत्तर द्यावे कळेना? त्याच क्षणीच त्याला बोधिसत्वानी सांगितलेली गोष्ट आठवली की; त्याचे रहस्य सांगितले की त्या मंत्राचा महिमा नाहिसा होईल. त्यांनी असा विचार केला जी गोष्ट पाठ करून ठेवली आहे ती कशी काय नाहिशी होईल. तेव्हां राजाला मंत्र विद्या कोणा जवळुन व कशी आत्मसात केली त्याचा सारा वृत्तांत सांगितला.

त्यावर राजानी सुनंदचा उपहास केला व म्हणाले-"अरेरे, अशी चांगली महिमा तू एका चांभाराकडून शिकला आहेस चांगला ब्राह्मण वंशात जन्माला येऊन तू इहलोकांच्या सुखाच्या लालसेने स्वधर्मपण विसरून गेलास? ही फार मोठी चूक केली आहेस."

असे राजाच्या तोंडी ऐकताच सुनंद लज्जीत होऊन मान खाली घालून हिमूटपणे घरी निघून गेला.

थोडे दिवस उलटून गेले. एके दिवशी काशीचा राजा त्याच्या मनांत आंबे खाण्याची इच्छा प्रकट झाली. तेव्हां त्यांनी सुनंदला बोलावून घेवून आपली इच्छा सांगितली. त्यावर सर्व लोक राजाच्या बागेत येऊन पोहोचले.

सुनंदने पूर्वीप्रमाणेच आंब्यांच्या झाडापासून सात फूटावर उभे राहून मंत्र म्हणण्याचा प्रयत्न केला. परंतु पाठ केलेला मंत्र त्याला कितीही आठवायचा प्रयत्न केला तरी आठवेना. तेव्हां सुनंदला समजून आले की आपल्या गुरुचे म्हणणे अवमानिले त्याचा हा परिणाम मंत्रविद्या निघून जाण्याशी आहे. म्हणून मंत्राचा महिमा निघुन गेला.

राजांनी आश्चर्यांनी झाडाकडे पाहिले. तेव्हां सुनंदनी राजाला सांगितले-"राजा, मी माझ्या गुरुची आज्ञा मोडली व त्यामुळे मी मंत्रविद्या विसरलो." असे म्हणून चिंतापूर्ण चेहऱ्यांनी सुनंद आपल्या घरी परत गेला.





# भर्तृहरिची गोष्ट

इ. स. सातव्या शतकात भर्तृहरि नावाचा राजा उज्जैनही राजधानी करून राज्य करत होता. तसा तो विलासपूर्ण जीवन उपभोगत होता तरी पण आपल्या राज्यकारभारात न्यायपूर्ण रहात होता.

त्या नगराच्या जवळच्या जंगलात त्यावेळी एक ऋषीमुनी रहात होते. ऐके दिवशी एक विचित्र फळ त्यांना समोर तरंगत असतांना दिसले. थोड्या वेळांनी विचार करून त्यांना वाटले की त्यांच्या ध्यानशक्तिचेच ते फळ असावे.





ते विचित्र फळ खूप शक्ति देणारे असे होते. ते फळ जो कोणी खाईल त्याला शंभर वर्षे तरुण रहाता येईल. मुनीनी विचार केला की राजा भर्तृहरिच हे फळ खाण्यायोग्य आहे विचारपूर्वक त्यांनी ते फळ राजा भर्तृहरिला अर्पण केले.



राजा भर्तृहरि आपल्या छोट्या राणीवर आपल्या प्राणापेक्षां जास्त प्रेम करत असे. तेव्हां राजांनी आपल्या छोट्या राणीच्या अंत:पुरात प्रवेश केला व ते फळ त्यांनी राणीला भेट दिले.

दुसऱ्या दिवशीच राजा शिकार करायला जगलात निघून गेला. शिकार करून परत येत असताना त्यांनां एक घुंघट घेतलेली तरूणी दिसली तिने राजाला आपल्या बरोबर एका निर्जन अरण्यात नेले.





राजाने ताबडतोब ओळखले की ती तरूणी दुसरी कोणी नसून एक सौंदर्यवती नाचणारीण आहे. तीने एक फळ राजाच्या हातात दिले व सांगितले "राजा हे फळ एक अद्भुतशाली आहे. ह्यामुळे शंभर वर्ष तरूण रहाता येते. हे खाण्या योग्यतेची मी नाही आपण हे खाण्यायोग्य आहात." असे म्हणत ती तेथून झटकन निघून गेली.

राजाने मुनिच्या जवळ जाऊन विचारले त्यांनी कोण्या नर्तकीला ते अद्भुत फळ दिले आहे कां ? तेव्हां मुनीने राजाला स्पष्टपणे सांगितले की; तसले फळ एकच आहे. दुसरे नाही





ह्या गोष्टीचे राजा भर्तृहरिला खूपच आश्चर्य वाटले तो तेथील पहाडावरच्या दगडावर बसून विचार करू लागला. की हे विचित्र फळ त्या नर्तकीच्या जवळ कसे आले आणि त्या फळा पाठीमागे काय रहस्य दडले असावे ?

त्यानंतर राजाने राजधानीला पोहोचनाच चौकशीला सुरवात केली. तेव्हां राजाला कळले की; छोटी राणी एका अधिकाऱ्यावर जीव जडवून आहे. त्यामुळे तीनचे आपल्या पतीने दिलेले ते फळ आपल्या प्रियकराला देऊन टाकले आहे.





परंतु त्या अधिकाऱ्यानी ते फळ खाल्ले नाही. त्याच दिवशी संध्याकाळी त्यांन ते फळ नर्तकीला भेट दिले कारण तो तिच्यावर प्राणापेक्षां जास्त प्रेम करत होता.

ह्या गोष्टीची माहिती कळल्यावर राजा भर्तृहरिला आपल्या डोक्यावर कोणी वज्राघात करत असल्यासारखे वाटले. तो बरेच दिवस चिन्तामग्न अवस्थेत काळ कंठू लागला. रात्री राजा भर्तृहरि आपल्या सिंहासनाचा व आपल्या राजधानीचा त्याग करून जंगलात निघून गेला. मुनिच्या प्रमाणे आपला वेळ तपस्या करण्यात घालवून आपले जिवन जगू लागला.





संन्यास घेतल्या नंतर भर्तृहरिनी अनेक ग्रंथ लिहीले. त्यात "वैराग्य शतक" एक आहे. त्यात शंभर कविता आहेत. मनुष्य जिवनात उत्पन्न होणाऱ्या प्रलोभन, खोटेपणा, आकर्षण इत्यादीची ओळख त्यात दिली आहे. त्यांच्या दृष्टीने भ्रम दूर करण्यास ह्या ग्रंथ उपयोगी ठरलेला आहे.



# आळशीपणाचा परिणाम

राधाबाईला दोन मुलगे होते. मोठा मुलगा मंगाराम खूप मेहनती कष्टाळू होता तर दुसरा मुलगा दयाराम खूप आळशी होता. मंगाराम दुसऱ्याच्या शेतात काम करून थोडे फार पैसे कमवित होता परंतु मंगाराम दिवसभर टवाळक्या करीत गावभर फिरत असे.

राधाबाईनी दयारामला खूप समजवण्याचा प्रयत्न केला की तू आळशीपणा सोडून दे, त्यांनी ऐकले नाही की ती चिडत असे. तिने विचार केला की, दोघा भावांना वेगवेगळे ठेवले तर आपल्यावर पडणारी जबाबदारी समजून दयाराम आळशीपणा सोडून काही काम शोधेल.

मोठ्या भावाला वेगळे झालेले पहाताच दयारामचा जीव गलबलून गेला. तो दिवसभर गांव हिंडत राहिला. संध्याकाळ होताच गावाच्या बाहेर एका देवळात येऊन पोहोचला व तियेच पायरीवर झोपला.

अर्ध्यारात्री कसल्या तरी आवाजानी दयाराम दचकून जागा झाला. तेव्हां समोर एक देवी दिसली. तीने विचारले–"मुला, तू कोण आहेस? इथे काय कारणासाठी आला आहेस?"

दयारामनी देवीला नमस्कार केला व म्हणाला–"आई देवी, माझे नांव दयाराम आहे. मी जीवन जगण्याकरीता मार्ग शोधत आहे."

देवीला दयारामची दया आली. तिने विचारले–"सांग तू कोणत्या प्रकारचे काम करतोस? तुला मी असा वर देईन की त्या कामापासून तुला खूप फायदा होऊ शकले!"

"देवी, मी फक्त शेतीच करू शकतो." दयारामनी उत्तर दिले.

"चांगली गोष्ट आहे, मी पहाते तुला त्यापासुन फायदाच फायदा होईल. असे म्हणून देवी अदृश्य झाली.

एका आठवड्यानी गावच्या अधि-कान्यांना राजांनी असा निरोप धाडला की भूमिहीन मंगाराम व दयारामला गावच्या जंगला नजिकचीदोन-दोन एकर जागा द्यावी.

दयारामच्या वाटयाची जी जागा मिळाली होती. त्यांत झाडे-झुडपे व काटेच जास्त होते तर मंगारामची वाटयाची जमीन सपाट व साफ होती. दयारामला शेती करावयाची असेल तर त्याला प्रथम जमीन झाडे-झुडपे उपटून स्वच्छ करणे भाग होते. तेंव्हां आळशी दयाराम आपला मोठा भाऊ मंगारामकडे येऊन म्हणाला–

"भाऊ, मी तुझ्यासारखी मेहनत करू शकत नाही तेव्हां तुझ्या वाटयाची जी जमीन आहे. त्यात काटे-झाडे झुडपे कमी आहेत. तर आपण आपल्या जमिनीची अदला-बदल केली तर?"

मंगारामला आपल्या छोटया भावाची दया आली व त्यांनी आपल्या वाटयाची जमीन भावाला देऊन टाकली व त्याची जमीन आपण घेतली.

दयारामनी आपल्या जमिनीत हात सुद्धा घातला नव्हता. परंतु तेवढयात मंगारामनी खूप कष्ट घेऊन जमीनीची चांगली मशागत केली त्याच वेळेला एका वाळक्या झाडाच्या बुधांत मंगारामला दोन सोन्याचे तुकडे मिळाले.



हि गोष्ट कळताच दयाराम आपले डोके बडवून घेऊ लागला. तेव्हां देवीनी सांगितलेली गोष्ट त्याच्या ध्यानात आली तो लगेच आपल्या मोठ्या भावापाशी गेला व ती सर्व गोष्ट सांगून तो ते सोन्याचे तुकडे मागू लागला. परंतु सर्व सोने तर सोडाच पण अर्धे सोने सुद्धा देण्याचा नकार मंगारामने दर्शविला.

ह्या गोष्टीनंतर चारच दिवस झाले नाही तो परत दयाराम मंगारामच्या जवळ आला व म्हणाला–" भाऊ, तू आपली जमीन पेरणी करता चांगली सकस करून ठेवली आहेस. तर मला परत एकदा तुझी जमीन देऊन कृपा कर. आपण आपली जमीन बदलून परत आपापली जमीन परत घेऊ."

आपल्या छोटया भावावरच्या प्रेमामूळे मंगारामचे हृदय व्याकूळ झाले व त्यांनी जमिनी बदलण्याची तयारी दाखविली.

मंगारामने परत जमिनीतले काटेकुटे झाडेझुडपे साफ केले व तो जमीन शेती करता नांगरू लागला. तेव्हां नांगराच्या फाळाला काहीतरी वस्तू लागल्याचा आवाज आला. त्याने तेथे खणून पाहिले तेव्हां जमीनीत पुरलेला सोन्याच्या नाण्यांनी भरलेला हंडा त्याच्या हाती लागला.

ही पण गोष्ट समजताच दयारामची अवस्था दयनीय झाली तो चक्करच येऊन ·डला नंतर तो आपल्या नशिबाला दोष ेत आपल्या भावाजवळ येऊन पोहोचला व त्यांनी सोन्याच्या नाण्याचा अर्धा हिस्सा



भावाकडे मागितला परंतु मंगारामनी देण्याचे नाकबूल केले.

दयारामचे मन अस्वस्थ झाले. दिवसभर गांवभर हिंडत राहिला व रात्री त्या ओसाड देवळापाशी येऊन पायरीवर झोपला. अर्ध्या रात्री पुन्हां परत देवीने येऊन दर्शन दिले. देवीने रागातच विचारले–"अरे मूर्ख आळश्या! तुला सुधारण्या करीता मी तुला दोनदा संधी दिली. परंतु तुझ्या आळशी-पणानी तू दोनदा ही तीला डावललेंस मी राजाच्या मनांत दयाभाव निर्माण करवून तुला जमीन देववीली व झाडाच्या बुध्यांत मीच सोन्याचे तुकडे तुला मिळावेत ह्या इच्छेने ठेवले. परंतु तू जमीन बदललीस मी जमीनीत सोन्यांचा नाण्यांनी भरलेला हंडा ठेवला तर परत तू तुझ्या भावाकडून जमिन बदलून घेतलीस व तुझ्या भावाला सर्व मिळाले. जेव्हां हा तुझा आळशीपणा दूर होईल तेव्हांच तू सुधारू शकशिल. फिरून मला तुझे तोंड कधी दाखवू नकोस असे रागानी म्हणत देवी अंर्तधान पावली.

देवीच्या कोपामुळे दयारामला आपली लाज वाटू लागली त्याच दिवसापासून त्यांने आपल्या जमीनीत भावाच्या बरोबरीने कामे करायला सुरवात केली. दयारामची सुधारणापाहून गावातील लोकांनी दयारामचे कौतुक केले. जेव्हां शेतात धान्य पिकूनवर आले तेव्हां मंगाराम आपला भाऊ दया-रामच्या घरी त्याला जाऊन घेऊन गेला आणि समजावले–"माझ्या राजा ह्या कार-णानी तू माझ्यावर नाराज होवू नको तुला सोन्यांच्या दोन तुकड्यातला व सोन्याच्या नाण्यांनी भरलेल्या हंड्यातेला अर्धा भाग दिला नाही. आता तुझा आळशी स्वभाव दूर झाला तुझ्या आळशी स्वभावाला पाहूनच आईनी व मी तुला वेगळे ठेवले. तेव्हां आता तुला माझ्यातला अर्धा हिस्सा देतो. परंतु आजपासून परत आपण दोघे मिळून मिसळून एकत्र राहू. आईला पण खूप आनंद होईल.

ही गोष्ट ऐकताच दयारामला अतिशय आनंद झाला व तो भावाबरोबर रहाण्यास तयार झाला.



# योग्य शिक्षण

विदर्भचा राजा धर्मनंदनयांनी राज्यातील शाळांकरिता मुलांना चांगले शिक्षण मिळावे ह्या हेतुने काही शिक्षकांची नेमणूक करण्याचे ठरविले. परंतु चांगले शिक्षक मिळवणे कठिण होऊ लागले. तेव्हां मंत्री विद्याधरने ह्या समस्येचा सोपा उपाय शोधून काढला. आणि राजाला दरबारसभा घेण्यास सांगितले.

मंत्र्याने राजदरबारातील काही अधिकारी लोकांची सभा भरवली, त्यांने राजाची योजना अधिकाऱ्यांना सांगितली. "शाळेच्या ह्या कामांमुळे काही ठिकाणी बांधकाम सुरू करावे. ते काम पूर्ण होतांच आपल्याला सुचना मिळेल तरी पुढच्या महिन्याच्या पहिल्या तारखेला सरकारी खजिन्यातून आपला पगार घेवून जात जावा.

त्यानंतर दोन तीन महिने उलटून गेले. परंतु बांधकाम काही पूर्ण होऊ शकले नाही. परंतु शिक्षक पदावर असलेले लोक आपापले पगार नेत गेले परंतु ज्यांनी आपला पगार नेला नाही. त्यांना मंत्र्यानी बोलावणे धाडून कारण विचारले. तेव्हां त्या काही लोकांनी उत्तर दिले–"मंत्रीसाहेब आम्ही आजपर्यंत एकाही विद्यार्थ्याला शिकवले नाही. तरी अश्या परिस्थितीत आम्ही पगार घेतला तर न्यायाला अनुसरुन होईल कां?"

त्यावर मंत्र्याने राजापाशी जाऊन त्या लोकांचे विचार सांगितले व तेच योग्य शिक्षण देण्यास समर्थ आहेत असे सांगितले तेव्हां राजाने त्या लोकांची शिक्षकांचा जागेवर नेमवून केली.





अनसूयाने पति निधनानंतर, कांही इमानदार मजूरांकडून शेती करवून आपल्या दोन्ही मुलांचे पालनपोषण मोठे काळजीपूर्वक केले. जेव्हां तिची दोन्ही मुले शिकून मोठी झाली. तेव्हां अनसूयानी चांगली ठिकाणे पाहून आपल्या दोन्ही मुलांची लग्ने करुन दिली.

अनसूयाच्या दोन्हीं सुना श्रीमंत असल्यामुळे त्या माहेरुन किमती वस्त्रे दागीने व संसाराला लागणारे सामानसुमान सर्व सासरी घेऊन आल्या.

अनसूयाकडेही खूपसारी जमीन-जायदाद असल्यामुळे दिवसभर मजूरांकडून कामे करवून घेणे. शेतातील बैल-म्हशीची देखभाल करणे, घरातील कामे त्यामुळे दिवसभर सासूसुनांना विश्रांती घेणेही कठिण होऊन जाई. त्या दिवसभराच्या श्रमांनी थकून जावू लागल्या.

तशी अनसूया तब्बेतीनी खूप चांगली होती. आपल्या मुलांच्या लग्नाआधी सर्व कामकाज तीच स्वत:हा घरची सर्व कामे पाहून सुद्धा करत होती. परंतु दोन्ही सुना आल्यापासून घरातीलही सर्व कामे तिलाच पहायला लागत होती हेच तिला कठिण वाटत होते.

तेव्हां अनसूयांनी ऐका ठिकाणी बसून आराम करुन बसल्या ठिकाणीच खाणे-पिणे मागवून आराम व सुख भोगायचे असा मनाशी निश्चय केला. परंतु तिला असा विचार आला की, आजारी न पडता एकाच ठिकाणी बसून खाऊनपिऊन सुख भोगणे तीच्या सुनांना आवडणार नाही.

तेव्हां त्यावर खूप खूप विचार करुन अनसूयाने एक उपाय योजला. आणि ऐके दिवशी तिने खूप गडबडगोंधळ माजवून स्वत:हाला दिसत नसल्याचे व ऐकू येत नसल्याचे सांगितले.

मुले आपल्या आईची अशी परिस्थिती पाहून खूप घाबरून गेली व त्यांनी विचार केला की; अश्या परिस्थितीत आपल्या आईने पूर्ण विश्रांती घेतली पाहिजे व त्याकरीता त्यांनी एका वेगळ्या खोलीत आईचा पलंग टाकून दिला व तिला पलंगावरून खाली उतरण्यास मनाई केली.

आपल्या योजनेचा परिणाम चांगला झाल्याचे पाहून अनसूयाला खूप आनंद झाला. वेळच्यावेळी सुनां खाणेपिणे आणून देऊ लागल्या. व ती आनंदाने आराम करून आपला काळ कंठू लागली. परंतु अनसूयाच्या सूनाही काहीं कमी हुषार नव्हत्या त्यांनी थोडयाच दिवसांत आपल्या सासूची सोंगे ओळखली. तश्या त्या सासूचा आदरच करीत परंतु सासूचे असे वागणे त्यानां आवडले नाही.

एक दिवस जेव्हां त्यांचे पती शेतात कामावर गेले तेव्हां दोघींनी घरात गोड-धोड बनवले. व सासूच्यासमोर येऊन त्या ते गपागप खाऊ लागल्या.

"सासूला काय दिसत नाही. आणि आपण तिला शिव्या दिल्या तरी तिला ऐकू येणार नाहीत. तर आज आपण लाडू बनवले, उद्या पेढा बर्फी तयार करून आनंदानी खाऊ असे म्हणत त्या आपल्या सासूला नांवें ठेवू लागल्या. परंतू अनसूया



आपला राग मनातल्या मनांत आवरून धरून विचार करू लागली—"काय माझे नशिब भाग्याचे की, मला अश्या सुनां मिळाया एकवेळ मिठाई मला दिली नाही तरी चालेल .परंतु आपल्या नवऱ्यांना न देता कश्या खादडासारख्या खात बसल्या आहेत असे म्हणून तिच्या तोंडातून पाणी गळू नये म्हणून ती काळजी घेऊ लागली.

अखेर एक दिवस अनसूयान निश्चय केला व ती जोरजोरात ओरडू किचाळू लागली—"मुले धावून आली तेव्हां तिने आपल्याला परत दिसू लागल्याचे सांगितले."

ती गोष्ट ऐकूनच मुलांना खूप आनंद झाला. आपल्या आईजवळ जाऊन मुलांनी विचारले—"आई, खरेंच तुला दिसू लागले कां ? "

"होय रे मुलांनो ! हायऽऽ काय सांगू मला ऐकूही येऊ लागले. असे म्हणत ती जोरजोरात ओरडू लागली.

एवढयात दोन्ही सुनां अनसूयाच्या जवळ जात म्हणाल्या—"अरे रे ! आम्ही किती नशिबवान आहोत कारण सर्व घरादाराची व्यवस्था पहाणारी तब्बेतीनी चांगल्या असणाऱ्या अश्या सासूला अचानक दृष्टीदोष व बहिरेपणा यावा ही आमच्यावर दुर्दैवाची गोष्ट होती, असे म्हणत त्यांनी आपल्या सासूचा हात धरुन तिला समजावले—"आई, आता आपण ही खोली व हा पलंग सोडून द्या. आणि लवकर स्वयंपाक घरात येऊन तांदूळातले खडे काढा कारण चुलीवर भाताकरीता ठेवलेले आधण उकळते आहे.

अनसूया गुपचुप उठून स्वयंपाक घरांत गेली, कारण तिच्या मनांत एवढाच संतोष होता की; आपल्याला सोडून मिठाई खाणाऱ्या सुनांचा खेळ आता यापुढे होणार नाही.

परंतु सुनांना खूप आनंद होत होता की तब्बेतीनी ठिकठाक असलेल्या सासुला ढोंग करताना पकडून कशी अद्दल घडवली.



# कंजूषाचे पाप

जगतराम नावाचा एक कंजूष अत्याचार व पाप करण्यास डगमगत नव्हता. काशीला जाऊन गंगेत स्नान केल्याने सर्व पापे नाहिशी होतात असे त्याने ऐकले होते. परंतु काशीला जाऊन गंगेत स्नान करून यायचे म्हणजे बराच खर्च होणार. तेव्हां जगतरामला ऐकिवात आले की माधवप्रसाद काशीला जाणार आहेत. तेव्हां त्यांने माधवप्रसादला जावून विचारले—"माधव, मी ऐकले आहे की, तुम्ही काशीला जाणार आहांत तेव्हां काशीला जाऊन येऊन २०० रु. खर्च होणार. तर तुम्ही जातच आहात तर; मी केलेली पापे तुम्ही तुमच्या डोक्यावरून नेत आहात असे समजा आणि तुमच्या पापांबरोबर माझीही पापे धुवून या तेव्हां याकरीता मी तुम्हांला शंभर रुपये देईन."

"चांगले काम आहे, देऊन टाका शंभर रुपये !" माधवनी जगतरामकडून पैसे घेतले.

एक दिवस जगतरामनी माधवला विचारले—"तुम्ही काशीला केव्हां जाणार आहांत ?"

माधवने झटक्यान उत्तर दिले—"मी काशीला जाणार नाही. आमच्या गावांतच एक तळे आहे त्यांतच डुबाक्या मारून मी गंगास्नान झाले असे समजीन."





# तपश्चर्येचे फळ

**प्रा**चीन काळी राज्यवर्द्धन नावांच राजा राज्य करीत होता. जनतेंचे राजावर अतिशय प्रेम होते. राजासुद्धा प्रजेला आपल्या मुलांसमान मानत होता.

एक दिवस राजाला स्नान घालत असतांनाच राणीच्या डोळ्याला अश्रुधारा लागल्या ते पाहून राजाने राणीला रडण्याचे कारण विचारले राणी म्हणाली–"ह्याचे उत्तर मी काय देणार? आपले केस पांढरे होत चालले आहेत. आपले आयुष्य कमी कमी होऊ लागले आहे ते मला पहावत नाही असे म्हणून राणी आपले डोळे पुसू लागली.

ह्यावर राजा म्हणाला–"बस, ह्याकरीता कां. तू दु:ख करते आहेस? म्हातारपण कोणाला चुकत नाही. आणि मरणसुद्धा सर्वांनाच असते. ही गोष्ट विधात्यांनी लिहून ठेवली आहे. ह्यापासून कोणीच वाचू शकत नाही. आज नाही तरी उद्या आपण सर्व मरणारच आहोत. ह्या करीता दु:ख करणे योग्य नाही. असे सांगून राजाने राणीला समजावले.

परंतु राणीचे दु:ख कमी झाले नाही. ती सर्व देवदिकांची प्रार्थना, पुजाअर्चा करु लागली की तीच्या पतीचे आयुष्य वाढावे आपल्या राणीला दु:खात पाहून राजाला काळजी वाटू लागली. हळूहळू राजाचे कामकाजात लक्ष लागेनासे झाले. तोपण विचार करु लागला.

अश्या अवस्थेत मंत्री तश्या परिस्थितीचा विचार करू लागला की, काय उपाय शोधावा? त्याने असा विचार केला की; म्हातारपणामुळे व मानसिक स्वास्थ ठिक नसल्याने राजाचे लक्ष हळूहळू राज्यकारभारपासूनही दूर जात आहे तेव्हां राजानी आपला राज्यकारभार दुसऱ्यावर सोपवावा. राजाचा मोठा मुलगा कारभार सांभाळायला तयार होताच तेव्हां ही सर्व गोष्ट मंत्र्यानी राजाच्या कानावर घातली.

राजाने पण आपल्या मुलाचा राज्याभिषेक करून आपण तपश्चर्या करायला जंगलात निघून जावे असे ठरवले. दुसऱ्याच दिवशी पुरोहिताना बोलावून राजाने मुहूर्त काढायला सांगितले, परंतु जनता गप्प राहू शकली नाही राजाजवळ जाऊन म्हणाली :–

"महाराज, आजपर्यंत आपण आम्हांला मुलांप्रमाणे मानलेत आणि आम्हांलाच सोडून जात आहात हे ऐकूनच आम्हांला खूप दु:ख झाले. तरी आपण इथेच रहावे. आमचे म्हणणे ऐकले नाहीत तर आम्हीपण आपणांबरोबर येऊ.

तेव्हां ह्याचे उत्तर म्हणून राजा म्हणाला–"प्रत्येक मनुष्यप्राण्याला स्वत:ह्याच्या जन्माबरोबर मृत्यु घेऊनच जन्मावे लागते. तेव्हां मी जरी जंगलात गेलो नाही. तरी मृत्यु मला येणारच. तरी माझ्या वृद्धापकाळी मी तपश्चर्याकरुन माझा वेळ घालवावा म्हणतो. तरी तुम्ही भिऊ नका तुमच्या करीता मी दुसऱ्या राजाची नेमणूक करुन जात आहे.

तरीपण लोक गप्प राहिले नाहीत. त्यांचातील काही प्रमुख व्यक्ति तीर्थक्षेत्रात जाऊन राजाच्या आयुष्यवृद्धी करीता तपाचरण करू लागले. अश्या तऱ्हेने कित्येक लोकांनी कित्येक महिने तपश्चर्या केली. तेव्हां एका गंधर्वांनी त्यांना दर्शन दिले व सांगितले–"तुम्ही सर्वजण कामरूप पर्वतावर जाऊन तेथील सूर्यभगवानाची आपल्या राजाच्या आयुर्वृद्धीकरीता तपश्चर्या करा. ते तुमची इच्छा सफळ करतील."



ह्यावर सर्वजण आनंदीत झाले. व कामरूप पर्वतावर जाऊन तपश्चर्या करु लागले. कांही दिवसांनी सूर्यनारायणानी प्रत्यक्ष दर्शन देऊन त्यांना सांगितले–"तुम्हां लोकांच्या इच्छेप्रमाणे तुमचा राजा राज्य-









वर्द्धन एक हजार वर्षापर्यंत जगल. असा मी तुम्हांला आशिवाद देतो.

सर्व जनतेला आनंद झाला. की त्यांची तपश्चर्या पूर्ण झाली त्याचे चांगले फळ मिळाले त्यांनी ती बातमी राजाला सांगितली परंतु ती गोष्ट ऐकून राजाला आनंद झाला नाही. ते पाहून राणी राजाला म्हणाली—"महाराज, प्रजेनी आपल्यावर भक्ति व श्रद्धा ठेवून आपल्या करीता सूर्यनारायणाकडून वर प्राप्ती मिळवीली तरी आपण काळजीत कां आहात ?"

राजाने सांगितले तुझे म्हणणं बरोबर आहे. माझ्याकरीता प्रजेनी कष्ट हाल सोसून वरप्राप्ती संपादन केली. हि छानच गोष्ट आहे. मी हजारवर्षे जिवंत राहीन परंतु माझ्यावर विश्वास, भक्ति, प्रेम करणारी जनता हजारवर्षे जिवंत रहाणार नाही, तेव्हां मी जिवंत राहून प्रजा जिवंत रहाणार नाही तर मला आनंद कसा वाटेल तेव्हां मी ही प्रजा हजारवर्षे जिवंत रहावी म्हणून तपश्चर्या करायला जातो व प्रजे-करिता वरदान प्राप्त करुनच परत येतो. असे म्हणुन राजा पर्वतावर जाऊन तपश्चर्या करु लागला.

एक, दोन वर्षे लोटली राज्यकारभार थांबला. परंतु सर्व जनता खरेपणानी चालणारी असल्यामुळे राज्यांत अराजकता पसरली नाही जनता रोज राजाच्या दर्शना-करीता कामरूप पर्वताकडे जाऊ लागली. व रोज राजाची तपश्चर्या केव्हां फलारूपात येते ते पाहू लागली.

शेवटी सूर्यनारायणानी राज्यवर्द्धनच्या तपश्चर्येला पावून प्रसन्न होऊन दर्शन देऊन विचारले—"तुझी तपश्चर्या पूर्ण झाली, राजा तुझ्या म्हणण्याप्रमाणे तू जोपर्यंत जिवंत रहाशिल तोपर्यंत तुझी प्रजा जिवंत राहील. असा आशिर्वाद देऊन सूर्यनारायण अंतर्धान पावले.

सूर्यभगवानांच्या अनुग्रहामुळे राज्यवर्द्धन व त्याची प्रजा एक हजार वर्षापर्यंत जिवंत राहिली. आनंदानी सुखांनी राहिली. राज्या-मध्ये एक प्रकारचा उत्साह निर्माण झाला





# गणेश पुराण

एकदा लक्ष्मी मानस सरोवरात स्नान करत असतांना पार्वतीने विष्णूचे रूप धारण केले व ती लक्ष्मीजवळ आली. अत्यंत मनोहर दिसणाऱ्या सुंदर विष्णुला पाहून तीचे देहभान हरपले. आणि विष्णुरूपी पार्वती सुद्धां लक्ष्मीचे अतिसुंदर रूप पाहून मुग्ध झाली. दोघांनी एकमेकांना अतिप्रेमाने पाहिले. त्यांच्या दोघांच्या त्या मिलन दृष्टीतून त्या सरोवरात एक सुवर्ण कमल उगवले. त्यातून एक आश्चर्यचकित करुन टाकणारी एक बालिका उत्पन्न झाली. लक्ष्मीने नारायणाच्या जवळ जाऊन त्याला प्रेमाने मिठी मारली. तेव्हां पार्वतीला खूप हसू आले ती म्हणाली—"मी नारायण नाही. मी पार्वती आहे. असे म्हणून तिने आपले प्रत्यक्ष रूप धारण केले."

लक्ष्मी खेदाने म्हणाली—"तू सुद्धा आपल्या भावाला शोभणारीच झालीस."

पार्वती म्हणाली—"एकदा विष्णुनी मोहीनीचे रूप धारण करून शंकराला मायाजालात फसवले होते. त्याची परत-फेड मी अशी केली. समजले."

त्यानंतर त्या सूवर्ण कमलातून आलेल्या बालिकेकडे पाहून लक्ष्मी व पार्वती अत्यानंदित झाल्या. अत्यंत वात्सल्यप्रेमानी दोघींनी त्या बालिकेला हातात उचलून घेतले. तेव्हां गणपतीने प्रवेश केला व म्हणाला—"मातांनो आपणा दोघांच्या अंशांनी प्रकट झालेल्या हिचे पार्वतीच्या



कडून 'जया' व लक्ष्मीच्या कडून 'श्री' नी नामकरण करून तिचे नाव 'जयश्री' असे प्रसिद्ध व्हावे. तीचा वर सुद्धां असाच शिव व केशव यांच्या अंशाचाच जन्माला आला आहे. तेव्हां त्यानी कमळातल्या बालीकेला कावेरी नदीत सोडून यायला वायुदेवाला सांगितले. तेव्हां वायुदेवांनी जयश्रीला कावेरी नदीत सोडून दिले.

दक्षिणेत राज्य करणारा राजा त्याने त्या मुलीला आपल्या राजवाड्यात आणले व तिचा नामकरण उत्सव केला. तेव्हां आकाशवाणी झाली–"की तिचे नाव जयश्री ठेवण्यांत यावे." तसे सर्वांनी ऐकले. जयश्री राजकुमारी बनून राजवाड्यात लहानाची मोठी होवू लागली व तिन्हीं लोकांत अत्यंत रूपवती व साहसी म्हणून ओळखू लागली.

जयश्रीला महालात वेळ घालवण्यापेक्षा जंगलातले सृष्टी सौंदर्य पहायला आवडत असे व हिंडायफिरायला आवडत असे.

शिव आणि केशव ह्यांच्या अंशानी झालेला एक किशोर एक दिवस गणपती व कार्तिकस्वामीना भेटायला कैलास पर्वतावर गेला. तेव्हां दोघेजण प्रेमानी गप्पा मारत असतांना दिसले–मानस सरोवरांत लक्ष्मी व पार्वती याच्यांतून निर्माण झालेली व किशोर याला अनुरूप होणारी पत्नी निर्माण झाली आहे. आणि असे म्हणून गप्प राहिले.

तेव्हां त्या तरुणाला खूप आश्चर्य वाटले. त्यांनी आपल्या मनावर ताबा ठेवून थोडे दिवस तेथेच वास्तव्य केले. परंतु जेव्हां तो तेथून परत निघाला. तेव्हां गणपतीने सांगितले–"हे तरुण किशोरा. आमच्या दोघांपेक्षा तु वयांनी वडिल आहेस. तेव्हां आपण असे ब्रह्मचारी राहणे चांगले वाटत नाही. तेव्हां लवकरच आपण विवाह करावा.

त्यानंतर गणपती व कार्तिकस्वामीनी त्यांचा आदरपूर्वक आभार मानून निरोप दिला.

एकदा स्वामी सिंहावर आरूढ होऊन मजेने जंगलात हिंडत फिरत होते. तोच त्यांना थांबवण्याकरीता म्हणून कोणी तरी बाण सोडले व त्यांच्या पासून जवळच ते जमिनीत घुसले. स्वामीनी बाण जेथून आले त्या दिशेकडे पाहिले परंतु दुसऱ्या क्षणीच त्यांचा राग नाहिसा झाला. धनुष्य-बाण हातात धरून मोठ्या दिमाखाने उभी असलेली हसरी जयश्री त्यांना दिसली. तिची दृष्टी त्यांच्या दृष्टीत विलीन झाली व स्वामी अदृष्य झाले.

गणपतीने जयश्रीला स्वप्नात येऊन सांगितले होते तेव्हां पासून ती त्याच्याच शोधात जंगलात फिरत होती. नारदाच्या आदेशानुसार राजानी जयश्रीचे स्वयंवर मांडले. राजाच्या रूपाने इन्द्र व देवदेवता वेगळे वेगळे वेष करून विवाह स्थळी आले होते. परंतु स्वामीने साधारण भिल्लाच्या रूपानी एक तीर कमान धारण करून बरोबर एक काळे कुत्रे घेऊन प्रवेश केला.

राजांनी त्याचा भिल्ल कुमार व त्याच्या कुत्र्याची चेष्टा केली व आपल्या बरोबर बसण्यास त्याला जागा दिली नाही. तेव्हां स्वामींनी सिंहाचा जबडा पकडण्यासारखे कुत्र्याचे तोंड धरले व ते पाठीवर चढून बसले. दुसऱ्या क्षणीच त्या कुत्र्याचे सिंहात रूपांतर झाले. तेव्हां जयश्रीने स्वामीनां ओळखले व तीने वरमाला त्याच्या गळयात घातली. स्वामीनी जयश्रीला सिंहावर





बसवले. तेव्हां इतर सर्व राजे देवता नाराज होऊन स्वामीच्यावर तुटून पडले. परंतु त्यांना सर्वांना त्यानीं थोपवून धरले.

स्वामीच्या बाणाच्या प्रहारानी सर्वजण घाबरून इकडे तिकडे सैरावैरा पळू लागले. त्यांनी दिव्य अस्त्राचा प्रहार करण्यास सुरवात केली. त्याच्यापुढे कोणाचा टिकाव लागणे शक्य झाले नाही. इन्द्राचे वज्रायुध कुचकामी निघाले. तेव्हां त्यांनी आपले रूप धारण केले. पण सर्व देवदेवतां हात जोडून त्यांना शरण आले. सर्वांनी क्षमा मागितली.

अश्या तऱ्हेने स्वामी व जयश्रीचा लग्न समारंभ सर्व देवदेवतांच्या समवेत वैभवात थाटात झाला व स्वामी जयश्रीसह आपल्या निवासस्थानी परत जाण्यास निघाले.

त्रेतायुगात आर्यावर्तमध्ये कोसल, केकय व वसुमित्र नावाचे राजे आपैसांत खूप मैत्रीने रहात होते. त्यांना प्रत्येकांना कोसलला कौसल्या, केकयला कैकयी व वसुमित्रला सुमित्रा नावाच्या कन्या होत्या. तिन्ही राजांच्या मनात एकाच वेळी एकच विचार निर्माण झाला की; अयोध्याचा राजा दशरथ ह्याच्या बरोबर आपल्या मुलींचा विवाह करून द्यावा. दशरथानी त्यांच्या विचारांना संमती दिली.

तिन्ही राजांनी जैमिनी मुनिच्या करवी लग्नाचा मूहूर्त काढला जैमिनी मुनिनी सांगितले–"मी जो लग्नाचा मुहूर्त निश्चित केला आहे, तो असा; गणपतीला साक्षी बनवून ह्या मुलींचा विवाह दशरथ राजा बरोबर लावून द्यावा. परंतू लग्नाच्या आधी ह्या मुलींना राक्षसांपासून भय आहे. तिघींना काळजीपूर्वक सांभाळले पाहिजे.

तेव्हां राजानीं त्या तिघी मुलींनां एका जड पेटीत सुरक्षीत समजून ठेवले.

तिकडे नारदमुनिनी रावणासुराकडे जाऊन सांगितले–"अरे लंकेश्वरा, तिकडे दशरथ राजाचा विवाह होणार आहे आणि दशरथाच्या होणारा मुलगा तुझा नाश करेल.



त्यावर रावणांनी राजकुमारीनां पळवून आणण्यासाठी महोदर नावांच्या बलवान राक्षसाला पाठवले. महोदरनी त्या तिन मुली एका जड पेटीत सुरक्षित ठेवल्या असल्याचा पत्ता काढला व त्याने ती पेटीच उचलली. तो जेव्हां आकाशमार्गानी जात होता तेव्हां समुद्रावरून लंकेकडे जात असता अचानक त्याच्या पोटात असह्य कळा येऊ लागल्या त्यावेदनेनी त्याच्या हातून पेटी समुद्रात पडली व समुद्राच्या लाटांवरून पेटी वेडीवांकडी होऊन वाहू लागली.

त्याच वेळी दशरथ राजा एका मोठ्या नावेत बसून नगरात परत चालले होते. त्यांना त्यांच्या प्रवासात विलंब होणार म्हणून ते त्या गोष्टींचा विचार करत बसले. मुहूर्त ठरवलेल्या वेळात ते नगरात पोहोचू शकणार नाहीत. असा विचार करीत त्यांनी समुद्रात दूरवर पाहिले. तेव्हां नावेच्या जवळूनच एक वजनदार पेटी वहात येत असल्याचे दिसले. तेवढ्यात त्या पेटीचा धक्का बोटीला लागला व त्या पेटीचे झाकण उघडले गेले व पेटीतील तीन राजकुमारी त्यांच्या दृष्टीस पडल्या. त्यांनी दोरीची शिडी करून त्यांना बोटीत चढवून घेतले. तेव्हां दशरथाला कळले की; तो ज्या तिन मुलींशी लग्न करणार आहे त्याच ह्याच तिन मुली आहेत आणि जैमिनि मुनिनी सुद्धा लग्नाचा तोच मुहूर्त नक्की केला होता. तेव्हां गणपतीने प्रत्यक्ष दर्शन देऊन त्या मुलींचा विवाह दशरथ राजाबरोबर लावून दिला व गणपती अदृष्य झाला. दशरथराजा आपल्या तिन राण्यांसह आपल्या नगरात परत निघाला.

ह्या घटनेनंतर बऱ्याच दिवसांनी दशरथाला चार मुलगे झाले. त्याचा मोठा मुलगा जो श्रीरामचंद्र कैकयीच्या हट्टामुळे सीता व लक्ष्मणासहित चौदा वर्षे वनवासास गेला. रावणानी सीतेला पळवून लंकेत नेवून ठेवले व रामानी हनुमान, सुग्रीव व इतर वानरसेनेसह लंकेवर चाल करून रावणाचा नाश केला व सीतेला पुष्पक विमानात बसवून परत आणले. तेव्हां सेतु जेथे बांधला त्याच्या समुद्रकिनाऱ्यावर रामचंद्रांनी शंकराची पुजा करून अयोध्याला परतण्याचा विचार केला.

शिवलिंगाची प्रतिष्ठापना करण्याकरिता रामचंद्रांनी हनुमानाला कैलासला पाठवले हनुमान वायुवेगाने कैलासाला पोहोचले येथील सर्वांत मोठ्या लिंगाला पाहून त्यांनी ते उचलण्या करिता हात लावला. परंतु कितीही प्रयत्न केला तरी लिंग जागचे हलले नाही. तेव्हां त्यांनी लहान लिंग उचलण्याचा प्रयत्न केला. परंतु छोटे लिंग सुद्धा हलू शकले नाही.



तिकडे वेळ निघून चालली होती. हनुमान आपल्या असमर्थतेवर दुःखी होवू लागला. तेव्हां एक लहान मुलगा तेथे आला. त्यांने विचारले—"हे महाशया, तू कोण आहेस? दिसायला तर हनुमानासारखाच दिसतो आहेस पण तू हनुमान नाही आहेस!

"मी हनुमानच आहे. रामचंद्रांनी मला एक शिवलिंग आणण्याकरिता इकडे पाठवले आहे. परंतु तू कोण आहेस?"

कोणीही लिंगे उचलून घेऊन जावू नयेत म्हणून मला त्या लिंगाच्या देखरेखीकरता इथे बसवले आहे. परंतु मी असे ऐकले आहे की; हनुमान शंकराचाच अवतार आहे आणि तोच पंचमुखी आंजनय आहे. पण तुमची पांच तोंडे कुठे आहेत?

तेव्हां हनुमानानी गरुड, वराह, सिंह आणि अश्व यांची तोंडे जोडून पंचमुखी आंजनेयाचे रूप धारण केले आणि आकाशापर्यंत जाऊन पोहोचेल अशा आवाजात हसून त्या मुलाला म्हणाला—"गजानना आता माझी वेळ संपली आता पंचतोंडी रूप तुम्हांला धारण करावे लागेल." तेव्हां गजाननानी आपले विश्वरूप दर्शन दिले. त्या पंचमुखी गजाननाला नमस्कार करून हनुमान म्हणाला—"महानुभाव, जेव्हां तुम्ही लहान बालकाचे रूप घेऊन माझ्याकडे निघालात तेव्हांच मी आपल्याला ओळखले. शिव-

लिंगाना आपण हलू दिले नाहित. तेव्हां कृपा करून मला एक शिवलिंग अर्पण करा.

त्यावर गणपती म्हणाला—"हनुमाना तुझ्या पंचमुखी दर्शना करिताच मी हे सर्व नाटक रचले होते. तू शिवाच्या अंशानीच निर्माण झाला आहेस. तेव्हां तुला अडवणारा मी कोण? परंतु तू माझ्याजवळ मागितले आहेस म्हणून मी तुला देतो. तुझ्याकरिता अतिविशेष असे लिंग मी आधी पासूनच निवडून ठेवले आहे. ते तू घेऊन जा." असे म्हणतच त्यांनी हनुमानाच्या ओंजळीत एक ज्योतिर्लिंग ठेवून दिले.

हनुमान लिंगाला साभांळून धरत उडत निघाला. तोपर्यंत वेळ निघून गेली होती. तिकडे वेळेच्या आधीच सीता देवीने एक वाळूचे शिवलिंग तयार केले व रामचंद्र पाण्याचा अभिषेक करून त्याची पूजा करावयास लागले तेवढ्यात हनुमानानी लिंगासह प्रवेश केला. ते पाहून हनुमानानी आपल्या शेपटीने गुंडाळून त्या लिंगाचा नाश करण्यास आरंभ केला. परंतु वाळूचे लिंग जसेच्या तसेच राहिले. तेव्हां रामचंद्रानी हनुमानाला शांत करून सांगितले—"हनुमाना, बुद्धिमान लोक सुद्धा जेव्हां तेव्हां विसरून जातात. तू तर सर्व जाणकार आहेस तेव्हां वाळूचेच असले म्हणून काय झाले शिवलिंगच आहे ना. आणि ते तर शिवाचा अंशच आहे. शंकराबरोबर गमंत करायला खेळायला कोणाला आवडेल. तरी अजुन काहि बिघडले नाही तू जे लिंग घेऊन आला आहेस. त्याचेच वाळूचे रूपांतर करून त्याची प्रतिष्ठापना करून पूजा करुया चालेल ना."

हनुमानानी जे आपल्याबरोबर लिंग आणले होते. ते रामचंद्राच्या हातात देऊन स्वतःहाचे कान पकडले व वाळूच्या लिगाला भक्तिपूर्वक हात जोडून नमस्कार केला.

रामचंद्रानी हनुमानानी आणलेल्या लिंगाची प्रतिष्ठापना केली व सीतेसह विधीपूर्वक त्यांची पूजा केली. तेव्हां ते सर्वजण पुष्पक विमानात बसून अयोध्या नगराला निघाले.





# गंधर्व राजकुमारी

[ २ ]

हसनला बेशुद्ध झालेले पहाताच तो वृद्ध माणूस जोरजोरात आनंदाने किंचाळू लागला. "अरे लबाडा, आता तू माझ्या हातातून कसा सुटून जाशिल आता तुला वाचवणार कोणी नाही." असे म्हणतच तो वृद्ध माणूस उठून उभा राहिला व हसनचे पाय छातीशी दुमडून त्यांचे मुटकुळे बांधून, तेथीलच एक पेटी रिकामी करून त्यात त्या दुष्ट म्हाताऱ्याने हसनला बंद करून टाकले. घरांतील सर्व धन-दौलत संपत्ती उचलून घेतली, बाहेर जाऊन एका नोकराला पैसे ठरवून घेऊन आला. त्याच्या डोक्यावर ती पेटी देऊन त्याला ती सरळ किनाऱ्याजवळ घेऊन चलण्यास सांगितले. समुद्रकिनाऱ्यावर एक बोट नुकतीच निघण्याच्या तयारीत होती. नावाड्याने त्याला त्याच्या पेटीसह बोटीत चढवून घेतले व बोट चालू लागली.

थोड्या वेळानंतर हसनच्या आईने घरी येऊन पाहीले तो हसन घरात नाही. आदल्या दिवशी हसनने सोने विकून जे पैसे आणले होते तेही नाहिसे झालेले व पेटीत जे कपडे ठेवलेले होते तेही अस्ताव्यस्त घरभर पसरलेले.

बाहेरचे दारही उघडेच होते. ती आपले डोके बडवून घेत, कपडे फाडत जोरजोरात ओरडू लागली—"मी ज्या गोष्टीसाठी भीत होते शेवटी तेच झाले आता मी माझ्या मुलाचे तोंड पाहू शकणार नाही." असे म्हणत रडू लागली. त्यानंतर तिने आपल्या घरांतच मुलांच्या नावांनी एक कबर बांधली व दिवसरात्र तिथे बसून त्याचे रक्षण करत रडत दिवस घालवू लागली.

हसनवर जादूटोणा करून बरोबर घेऊन जाणारा म्हातारा फारसचा भयंकर मांत्रिक



होता. त्याचे नाव बेहराम होते. त्यांनी आपल्या जादूच्या प्रयोगाकरीता कित्येक मुसलमान तरूणांचे बळी दिले होते. ह्यावेळेस हसन त्याच्या हातात सांपडला.

समुद्रप्रवास संपेपर्यंत हसनला पेटीतच नशा आणणारे काही पदार्थ खाण्यात मिसळून बेहराम देत राहिला. काही दिवसानंतर जहाज दुसऱ्या किनाऱ्याला येऊन पोहोचले. बेहराम पेटीसकट किनाऱ्यावर उतरला ती बोट परत निघून गेली. म्हाताऱ्यांनी पेटीचे झांकण उघडून हसनला बाहेर काढले त्याचे हातपाय मोकळे केले व त्याला शुद्धीवर आणण्याकरिता त्यांच्या नाकाजवळ एक वस्तु हुंगायला दिली.

थोड्यावेळानीं हसननी डोळे उघडले त्याला समजले की; तो एका समुद्रकिनाऱ्यावर आहे. नंतर असेही कळून आले की, तो त्याचा देश नाही. त्या समुद्रकिनाऱ्यावरच्या रेतीत लाल, हिरवे, पांढरे व काळे खडे होते. तेव्हां तो आश्चर्यचकित होवून इकडेतिकडे पहात उभा राहिला. त्याला पाठीमागे एका उंच खडकावर एक म्हातारा बसलेला दिसला. ताबडतोब हसननी ओळखले, त्या म्हाताऱ्याने आपल्याला फसवून पळवून आणले आहे. आपल्याला आईने सांगितलेल्या गोष्टी तंतोतंत खऱ्या आहेत. हसननी म्हाताऱ्याजवळ जावून विचारले–"बाबा, हा काय प्रकार आहे? तुम्ही आमच्या घरचे अन्न खाल्ले आहेत!"

म्हातारा खळखळून हसत म्हणाला–"मुला, अग्निची पूजा करणाऱ्या बेहरामला कोणाच्या घरचे अन्न खाल्ले किंवा नाही, ह्याच्याशी काहीही संबंध रहात नाही, तुझ्यासारख्या नऊशे नव्याण्णव तरुण मुसलमानांचे मी आतापर्यंत बळी दिले आहेत, तू हजारावा बळी आहेस. तेव्हां माझ्या तावडीतून आता तुझी सुटका नाही! तरी तू तुझ्या देवाला स्मरायचे सोडून माझ्या अग्निची पूजा कर."

हे सर्व ऐकताच हसन नाराज झाला आणि जोरजोरात ओरडून म्हणाला–"अरे दुष्टा म्हाताऱ्या, तू हे काय मागतो आहेस?"

दुसऱ्या क्षणी बेहराम नरमाईने म्हणाला–"मुला, मी फक्त तुला समजावण्याकरिता सांगितले. शाबास! तू माझ्या परिक्षेत यशस्वी झालास! माझी मंत्रविद्या शिकविण्याच्या योजनेनी मी तुला ह्या एकांत स्थळी घेवून आलो. तो बघ, दूरवर एक डोंगर दिसतो आहे ना? आपल्याला ज्या औषधी वनस्पती पाहिजेत त्या सर्व ह्या डोंगरावर मिळतात. आता आपल्याला त्या पहाडावर जावयाचे आहे."

म्हाताऱ्याच्या तोंडून असे शब्द ऐकताच हसनची शंका थोडी दूर झाली. त्यांनी विचारले–"तो डोंगर भिंतीसारखा सरळ आहे आपण त्यावर चढून जावू शकू?"

"आपल्याला त्याच्यावर चढून जायची जरूर नाही. आपण पक्ष्यासारखे उडत जावून त्या डोंगरावर उतरू" असे म्हणतच बेहरामनी आपल्या खांद्यावरच्या फडक्यातून एक तांब्याचे ढोलके काढले. त्या तांब्याच्या ढोलक्यावर एका कोंबडीच्या कातड्याचा तुकडा चिकटवला होता. त्या कातड्यावर काही बीजाक्षरं लिहीली होती.

बेहरामनी आपल्या बोटांनी जेव्हां ढोलके वाजवले, तेव्हां दूरवर धूळीचा लोट उडाला आणि पाठोपाठ एक काळ्याकभिन्न पंखाचा घोडा समोर उभा राहिला. त्याच्या नाकांतून ज्वाळा बाहेर पडत होत्या. बेहराम त्या घोड्यावर जावून बसला व हसनला हात देवून आपल्या पाठीमागे बसवले. त्या क्षणीच घोड्याने आपले पंख फडफडवले व वेगाने आकाशात उडाला, डोळ्याची पापणी लवते ना लवते तोच तो डोंगरावर जावून उतरला. बेहराम व हसन त्या घोड्यावरून खाली उतरल्या बरोबर तो घोडा अदृश्य झाला.

हसनच्या मनांत पुन्हा शंका निर्माण झाली. त्यानी चौफेर दृष्टी फिरवून पाहिले परंतु त्याला औषधी वनस्पतीपैकी काहीही झाडे झुडपे दिसली नाहीत. बेहराम हसून













म्हणाला—"आता तुला कोणीही वाचवू शकत नाही. इथून तुझी आता सुटका नाही."

हसनला भयंकर राग आला. त्यानी ओरडून सांगितले—"अरे, नीच म्हाताऱ्या, मला माझ्या परमेश्वराचा पाठींबा आहे. माझ्या ईश्वराच्या मदतीने मी तुझे हालहाल करतो?" असे म्हणतच हसननी एका हातांनी म्हाताऱ्याच्या हातातले तांब्याचे ढोलके हिसकावून दुसऱ्या हातानी बळ एकवटून म्हाताऱ्याला खाली दरीत ढकलून दिले. बेहराम हवेत उंच उडाला व किंकाळ्या फोडून खालील दगडावर पडला. त्याच्या शरिराच्या ठिकऱ्या उडाल्या. अशा तऱ्हेने हसननी स्वतःहाला मरणाच्या दाढेतून वाचविले. त्याने ढोलके उलट-सुलट करून पाहिले. त्याला त्याचा उपयोग कसा तऱ्हेने करायचा माहीत नव्हते. त्यांनी चौफेर पाहून हातातले ढोलके कमरेला बांधले.

तो ज्या पहाडाच्या शिखरावर होता. आता तोच पहाड एका समतल प्रदेशांसारखा दिसू लागला. त्यावर झाडे झुडपे वगैरे नव्हती तो सर्व एकसारखा खडकाळ प्रदेश दिसत होता. दूरवर ज्वाला येते होत्या. तो त्या बाजूला निघाला. कारण ज्वाला आहेत म्हणजे तेथे माणसेसुद्धा असू शकतील नाहीतर आग कशी येईल.

जेव्हां तो त्या आगीपाशी पोहोचला तेव्हां त्या आगीचे रूपांतर एका विशाल महालात झाले. त्या महालात चार प्रचंड मोठे खांब होते. त्यावर एक उंच गोल घुमट होता. त्या महालाच्या खांबांना, भितींना व घुमटाला सोन्याचा मुलामा दिला होता. सूर्याच्या प्रकाशात तो महाल झगमगत होता. हा चमत्कार पाहून हसनला भ्रम पडला की ह्यापण एक प्रकारच्या ज्वालाच आहेत.

परंतु हसन शाररिक व मानसिक श्रमानी दमला होता. तो विचार करू लागला—"हा महाल मनुष्यवस्ती करीता नाही. यात कोणी यक्ष किंवा गंधर्व रहात असावेत असे असले तरी इथे कोणीतरी द्वारपाल रहात असावा तरी प्रथम त्याच्याकडे जावून तहान खूप लागली आहे तेव्हां पाणी मागून प्यावे मग महालातल्या कुठल्यातरी कोपऱ्यात विश्रांती घ्यावी" असे म्हणत तो तेथील हिरव्या दगडांनी बांधलेल्या दारांतून महालात आला.

हसन दोन चार पावले चालला नसेल तोच त्याला दोन तरुणी एका संगमरवरी चौथऱ्यावर बसून बुद्धिबळ खेळत असलेल्या दिसल्या. परंतु त्या तरुणींनी हसनला पाहिले नाही. थोडा वेळ गेल्यानंतर लहान तरुणीने आपल्याजवळ उभ्या असलेल्या युवकाला पाहून मोठ्या तरुणीला म्हटले—"ताई, कोणी तरुण युवक आला आहे. दुष्ट बेहराम दरवर्षी एका तरुणाला ह्या डोंगरावर आणतो. बहुतेक ह्या तरुणाला सुद्धा तोच घेवून आला असावा. तसे असेल तर हा तरुण त्या मांत्रिकाच्या हातून सुटून येणे कसे शक्य होईल. ही तर खरोच आश्चर्याचीच गोष्ट आहे ना?"

हसन त्या तरुणीच्या पाया पडून म्हणाला—"ताई, मी एक असा अभागी आहे." असे म्हणत तो अश्रू ढाळू लागला. त्याच्या त्या केविलवाण्या परिस्थितीकडे पाहून त्या दोघींना त्याची दया आली.

त्या तरुणीने आपल्या मोठ्या बहिणीला सांगितले—"ताई, मी त्या तरुणाला माझ्या छोट्या भावाप्रमाणे सांभाळीन म्हणते तरी ह्याची साक्षी तूच आहेस."

त्यानंतर हसनला ती तरुणी महालात घेवून गेली. त्याच्या स्नानाची तयारी करून त्याला नविन कपडे घालायला दिले.

त्या दोन्ही बहिणींनी त्याला आपल्या मध्ये बसवून त्याला उत्तमोत्तम पक्वान्ने खायला घातली.

खाणे झाल्यानंतर हसनने आपल्या बहीणींना सांगितले—"हे माझ्या बहीणींनो, आपल्या दोघींच्या दर्शनाआधी मी किती कष्ट हालअपेष्टा सहन केल्या आहेत." असे म्हणत त्यांनी आपली सर्वच्या सर्व गोष्ट त्यांना सांगितली. (पुढील अंकी)





# खुळा बाळू

बाळू आपल्या भावंडात सर्वात लहान होता. तो आपल्या सर्व भावांत विद्याभ्यासात हुशार निघाला. गुरुजी म्हणत की तो फार हुशार आहे. परंतु त्याचे भाऊ त्याला त्याच्या लहानपणा पासून चांगले ओळखत. म्हणून ते आपल्या वडिलांना म्हणत–"असेल तो मोठा हुशार परंतु त्याला व्यवहार ज्ञान शून्यच आहे! असा माणूस सरकारी नोकरी शिवाय इतर कोणत्याही कामात कुचकामाचाच ठरेल. म्हणून त्याला सरकार दरबारात एखादी नोकरी पाहून द्या.

परंतु बाळूला ते मान्य नव्हते. तो वडिलांना म्हणाला–"तस म्हणाल तर सरकार दरबारात मला नोकरी करायला आवडेल. परंतु ते मी इतर कामे करण्यात वाकबगार आहे की नाही हे ठरल्यावरच करीन. म्हणून मला निदान एक वर्षभर शेतीभातीची कामं करू द्या." म्हणून वडिलांनी त्याला पांच एकर जमिनीची लागवड करण्याचे काम दिले. बाळूने त्या जमिनीतल्या मातीची वैज्ञानिक परीक्षा करविली, म्हणजे त्या जमिनीत कोणते पीक काढल्यास फायद्याचे होईल, हे कळेल. त्याप्रमाणे तेच पीक काढता येईल. त्याने तसेच केले व त्याच्या शेतात खरोखरच चांगले पीक निघाले.

बाळूने त्यावर्षी काढलेले सर्व पीक विकून पैसें जमविले. परंतु त्याने सर्वापेक्षा जास्त हुशारीने काम करून खूप पैसे मिळविले या आनंदात सर्व पैसे खर्च करून टाकले. म्हणून पुन्हा नवे पीक काढायला त्याच्याकडे पैसे उरले नाहीत. परंतु त्याच्याहून कमी पीक काढणारे भाऊ सुद्धा जास्त सुखी होते. ह्याचे कारण त्यांनी आपले पीक चांगली किमत मिळे पर्यंत विकले नव्हते.

"वसुंधरा"

शिवाय त्यांनी एकच एक पीक काढले नाही, तर त्यांच्या कुटुंबाला लागणाऱ्या डाळी, भाजीपाला, कडधान्य वगैरेंचे अनेक प्रकारचे पीक ही काढले. कुटुंबाला लागणाऱ्या वस्तू साठवून बाकी उरलेली धान्येच विकली या उलट बाळूने सर्वांच्या सर्व पीक विकल्यामुळे त्याला स्वतःच्या कुटुंबासाठी जास्त किमत देऊन धान्ये खरेदी करावी लागली.

तेव्हां त्याच्या भावंडांनी पुन्हां आपल्या वडिलांना सांगितले की खुळेपणा करून हा खुळा वागला. म्हणून याला एखादी नोकरी करू द्या.

बाळू वडिलांच्या हाता पाया पडून म्हणाला–"बाबा, शेतीभातीची कामे माझ्या नशिबात नाहीत. ज्यांच्या अंगात मेहनत करण्याची शक्ती आहे, त्यांच्या लायकच ही सर्व कामे आहेत. माझे डोके चांगले चालते. म्हणून मी व्यापार करावा म्हणतो मला भांडवलासाठी एक हजार रुपये द्या म्हणजे झाले."

वडिलांनी त्याला एक हजार रुपये दिले रुपये हातात येताच बाळूने बाजार भावाची चवकशी केली आणि जवळपासच्या बाजारातले बाजार भाव कसे आहेत याची माहिती सुद्धा काढली. स्वस्त माल जेथे मिळाला तेथून तो विकत घेतला आणि आपल्या



गावात त्या मालाची किमत जास्त असल्याचे पाहून इतर व्यापाऱ्यांच्या मानाने तो स्वस्तात विकू लागला. त्याचा व्यापार वाढू लागला. व्यापारात खूप फायदा मिळत असल्याचे पाहून तो चकित झाला. बाळूने दोन तीन महिन्याच्या आंतच एक हजाराचे दहा हजार केले.

इतर भाऊ आपल्याला खुळा म्हणून आपली थट्टा उडवितात हे बाळूला माहीत होते. म्हणून त्याने इतर व्यापाऱ्यांना भेटून चवकशी सुरू केली. त्याला एक हजार भांडवलावर तीन महिन्यात नऊ हजार मिळाल्याचे सांगून इतर व्यापाऱ्यांची मिळकत किती असेल असे त्याने विचारले.



परंतु एकाही व्यापाऱ्याने बाळूच्या इतका फायदा झाल्याचे त्याला सांगितले नाही. उलट ते म्हणाले–"तुला इतका फायदा कसा मिळाला हेच आम्हांला कळत नाही. आम्हांला तर तोंड मिळवणी जेमतेम करतां आली."

बाळूला वाटू लागले की त्याच्या इतका शहाणा जगात दुसरा कोणी नसणार. त्या घमेंडीत तो पाण्यासारखा पैसा खर्च करू लागला.

सहा महिन्यांनंतर राजाच्या प्राप्तिकर वसूल करणाऱ्या अधिकाऱ्याने त्याला हिशोब विचारून म्हटले–"आम्ही तुम्हांला खूप फायदा झाल्याचे ऐकतो आणि बाळू खुळ्या-सारखा म्हणाला–"होय, इतर कोणाला इतका फायदा झाला नाही."

"होय, तुम्हांला खूप फायदा झाल्याचे आमच्या कानावर आले म्हणून तर आम्ही आलो आहोत. तुम्हांला प्राप्तिकर म्हणून तीस हजार रुपये खजिन्यात भरावे लागतील. अधिकारी म्हणाला.

"प्राप्तिकर? म्हणजे काय?" बाळूने चकित होऊन विचारले. तुला जो फायदा झाला आहे त्यातले तीस टक्के प्राप्तिकर म्हणून सरकार दरबारात कायद्याप्रमाणे भरावे लागतील. तुम्हांला वर्षभरात निदान एक लाख रुपयांचा तरी फायदा झाला असणार! तुमच्या सारख्या इतर व्यापाऱ्यांना सुद्धा कर भरावा लागतो. कराची रक्कम वेळवर भरा, नाही तर कायदेशीर इलाज केला जाईल." अधिकाऱ्याने बजावले.

तेव्हां बाळूला पायाखालची जमिन घसल्यासारखे वाटले व व्यापाऱ्यांनी त्यांना काही फायदा होत नसल्याचे कां सांगितले ते कळाले.

त्यानंतर बाळूच्या वडिलांनी प्राप्तिकर वसूल करणाऱ्या अधिकाऱ्यांची समजूत घालून त्यांना निरोप दिला व बाळूला म्हणाले–"बाळू, तू तुझे भाऊ म्हणतात तसाच खुळा आहेस. माझ्याबरोबर राजधानीच्या गावी चल. तेथे मी तुला चांगली नोकरी लावून देतो."

बाळू वाकून वडिलांना म्हणाला–"बाबा, मी स्वतःच आपल्या जोगती नोकरी शोधून काढतो. मी खोटे बोलून धंदा चालविण्यात यशस्वी झालो नसेन, परंतु मी आपल्या हुशारीने राजाला खूष करू शकेन."

वडील थोडा विचार करून म्हणाले–"बरं तर तू तसंच कर! परंतु एक गोष्ट लक्षात ठेव, कोणीतरी वजनदार माणसाची शिफारस घेऊन राजाश्रय मिळव. तुला यश मिळाले नाही तर, मला ताबडतोब कलव. मी स्वतः येऊन तुला मदत करीन."

बाळू राजधानीच्या गावी गेला. त्या दिवशी महाराजांनी महाकवी जगन्नाथ पंडिताचा सुवर्णाभिषेक समारंभ ठेवला होता. तो उत्सव पाहायला बाळू गेला.

तेथे त्याने, राज्यातील सर्व मानकरी मंडळी महाकवीला वाकून आदरपूर्वक नमस्कार करीत असलेले स्वतःच्या डोळयांनी पाहिले. राजा एका हातात सुवर्णमुद्रा घेऊन आला व पुरोहित मंत्रोच्चार करू लागले. राजाने सुवर्णाभिषेक केल्यानंतर जगन्नाथ कवीच्या पायांवर डोके ठेवले. महाकवीने आशीर्वाद दिला आणि महाकवीचा व महाराजांचा जयजयकार झाला.

त्या दिवशी सायंकाळी बाळू जगन्नाथ पंडितांच्या दर्शनाला गेला. अगदी सहजी



त्याला दर्शन घडले. बाळूने नम्रपणे कवीचे वंदन केले व म्हणाला–"महाकवी, आपण मला माझ्या बुद्धि चातुर्याचे प्रदर्शन करायला संधी देऊ शकल्यास मी थोर महापुरुषाला प्रसन्न करू शकेन. आपली शिफारस मिळाल्यास राजदरबारी मला नक्कीच नोकरी मिळेल."

जगन्नाथ पंडितांना आश्चर्य वाटले. ते म्हणाले–"मुला, तू कोण हे मला माहीत नाही. परंतु तू भोळा आहेस एवढे मात्र मला कळले. नाही तर तू माझ्यासारख्याकडे शिफारस करायला सांगण्यासाठी आला नसतास."

बाळू लाजून नम्रपणे म्हणाला–"मला सर्वच खुळा व भोळा म्हणतात, आपणही तेच म्हणालात. परंतु महाराजांकडून आपला स्वर्णाभिषेक करविणारे थोर पुरुष मला आणखी कोठून मिळणार?"

महाकवी स्मित करून म्हणाले–"अरे वेड्या, तुला हे माहीत नाही का, राजा थोरपणा मिळविण्यासाठी आणि मिरविण्यासाठी कवी व विद्वानांचा सत्कार करतो. त्यांनी म्हणून तर माझा सत्कार करविला, त्यांच्या मनात माझ्या विषयी मोठा आदर आहे म्हणून नव्हे! तुला राजदरबारात नोकरीच करावयाची असेल तर मंत्र्याकडे जा, सेनापती किंवा विदूषकाकडे जा. तेही जमले नाही तर राजाचा न्हावी किंवा धोबी असेल त्याला पकड.

सत्कार समारंभ संपल्यानंतर मी कोण व माझा सत्कार कसा व कशासाठी केला गेला, हे तेथील राजाला आठवेल की नाही शंकाच!"

महाकवीच्या तोंडून ते शब्द ऐकून बाळूला सर्व जगच विचित्र वाटू लागले. त्यानंतर त्याने वडिलांकडे निरोप पाठविला व त्यांनी बाळूला राजदरबारात नोकरी मिळवून दिली. एखाद्या सामान्य अपरिचितासारखा तो नोकरी करून सुखाने आयुष्य घालवू लागला.






[२]

[सुख व शांतीबरोबर ऐश्वर्यसंपन्न अशा मराळ द्वीपावर राजा मंदरदेव याचे राज्य होते. त्याच्या शेजारचे राज्य कुंडलिनी द्वीप होते. तेथे अराजकता होती. नरवाहन मिश्रा नांवाच्या सेनापतीने सत्ता बळकावली व मराळ द्वीपावर स्वारी केली. विश्वासघातकी लोकांनी मंदरदेवाला बंदी केले व त्याला घेऊन जाऊ लागले. पुढे–]

विजा चमकू लागल्या आणि ढगांचा गडगडाट सुरू झाला आणि त्या पाठोपाठ मुसळधार पाऊस पडू लागला. किनाऱ्यावरची नारळाची व सुरूची झाडे सोसाट्याच्या वाऱ्यामुळे उमळून पडू लागली. समुद्रात तळहातावर जीव घेऊन युद्ध करणारे मराळ व कुंडलिनी द्वीपाच्या आरमाराच्या युद्धनौका लाटांबरोबर वारा नेईल तिकडे वाहून जाऊ लागल्या. किनाऱ्यावर उतरलेले कुंडलिनी द्वीपावरचे सैन्य मराळ देशाच्या सैन्याबरोबर युद्ध करू लागले.

मंदरदेव घोड्याला टांच मारून पळ काढू लागला. त्याला कुंडलिनी व मराळ देशांच्या सैनिकांच्या आरोळ्या ऐकू येत होत्या. 'जय कुंडलिनी देवी की!' आणि 'जय मराळी देवी की' असा जयघोष ही दोन्ही सैन्ये करीत होती. वाऱ्याबरोबर



ढग वाहून जाऊ लागले. तरी विजांचा कडकडाट चालूच होता. त्या आवाजाने आसमंत दुमदुमून निघत होते.

मंदरदेव विचार करू लागला–"आतां आपण आपल्या राज्याला कायमचे मुकलो, आपण किती प्रयत्न केला तरी स्वतःचा बचाव करून घेऊन निसटून जाणे शक्य नाही. त्याचे अंगरक्षक त्याच्याशी दगा करून शत्रूला सामील झाल्यामुळे त्याला तेथून निसटून जाणे ही शक्य नव्हते. त्याच्या हातात बरची भाला किंवा इतर कोणते ही शस्त्र संरक्षणासाठी नव्हते. या संकटातून सुटका कशी काय मिळणार, या विचारात गढून गेलेल्या मंदरदेवाच्या कानावर 'जय मराळदेवी की' हा जयघोष आला. तो चकित होऊन आपल्या चारी बाजूला पाहू लागला.

हा जयघोष करणारे मंदरदेवाचे रक्षण करण्यासाठी मंत्र्याने पाठविलेले सैनिकच होते. ते मंदरदेवाला धरून नेणाऱ्या बंडखोर अंगरक्षकांवर चालून येत होते. त्यांच्या घोड्यांच्या टापांचा आवाज स्पष्ट ऐकू येत होता. मंदरदेवाने एकदा मागे वळून पाहिले. त्याच वेळी विजेचा फार जोराने कडकडाट झाला आणि वीज पडली. त्या आवाजाने सर्वांचा थरकांप उडाला. मंदरदेवाने त्या उजेडात वळून पाहिले. बंडखोर अंगरक्षकांपैकी काही जमिनीवर कोसळून तडफडत होते. त्यांचा एक घोडा विजेचा आघात झाल्याने किंकाळया फोडीत होता. दुसरा घोडा वाट फुटेल तिकडे पळत होता.

मंदरदेवाने आपल्या घोड्यावरून खाली उडी मारली. त्याच वेळी रक्षणार्थ मंत्र्याने पाठविलेले सैनिक त्याच्या जवळ येऊन पोंचले. विजेच्या आघाताने तडफडणाऱ्या अंगरक्षकांजवळ ते जाऊ लागले.

मृत्यूच्या दाढेत सापडलेला एक बंडखोर अंगरक्षक मंदरदेवाकडे हातवारे करून त्याला बोलवीत होता. मंदरदेव त्याच्या जवळ जाऊन बसला. तेव्हां धापा टाकीत



तो अंगरक्षक म्हणाला–"महाराज, आम्ही दोघांनी आपल्याशी दगा केला खरा, परंतु खरी गोष्ट अशी आहे की धनलोभाने आम्ही हे केले नाही. नीच नरवाहनने आमच्याकडे दूत पाठवून कळविले की आम्ही त्याचा हुकूम मानला नाही तर तो आमच्या बायकापोरांची कत्तल केल्याशिवाय राहणार नाही. आपल्याला माहीतच आहे की आम्ही आपले अंगरक्षक असलो तरी कुंडलिनी द्वीपावरचे रहिवाशी आहों. आम्ही आपले मीठ खाल्ले व त्याच्याशी दगा केला त्याचे प्राय:श्चित्त परमेश्वराने आम्हांला दिले. आपले मीठ खाल्ले त्याचे उतराई होण्याची या क्षणाला इच्छा आहे म्हणून सांगतों; आपल्याला स्वतःचा बचाव करावयाचा असेल तर या नारळांच्या झाडांपलीकडे दोन नावा आहेत." बोलतां-बोलतांच त्या अंगरक्षकाचे प्राणोत्क्रमण झाले.

मंदरदेवाने उठून एकदां आपल्या किल्ल्याकडे पाहिले. किल्ल्याच्या बुरजांवर उभे राहून सैनिक शरवृष्टी करीत होते. काही लोक शत्रूची पीछेहाट करण्यासाठी व किल्ल्याच्या रक्षणासाठी मोठे मोठे दगड व खडक खाली ढकलीत होते. कुंडलिनी द्वीपाचे सैनिक शिड्या लावून किल्ल्याच्या तटावर चढण्याचा यत्न करीत असल्याचे दिसत होते.

मंदरदेवाला हे कळायला वेळ लागला नाही की त्याच्या सैन्याने किल्ल्याच्य





रक्षणार्थ आपले सर्वस्व पणाला लावले आहे आणि त्या भयंकर नैसर्गिक परिस्थितीत ही कुंडलिनी द्वीपाचे सैनिक मराळ द्वीपाच्या सैन्याचा पराभव करण्यात यशस्वी होतील असे दिसत आहे. तो त्यावेळी शत्रु सैन्याच्या पाठीमागे होता. फक्त चार सैनिकांच्या मदतीने शत्रुसैन्यावर चालून जाणे आत्महत्या करण्यासारखेच ठरणार होते. मंदरदेव किंकर्तव्य विमूढ परिस्थितीत होता. त्याच वेळी कानाचे पडदे फाटतील इतका मोठा स्फोट झाला. पायाखालची जमीन हादरली. बुरजाचे दगड आकाशात उडत असलेले दिसले. सैनिकांच्या किंकाळ्या आणि आरडा ओरडा ऐकूं येऊ लागला. एकंदर प्रसंगच अवघड होता.

तेव्हां मंदरदेव आपल्या सैनिकांना म्हणाला–"सर्वनाश झाला! कुंडलिनी द्वीपाच्या लोकांनी सुरंग लावून किल्ल्याचा तट पाडला, आतां पराभव निश्चित आहे."

"खरे आहे, महाराज!" म्हणत चारही सैनिकांनी हताश होऊन माना खाली घातल्या.

त्यानंतर मंदरदेवाला वाटले की मराळ द्वीपाला सोडण्याशिवाय तरणोपाय नाही. शत्रूने पाडला तर किल्ला सर करणे शत्रूला अशक्य नाही. आतां शत्रू आपला शोध काढणार. आपण शत्रूच्या हातात कैदी झालो तर शत्रू नानाप्रकारे हाल हाल करून आपला जीव घेतल्याशिवाय राहणार नाही. त्या दुष्ट नरवाहन मिश्राच्या हाती आपल्याला अपमान सहन करावा लागणार.

असा विचार करून मंदरदेव म्हणाला–"बरं तर आतां त्या बंडखोर अंगरक्षकाने सांगितल्याप्रमाणे जर का किनाऱ्यावर नावा असतील तर स्वतःला वांचविण्यास तेवढाच मार्ग आपणास उरला आहे. मराळ देवीची कृपा असेल तर आपण सुरक्षित कोणत्या तरी बेटावर पोहोचूं. नशीब पाठीशी असेल तर देवीच्या कृपेने आपण पुन्हां मराळ द्वीप जिंकू!"





सैनिकांनी अगदी हताश होऊन एकदां किल्ल्याकडे पाहिले. किल्ल्याच्या तटावर किंवा बुरजांवर मराळ द्वीपाचे सैनिक कुंडलिनीच्या सैन्याशी लढत असलेले दिसत नव्हते. कुंडलिनी द्वीपावरचे सैनिक आता निश्चितपणे शिड्या लावून तटावर चढून जात होते.

मंदरदेव पाठ फिरवून निघाला. त्याचा चेहरा गंभीर होता. त्याच्या हातात एकही शस्त्र नसलेले पाहून एका सैनिकाने मेलेल्या अंगरक्षकाच्या हातातली तलवार काढून ती मंदरदेवाला दिली. त्यानंतर ते सर्व समुद्र किनाऱ्याकडे जाण्यासाठी नारळांच्या झाडांच्या दिशेने चालू लागले. अजून मुसळधार पाऊस थांबला नव्हता. विजा चमकत होत्या व ढगांचा कडकडाट चालूच होता.

निराश होऊन सर्व माना खाली घालून चालत होते. थोडे अंतर चालून गेल्यावर त्यांना पाठीमागून घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकू आला. त्यांनी मागेवळून पाहिले. किल्ल्याकडून भरधांव येत असलेले घोडेस्वार त्यांना दिसले. मंदरदेव तत्क्षण म्हणाला–"ते पहा, कुंडलिनी द्वीपाचेच घोडेस्वार दिसत आहेत. आपल्याला कैद करण्यासाठीच इकडे येत आहेत. या मैदानांत उघड्यावर इतक्या सशस्त्र घोडेस्वारांशी युद्ध करणे सोपे नाही. आपण वेळ न घालवितां त्या नारळांच्या झाडात कोठे तरी दबा धरून राहले पाहिजे." या शब्दांत मंदरदेवाने सर्व सैनिकांना सावध केले व स्वतः नारळाच्या झाडांच्या दिशेने निघाला. सैनिकांनी राजाचे अनुसरण केले. सर्व एकेक करून एकेका झाडाआड लपून उभे राहिले आणि किल्ल्याकडून येणाऱ्या घोडेस्वारांकडे पाहू लागले. कुंडलिनी द्वीपाचे घोडेस्वार त्याच दिशेने येत होते. मंदरदेवाने तलवार उपसून जवळच्या समुद्राकडे एकदां पाहिले. बंडखोर अंगरक्षकाने सांगितलेल्या दोन नावा पाण्यावर तरंगत असलेल्या दिसल्या. आपण चार पावले धावत जाऊन

नावात चढून जाणं कदाचित शक्य होईल आणि समुद्रात गेल्यावर शत्रूच्या घोडेस्वारांच्या हातांतून निसटून जाता येईल, असा एक विचार त्याच्या मनाला चाटून गेला, परंतु दुसऱ्या क्षणाला घोडस्वार नारळाच्या झाडांजवळ पोचलेले त्याच्या दृष्टीस पडले. ते दहापंधराच होते. परंतु सर्व सशस्त्र होते.

मंदरदेवने गंभीर स्वरात आपल्या चौघां सैनिकांना सावध केले–"आतां आपण विजयी तरी होऊं किंवा आपल्याला वीरगती तरी प्राप्त होईल!" असे म्हणत मंदरदेव तलवार घेऊन समोर आला. त्याचे सैनिक मात्र नारळाच्या झाडाआड उभे राहून येणाऱ्या घोडेस्वारांची शिकार करायला तयार होते. कुंडलिनी द्वीपावरच्या घोडेस्वारांना झाडाआड उभे असलेले सैनिक दिसले नाहीत. म्हणून ते भरधांव घोड्यांवर झाडांच्या मध्यभागी पोचले. "जय मराळ देवी की!" सिंहगर्जना करीत मंदरदेवने पुढे पाऊल टाकून एका शत्रूचे शिरस्त्राण केले.

त्या अनपेक्षित सिंहगर्जनेमुळे व एक साथीदार मरून पडल्यामुळे शत्रुसैनिकांना दहशत बसली नारळाच्या मधून चिंचोळ्या वाटेने घोडे पुढे नेणे घोडेस्वारांना शक्य नव्हते आणि ते घाबरून गेले. ती संधी



साधून मंदरदेव व त्याच्या सैनिकांनी घोडेस्वारांवर हल्ला चढविला आणि एकेकाला जखमी करून खाली पाडू लागले.

त्या घोडेस्वारांपैकी चारपाच धरा शायी आले तेव्हां उरलेले घोडेस्वार घोड्यांवरून उतरून मंदरदेव व त्याच्या सैनिकांवर तुटून पडले. पाहतां पाहतां त्या नारळाच्या बागेत भयंकर चकमक उडून गेली. त्या भयंकर चकमकीत तलवारींचे वार कधी शत्रूच्या अंगावर पडत तर कधी झाडांवर.

एका घटकेत कुंडलिनी द्वीपावरचे बरेच सैनिक जमिनीवर लोळू लागले. झाडाआडून लपून शत्रूवर वार करणाऱ्या

मंदरदेवाने व त्याच्या सैनिकांनी शत्रूला नामोहरम केले आहे. उरलेल्या सैनिकांची गाळण उडाली असून व त्यांनी तेथून पाय काढता घेतला आहे. परंतु मंदरदेवाने त्यांना सोडले नाही. त्यांचा पाठलाग करून त्यापैकी काहींना जमिनीवर लोळविले आणि काहींना ठार केले.

त्यानंतर काही वेळाने तेथे स्मशानवत शांतता नांदू लागली. विजा पडत होत्या व ढगांचा कडकडाट चालू होता. किल्ल्याकडून कसलाच आवाज येत नव्हता. कुंडलिनी द्वीपावरच्या काही घोडेस्वारांनी आपले घोडे नारळाच्या बागेतच सोडून दिले होते. स्वतःचा जीव वाचविण्याची एकच फिकीर त्यांना होती.

तिकडे शत्रूने किल्ला काबीज केला होता. तरी राजवाड्याच्या परिसरात अद्याप कुंडलिनी व मराळ द्वीपांच्या चकमकी चालूच होत्या.

त्या लढाईत मंदरदेव व त्याचे सैनिक बरेच जखमी झालेले होते. परंतु त्यांच्या जखमा तितक्या मोठ्या व भयंकर नव्हत्या. परंतु ते अगदी दमून भागून गेले होते.

मंदरदेवाने आपली तलवार म्यानेत ठेवली व म्हणाला–"आतां आपण वेळ घालविणे धोक्याचे आहे!" असे सांगून तो नावा होत्या त्या बाजूला किनाऱ्याकडे निघाला. चार ही सैनिकांनी एकदां किल्ल्याकडे पाहिले व नंतर आपल्या राजाच्या पाठीमागून निघाले.

बंडखोर अंगरक्षकाने सांगितल्या प्रमाणे दोन नावा समुद्राच्या किनाऱ्यावर होत्या खऱ्या, परंतु त्या समुद्रात खोल पाण्यात वदूरवर प्रवास करण्यास उपयोगी नव्हत्या. कारण त्या अगदी लहान होडक्यांसारख्याच होत्या. शीड लावून नेण्यासाठी त्यात व्यवस्था नव्हती. फक्त वल्ही मारूनच त्यांतून जाता येणे शक्य होते.

मंदरदेव नावांजवळ जाऊन पाहू लागला. तेव्हां त्याला काही तरी युवती सुचल्यासारखी दिसली. म्हणून त्याने आपल्या सैनिकांकडे वळून पाहिले.

(क्रमशः)



# राजयोगी

**वि**क्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, फार जुनी गोष्ट आहे, एका राजकुमाराने योगी झाल्यानंतर संकोचाने म्हणा नाहीतर आणखी काही कारणाने म्हणा, आपल्या दोघां शिष्यांमध्ये चालू असलेल्या भांडणाचा सयुक्तिक निकाल दिला नाही. मला असे वाटते आहे की तू सुद्धा कोणाला नाखुश न करण्याच्या हेतूने हे साहसाचे काम करीत असावास. मी तुला त्या राजयोग्याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार प्राचीन काळी चंपक देशावर राजा धीरवर्मा याचे राज्य होते. त्याला वीरवर्मा,



शूरवर्मा व गुणवर्मा नावाचे तीन मुलगे होते. सर्वात धाकटा गुणवर्मा याचे लक्ष आध्यात्माकडे जास्त होते.

काही दिवसांनी राजा धीरवर्मा स्वर्गलोकी गेला. म्हणून युवराज वीरवर्मा याच्या राज्याभिषेकाची तयारी सुरु झाली. मधला राजकुमार शूरवर्मा याला ती गोष्ट आवडली नाही. त्याने वीरवर्मा विरुद्ध कट केला. ती गोष्ट वीरवर्माला त्याच्या स्वामिभक्त नोकरांकडून कळली. म्हणून दोघां राजकुमारांचे परस्परांशी द्वंद्वयुद्ध झाले आणि दोघेही त्या युद्धात मरण पावले.

ते पाहून धाकटा राजकुमार गुणवर्मा-याच्या मनात राज्याचा मोह उत्पन्न होण्या-ऐवजी विरक्ती उत्पन्न झाली व तो कोणलाही सांगितल्या शिवाय त्याच दिवशी रात्री राजधानी सोडून निघून रानावनात जाऊन राहू लागला. त्याने तीर्थयात्रा केली आणि साधू व संन्याश्यांच्या भेटी घेऊन ज्ञान प्राप्त केले.

शेवटी तो शंखपुर नावाच्या गावाजवळ एक रानात तपश्चर्या करू लागला. ती जागा शांत व तपश्चर्ये योग्य होती.

तो तपश्चर्येत इतका गर्क होऊन गेला की त्याला भूक तहानेचे सुद्धा भान राहिले नाही. इतके की त्याच्या अंगावर मुंग्यांनी वारूळ केले.

त्या गावचे काही लोक त्या जागी आले व ती जागा शेतीला चांगली सुपीक आहे हे ओळखून त्यांनी झाडेझुडपे तोडून तो प्रदेश खणून नांगरून काढला. ते झाडे झुडपे काढीत गुणवर्माच्या अंगावर वारूळ झाले होते तेथे आले. वारूळ काढून जमीन समतल करण्याच्या हेतूने ते वारूळ खणू लागले तेव्हां आत गुणवर्मा त्यांना आढळला. त्याची तपश्चर्या त्यावेळी भंग झाली.

मुनींना राग नये म्हणून गावकरी हात-जोडून त्याची क्षमा मागू लागले. परंतु तो रागवला नव्हता. त्याच्या चेहऱ्यावर गांवकऱ्यांना एक अद्भुत तेज दिसले. गावकऱ्यांनी त्याच जागी एक झोपडी बांधून





गुणवर्माला तीत राहण्याची विनंती केली. त्याने ती मान्य केली.

त्या दिवसापासून शंखपुर गावाचे लोक गुणवर्माच्या दर्शनाला नित्य येऊ लागले. जवळपासच्या पंचक्रोशीत गुणवर्माची कीर्ती पसरली व लोक त्याच्या दर्शनाला येऊ लागले. लोक त्याला विनवू लागले की त्याने गावात येऊन रहावे व त्यांना उपदेश करून त्यांना सन्मार्गाला लावावे. त्याप्रमाणे गुणवर्मा गावात येऊन राहू लागला.

शंखपुर गावाचा एक सधन शेतकरी गुणाजी पाटील होता. तसाच एक श्रीमंत सावकार धनजीशेट नावाचा होता. ते दोघे गुणवर्माचे शिष्य होते. त्यांनी गावाच्या मध्यजागी गुणवर्मासाठी एक मोठी हवेली बांधून दिली. त्या हवेलीत गुणवर्मा राहू लागला व तेथे एक मोठा आश्रम स्थापन झाला. भक्त लोक गुणवर्माच्या दर्शनाला येत व आश्रमाला मोठमोठ्या देणग्या देत. आश्रमाची सर्व व्यवस्था गुणाजी व धनजीशेट पहात.

हळूहळू दोघांना गुणवर्माच्या उपदेशांपेक्षा आश्रमाच्या व्यवस्थेच्या कामात जास्त रस वाटू लागला. दोघांमध्ये अधिकारासाठी स्पर्धा सुरू झाली. मैत्रीच्या जागी दोघांची परस्परांशी अधिकारासाठी भांडणे होऊ लागली. एकदा गुणवर्माच्या दर्शनास लोक आले होते. तेव्हां गुणाजी गुणवर्माला म्हणाला—"धनजी मोठा बस्ताद व लोभी आहे. त्याला आश्रमाच्या व्यवस्थेची कामे सोपविणे बरोबर नाही." त्यानंतर धनजीने गुणाजीच्या विरुद्ध गुणवर्माकडे येऊन कागाळ्या करायला सुरवात केली.

एके दिवशी रात्री गुणवर्माने या सर्वांचा बराच विचार केला आणि कोणलाही काही कळविल्याशिवाय आश्रम सोडून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, गुणवर्माचे हे वागणं मला विक्षिप्तपणाचं वाटतं आहे! त्याच्यावर एवढी भक्ती दर्शविणाऱ्या गुणाजी व धनजी यांच्यामधील स्पर्धा दूर करून त्या दोघांपैकी

योग्य व्यक्तीच्या हातात आश्रमाची व्यवस्था द्यायला हवी होती. परंतु आपले हे कर्तव्य न पाळता घाबरून जाऊन कोणाला काही सांगितल्याशिवाय निघून जाण्यात गुण-वर्माला काय मिळाले? दोघे त्याचे शिष्य होते, त्यांच्या मधील स्पर्धा दूर करून न्याय्य देण्यात त्याला संकोचवाटला म्हणून त्याने पलायनाचा मार्ग काटला असे म्हणावयाचे का? या शंकोचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील!"

विक्रमादित्य म्हणाला–"गुणवर्माचं तसं वागणं निरर्थक म्हणतां येणार नाही. त्याचे शिष्य असून त्याच्यावर एवढी भक्ती असलेल्या गुणाजी व धनजी यांच्या मधील भांडणाचा शेवट करून योग्यते प्रमाणे त्यांच्यापैकी एकाच्या हातात आश्रमाची व्यवस्था देण्यास त्याला राजासारखा अधि-कार कोठे होता? तसा तो सामान्य माणूसही नव्हता. सामान्य माणसांत जी ईर्ष्या व द्वेष इत्यादि दुर्गुण असतात ते पाहूनच विरक्ती उत्पन्न झाल्यामुळेच नाही का त्याने सिंहासनाला लाथ मारली? गांव-कऱ्यांची भक्ति भावना पाहून त्यांना मुक्ति मार्गाचे मार्गदर्शन करण्याच्या सदुद्देशाने त्याने गावात राहण्याची गोष्ट कबूल केली होती. ती देखील गावकऱ्यांच्या इच्छेला मान देऊनच की नाही? परंतु त्याच्या शिष्यांत मुक्ति मार्गा ऐवजी अधिकार लालसा वाढत असलेला त्याला श्रेयस्कर वाटले. निघून जाण्यामागे संकोच नव्हता उलट अधिकारासाठी भांडणाऱ्या गुणाजी व धनजी विषयी त्याला घृणा वाटू लागली होती. अधिकारासाठी त्याचे दोघे भाऊ आपसात भांडून प्राणास मुकले होते, म्हणूनच तर त्याने चालून आलेल्या सिंहा-सनाचा मोह सोडला होता नाही का?"

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतावरोबर नाहीस झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





## स्वप्नाचा जादू

शेखर व विठ्ठल दोघे जीवश्चकंठश्च मित्र होते. दोघे एकाच वर्गात लहानपणी शिकत होते. शिक्षण संपल्यावर शेखरला विठ्ठलपेक्षा चांगली नोकरी मिळाली. दोघे एकाच गावी बिऱ्हाड करून राहू लागले होते.

परंतु विठ्ठलची बायको रखमाबाई व शेखरची बायको पार्वती दोघींमध्ये सख्य नव्हते. कारण शेखरची बायको श्रीमंत घराण्यातून सासरी आली होती व म्हणून ती रखमाबाईचा योग्य मान राखीत नसे. दुर्दैवाने एकदा विठ्ठलच्या घराला आग लागली. परंतु विठ्ठलने जिवावर उदार होऊन आपल्या बायकोला मुलांना वांचविले. तरी त्याच्या जवळ जें काही थोडे फार होते ते सर्व अग्निनारायणा-च्या आहारी गेले. विठ्ठलवर ओढलेल्या घोर दैवी प्रकोपाबद्दल शेखरला फार वाईट वाटले. विठ्ठलचे शेखरसारखेच आणखी काही मित्र होते. सर्वांनी मिळून विठ्ठलला मदद करायची ठरविले असते तर घर पुन्हा उभे राहू शकले असते.

परंतु नेमका त्यावेळीच शेखरचा हात रिकामा होता. त्याच्या बायकोजवळ माहे-रून आणलेले दागिने होते. पार्वतीला तिचे दागिने जिवापेक्षा मोठे वाटत. झोपतांना सुद्धा ती सर्व दागिने घालूनच निजे. फार मौल्यवान होते.

शेखरला काय करावे, सुचेना. त्याला त्यावेळी पैसे देणे तर शक्यच नव्हते. निदान बायकोचे दागिने गहाण ठेवून कर्ज काढून काही मदत करता आली असती, आणि विठ्ठलने त्याची स्थिती सुधारल्यावर कर्जाची रक्कम फेडलीही असती. परंतु पार्वती त्या गोष्टीस कशी कबूल होणार?



बराच विचार केल्यानंतर शेखरला एक युक्ती सुचली. पार्वतीचा स्वप्नांवर फार विश्वास होता. ती सांगे की जे स्वप्नात घडते ते कधी न कधी खरे होतेच! कारण त्यापूर्वी तिला किंवा शेखरला जी स्वप्ने पडली होती, ती, योगायोग असा की सर्व खरी ठरली होती. म्हणून शेखरने बायकोचा स्वप्नांवर जो विश्वास आहे त्याचा उपयोग याप्रसंगी करून घेतला पाहिजे असे ठरविले.

एके दिवशी मध्यरात्रीच्या सुमारास शेखर दचकल्यासारखा झोपेतून उठला. पार्वतीसुद्धा जागी झाली व आपल्या अंगा-खांद्यावरचे दागिने आहेत की नाही, याची प्रथम खात्री करून घेऊन तिने नवऱ्याला विचारले–"काय झालं हो?"

शेखर म्हणाला–"अग, मला एक मोठे वाईट स्वप्न पडले. आपल्या घरात चोर शिरले आहेत."

"बरं मग आतां काय करायचे म्हणता?" पार्वतीने विचारले.

"करायचं काय? अग, हेतर स्वप्नच होतं ना! सकाळी उठल्यावर मी कदाचित विसरेन म्हणून आतां सांगून टाकलं, एवढंच!" शेखर म्हणाला.

"तुम्ही अशी उडवा ःवा करून टाळू नका! तो पहा, कोंबडासुद्धा आरवला. पहाटेची स्वप्न कधी खोटी होत नाहीत. यापूर्वी पहाटे पडलेली स्वप्न खरी नाही का झाली?" पार्वती म्हणाली.

"तू म्हणतेस ते अगदी खरं आहे ग! पण काय करावं म्हणतेस?" शेखरने तिला विचारले.

"आपण हे सर्व दागिने घरातच कोठे तरी पुरून ठेवू या! चोरांना पत्ता लागणार नाही!" पार्वतीने सुचविले.

"चोर घरात शिरल्यावर दागिने मिळाले नाहीत तर नुसते सोडून देतील का आपल्याला? दागिन्यांसाठी आम्हांला मारा-यला तयार होणार नाही का?" शेखरने विचारले.

पार्वतीने होकारार्थी मान हलविली. शेखर थोडा वेळ थांबून म्हणाला–"एक काम करू या. आपला एक श्रीमंत मित्र आहे. अशा वाईट स्वप्नांचा परिणाम वर्षा दोन वर्षानंतर रहात नाही. म्हणून आपण सर्व दागिने त्याच्याकडे नेऊन ठेवू या. हे सुद्धां तुझ्या मनाच्या समाधानासाठी! तसं म्हणालीस तर माझा तुझा तुझ्यासारखा स्वप्नांवर विश्वास नाही."

पार्वतीला ती सूचना मान्य झाली. दुसऱ्या दिवशी तिने अंगावरचे सर्व दागिने नवऱ्याच्या हातात दिले. शेखर ते दागिने घेऊन विठुलच्या घरी गेला. परंतु विठुलला ते मान्य नव्हते. परक्याचे दागिने गहाण ठेवून कर्ज काढणे त्याला कसे मान्य होणार. म्हणून शेखरने स्वतःच बायकोचे दागिने गहाण ठेवून कर्ज काढले व विठुलला आणून दिले. विठुलचे डोळे शेखरच्या या उपकाराने डबडबून आले.

काही दिवसांनी पार्वतीने दागिने परत आणायला सांगितले. पण शेखरने त्याचा तो श्रीमंत मित्र परगावी गेला असल्याचे सांगून ती गोष्ट टाळली.

त्यानंतर तीन दिवसांनी एक चोर तोंडा-वर बुरखा घालून एक सुरा घेऊन शेखरच्या घरात शिरला. त्याने शेखरला व त्याच्या बायकोला सुरा दाखवून विचारले–"घरात दागिने कोठे ठेवले आहेत सांगतां की भोसकू सुरा?"



पार्वती तर घाबरून थरथर कापूच लागली. तिला समजावून सांगून शेखर चोराला म्हणाला–"तुला आमचे घर पाहून वाटत असेल आम्ही खूप श्रीमंत आहोत व पुष्कळ दागिने असतील आमच्या घरात. परंतु खरी गोष्ट ही आहे की तुला वाटते तसे आमच्या घरात दागिने व पैसे तर नाहीतच नाहीत, उलट आमच्यावर कर्ज आहे, कर्ज!"

चोर थोडा वेळ गप्प राहिल्यावर चिडून म्हणाला–"तू चोराला आपल्या कर्जाचे रडगाणे सांगणारा कसाला मर्द आहेस रे? नक्कीच काही तरी फसवाफसवी दिसते आहे. मी पुन्हा येईन तेव्हां चांगली खोल चवकशी करून येईन. मला जर कळलं की तू मला फसविलं आहेस तर मात्र तुझी अशी खोड मोडीन की तुला जन्मभर आठवण राहील." असे सांगून व पुन्हा एकदां सुरा दाखवून चोर निघून गेला.

चोर निघून गेल्यावर पार्वती स्वतःला सावरून म्हणाली–"पाहिलंत, तुम्हांला पडलेले स्वप्न खरं ठरलं! आपलं नशीब चांगलं होतं, म्हणून आपण वेळीच सावध झालो. नाहीं तर त्या चोराने आपणांस मारून टाकले असते.

पुष्कळ दिवसांनी विठ्ठलने आपलं कर्ज फेडलं आणि शेखर दागिने सोडवून घेऊन घरी परत आला. बायकोला दागिने परत देत म्हणाला–"आतां पुष्कळ दिवस होऊन गेले, आतां चोराची भीती बिलकूल राहिली नाही."

पार्वतीने देवाचे आभार मानून सर्व दागिने पाहिले आणि आनंदाने अंगावर घातले.

बायकोच्या या भोळेपणावर शेखरला हसू आले. स्वप्नावरचा तिचा विश्वास त्याच्या चांगलाच पथ्यावर पडला. एका मित्राला तो संकटातून वाचवू शकला. त्याने ही घडलेली गोष्ट चकूनसुद्धा आपल्या बायकोला कळू दिली नाही की त्याच्या घरात शिरलेला चोर त्याचाच एक मित्र होता.





# उदारता

अनुरूप देशाचा राजा अनंतपाळ हा वेष पालटून देशभ्रमण करण्यास निघाला असता त्याच्या मनात आले की जनतेचे सुख-दुःख कसे काय आहे ते पाहून यावे. एकदा तो राजा एका गांवाच्या गल्लीतून जात असता त्याला एका चौथऱ्यावर एक बाई दुःखी अंतःकरणाने बसलेली दिसली.

राजाला त्या बाईच्या दुःखाचे कारण काय आहे हें समजून घ्यावयाचे होते, इतक्यात शेजारच्या घरांतून एक बाई बाहेर आली, तिने त्या दुःखीकष्टी बाईला विचारले–"शांताबाई, काय झाल? तुम्ही इतक्या दुःखी कां?"

हे ऐकून शांताबाईच्या डोळ्यांत अश्रू आले. ती म्हणाली–"पार्वतीबाई, काय सांगू. कितीतरी दिवसांनी मुलीसाठीं ठिकाण सांगून आले, पण त्यांना हुंडा वगैरे काही नको होते. फक्त मला लग्नाच्या खर्चाची चिंता वाटते आहे. निदान हजारबाराशे रुपये तरी पाहिजेत पण ते तरी कोठून येणार? प्रयत्न करीत आहे."

पार्वतीबाईला शांताबाईविषयी सर्व काही माहीत होते. तिची मिळकत ती काय, त्यात लग्नाची मुलगी पदरी, त्यामुळे जवळ जवळ वर्षभर चिंतेने तिला ग्रासलं होते.

पार्वतीबाई सहानभूति दाखवीत म्हणाली–"शांताबाई, मी सुद्धां तुमच्या मुलीच्या लग्नाविषयी विचार करते तेव्हां मनांत येते की जरी माझी ऐपत नाही, तरी सुद्धां तुम्हाला काही ना काही मदत करावी. पण करणार काय, देवाची प्रार्थना करून त्याच्या जवळ दोन हजार रुपये मागावे, व त्यापैकी एक हजार तुला द्यावे,

तुमची अडचण दूर होईल व लग्न पार पडेल आणि तुमची चिंता दूर होईल.

ह्या दोघींचे बोलणे अनंतपाळ राजाने ऐकले. ह्या दोघी जवळजवळ राहणाऱ्या गरीब कुटुंबातील आहेत. असे त्याला वाटले.

दुसऱ्या दिवशी सकाळी उठल्याबरोबर पार्वतीबाईने दार उघडले तर तिला दारांत एक पुरचुंडी दिसली. जवळपास कोणी नाहीं असे पाहून आनंदाच्या भरात ती पुरचुंडी उचलून घरांत गेली.

थोड्या वेळाने राजाचा एक शिपाई दवंडी पिटीत आला–"रस्त्यात येतांना कोठेतरी दोन हजार रुपयांची पुरचुंडी पडली आहे. जर कोणास सापडली असेल तर गांवाबाहेर राजाचा मुक्काम आहे. त्याच्या तंबूमध्ये ती पुरचुंडी आणून द्यावी राजा योग्य ते बक्षिस देईल."

पार्वतीबाई ती रुपयांची पुरचुंडी घेऊन राजाच्या तंबूकडे गेली. घडलेला सर्व वृत्तांत राजाला सांगून त्याच्यापुढे ती पुरचुंडी ठेवली. राजा पार्वतीबाईची स्तुती करीत म्हणाला–"हे दोन हजार रुपये मी तुझ्या इमानदारीबद्दल बक्षिस देत आहे. घेऊन जा."

घरी परतल्यावर पार्वतीबाई घडलेला सर्व वृत्तांत शांताबाईस सांगून म्हणाली–"बाईसाहेब, आपण असे समजू या की हे रुपये ईश्वराच्या आणि राजाच्या कृपेमुळे आपणांस मिळाले आहेत. ह्यापैकी एक



हजार रुपये मी तुम्हाला देते, तुमच्या मुलीचे लग्न पार पडेल." असे म्हणत पार्वतीबाईने एक हजार रुपये मोजून शांताबाईला दिले.

शांताबाईला रुपयांची सोय झाल्याबद्दल बरे वाटले, परंतु पार्वतीबाईविषयी तिच्या मनांत थोडे किल्मिष उत्पन्न झाले. पार्वतीबाईने मुलीच्या लग्नासाठी पैसे देण्याचे ठरविल्यावरच तिला ती पुरचुंडी मिळाली आहे. म्हणजे रुपये मिळाले हे माझ्या मुलीचे भाग्यच समजावयाचे.

अशाप्रकारे रुपयांच्या आशेने शांताबाईच्या मनांत नाही नाही त्या गोष्टी येऊ लागल्या. त्याच दिवशी पार्वतीबाई मागील-दारी विहिरीवर पाणी भरावयास गेली आहे हे पाहून शांताबाईने पार्वतीबाईच्या घरांत मांजराच्या पावलाने प्रवेश केला आणि ती रुपयांची पुरचुंडी घेऊन चुपचाप पसार झाली.

पार्वतीबाईने जेव्हां पेटी उघडून पाहिले तेव्हां तिला ती पुरचुंडी दिसली नाही. तिला फार वाईट वाटले. तिने हे शांताबाईला जाऊन सांगितले.

शांताबाई चिंतित होऊन म्हणाली–"अगबाई, हा काय अन्याय? मी माझ्या मुलीच्या लग्नाचा खर्च कसा तरी भागवीन, तुम्ही हे हजार रुपये घेऊन जा."

"असे काय म्हणता. असे काय म्हणता. मुलीचे लग्न तर टाळता येणार



नाही. एक हजार रुपयांनी काय माझे दारिद्रय थोडेच जाणार आहे." पार्वतीबाई म्हणाली.

शांताबाईचे पार्वतीबाईच्या घरात चुपचाप येणे व रुपयांची पुरचुंडी घेऊन जाणे, राजाचे दोन शिपाई पाहऱ्यावर होते त्यांनी पाहिले होते. काही वेळानंतर त्यांनी शांताबाईच्या घराची झडती घेतली. तेव्हां त्यांना ती दोन हजार रुपयांची पुरचुंडी मिळाली. शांताबाई व पार्वतीबाई यांस शिपाई राजाकडे घेऊन गेले. राजा पार्वतीबाईला म्हणाला–"मी तुला दोन हजार रुपये दिले होते. ते दोन हजार रुपये शांताबाईच्या घरांत शिपायांना मिळाले. आपसांत मैत्रीचे सोंग करून शांताबाईने पार्वतीबाईचा विश्वासघात केला. म्हणून शांताबाईस शिक्षा करतो."

शांताबाईचा थरकांप उडाला आणि तिने अपराध कबूल केला. ह्यावर पार्वतीबाई म्हणाली–"महाराज, आपल्या शिपायांची यात चूक आहे. मीच शांताबाईला मुलीच्या लग्नासाठी एक हजार रुपये देण्याचे ठरविले होते, पण तेवढ्याने तिचे काम भागणार नाही असे वाटल्यावरून मीच तिला दोन हजार रुपये देऊन तिला मदत केली."

राजाला हे कळून आले की, पार्वतीबाई शांताबाईची चूक लपविण्यासाठी स्वत: खोटे बोलत आहे. राजाने पार्वतीबाईच्या ईमानदारीची आणि उदारतेची प्रशंसा केली. या दोन हजार रुपयांच्या बरोबर आणखी एक हजार रुपये तुम्हाला बक्षिस म्हणून देत आहे. हे सर्व रुपये तुम्ही आपल्या जवळ ठेवा आणि शांताबाईच्या मुलीचे लग्न पार पडल्यावर शांताबाईच्या मनांतील दुष्ट हेतू दूर करण्याची जबाबदारी तुमच्यावरच टाकीत आहे.

पार्वतीबाई राजाला नमस्कार करून घरी यावयास निघाली तिच्या पाठोपाठ शांताबाईपण पश्चात्तापाने मान खाली घालून निघाली.





# दासीपुत्र

ब्रह्मदत्त काशीच्या राज्यावर राज्य करीत असतां बोधिसत्वांनी एका श्रीमंत घरी अवतार घेतला. लग्नाचे वय झाल्यावर त्यांचे लग्न झाले. काही काळ लोटल्यावर त्यांना एक मुलगा झाला. त्याच दिवशी त्या घरातल्या दासीला सुद्धा एक मुलगा झाला. त्याचे नाव कटाहक असे ठेवण्यात आले.

श्रीमंताचा मुलगा व दासीपुत्र कटाहक दोघांची वाढ हळूहळू होत गेली. श्रीमंताचा मुलगा विद्याभ्यासासाठी जाई तेव्हां कटाहक त्याची पाटी व पुस्तके वगैरे घेऊन जाई. ओघा ओघाने श्रीमंतचा मुलगा जे शिकत गेला. तसाच कटाहक सुद्धा अनायासाशिकत गेला.

हळूहळू कटाहकला सुशिक्षित व हुशार म्हणून प्रसिद्धी मिळू लागली. म्हणून त्याला एखाद्या नोकरासारखे राहणे बरे वाटेनासे झाले. आपण आपल्या विद्वत्तेला अनुरूप असे समाजात स्थान प्राप्त केले पाहिजे. म्हणून त्याने एक उपाय करण्याचे आपल्या मनाशी ठरविले.

काशीपासून काही कोस अंतरावर प्रत्यंत नावाच्या देशात बोधिसत्वांचा एक लक्षाधीश मित्र रहात होता. त्याच्या नावें कटाहक ने एक पत्र लिहून खाली बोधिसत्वांची सही केली. पत्रातील मजकूर असा होता.

"मी आपल्या मुलाला आपल्याकडे पाठवीत आहे. आपण परस्परांशी नाते जमवून घ्यावे असे मला वाटते. म्हणून आपण माझ्या मुलाशी मुलीचे लग्न करून देऊन माझ्या मुलाला स्वत: कडेच ठेवून घ्यावे. मी फुरसत काढून आपणांस भेटायला येईन."

असे पत्र लिहून कटाहकने मालकाची सही केली व खाली त्यांची मोहोर सुद्धा



लावली. नंतर मालकाच्या तिजोरीतून त्याला हवे होते तेवढे पैसे काढून घेतले आणि प्रत्यंत देशी निघून गेला. तेथे त्या लक्षाधीश मित्राला भेटून ते त्याने पत्र दिले.

लक्षाधीश मित्राने पत्र वाचले व त्याला आनंद झाला. त्याने एका चांगल्या मुहूर्तावर आनंदाने कटाहक बरोबर आपल्या मुलीचे लग्न करून दिले.

तेव्हां पासून कटाहकच्या सेवेला अनेक नोकरचाकर हजर राहू लागले. त्याला जेवायला दररोज पंचपक्वान्ने येऊ लागली. तो ऐशआरामात बुडून गेला. तरी तो दररोज चिडून म्हणू लागला–"काय पण हा प्रत्यंत देश आहे. येथील लोकांना सभ्यता म्हणजे काय असते हे सुद्धा कळतच नाहीसे दिसतं आहे. हे काय जेवण झालं? आणि ही काय वस्त्रं झाली? असला रांगडेपणा व रानटीपणा कोठे पूर्वी पाहिला नाही."

कटाहक बरेच दिवस न दिसल्यावर बोधिसत्वांना त्याची काळजी वाटू लागली. कोणाला तो कोठे गेला होता, माहीत नव्हते. म्हणून त्याच्या शोधार्थ बोधिसत्वांनी चारी दिशांना नोकर पाठविले. त्यापैकी एकाने प्रत्यंत देशात जाऊन ह्या गोष्टीचा शोध लावला की कटाहकने आपले नाव बदलून एका लक्षाधिशाच्या मुलीशी लग्न करून घेतले आहे आणि तो स्वतःला काशीच्या कोठल्या तरी श्रीमंताचा मुलगा असल्याचे सांगत होता.

ते ऐकून बोधिसत्वांना फार वाईट वाटले. ते स्वतः कटाहकला घेऊन येण्यासाठी प्रत्यंत देशाकडे निघाले. बोधिसत्व स्वतः येणार हे कळल्यावर कटाहकची घाबरगुंडीच उडाली. प्रथम त्याने पळून जाण्याचे ठरविले. मी असे केल्याने आपलेच नुकसान होईल व कोणत्याही प्रकारचा फायदा होणार नाही. असा विचार करून त्याने आपल्या मालकाला खरी गोष्ट सांगून टाकण्याचे ठरविले.



आपल्या मालकाकडून लक्षाधीशाला सर्व कळण्यापूर्वीच त्यांना स्वतःच सर्व सांगून मोकळे व्हावे व त्यांची माफी मागावी असेही त्याने ठरविले.

परंतु आपल्या मालकाबरोबर नोकरासारखे वागताना पाहून सर्व आपल्या विषयी नाही त्या शंका करू लागतील असा विचार करून तो स्वतःच आपल्या नोकरांना म्हणाला–"मी इतर लोकांच्या मुलांसारखा नाही. मी आपल्या वडिलांना देवासारखे मानतो. माझे वडील जेवायला बसले म्हणजे मी त्यांना पंख्याने वारा घालतो. त्यांना पाणी वगैरे काही लागल्यास स्वतः आणून देतो." या शब्दात तो त्यांनी स्वतः व नोकर मार्फत काम कसे केले जाते, हे सांगितले.

त्यानंतर कटाहक आपल्या सासऱ्याला जाऊन म्हणाला–"माझे वडील येत आहेत. मी त्यांना आणायला थोडा पुढे जातो आणि घेऊन येतो."

लक्षाधीश सासऱ्याने होकार दिला.

कटाहक बोधिसत्वांना नगरा बाहेरच भेटला, त्यांचे पाय धरून आपल्या कुकर्माबद्दल पश्चात्ताप व्यक्त केला आणि क्षमा मागून या संकटातून वाचविण्याची विनंती केली. बोधिसत्वांनी त्याला अभयदान दिले. त्यानंतर कटाहक बोधिसत्वां-



बरोबर आपल्या सासऱ्याच्या घरी निघून गेला.

लक्षाधीश मित्र बोधिसत्वांना भेटला. त्याला मित्र घरी आल्याबद्दल परमानंद झाला. म्हणाला–"तुमच्या इच्छे प्रमाणे माझ्या मुलीचे लग्न आपल्या चिरंजीवांशी करून दिले."

बोधिसत्वांनी मनाचे समाधान झाल्यासारखा अभिनय केला आणि कटाहक जवळ स्वतःच्या मुलाशी बोलतात तसेंच बोलले. त्यानंतर त्यांनी लक्षाधीशाच्या मुलीला बोलावून विचारले–"मुली माझा मुलगा तुझ्याशी योग्य प्रकारे वागतो की नाही?"

ती म्हणाली–"त्यांच्यात तशी कोणत्याही तऱ्हेची उणीव नाही. परंतु त्यांना उत्तमोत्तम पदार्थही रुचकर वाटत नाहीत. पंचपक्वान्ने वाढली तरी त्यांत काही तरी दोष काढतातच. यांना कोणकोणत्या प्रकारचे आणि कशा प्रकारचे पदार्थ आवडतील हेच मला कळत नाही."

"होय, तो असाच आपल्या घरीसुद्धा खाण्यापिण्याच्या पदार्थात एक न एक दोष काढून घरातील लोकांना त्रास देत असे. म्हणून खायला बसतांना तो त्यात काही दाखवू लागला की तू मी सांगतो तो श्लोक म्हणत जा. मी तो श्लोक तुला लिहून देतो. तू तो पाठ करून ठेव. तू तो म्हण, म्हणजे तो दोष काढण्याचे सोडून देईल. तू जे वाढशील ते आनंदाने खाईल." असे सांगून बोधिसत्वांनी तो श्लोक लिहून दिला.

त्यानंतर बोधिसत्व काशीला परतले. ते निघून गेल्यावर कटाहक जास्तच शेफारला. तो जास्तच तक्रारी करू लागला. तो प्रत्येक खाद्य पदार्थात काहीना काही दोष काढू लागला.

एके दिवशी त्याच्या तोंडून तक्रार ऐकताच त्याच्या बायकोने हा श्लोक म्हटला–

"बहूंपि सो विकत्थेय्य अंञम्
जनपदं गतो,
अन्वागंत्वान दूसेय्य भुंज
भोगे कटाहक!

(कटाहक अनेक प्रकारे शिव्याशाप खाऊन, परस्थानी दुसऱ्याची निंदा करीत सर्व प्रकारे सुखोप भोग ग्रहण करीत आहे.)

कटाहकाच्या बायकोला या श्लोकाचा अर्थ माहीत नव्हता. परंतु कटाहकला मात्र वाटले की त्याच्या मालकाने आपले नाव आपल्या बायकोला सांगून सर्व रहस्यस्फोट केला आहे.

त्यानंतर पुन्हां कधी जेवतांना कोणत्याही पक्वान्नाला नावे ठेवली नाहीत, उलट आनंदाने सर्व खाऊ लागला आणि सुखासमाधानाने राहू लागला.





## हल्ला-प्रतिकार

सहाव्या शतकात महंमद पैगंबराने जो नवीन धर्म स्थापन केला तोच इस्लाम विविध भटक्या जातीत इस्लाम मताने ऐक्य स्थापन केले. महंमद पैगंबरानंतर इस्लाम धर्माचे जे आधिकारी पुरुष होते त्यांना खलीफा म्हणत. त्यांनी अनेक देश जिंकले. हिंदुस्थान जिंकण्याची महत्वाकांक्षा पण होती.

त्यासाठी एक चांगली संधी चालून आली. लंकेहून निघून सिंध प्रांतागतच्या समुद्रालगतच्या किनाऱ्यावर जाणारी जहाजे चाच्यांनी लुटली. त्या जहाजात लंकेच्या राजाकडून मिळाल्या भेट वस्तू इराक मधील खलीफाचा प्रतिनिधी अल हजाज याच्यासाठी नेण्यात येत होत्या.





त्यावेळी सिंध प्रदेशावर दाहिर नावाचा राजा राज्य करीत होता. खलिफाने दाहिरला त्या भेटवस्तूंची किंमत भरायला सांगितले. त्याला नकार देऊन दाहिर राजाने कळविले की चाच्यांच्या हल्ल्याशी त्याचा किंवा त्याच्या राज्याचा काही एक संबंध नव्हता. जहाज सुरक्षितपणे नेण्याची जबाबदारी त्यांचीच स्वतःची होती.



ते उत्तर मिळाल्यावर अल हजाजयाने सिंध राज्यावर मोठ्या सैन्यानिशी स्वारी केली. दैबालच्या रणांगणावर भयंकर युद्ध झाले. दाहिरला या युद्धाची कल्पनाही नव्हती म्हणून तो तयार नव्हता. तरी त्याने निकराची लढाई लढून शत्रूच्या पराभव केला. त्या युद्धात त्याच्या शूर सरदारांना वीरगती प्राप्त झाली.

पराभवाची वार्ता कळल्यावर अल हजाज चिडला. त्याने खलीफाजवळ मदत मागून मोठे सैन्य उभे केले आणि आपला जावई महंमद बिन कासिम याला सेनापती नेमले. कासिम शूर होता व युद्धकुशलही होता. त्याने दैबावर पुन्हा स्वारी केली.





धन लोभी काका कोटाल नामक एका सामंताला कासिमने फितूर करून घेतले. कोटालने खोटा प्रचार सुरू केला की दाहिर राजाचा पराभव होणार असे ज्योतिष्यांनी भविष्य वर्तविले आहे. म्हणून दाहिरच्या सैन्याचा उत्साह भंग झाला. काही सरदार शत्रूला फितूर झाले.

अशा अवघड परिस्थितीतही दाहिर राजाने शौर्य व साहस दाखवून युद्ध केले. परंतु तो जख्मी झाला आणि त्याला त्याचे स्वामिभक्त सैनिक चोर वाटेने किल्ल्यात घेऊन गेले. परंतु तेथे पोचल्यावर दाहिर मरण पावला. त्याची राणी शोक करीत बसली नाही. तिने खड्ग धारण केले.





किल्ल्याच्या बुरजावर उभी राहून तिने आपल्या सैनिकांना प्रोत्साहन दिले. अशा तऱ्हेने तिने शत्रूचा हल्ला काही काळ अडविला. परंतु शत्रू असंख्य होते आणि ते किल्ल्यात शिरले. राणीने सैन्याला प्रोत्साहन देऊन खड्ग व तेलात भिजविलेल्या वस्तू पेटवून शत्रूवर टाकविल्या.

परंतु शत्रुसैन्य किल्ल्यात शिरलेच व एकामागून एका इमारतीवर अधिकार करू लागले. आपला पराभव निश्चित असल्याचे राणीने ओळखले व ती अंत:पुरातील स्त्रियांबरोबर एका दालनात गेली व त्याला आग लावली. किल्ला शत्रूने सर केला तेव्हां त्या दालनांत भस्मीभूत स्त्रियांचे देहच शत्रूला पहायला मिळाले.





विजयी कासिमने बाकी नागरिकांपैकी तीस हजार लोकांना गुलाम करून इराक देशाला परतला. त्यांत दाहिर राजाच्या दोन लहान मुली सुद्धा होत्या. कासिमने खलीफाला त्या भेट म्हणून दिल्या.

त्या तरुण राजकन्यांना पाहून खलीफाने त्यांच्याशी लग्न करून घेण्याचे ठरविले. परंतु त्या राजकन्यांनी, कासिमने त्या पूर्वीच त्यांच्याशी विवाह केला असल्याचे सांगितले. ते कळल्यावर खलीफा संतापला व त्याने कासिमला एक कातड्याच्या पिशवीत कोंडून समोर हजर करायला सैनिकांना हुकूम केला.





सैनिक कासिमला कातड्याच्या पिशवीत धरून घेऊन जात असतां तो वाटेतच गुदमरून मरण पावला. ते कळल्यावर दाहिरच्या मुलींनी खलीफाला कासिमने त्यांच्याशी ही गोष्ट खोटी सांगितल्याचे कळविले. त्याने आमच्या वडिलांचे राज्य नष्ट केल्याबद्दल आम्ही त्याच्यावर अशाप्रकारे सूड उगवला. तेव्हां संतापून खलीफाने दोघींना जिवंत पुरण्याचा शिक्षा केली.

# दुःखी कष्टी

मोलमजुरी करून पोट भरणाऱ्या राघोबाला दुःखी कष्टी पाहून त्याच्या मित्राने,—विठोबाने त्याचे कारण विचारले.

"काय सांगू, मित्रा! माझे मालक मला जी मजूरी म्हणून देतात ती माझ्या रोजच्या जेवण-खाणास पुरेशी नाही. जर तुझ्या सारख्या मित्राने माझ्या मालकाकडे माझ्यासाठी शब्द टाकला तर कदाचित मालक मजूरी वाढवून देण्याची शक्यता आहे. कृपा करून माझ्यासाठी एवढे कर ज्यामुळे तुझ्या पदरी पुण्य पडेल. जेवणखाण तुटल्यामुळे शरीरांत ताकतच उरली नाही. म्हणून कामावर जाणे ही बंद करावे लागत आहे." राघोबा अगदी विनयपूर्वक म्हणाला.

हे ऐकून विठोबाने राघोबाच्या मालकाशी बोलणे करून एक दिवस त्याची मजूरी वाढवून घेतली.

मजूरी वाढवून मिळाल्यानंतरही राघोबाला दुःखी कष्टी पाहून आश्चर्य वाटले आणि त्याने त्याचे कारण विचारले.

"विठोबा, काय सांगू? कधीही कामाचा खाडा करू नये असे वाटते, पण खाडा केला तर नुकसान होईल हेच चिंता करण्याचे कारण." राघोबाने उत्तर दिले.





# मूर्खपणा अंगाशी आला

एका खेड्यांत शंभू नावाचा एक गरीब युवक रहात होता. त्याचे कोणी सगे-सोयरे नव्हते, शिवाय स्वतःचे पोट भरण्यासाठी कामधंदा करण्याची पण त्याच्या अंगी कुवत नव्हती.

एक दिवस गावांतील म्हातारी मंडळी, एका पिंपळाच्या झाडाखाली रात्रीच्या वेळी जमली. इकडच्या तिकडच्या गप्पा गोष्टी करीत होती.

गप्पा मारता मारता त्या गरीब युवका-विषयी पण चर्चा सुरु झाली. त्या सर्वांनी ठरविले की याला काही तरी उद्योग मिळवून देऊ त्याच्या पोटापाण्याची व्यवस्था लावाणे हे आपणा सर्वांचे कर्तव्य आहे.

दुसऱ्या दिवशी त्यांनी शंभूला बोलावून सांगितले की रोज प्रत्येक घरी एक कावड पाणी भरावयाचे. शंभर घरी रोज पाणी भरले पाहिजे. या बद्दल रोज कोणीतरी जेवावयास वाढेल आणि सर्व देवू मिळून तुला एक घर पण बांधून जण.

शंभू ठरल्याप्रमाणे त्या शंभर घरी काव-डीने पाणी भरू लागला, यांत त्याचा सबंध दिवस जाऊ लागला.

अशाप्रकारे पुष्कळ दिवस झाले. एके दिवशी रात्री ते सर्व म्हातारे पिंपळाच्या पारावर बसून गप्पागोष्टी करीत होते. त्यावेळी शंभू दूर बसून ह्या गप्पा ऐकत होता.

त्या गांवातील जुन्या शिवालया विषयी गप्पा चालल्या होत्या. एक म्हातारा म्हणाला की या शिवालयांत एक शिलालेख आहे व त्यावर काही वाक्ये लिहिलेली आहेत. ती वाक्ये म्हणजे–"जो कोणी ह्या शिवलिंगावर एकशेपन्नास घागरी पाण्याचा अभिषेक करील, तो राजा होईल."

त्या म्हाताऱ्यांपैकी एकाने म्हटले की ही शिलालेखाची गोष्ट अगदी खोटी आहे. निव्वळ लोकांची दिशाभूल करणारी आहे.

तो थट्टेत म्हणाला–"जर दीडशे घागरी पाण्याचा अभिषेक करून कोणी राजा होत असेल तर प्रत्येक जण राजा होण्याचा प्रयत्न करील व राजा होईल."

काही वेळ या विषयांवर वादविवाद सुरू झाला आणि सर्वांनी ठरविले की ही गोष्ट अगदी खोटी आहे. लोकांची फसवणूक करणारी गोष्ट आहे.



हा सर्व विवाद शंभूने ऐकला. त्याला रात्री झोप आली नाही. तो विचार करू लागला–"हा शिलालेख खोटा कसा असू शकेल? या म्हाताऱ्यांच्या अंगी दीडशे घागरी पाणी आणून अभिषेक करण्याची ताकत नाही म्हणून हे लोक असे म्हणत आहेत व या शिलालेखाची थट्टा करीत आहेत."

सरते शेवटी शंभूने विचार केला–"माझा धंदाच पाणी भरण्याचा आहे. तर मग आणखी दीडशे घागरी भरून पाणी आणून शिवलिंगावर अभिषेक करणे हे अवघड काम नाही. शिवाय अभिषेक केल्याने राजा होईन नाहीतर निदान शंकराची सेवा केल्याबद्दलचे पुण्य तर मिळेल." असा विचार करून शंभूने अभि-षेक करण्याचे ठरविले.

दुसऱ्या दिवशी सर्व शंभर घागरी पाणी भरल्यानंतर शंभूने शिवलिंगावर अभिषेक करण्यास सुरवात केली.

एकशे चाळीस घागरी पाण्याचा अभि-षेक केल्यावर त्याच्या डोळ्या समोर काजवे चमकू लागले. थकल्यामुळे पाय लटपटू लागले. तरी सुद्धा त्याने निर्धार केला की आता फक्त दहाच घागरी पाण्याचा अभिषेक शिल्लक राहिला आहे, तो पण पुरा करूं या, जरा सावकाशपणे केले म्हणजे झाले. परंतु पुढील आठ घागरी पाणी आणी आणी पर्यंत तो चांगलाच दमला,

धापा टाकीत त्याने एकदां शिवलिंगाकडे पाहिले आणि पुन्हा स्वतःला सावरू लागला.

तो विचार करु लागला—"एकशे अट्ठे चाळीस घागरी पाण्याचा अभिषेक केल्या-नंतर सुद्धां त्याला राजा होण्याची काहीच लक्षणे दिसली नाहीत. तेव्हां त्याला वाटले की ते म्हातारे जे म्हणत होते शिलालेख खोटा आहे, ते खरे असावे. तरी पण उरलेल्या दोन घागरी पाणी आणून अभिषेक पुरा करूया. यातून काही झाले तर झाले नाहीतर हे शिवलिंग फुटून जाईल. यावर गांवातील लोक मला शिव्या देवोत किंवा ठार करोत. असा विचार मनांत आणून रागाच्या भरात दोन घागरी पाणी आणून त्याने शिवलिंगावर ओतले.

शिवलिंगावर दोन घागरी पाणी ओतल्याबरोबर शिवलिंगाचे दोन भाग झाले व मधून एक त्रिशूळधारी शंकर प्रकट झाला. शंभू हे पाहून थरथर कांपू लागला. शंकराने रागाच्या भरात शंभूस धमकाविले.

"अरे शंभू, तू मूर्ख आहेस. अगदी बुद्धु आहेस. बुद्धिवंताचे काम आहे की जे काही काम करावयाचे ते श्रद्धापूर्वक आणि भक्तिभावनेने करावे आणि त्यानंतर फळाची आशा करावे, परंतु तू आपल्या मूर्खपणामुळं केलेल्या कामाचे फळ मिळवू शकला नाहीस. जर उरलेल्या दोन घागरी पाणी भक्तिपूर्वक ओतल्या असल्यास तर खात्रीने राजा झाला असतास! आतां तू येथून चुपचाप चालता हो."

हे सर्व झाल्यावर शंभू शरमेने मान खाली घालून शिवालयातून बाहेर जाणार होता, तेवढ्यात तेथील शिवलिंग व शिला-लेख अदृश्य झाले.

शंभूने गांवातील त्या म्हाताऱ्यांना ही गोष्ट सांगितली. त्यांना आश्चर्य वाटले. सर्व शिवालयाकडे येऊन पहातात तर काय खरोखरच शंभूने सांगितल्याप्रमाणे शिवलिंग व शिलालेख नाहीसे झालेले त्यांना दिसले.



# मोठी रेघ व लहानरेघ

रघूकाका गावातले एक सुशिक्षित सामान्य स्थितीचे गृहस्थ होते. त्यांना दोन मुलगे होते.

मुलं लहान असतां रघूकाका फळ्यावर एक रेघ काढून मुलांना म्हणत ही रेघ पुसायची नाही आणि ही लहान करून दाखवा पाहू. तेव्हां धाकट्या मुलाने त्या रेघेशेजारी एक लांब रेघ काढली व पहिली लहान असल्याचे साबीत केले.

मुलं मोठी झाली. त्यांची लग्नं झाली आणि निरनिराळी घरं भाड्याने घेऊन ती राहूही लागली. रघूकाका पेन्शन घेऊन आपल्या थोरल्या मुलाकडे येऊन राहू लागले. सासवासुनांचं रोज चालू असलेलं भांडण पाहून रघूकाका धाकट्याकडे येऊन राहू लागले.

परंतु तेथेदेखील त्यांना सुख लाभले नाही. धाकटी सून सासूसासऱ्याची फिकीर करीत नसे. शेवटी मुलाने व सुनेने मिळून त्या दोघांना घरात राहणे नकोसे करून सोडले.

म्हणून रघूकाकांनी थोरल्या मुलाकडे पुन्हां बिऱ्हाड हलविले. त्याच्या घरीच जास्त सुख मिळत असल्या भासले.

त्यानंतर रघूकाका गावाच्या मित्रांना सांगत—"माझा मोठा मुलगा आणि सून म्हणजे रत्नं आहेत रत्नं! आम्हां दोघां म्हाताऱ्यांना सांभाळून आहेत. कोणत्याही गोष्टीची कमतरता भासू देत नाहीत. अगदी आनंदाने राहातो आहों!"

ते कानावर आल्यावर मोठा मुलगा वडिलांना एकदा म्हणाला—"बाबा! त्यात मोठेसे ते काय हो? एका रेघेसमोर दुसरी लहान झाली, त्यात नवल ते काय?"





# चलाख भुते

सदाशिव घाई करीत होता. तो त्याच्या बायकोला म्हणाला–"अग, पार्वती, जरा आटपतं घे की! गाडीवाला उशीर झाला म्हणून ओरडतो आहे!"

खरं बोलायचं म्हणजे पार्वतीला तो प्रवास नको होता. तरी सदाशिव ओरडतच होता–"तू म्हणजे एक हळूबाई आहेस! आज आपण शहराच्या गावी गेलेच पाहिजे.'

दुसऱ्याच दिवशी त्यांच्याच गावी त्याच्या मित्राच्या बहिणीचे लग्न होते. गावात राहिला असता तर कोणती तरी भेट किंवा कापड चिपड द्यावे लागले असते. तो व्यर्थ खर्च टाळता आला तर टाळण्याच्या हेतूने परगावी निघून जाण्यासाठी सदाशिव घाई करीत होता. त्याने आपल्या मित्राकडे निरोप धाडला की सासऱ्याची तब्येत एकाएकी बिघडल्यामुळे बायकोबरोबर सासुरवाडी जावे लागत आहे.

श्रीमती सुधा साने

पार्वतीला ते मुळीच आवडले नाही. सदाशिव तिची समजून घालण्यासाठी म्हणाला–"परवाच आपल्या लग्नाला एक वर्षं पुरं होतं आहे. शहरांतल्या बाजारांतून नवीन लुगडं तुला घ्यावे म्हणतो! इकडे लग्न होऊन जाईल तो पर्यंत!"

पार्वतीला ते कसे आवडणार? कारण त्यांच्या लग्नात त्याच मित्राने चांदीचे ताट भेट म्हणून दिलं होते. पार्वतीने नवऱ्याला त्या गोष्टीची आठवण करून दिली.

"तू म्हणतेस ते खरं आहे की त्याने आपल्या दोघांच्या लग्नात चांगली भेट दिली होती. परंतु माझ्या बहिणीच्या लग्नात त्याने काय दिलं ग?" सदाशिव चिडक्या स्वरात म्हणाला.

तुमच्या मित्राला आपल्या या प्रवासाचे गुपित कळलं तर त्याला काय वाटेल?" पार्वती म्हणाली.

"तो आहे मूर्ख!" सदाशिव आपल्या हुशारीच्या घमेंडीत म्हणाला.

शेवटी संध्याकाळच्या सुमारास दोघं गाडीत बसून निघाली. उजाडण्यापूर्वी शहरांत पोहोचू असे त्यांना वाटत होते. परंतु अर्ध्या वाटेवर पोचे पोचे तो जोराचा पाऊस पडू लागला. पावसाची झड गाडीत येत होती. दोघं नवरा बायको ओलीचिंब झाली. इतक्यात गाडीचं एक चाक रस्त्याच्या बाजूच्या खड्डयात रुतलं आणि त्या पाठोपाठ बैलाचा पाय घसरून तो सुद्धा खाली बसला.

गाडीवाल्याने खूप श्रम करून बैलाला उभं केलं, परंतु एक पाय लंगडा झाल्यामुळे बैलाला पळतां येईना. गाडीवाला चिडून जाऊन सदाशिवाला म्हणाला–"मालक! गाडी पुढे जाणे आतां शक्य नाही. समोर झाडी दिसते आहे, तिच्या पलीकडे एक खेडेगाव आहे, तेथे रात्र काढा. पाहिजे तर गाडी भाडं अर्धंच द्या म्हणजे झाले!"

नाइलाज म्हणून सदाशिव गाडीतून उतरला व बायकोला घेऊन झाडीच्या दिशेने चालू लागला. थोडे अंतर चालून गेल्यानंतर विजेच्या चकचकाटात काही घरं दिसली. परंतु तोंपर्यंत अर्धी रात्र उलटली होती. दिवा कोठेही दिसत नव्हता.



सदाशिव रस्त्याच्या बाजूला एक जुनाट पडके घर दिसले त्याच्या चौथऱ्यावर बसत बायकोला म्हणाला–"रात्र येथेच काढू या."

पार्वतीने लोकांच्या तोंडी ऐकलं होतं व गोष्टीत वाचलंही होतं की जुनाट ओसाड घरात भुतं राहतात म्हणून रात्र त्या घरात काढण्याची गोष्ट ऐकतांच तिच्या अंगाचा थरकाप उडाला.

ती हलक्या आवाजात म्हणाली–"मी कित्येकांच्या तोंडी ऐकलं आहे की भुते अशाच घरात राहतात!"

ते ऐकून सदाशिवाची सुद्धा घाबर गुंडी उडाली. परंतु बायकोसमोर आपली मान खाली होऊ नये म्हणून धिंडस दाखवून



म्हणाला–"भुतांची भीती आपल्याला नाही वाटत बुवा! मी भुतांचा मारण होम केला आहे! बत्तीस भुतांना जमिनीत पुरून टाकलं आहे. मला पाहतांच भुतं..." असे म्हणत असतांच सदाशिव भडकला आणि ओरडला.

"ओरडून सांगण्याची गरज काय की तुला पाहतांच भुतं पळून जातात म्हणून! तुझ्या गप्पा आम्ही सर्व ऐकल्या. तुला वाटलं का तुझ्या ओरडण्याने आम्ही भ्यालों आणि येथून पळून जाऊ? तुझा तो भयंकर आवाज ऐकून आम्ही सुद्धा ओरडणार होतों, पण आमची बोबडीच वळली." भुतं म्हणाली.

भुतं पाहून पार्वतीला कापरंच भरलं. सदाशिवाच्या घशाला कोरड पडली. तरी त्याने धाडस करून व रागाचा आव आणून भुतांना विचारले–"काय रे! तुम्ही मला काय समजलात? माझ्या समोर यायची तुम्हांला हिंमतच कशी झाली?"

"मालक, आमच्यावर असे रागावू नका! आम्हाला मारण होम करून ठार करू नका. आम्हांला आपल्या वाटेने पळून जाऊ द्या!" एका भुताने विनवणी करीत विचारले."

"आम्हांला जिवानिशी सोडा, आम्ही आयुष्यभर आपलं गुणगान करूं." दुसरे भूत म्हणालं.

तेव्हां सदाशिवला वाटलं की ही भुत अगदी भोळी व मूर्ख दिसत आहेत. तो दरडावून म्हणाला–"माझ्या दृष्टीस जे जे भूत पडते त्याला मी जिवानिशी सोडणार नाही. नाइलाज, माझी ती जुनी संवय आहे, मी कोणाला सोडणार नाही."

"फक्त आजची रात्र ती संवय विसरा आमच्याकडे दयेच्या नजरेनं पहा. या बद्दल आम्ही, जवळ जेवढे सोनं राखून ठेवले आहे, ते सर्व तुम्हांला देऊ." भुतांनी पायां पडून विनंती केली.

सदाशिव मनातल्या मनात खूप झाला, परंतु वरकरणी कठोर आवाजात म्हणाला–



"बोला, कोठे ठेवलं आहे, तुम्ही ते सोने लपवून! मला सोन्याची गरज नाही, परंतु तुमची कींव आली म्हणून विचारले."

"मालक, तुम्ही उदार दयाळू आहां, चला आमच्याबरोबर!" असं सांगून भुतं जाऊ लागली.

सदाशिवसुद्धा त्यांच्याबरोबर निघाला. पार्वती घाबरून जाऊन म्हणाली–"तुम्हांला वेडबीड तर नाही लागलं? तुम्ही मला एकटीला येथे सोडून त्या भुतांच्या मागे निघालात काय?"

"अग, वेडे, तू थोडावेळ येथे बसून रहा, ही भुते मूर्ख दिसत आहेत! मी हा आलोंच परत, येताना पुष्कळसे सोने घेऊन येईन. तुझ्या नशिबी सोन्याचा कंबरपट्टा लिहिलेला आहे. कपाळावर लिहिलेले कोणी पुसू शकेल का?" असे सांगून सदाशिव भुतांच्या मागोमाग निघून गेला.

भुतं सदाशिवाला घेऊन गेली तेथे जमिनीवर गालिचासारखं मऊ गवत उगवलेले होतं. जागोजागी कांटेरी झुडपंसुद्धा होती. ती म्हणाली–"तुम्ही येथे खणून पहा, मिळेल तेवढं सोनं घेऊन जा, तुम्हांला उचलून नेववेल तेवढे! तुम्ही आम्हांला जीव दान दिलं आहे. आम्ही तुमच्या या उपकारापासून कधी उतराई होणार नाही." असे सांगून भुते अदृश्य झाली.

सदाशिवने एक अणकुचीदार फांदी तोडून घेतली व तिच्या टोकाने जमीन खणू लागला. दोन अडीच फूट खणल्यावर



त्याला एक सोन्याचं नाणं सापडलं. ते बाजूला ठेवून तो हाताच्या बोटांनी भुसभुशित जमीन खणू लागला. थोड्यावेळाने त्याच्या हाताला सोन्याची नाणी लागली.

थोड्या वेळाने सदाशिवाजवळ सोन्याच्या नाण्यांचा एक ढीग झाला. तरी सदाशिव लोभाला बळी पडून जमीन उकरीत राहिला.

इतक्यांत हा प्रश्न ऐकून तो चकित झाला. कोणी विचारीत होता–"कोण आहे तो? येथे काय खणतो आहे?"

तोंपर्यंत उजाडू लागलं होतं. प्रश्न विचारणारा गावाचा पाहरेकरी होता.

सदाशिवने चटदिशी खांद्यावरचं उपरणे त्या नाण्यांवर टाकलं. पाहरेकऱ्यांपैकी एकानं ते उपरणे बाजूला सारून पाहिलं आणि चकित होऊन ओरडला. ढिगाकडे पाहून सदाशिवाला चक्कर आल्यासारखं झालं. रात्रभर ती सोन्याची नाणी आहेत. असे समजून तो आनंदाने नाचत होता. खरोखरी ते हाडाचे तुकडे होते. तो खरोखरी त्यावेळी स्मशानात होता. त्याने खणली होती ती जागा जुन्या काळातली कोणाची तरी समाधी होती.

त्यानंतर पाहरेकऱ्यांनी सदाशिवाला अटक करून गावाच्या पोलीस पाटलासमोर उभे केले. पार्वती दुरून हे सर्व पहात होती. तिने डोळ्यांत पाणी आणून सर्व रडकथा पाटलाला सांगितली.

पाटलाला पार्वती म्हणाली ते सर्व खरं वाटलं. तो सदाशिवाला दटावून म्हणाला–"तू स्वतःला मोठा शहाणा समजून आपल्या मित्राला आणि भुतांना घाबरवायला निघाला होतास आणि स्वतः संकटात सापडलास. तुला वाटत होतं की भुतं मूर्ख असतील, परंतु ती वस्ताद निघाली व तू मूर्खात काढला गेलास. निदान या अनुभवावरून तरी आपला शहाणपणा सोडून दुसऱ्याशी प्रामाणिकपणाने वागायला शीक!"

सदाशिवने चुकीची माफी मागितली आणि पाटलाच्या मदतीने भाड्याची गाडी करून आपल्या मित्राच्या बहिणीच्या लग्नसमारंभाला हजर राहण्यासाठी निघाला.





# आचारी की वैद्य

रघुनाथराव नांवाच्या एका श्रीमंत माणसाच्या घरी नारायण नावाचा एक आचारी होता. तो सैंपाक करण्यात फार हुशार होता. त्याचा सैंपाक स्वादिष्ट होत असे.

एकदां नारायण आपल्या धन्याला म्हणाला–"मालक! माझा मुलगा कचेरीत नोकरी करू लागला आहे, म्हणून मला त्याच्या गावी त्याने बोलावलं आहे!" नंतर तो गेला.

त्यानंतर रामाचारी नांवाचा आचारी रघुनाथरावांकडे आला व म्हणाला–"मालक, आपला सैंपाकी निघून गेल्याचे ऐकून आलो आहे. सैंपाक पाणी सुद्धा करतो."

ते ऐकून रघुनाथरावांना आनंद झाला. सैंपाक करून हा माणूस लहानसहान आजाराचे औषधपाणी सुद्धा करतो, म्हणतो आहे, बरेच झाले. त्यांनी रामाचारीला दुसऱ्या दिवसापासून कामावर यायला सांगितले.

रामाचारी दुसऱ्यादिवशी हजर झाला. तो सैंपाक उत्तम करी. रघुनाथराव पोट भरून जेवीत. परंतु दोन तीन दिवसांनी त्यांचे पोट दुखू लागले. त्यांना अपचनाचा विकार झाला होता. त्यांनी रामाचारीला बोलावून पोट दुखत असल्याचे सांगितले.

रामाचारीने त्यांना तीन पुड्या दिल्या व म्हणाला–"मालक, जेवण झाल्यावर एक पुडी घेत जा." नंतर थोडावेळ थांबून म्हणाला–"मालक, मी आपल्या घरी सैंपाकी म्हणून लागलो आहे, पण ही वैद्यकी मी केली त्याबद्दलही थोडा मोबदला मिळाला पाहिजे."

रघुनाथरावांनी स्मित करून एकेका पुडीबद्दल एकेक रुपया याप्रमाणे ऐकूण तीन रुपये रामाचारीला दिले. तिन्ही

श्री ल. ना. जकाते

पुड्या खाल्ल्यावर रघुनाथरावांची पोट दुखी थांबली. पुढे एका आठवड्याने रघुनाथरावांचे डोके दुखू लागले आणि डोळ्यांसमोर काळोखी आल्यासारखं वाटू लागलं. रामाचारीने [illegible] तीन पुड्या दिल्या आणि तीन रुपये घेऊन निघून गेला.

औषधाला गुण पडला. रघुनाथरावांनी रामाचारीला विचारले–"कायरे, तू सेंपाकी आणि इतकं चांगलं वैद्यकशास्त्र कोठे शिकला?"

पुढे रामाचारी बरेच दिवस रघुनाथरावांच्या घरी सैंपाक करीत राहिला. दर आठवड्याला एकदांतरी त्यांना अपचनाचा विकार होई व डोकं दुखे आणि रामाचारीच्या औषधानें दोन्ही आजार बरे होत.

रघुनाथरावांच्या मनांत शंका आली की रामाचारी पैसे मिळविण्यासाठी अन्नात काही तरी घालीत असावा. नारायण सैंपाक करी तोंपर्यंत त्यांना कसलाही आजार होत नसे. परंतु तो गेल्या नंतर व रामाचारी आल्यापासून नित्य आजार येऊ लागला.

तो विचार मनात येतांच त्यांनी रामाचारीला कामावरून काढून टाकले ते कळल्यावर त्यांच्याकडे तीन सैंपाकी एका मागून एक आले.

रघुनाथरावांनी त्यांना विचारले–"तुमच्या पैकी कोणाला चांगल्या सैंपाकाबरोबर औषधपाणी करतां येते?"

दोघांनी सैंपाकाबरोबर औषधपाणी करता येत असल्याचे सांगितले. परंतु तिसरा म्हणाला–"मला फक्त सैंपाक करता येतो."

रघुनाथरावांनी तिसऱ्याला नोकरी दिली. तो चांगला सैंपाक करी आणखी विशेष म्हणजे त्यानंतर रघुनाथराव कधी आजारी पडले नाहीत.

तेव्हां रघुनाथरावांना कळले की रामाचारीनें सैंपाक्याचा धंदा पैसे मिळविण्यासाठी केला होता. दोन्ही त्याचे धंदेच होते. ते मला पूर्वी कळले असते तर हा त्रास मला सोसावा लागला नसता.





# गणेश पुराण

गणेशचतूर्थीच्या दिवशी संध्याकाळी विघ्ननाश गणनायक आपल्या दांतासारखी पांढरी शुभ्र व बांकदार असलेली चंद्राची कोर पहायला निघाला. वर चंद्राकडे डोळे लागले होते आणि पाय पुढे चालू होते. त्यावेळी तो पंचपक्वान्ने जेवलेला होता. बरोबर उंदीर होताच.

असं सांगतात की द्वितीयेचा चंद्र हे गणेशाचे चिह्न असते. गणपतीच्या कपाळावर चंद्राच्या कोरेसारखे आडवे गंध असते ते चवथीच्या चंद्रासारखेच तर असते. म्हणूनच की काय त्याला भालचंद्र हेही एक नाव आहे.

चालत असतां गणपतीच्या पायाच्या अंगठयाला एका दगडाची ठेच लागली व तो तोंडघशी पडला आणि त्याचे पोट फुटले. त्यासरशी त्याने खाल्ले सर्व मोदक व लाडू व इतर पक्वान्ने जमिनीवर विखुरली. ते पाहून आकाशातला चंद्र खदखदां हंसला. देव धावले व त्यांनी एका मोठ्या सापाचे कातडे आणून त्याने गणपतीचे पोट शिवले.

गणपतीची आई पार्वती, तिला चंद्राचा राग आला. तिने त्याला शाप दिला की गणेश चतूर्थीला कोणी चंद्राचे तोंड पाहिले तर त्याच्यावर खोटा आळ येईल.

गणेशचतूर्थीच्या दिवशी त्या दिवसापासून लोक मुलांना चंद्र दृष्टीस पडू नये याची काळजी बाळगू लागले.

द्वापर युग सुरू झाले. श्रीकृष्ण वसुदेव व देवकीच्या पोटी जन्माला येऊन यशोदेच्या



घरी गोकुळात वाढू लागला. पुढे त्याच्या ज्या लीला झाल्या त्याची लोकांना माहिती आहेत, उदाहरणार्थ पूतनावध, शकटासुर व तृणावर्त राक्षसांचा संहार इत्यादी.

एकदा गणेशचतुर्थी होती. यशोदा कपिला गाईचे दूध काढीत होती. श्रीकृष्णाने आईच्या पाठीवर चढून कासंडीतल्या दुधात चंद्राचे प्रतिबिंब पाहिले आणि टाळ्या वाजवून म्हणाला–"आई! तो बघ चांदूमामा!" यशोदाने दचकून मुलाला पाठीवरुन उतरविले व पोटाशी धरून म्हणाली–"कान्ह्या, हे काय केलेस? त्या मूर्खाचे तोंड तू आज कां पाहिलेस? तुझ्यावर विनाकारण खोटा आळ येईल ना!"

"खोटा आळ म्हणजे ग, काय आई?" कृष्णाने विचारले.

तुला लोक चोर म्हणतील किंवा असाच खोटा आरोप तुझ्यावर लावतील!" यशोदा म्हणाली.

"आई, तू उगाच मनाला लावून घेतेस. बघ! मी दूध दही लोण्याची चोरी केली, तर तो खोटा आरोप होईल का ग?" कृष्णाने खटयाळपणाने विचारले.

"लबाडा, तुझ्या तोंडात एवढे ब्रह्मांड कोठून आले रे?" असे म्हणत यशोदेने बोटे मोडून त्याची दृष्ट काढली.

"आई, तू कधी ब्रह्मांड पाहिले आहेस का?" कृष्णाने विचारले.

"ब्रह्मांडाची गोष्ट राहू दे रे, परंतु तू मोठा झाल्यावर तुझ्यावर खोटा आळ लोक लावतील." असे म्हणत आईने प्रेमाने त्याचा गालगुच्चा घेतला.

"तर मग मोठेपणी मी गणेशचतुर्थीला चंद्राचे तोंड पाहिले पाहिजे, नाही का, आई?" कृष्णाने पुन्हा विचारले.

"मोठा झाल्यावर गणेशचतुर्थीला चंद्राचे तोंड पाहिलेस तर आणखी मोठा आळ येईल." यशोदा म्हणाली. नंतर स्वतःशीच पुटपुटली–"हे विघ्ननाश गणनायका! माझ्या भोळ्या मुलाने चुकून चंद्राचे प्रतिबिंब पाहिले आहे. त्याला क्षमा कर!"



दुसऱ्या दिवशी बलराम धांवत पळत येऊन आईला सांगू लागला–"आई, आई! छोटा कान्हा माती खातो आहे, बघ! अगदी खरं! मी खोटं नाही सांगत. जाऊन त्याचं तोंड तर पहा!" म्हणून यशोदा धावत कृष्ण माती खात होता तेथे गेली.

कृष्ण त्यावेळी मातीची ढेकळं जमा करीत होता. यशोदेने जवळ जाऊन कृष्णाचा कान धरला व म्हणाली–"उघड तोंड, पाहू दे, किती माती खाल्लीस."

"आई, मी नाही माती खाल्ली, कोणीतरी खोटी कागाळी केली असेल. कालच तू म्हणाली होतीस ना, की माझ्यावर खोटा आळ येईल म्हणून! मी मातीचे मोदक आणि लाडू करणार आहे बघ. मातीच्या गतपतीला मातीचे मोदकच आवडतील नाही का?" कृष्णाने आईला समजावून सांगण्याचे सोंग केले.

यशोदाने आपल्याच थोबाडीत मारून घेऊन विघ्ननाशाची माफी मागितली व म्हणाली–"बाळा, असं बोलू नये. मातीचा असला किंवा दगडाचा असला तरी देव देवच असतो बाबा! देवा रे देवा! चूक झाली माझ्या पोराची, मुलाच्या वटवटीवर ध्यान देऊ नकोस!" म्हणत यशोदेने डोळे मिटून देवाची विनवणी केली.



"आई, तर मग तू साधे आणि तळून खूप मोदक तयार कर, पाहतो मी की हा लंबोदर किती मोदक खातो ते आणि त्याने खाल्ले नाहीत तर त्याच्या तोंडात कोंबून घालीन!" कृष्ण म्हणाला.

"पुरे झाली तुझी वटवट! पहिल्याने तोंड उघड पाहू!" असे म्हणत डोळे वटारून यशोदेने कृष्णाकडे पाहिले. तेव्हां कृष्णाने 'आ' करून आईला दाखविला.

तिने कृष्णाच्या तोंडात पाहिले आणि घामाघूम झाली. तिची बोबडीच वळल्या सारखे झाले. दचकून मागे सरकली. तिला कृष्णाच्या तोंडात ब्रह्मांड दिसले. सूर्य, चंद्र व नक्षत्र मंडल सर्व दिसले. त्याचबरोबर



तिच्या पाठीवर चढून दुधाच्या कासंडीत चंद्राचे प्रतिबिंब पाहणारा कान्हापण दिसला. स्वप्न पाहिल्यासारखे झाले. यशोदेला तिने आपल्या चारी बाजूला दृष्टी फिरवून पाहिले, कोणी देवाने आपली माया तर पसरविली नाही? यशोदेला त्या स्थितीत पाहून गोकुळातली मुलं तिच्या चारी बाजूला घोळका करून उभी राहिली. खांबाच्या आड उभा राहून बलराम हंसत होता.

कृष्ण यशोदेच्याकडे भोळ्या नजरेने पहात विचारू लागला–"आई, तुला माझ्या तोंडात माती दिसली का ग? पहा, पुन्हा पाहिजे तर नीट पहा!" यशोदेला त्याच्या तोंडात मातीच काय सर्व विश्वच दिसले होते. स्वतः कृष्ण मुरली वाजवीत होता व गणनायक तांडवनृत्य करीत होता. कृष्ण एका काळाकुट्ट नागाच्या फणेवर नृत्य करीत होता. नाग कृष्णाला विळखा घालून बसला होता. यशोदा ते दृश्य पाहून बेशुद्ध होऊन पडली. तिने डोळे उघडून पाहिले तेव्हां तिच्या चारी बाजूला गोपिकांचा घोळका उभा होता. तिने त्यांना विचारले–"मला असे काय होते आहे?"

तिला काही आठवतच नव्हते. तिने काय पाहिले व ती बेशुद्ध होऊन कां पडली काहीच आठवेना. गवळणी म्हणाल्या–"काय ग, झालं तुला? आम्हांला सुद्धा काही कळत नाही! आमच्या घरात चोरी झाली आहे आणि चोरी करणारा दुसरा तिसरा कोणी नसून तुझा लाडका पोरगा आहे. लोणी, साय, दही काही राहू देईल तर ना! तो आपल्या सवंगड्यांना व माकडांना वांटून देत असतां आम्ही आपल्या डोळ्यांनी पाहिले आहे.

यशोदा चिडली व म्हणाली–"काय म्हणतां, आमच्या घरात दही, लोणी नाही की काय, तुमच्या घरात शिरायला? अर्ध्या गोकुळात मिळणार नाही इतकं दुभतं आहे माझ्या घरात." असे सांगून तिने सर्व गोपींना पळवून लावलं. त्याचवेळी कृष्ण तेथे मांजराच्या पावलांनी आला आणि





म्हणाला–"आई, काय ग, या गवळणी कशाला आल्या होत्या?"

"मी सांगितलं होतं ना, अगदी तसंच झालं, बघ या सर्व तुझ्यावर दही, लोणी चोरणारा म्हणून आरोप लावीत होत्या." यशोदा म्हणाली.

"आई, मग खोटा आळ माझ्यावर नाही आला, मी सुटलो. कारण त्या म्हणाल्या ते सर्व खरं होतं!" कृष्ण म्हणाला.

तेव्हां मात्र यशोदेला राग आला. तिने कृष्णाला धरून एका उखळीला बांधून ठेवले.

कृष्ण ती उखळ ओढीत यमलार्जुन नांवाच्या जोड झाडाच्या मध्ये गेला. जोराने उखळी ओढू लागला आणि ती दोन्ही झाडे मुळापासून उपटली गेली. त्या झाडांच्या मुळातून दोन शापदग्ध गंधर्व निघाले व त्यांचा उद्धार केल्याबद्दल कृष्णाची स्तुती करीत आकाशात उडून गेले.

एक वर्ष लोटलें. पुन्हां गणेशचतुर्थी आली. नंदाने गणपतीची एक मूर्ती घडवून तिला विविध रंगांनी रंगविले. यशोदेने पिठीचे मोदक तयार करून त्यांवर तूप तूप घातले.

नैवेद्याची सर्व तयारी करून ताटे पुजेच्या खोलीत नेऊन ठेवली आणि बाहेरून दार बंद करून ठेवले.

कृष्ण यशोदेच्या नजरे आड त्या पुजेच्या खोलीत शिरला आणि आतून दार लावून घेऊन नैवेद्यातले मोदक वगैरे खाद्य पदार्थ गणपतीसमोर ठेवून बडबडू लागला–"घेरे बाबा, पोटभर खा, बरं का?"

गणपतीच्या मूर्तीने सोंड पुढे करून मोदक उचलले व म्हणाली–"कृष्ण, मी तुझ्या हातात जे काही देईन ते सुद्धां खाल्ले पाहिजेस." गणेशपुराणातील हे पर्व अपूर्वच होय! गणपतीने कृष्णाला आपल्या हातानें खूप भरविले. ताटंच्या ताटं एकामागून एक रिकामी होऊ लागली.

यशोदा पुजेच्या खोलीकडे आली आणि दाराच्या फटीतून आत बघत असलेले सर्व



कौतुक करून पाहू लागली. ती तर चकितच झाली. तिच्या सर्वांगाला घामच सुटला. नंतर स्वतःला सावरून ती मनात म्हणाली–"बाई, बाई! मला तर भ्रम झाल्यासारखं वाटतं आहे. माझ्या डोळ्यासमोर हे सर्व काय घडत आहे? देवाची माया काय विचित्र आहे!" असे म्हणत तिने दार उघडले आणि आत गेली.

परंतु गणपतीची मूर्ती मात्र जागच्या जागी स्थिर होती. सर्व ताटे रिकामी झालेली होती. कृष्ण चकित होऊन आईकडे पहात होता.

अरे, खादाड पोटा, गणपतीसाठी तयार केलेला नैवेद्य तूच सर्व खाऊन टाकलास?"

असं म्हणत यशोदेने कृष्णाच्या पाठीत एक हलकासा धपाटा मारला. कृष्ण जोराने रडत कालिंदी नदीच्या डोहाजवळ पळत गेला. त्याच्या पाठोपाठ यशोदा व गोकुळातले सर्व लोक यमुनातीरी धावले.

कालिंदीच्या डोहातला कालिया नाग गोकुळच्या लोकांना फार त्रास देत होता. कृष्णाने नदीवर वाकलेल्या एका झाडावरुन डोहात उडी टाकली आणि नेमका कालियाच्या अंगावरच पडला. नागाने त्याला विळख्यात धरण्याचा प्रयत्न केला. परंतु कृष्ण त्याच्या फडांवर चढून नृत्य करू लागला. अशा तऱ्हेने कालियामर्दन झाले. कालियासुद्धा शाप मुक्त झाला. त्याने आपल्या मुलींना वासुकी नागाकडे पाताळ लोकात पाठवून दिले आणि स्वतः कालियारूप सोडून विघ्न रूप धारण केले आणि विघ्नेश्वराचा सेवक झाला.

आपल्या मुलाला घेऊन यशोदा घरी आली तर तिला काय दिसले? पूजेच्या खोलीत ताटे नैवेद्याच्या पदार्थांनी भरलेली आहेत आणि कृष्णाच्या पाठीवर चापटीचे वण स्पष्ट दिसत होते. ते पाहून यशोदा स्वतःलाच शिव्या देऊ लागली–"माझे हात कां नाही तुटले! मी केवढी पापीण! माझ्या अंगात कोण राक्षसीण शिरली होती! मी माझ्या लाडक्याला विनाकारण मारलं!"

मध्येच कृष्ण हळूच म्हणाला–"आई, पूजा करना! उशीर होतो आहे!" नंद यशोदेने कृष्णा करवीच पूजा करविली आणि नैवेद्यातला प्रसाद साऱ्या गावाला वांटला. सर्व गवळी व गवळिणी म्हणत होते, "हा प्रसाद अमृतासारखा गोड आहे!"

हळू हळू कृष्ण मोठा झाला. एकदा इंद्राने रागावून मुसळधार वृष्टी केली. कृष्णाने गोवर्धन पर्वत धारण करून गाय, गोपी व गोपालांचं रक्षण केले आणि इंद्राचा गर्व हरण केला.

एकदां कृष्ण गोवर्धन पर्वताजवळ गाई चरायला घेऊन गेला होता. तेव्हां एक म्हातारा आपल्या कांखेत ढोल घेऊन आला व म्हणाला–"येथे कृष्ण नावाचा मुलगा आहे असे ऐकतो. तो छान मुरली वाजवितो मी त्याची मुरली ऐकायला आलो आहे. तो कोठे आहे सांगाल का?"

कृष्ण म्हणाला–"मीच तो मुरलीधर कृष्ण! तुम्ही कोणीतरी थोर मृदंगवादक दिसतां. कोण आपण?" कृष्णाने हात जोडून विचारले.

"मला मृदंगकेसरी म्हणतात मी दक्षिणी देशातला राहणारा आहे. मथुरेला जातो आहे. कंसाने धनुर्यज्ञ सुरू केला आहे. मी त्यावेळी आपले मृदंग वाजवून दाखवावे म्हणून जातो आहे!" तो म्हातारा म्हणाला.

त्या म्हाताऱ्याच्या पायात रत्नखचित कडे होते. हातात सिंहाकृती आभूषणे होती. गळ्यात सोन्याच्या मणक्यांची माळा होती आणि कानात मोठमोठी सुवर्ण कुंडले होती. मृदंगावर नवरत्न व सुवर्ण पदकें बसविलेली होती.

कृष्ण ते पाहून चकित झाला व म्हणाला–"अहो, मी एक सामान्य गुराखी आहे. माझी मुरली ही साध्या वेळूची केलेली आहे. तुमच्या दक्षिणेकडच्या लोकांना तालस्वराचे अद्‌भुत ज्ञान असते. परंतु मी एक सामान्य गुराख्याचा पोरगा आहे व मुरलीवर साधी गाणी वाजवितो. गुरांची राखण एवढाच काय तो माझा धंदा आहे."





# गंधर्व राजकुमारी

[ ३ ]

हसनने त्याच्यावर गुजरलेले प्रसंग सांगितल्यावर त्याचं रक्षण करणारी तरुणी आपले आत्मवृत्त सांगू लागली.

"आम्ही सात बहिणी आहों आणि एका गंधर्वराजाच्या राजकन्या आहोत. आम्ही सर्व एका गंधर्वराजाच्या कन्या असलो तरी आमची आई एकच नाही. त्या सर्वांत मी व माझी एक थोरली वहीण लहान आहों. बाकी पांच बहिणी शिकारीला गेलेल्या आहेत. त्या लवकरच परत येतील. आमच्या वडिलांना वाटतं की आमच्यापैकी कोणाशीही लग्न करण्याची योग्यता असलेला पुरुष या दुनियेत मिळणे शक्य नाही. म्हणून त्यांनी आम्ही अनंतकाळ कन्याच रहावे यासाठी या निर्जन निवांत जागी हा वाडा बांधला. हा प्रदेश तसा फार मनोहर आहे. येथे मुबलक पाण्याचा साठा आहे. सर्वत्र हिरवळ आणि फुले व फळे आहेत. येथे एक सुंदर सरोवर आहे व त्यात राजहंस विहार करतात. स्वर्गतुल्य या प्रदेशात आम्ही आनंदाने रहात आहों. आम्हांला एकाच गोष्टीची उणीव भासते. दीर्घकाळ लोटला तरी आम्हांला नवीन व्यक्ती कोणी नजरेस येत नाही. नशिबाने तू दृष्टीस पडलास. म्हणून आज ती उणीव ही भरून आली. आम्हांला त्या गोष्टीचा फार आनंद होतो आहे.

ती तरुण स्त्री हसनला आपला धाकटा भाऊ मानून त्याच्याशी बोलत असतां तिच्या पांच ही बहिणी परतल्या. त्यांना अकस्मात एक छोटा भाऊ लाभल्याचा त्यांना सुद्धा परमानंद झाला. त्यांनी त्याच्याकडून वचन घेतले की तो दीर्घकाळ त्यांच्याबरोबर राहील.

अरब देशातील कथा



हसन त्या गंधर्व राजकन्यांच्या सहवासात त्या सुंदर प्रदेशातील नैसर्गिक दृश्ये पहात आनंदाने राहू लागला. तो त्यांच्याबरोबर शिकारीला जाई. -तो आपल्या वडील बहिणींच्या सहवासात जसा सुख होता, तसा त्या आपल्या धाकट्या भावाबरोबर आनंदाने रहात होत्या. सर्व दऱ्याखोऱ्यात बरोबर फिरत, नदी काठांवरच्या झाडा-झुडपांतून हिंडत ती आठ जणं एका आई बापांच्या पोटी जन्मलेल्या भावंडांसारखी राहू लागली.

एके दिवशी सर्व मिळून झाडीत बसून गाणं गात असतां अचानक धुळीचे लोट उडत असलेले दिसले. त्याच वेळी ढग गडगडल्यासारखा आवाज झाला. सर्व राजकन्या घाबऱ्या आवाजात हसनला म्हणाल्या–"छोटू, तू लवकर कोठे तरी लप!" असे सांगून सर्वांत धाकटी राज-कुमारी त्याला हात धरून ओढून घेऊन गेली आणि बागेत एका जागी त्याला लपायला लावले.

इतक्यात गंधर्वांचा एक घोळका त्या वाड्यानजिक आला. दुसऱ्या एका गंधर्व राजाच्या सन्मानार्थ गंधर्वकन्यांचा पिता एक मेजवानी देत होता. म्हणून त्याने आपल्या मुलींना घेऊन येण्यासाठी आपल्या नोकरांना पाठविले होते. ते कळल्यावर सर्वांत धाकटी बहीण हसन जवळ येऊन म्हणाली–"छोटू, तुला एकटा येथे सोडून आम्हांला काही काळ दुसरीकडे जावे लागत आहे, या घे किल्ल्या, आम्ही परत येईपर्यंत हा सर्व महाल तुझाच आहे. परंतु एक गोष्ट लक्षात असू दे ही किल्ली लावून जे दालन उघडेल त्या दालनात मात्र तू जाऊ नकोस." असे सांगून तिने त्याला एक रत्नखचित किल्ली दिली.

त्यानंतर सातही राजकन्या हसनचा निरोप घेऊन त्यांना घेऊन जाण्यासाठी आलेल्या नोकरांबरोबर आपल्या पित्याच्या घरी गेल्या



राजकन्या निघून गेल्यावर हसनला त्या वाड्यात एकटे एकटेसे वाटू लागले. हसन काही सुचेनासे झाल्यामुळे सर्व खोल्यां-तून व दालनातून फिरत राहिला आणि आपल्या बहिणींच्या वस्तू पाहून त्याला त्यांची आठवण होऊ लागली. फिरत फिरत ज्या दालनाचे दार न उघडायला त्याची बहीण त्याला सांगून गेली होती त्या दालनात पाऊल न टाकण्याची ताकीद बहिणीने केल्याची आठवण झाली. तो मागे फिरला.

परंतु त्याच्या डोक्यात खळबळ उडून गेली. एकदम अनेक शंका त्याच्या मनात काहूर माजवू लागल्या. "तो दरवाजा उघडायचा नाही, याचे कारण काय असावे? ते काही असो, पण मी त्या दालनात पाऊल न ठेवण्याचे वचन दिले आहे." तो विचार मनात आला असूनही तो दरवाजा त्याच्या डोळ्यासमोर वारंवार येई. त्यामुळे त्याला झोप आली नाही. शेवटी त्याने ठरविले की तो दरवाजा उघडून आत काय आहे पहावयाचेच! प्रथम सकाळपर्यंत थांबायचे त्याने ठरविले व नंतर 'जीव गेला तरी चालेल, पण आत काय आहे ते पाहिलेच पाहिजे.' असे त्याने ठरविले. हसन एक दिवा घेऊन त्या दाराजवळ गेला आणि त्या किल्लीने त्याने



ते दार उघडले. नंतर निर्भयपणे त्याने आत पाऊल टाकले.

त्या खोलीत लाकडी सामान, गालिचा किंवा चटई काहीच नव्हते. ती खोली अगदी रिकामी होती. एका बाजूला एक शिडी ठेवलेली होती, ती छप्परा पलीकडे गेलेली होती. हसनने दिवा खाली ठेवला व सावधपणाने शिडी चढून छपराच्या भोकातून वर गेला. वरचे छप्पर सपाट होते. हसनला तेथे एक लहानशी फुलवाडी दिसली. तीत फुलझाडे होती. त्याने त्या फुलवाडीत पाऊल टाकले तेव्हां त्याला एक अद्भुत दृश्य दिसले. त्याच्यासमोर स्वच्छ पाण्याचे सरोवर होते आणि आरसा-



सारखे प्रतिबिंब त्यात दिसत होते. सरोवरा पलीकडे एक विचित्र वाडा दिसत होता. त्याचे बुरुज उंच होते आणि आकाशात शिरल्यासारखे वाटत. तो वाडा आणि सरोवरा पासून वाड्यापर्यंत संगमरवरी दगडांच्या पायऱ्या होत्या. पायऱ्यांच्या पायथ्याशी एक चौथरा होता, तो पाण्याच्या वर आला होता. तो चौथरा माणिक, पुष्पराग, सोने व चांदी यांच्या लाद्या टाकून केलेला होता. त्या चौथऱ्यावर गुलाबी रंगाच्या स्फटिक सिळानी निर्मिलेले चार खांब होते व त्यांच्यावर हिरव्या रंगाचे कापड टाकलेले होते. त्याच्याखाली एक सुंदर सिंहासन होते. त्यावर केलेले कोरीवकाम इतके सुंदर होते की मोठमोठ्या राजांनासुद्धा अलोट संपत्ती खर्च करून साध्य झाले नसते.

हसन पुतळ्यासारखा ते अद्भुत दृश्य पहात उभा होता. त्यावेळी दहा मोठे पक्षी आकाशातून उतरून त्या सरोवराच्या काठावर उतरले. काही वेळ सरोवराच्या काठावर हिंडत राहीले व त्यांतला सर्वांत मोठा पक्षी सिंहासनाजवळ चालत आला. त्याच्या पाठोपाठ इतर नऊ पक्षी आले.

हसन चकित होऊन त्यांच्याकडे पहात असतां त्या पक्षांनी अंगातली वस्त्रे काढावी तसे पंख काढले आणि सुंदर स्त्रियांच्या रूपे प्रगट झाले. प्रत्येक स्त्री चंद्रबिंबासारखी सुंदर होती. त्या सर्वांनी सरोवरात उड्या मारल्या व जलविहार करू लागल्या. त्या परस्परांना पोहत धरायला जात व पाणी उडवून हसत. त्यांच्या हंसण्याच्या आवाजाने चारही दिशा दुमदुमुन गेल्या. त्यांच्या पैकी सर्वांत सुंदर तरुण स्त्री होती तिने हसनला स्वतःकडे आकर्षित केले. तो एका झाडाआड उभा राहून त्या स्त्रीचे सौंदर्य निर्निमेष पहात होता.

त्या स्त्रियांचे स्नान संपले व त्यांनी वस्त्र धारण केले. इतक्यात कोणी विचारले— "उजाडण्याची वेळ झाली आहे, आपण निघू या का?"

तत्क्षण सर्व स्त्रियांनी आपले पंख अंगावर घातले आणि आल्या तशा पक्षी रूपात आकाशात उडून गेल्या.

त्या निघून गेल्यावर ही हसन शून्य नजरेने आकाशात बराच वेळ पहात राहिला. तो पर्यंत प्रेम काय असते हे हसनला माहीत नव्हते. त्याला प्रेम काय आहे हे कळल्यावर त्याला वाटू लागले की त्याच्या आयुष्यात सर्वत्र शुकशुकाट आहे. दिवस त्याला एका वर्षासारखा वाटला आणि रात्र पडतांच तो सरोवराच्या काठा पर्यंत आला. परंतु रात्री त्या कन्या आल्याच नाहीत. हसन झोप, भूक, तहान सर्व विसरला. "असं जगण्यापेक्षा मरण आले तर बरे!" असे त्याला वाटले. अशा तऱ्हेने तो दिवसेंदिवस खंगत गेला आणि त्याने अंथरूण धरले.

दहा दिवसांनी गंधर्व कन्या आपल्या वडिलांकडून परतल्या. परतल्याबरोबर हसनचे रक्षण करणारी बहीण हसनचा शोध काढीत तो खाटेवर पडला होता तेथे आली. हसनला त्या स्थितीत पडलेला पाहून तिच्या डोळ्यांना पाणी आले. तिने त्याला विचारले—"छोटू! तुला हे काय झालं रे? तुझा चेहरा पिवळा झालेला आहे. तुझे डोळे खोल आत गेले आहेत. काही लपवालपवी केल्याशिवाय तुला काय झालं ते खरं खरं सांग!"

हसन डोळ्यात आसवे आणून म्हणाला— "ताई, मी जी चूक केली त्याची फळे भोगतो आहे. आतां मला कोणी मदत करू शकणार नाही. मी असाच झुरत मरणार."

"असा विचार करू नकोस छोटू! तुला वांचविण्यासाठी आम्ही सर्व बहिणी हंसत हंसत आपले प्राण पणाला लावू. तू मेलास तर मी सुद्धा जिवंत राहणार नाही." हसनची ताई त्याला म्हणाली.

"मी दहा दिवसापासून काही खाल्ले प्याले नाही. मी अन्न पाणी सोडले आहे." असे सांगून हसनने सारा वृत्तांत आपल्या ताईला सांगितला.













# चंद्रहार

मध्यरात्रीच्या सुमारास दारावर कोणीतरी थाप मारली ती ऐकून विश्वनाथराव दचकून उठले. बाहेर वादळावरोबर पाऊसही पडत होता. विजा चमकत होत्या आणि सोसाट्याचा वारा चालू होता त्या वरून ते चांगले कळत होते. विश्वनाथरावांनी दरवाजा उघडला. एक घरंदाज बाई घरात शिरल्या व घाबऱ्या आवाजात म्हणाल्या– "लवकर दरवाजा बंद करा, ते लोक इकडेच येत आहेत."

त्या बाई उंची रेशमी लुगडे नसलेल्या होत्या. त्यांच्या अंगा खांद्यावर सोन्याचे चांगले दागिने होते. विश्वनाथरावांनी दार बंद करीत असतां पाहिले की तिघे जण त्यांच्या घरासमोरून पळत जात होते.

दार बंद करून विश्वनाथ रावांनी विचारले–"तुम्ही कोण? आणि हे तुमचा पाठलाग कां करीत होते?"

त्या बाई म्हणाल्या–"ते लोक माझ्या अंगावरचे दागिने लुटून नेण्यासाठी माझ्या पाठीस लागले होते. मी आपल्या एका नातेवाइकाकडे लग्नासाठी गेले होते. एकाएकी डोके दुखू लागले, म्हणून भाड्याची गाडी करून निघाले. वाटेत दोघां गुंडांनी गाडी थांबविली. गाडीवालासुद्धां त्यांना सामील झालेला दिसला. माझं नशीब चांगले, म्हणून त्यांच्या हातावर तुरी देऊन मी निसटू शकले."

मध्यंतरी पाऊस थांबला. विश्वनाथरावांनी त्या बाईंना समजावून सांगितले– "या पावसात जाणे धोक्याचे आहे. उजाडल्यावर तुम्ही घरी जा." त्यानंतर विश्वनाथरावांनी मधल्या घरात त्या बाईंना झोपण्यासाठी सोय करून दिली.

त्या बाईंनी विश्वनाथरावांचे आभार मानले आणि मधल्या घरात जाऊन झोपल्या.

विश्वनाथरावांना बराच वेळ झोपच लागली नाही. परंतु काही वेळाने डोळा लागला. झोप मोडली तेव्हां उठून पाहिले तर चांगले उजाडले होते. मधल्या घरात जाऊन पाहिले तर तेथे कोणीच नव्हते आणि बाहेरचा दरवाजा उघडाच होता.

विश्वनाथ रावांच्या छातीत 'धस्स' झाले. त्यांनी बाहेरचे दार बंद केले, सर्व घर धुंडाळून पाहिले, पण त्या बाई कोठे दिसल्या नाहीत. परंतु खाटेच्या बाजूला तिपाईवर एक चंद्रहार ठेवलेला होता. विश्वनाथराव चकित होऊन तो पाहू लागले, कमीत कमी चार हजार हजार रुपयांचा तरी तो होताच.

त्याच वेळी त्यांना आठवले, त्यांची बायको लग्न झाले त्या दिवसापासून चंद्रहार विकत घेण्यासाठी त्यांच्या मागे टुमणे लावून बसली होती. परंतु विश्वनाथरावांजवळ एवढी रक्कम कोठून असणार? त्यावेळी गौरी हट्ट करून म्हणाली होती– "पुढल्या दिवाळीच्या आत चंद्रहार करून दिला पाहिजे! परंतु विश्वनाथरावांनी त्यांना ते शक्य नसल्याचे सांगून टाकले होते.

त्या बाई अचानक आल्या त्याच्या आदल्या दिवशीच "तुम्हांला माझी पर्वाच नाही. तुम्ही जोपर्यंत मला चंद्रहार करून देत नाही तोपर्यंत मी तुमच्या घराचा



उंबरठा ओलांडून आत येणार नाही." असं पत्र नवऱ्याच्या टेबलावर ठेवून गौरी माहेरी निघून गेली होती.

विश्वनाथरावांना उलगडा होईना की त्या बाई चंद्रहार सोडून कां निघून गेल्या?

तितक्यात बायकोचा आवाज बाहेर रस्त्यावर ऐकू आला. काही कारणावरून ती घरी परतली होती. तिच्या नजरेस तो चंद्रहार पडला तर तिला वाटेल की तिच्या पत्राचा परिणाम चांगला झाला. पतीने तिच्यासाठीच तो चंद्रहार करवून आणला आहे! म्हणून खरी गोष्ट सांगितली तरी बायकोला ते खरे वाटणार नाही. काय वाटेल ते करून त्या बाईचा चंद्रहार



त्यांच्याकडे पोंचता केला पाहिजे, विश्वनाथरावांनी ठरविले. असा विचार करून त्यांनी चंद्रहार कोळशाच्या पोत्यात लपवला.

त्यानंतर विश्वनाथरावांनी दार उघडले. घरात पाऊल टाकतांच गौरी म्हणाली– "चांगले उजाडले, आणि अजूनपर्यंत झोपला होतां की काय? निदान संक्रांतीपर्यंत तरी चंद्रहार मिळालाच पाहिजे, सांगून ठेवते! म्हणून परत आले.

खरी गोष्ट निराळीच होती. ती भावजयीजवळ भांडून आली होती, परंतु तसं नवऱ्याला सांगणे तिला बरं वाटलं नाही. विश्नाथराव जेवण झाल्यावर ऑफिसात निघून गेले. गौरी खाऊन पिऊन सैंपाकघर स्वच्छ करीत होती, तेव्हां तिला एक विचू कोळशाच्या पोत्यात जात असलेला दिसला. तिने पोते उलटे करून मोकळे केले आणि विचवाला मारून टाकले.

कोळसे जमिनीवर ओततांच तिला चंद्रहार दिसला. तिने तो धुवून पुसून गळ्यात घातला व आनंदाने आरशांत स्वत:च रूप पाहू लागली. तिला वाटलं की कोळशाच्या बखारीत तो हार कसातरी आला असावा आणि तो नशिबाने त्यांच्याच घरी आला. ही गोष्ट नवऱ्याला कळली तर तो तिच्यासाठी चंद्रहार करण्याचा करण्याचा विचारच करणार नाही. म्हणून संक्रांतीपर्यंत नवऱ्याची नजर त्या हारावर पडूंच द्यायची नाही. त्यांनी चंद्रहार करून दिला की हा हार वितळवून घेता येतील.

परंतु तोंपर्यंत हा हार वांचवायचा कसा? तिने विचार करून तो एका डब्यांत ठेवला आणि माहेराहून येतांना आणलेले लाडू त्यावर रचून ठेवले. तिच्याबरोबर माहेरून पोंचवायला आलेल्या माणसाबरोबर तिने तो माहेरी पाठविला व आईला द्यायला सांगितले.

तो माणूस संध्याकाळपर्यंत गौरीच्या मोहरी पोंचला, परंतु त्या वेळी तिची आई घरी नव्हती. म्हणून त्याने तो डबा गौरीच्या भावजयीच्या हातात दिला. तिने



डबा उघडून पाहिला. लाडू पाहून तिला हे कळेना की नणदेने लाडू परत कां पाठविले? असा विचार करून ती लाडू काढून पाहू लागली तेव्हां खाली तिचा चंद्रहार दिसला.

"ही पोरगी वस्ताद दिसते आहे! सासरच्या वस्तू मोहरी पाठवते आहे. हिला चांगला धडा मिळाला पाहिजे." असा विचार करून गौरीच्या भावजयीने चंद्रहार काढून घेतला आणि लाडूचा डबा सासूच्या खोलीत नेऊन ठेवला.

त्यानंतर तिचा नवरा नरहरी घरी आला तेव्हां त्याच्या हातात तो चंद्रहार देऊन म्हणाली–"तुम्ही निष्कारण प्रश्न करून माझं डोकं पिकवूं नका. हा चंद्रहार शहरात घेऊन जा आणि तो वितळवून माझ्यासाठी दुसरा एखादा दागिना करवून घेऊन या."

नरहरी कधी बायकोच्यां शब्दाबाहेर काम करीत नसे. उजाडतांच तो शहराकडे निघाला आणि एका जव्हेऱ्याच्या दुकानात जाऊन त्याने विचारले–"हा चंद्रहार वितळवून तुम्ही एखादा दुसरा दागिना करून द्याल का?" दुकानदाराने नरहरीसमोर निरनिराळे दागिने आणून ठेवले. नरहरी ते पहात होता, तितक्यात दोन शिपायांनी येऊन त्याला अटक केली. दुकानदाराने



संशय आल्यावरून आपल्या नोकराकरवी शिपायांकडे निरोप पाठविला होता.

शिपायांनी नरहरीला विचारले– "चोरीचा माल वितळवायला निघाला होतास कां? चल, ठाण्यावर!"

नरहरीचा चेहरा पांढरा फट्ट झाला. म्हणाला–"हा मी चोरला नाही. माझ्या बायकोने मला वितळवून आणायला दिला होता."

ते कळल्यावर शिपाई त्याला घेऊन त्याच्या गांवी गेले. नरहरीच्या बायकोने नवऱ्याला कैद झालेला पाहून घाबरून जाऊन खरे ते सांगून टाकले. म्हणाली– "माझ्या नणदेने हा पाठविला होता!"

शिपाई नरहरीच्या बायकोला घेऊन गौरीच्या घरी शहरात गेले. गौरी थरथर कापत म्हणाली–"मला हा कोळशाच्या पोत्यात मिळाला होता!"

शिपाई कोळशाच्या वखारीत निघणार तेवढ्यात विश्वनाथरावांनी सर्व वृत्तांत सांगितला. म्हणाले–"हा हार चोरलेला नाही. एक श्रीमंत बाई आमच्या घरी विसरून ठेवून गेल्या होत्या!"

तो चंद्रहार आला कोठून हा प्रश्न जास्तच जास्त गुंतागुंतीचा होऊ लागला. शिपायांना काय करावे सुचेना. त्याच वेळी त्या घरा-समोर एक घोड्याची गाडी येऊन उभी राहिली. गाडीतून त्या चंद्रहाराची माल-कीण उतरली आणि शिपायांना म्हणाली–"कोणी चंद्रहार चोरलेला नाही. मीच तो विसरून यांच्या घरी सोडला होता. आतां तुम्ही जा." शिपाई निघून गेल्यावर विश्व-नाथरावांनी त्या श्रीमंत बाईला विचारले–"तुम्ही हा चंद्रहार माझ्या घरी कां ठेवून गेलां होतां?"

ती बाई म्हणाली–"त्या दिवशी रात्री मी ज्या खाटेवर झोपले होते, तिच्या बाजूच्या तिपाईवर तुमच्या बायकोचे पत्र पडलेले होते. मी ते वाचले माझे यजमान कोट्याधीश आहेत. आम्हांला असले चंद्र-हार म्हणजे फार मोठेसे वाटत नाहीत." नंतर ती गौरीकडे वळून म्हणाली–"नवऱ्याला त्रास देणे कोणत्याही स्त्रीला योग्य नाही. पतीचे उत्तम वर्तन व प्रेम हेच मुख्य असतात! आतां मी तुला प्रेमाची भेट म्हणून हा हार देते!" असे सांगून त्या बाई गौरीला चंद्रहार देऊ लागल्या.

परंतु गौरी मान खाली घालून तो हार न घेतां नम्रपणे म्हणाली–"तुम्ही गोड शब्दांत मला उत्तम नीतीचा उपदेश केला आहे आणि माझी कान उघाडणी केली आहे. आज पर्यंत मी दागिन्यांच्या हट्टा-साठी पतीला व्यर्थ त्रास देत होते. माझ्याशी इतक्या प्रेमाने वागणारे माझे पतीच मला चंद्रहारापेक्षा जास्त मोलाचे आहेत!"






[३]

[मंदरदेव निःशस्त्र झाला असतां त्याचे दोघे द्रोही अंगरक्षक त्याला धरून समुद्रकिनाऱ्या-कडे जात होते. त्या वेळी एक वीज पडली आणि दोघे अंगरक्षक मरण पावले. नंतर मंदरदेव त्याच्या सैनिकांवर कुंडलिनी द्वीपावरचे घोडेस्वार चालून आले. तेव्हां झालेल्या युद्धात काही घोडेस्वार मारले गेले. उरलेले किल्ल्याच्या दिशेने पळून गेले. त्यानंतर–]

मंदरदेवाच्या चेहऱ्याकडे पाहिल्यावर त्याच्याबरोबरच्या सैनिकांना, तो कोणत्या तरी विचारात गढून गेला असावा, असे वाटले. एकदां त्याने समुद्रा-कडे व नंतर किल्ल्याकडे पाहिले व दीर्घश्वास सोडला. राजाच्या मनात कोणती खरे खळबळ उडून गेली असावी या विचारात सैनिक पडले असतां मंदरदेव म्हणाला–

"आपण हे राज्य जितक्या लौकर सोडून जाऊ तितकंच आपल्या हिताचे आहे. मार खाऊन पळून गेलेले हे घोडे-स्वार आपल्या मालकाला आपण इकडे असल्याची माहिती दिल्याशिवाय राहणार नाही. नंतर ते आणखी जास्त सैनिकांना-बरोबर आणून आपल्याला पकडल्याशिवाय राहणार नाहीत. या लहानशा दोन होडक्यात आपण महासागरावर विजय मिळवून




मिळेल त्या बेटावर आपण गेले पाहिजे. कोणत्या क्षणी कोणत्या स्वरूपाचं संकट आपणांवर ओढवेल, सांगता येत नाही. तुम्ही चौघेजण माझ्याबरोबर हे बेट सोडून पळून जायला तयार आहां का?"

चौघे सैनिक मान हलवून आपला होकार देत म्हणाले—"महाराज! आपणाबरोबर आम्ही इतके दिवस काम केल्यानंतर आणि आपले मीठ खाल्लयावर या अवघड प्रसंगी तुम्हांला सोडून देऊ का? इतके विश्वास-घातकी आम्ही नाही."

मंदरदेव आपल्या सैनिकांची राजभक्ती पाहून त्यांची स्तुती करीत म्हणाला—"माझ्यावरच्या तुमच्या राजभक्ती विषयी मला मुळीच शंका नाही. मी स्वतः अविवाहित आहे. युद्धाची घोषणा न करितां, राजधर्माचा विचार ही न करतां तो नरवाहन मिश्र आपल्या राज्यावर चालून आला अशा अत्याचारी माणसाचे शिरकाण कधी न कधी केल्या शिवाय माझ्या मनाचे समाधान होणार नाही. परंतु तुमची बायका मुलं आहेत...इतर नाते वाईक...ह्या सर्वांना सोडून तुम्ही माझ्यासाठी एवढा त्याग करू नका."

"तसली कसली ही बंधने आम्हांला नाहीत महाराज!" सर्व सैनिक एक कंठस्वराने म्हणाले.

मंदरदेव सैनिकांकडे स्नेहार्द्र दृष्टीने पहात म्हणाला—"तर मग आपण वेळ घालविण्यात अर्थ नाही. होडक्यात चढा तर."

दोन्ही होडकी वल्ह्यांच्या सहाय्याने खवळलेल्या समुद्रात डोलत चालू लागली. परंतु सुदैवाने तुफान थोडे ओसरल्यासारखे वाटू लागले. विजांचा कडकडाट ही थोडा कमी होऊ लागला. पावसाची झड मात्र मधून मधून चालूच होती. सूर्यास्त झाला. चहूकडे अंधःकार पसरण्याची वेळ येतांच किनाऱ्यावरच्या झुडपांआडून पौर्णिमेचा चंद्र मान काढून डोकावू लागल्यासारखा भासला. त्याची किरणे समुद्राच्या पातळी-



वर सर्वत्र पसरू लागली. चारी बाजूला चंद्राचा अंधूक प्रकाश पसरला.

होडकी समुद्रात बरीच दूर गेली होती. आपण कोठे जात आहों, कोणत्या दिशेने जात आहों, याचा विचारही कोणाच्या मनाला शिवला नाही. नरवाहन मिश्राच्या हाती न सापडतां आपण कोठेही गेलो तरी फिकीर नाही असेच प्रत्येकाला वाटत होते. मंदरदेवाबरोबर त्याच्या सैनिकांच्या मनातही दुसरा विचार नव्हता. एकाग्र चित्ताने ते आपली होडी वल्हवीत होती.

समुद्रावर चार पांच तास प्रयाण करीत राहिल्यानंतर त्यांना समुद्रावर लाटांबरोबर मिणमिण करणारी एक ज्योत दिसली. इतकं मोठं वादळ चालू असतां कोणी मासे धरायला कोळी जातील असे वाटत नव्हते. तर मग आपल्याला धरण्यासाठी नरवाहन मिश्राने जहाज तर पाठविले नसेल? असेल कुटिल कारस्थान करण्यास तोच योग्य नराधम आहे.

ती शंका मनात येताच मंदरदेव आपल्या होडक्यात चटदिशी उठून उभा राहिला. मिणमिणणाऱ्या दिव्यांचा उजेड हळूहळू त्याच बाजूला येत होता. चांगलं लक्ष देऊन पाहिल्यावर मंदरदेवाची खात्री झाली की ते तसे मोठे जहाज किंवा युद्धनौका नाही. त्या लहान लहान दोन नावा होत्या.




क्षणभर मंदरदेवाला पुढची चकमक दिसू लागली.

या खवळलेल्या समुद्रावर ही आणखी एखादी चकमक उडून जाणार की काय? ते दिवे म्हणजे आपल्यासारखे पळून जाणारे आपल्याच दिशाचे लोक व नावा असतील तर हरकत नाही. तसं नसेल तर कुंडलिनी द्वीपाच्या नावा असू शकतील. आपल्यापैकी कोणा जवळही धनुष्य बाण नाही का?" मंदरदेवाने विचारले.

सैनिकांपैकी लगेच एकजण उत्तर देत म्हणाला—"महाराज, आपल्याजवळ आपल्या तलवारींशिवाय दुसरे काही नाही. प्रधानांनी आपल्या रक्षणासाठी जा म्हणून आज्ञा

देतांच आम्ही जसे होतो तसेच निघालो. मागचा पुढचा कांही विचारही केला नाहीं."

"काही हरकत नाही." मंदरदेव म्हणाला. तो पुढे म्हणाला—"मराळदेवीची करुणा असल्यावर नुसत्या तलवारी आपल्या हातात असल्या तरी पुरे! समजा, मरावेच लागले तर, प्राण गेल्यावर हा देह समुद्रांतल्या माशांच्या पोटात गेला काय किंवा जमिनी-वरच्या कृमीकीटकांच्या पोटात गेला काय, एकच!"

मंदरदेव म्हणाला ते ऐकून सैनिकाचं साहस वाढलं, त्यांना धीर आला. इतक्यांत दूर मिणमिणाऱ्या दिव्यांची होडकी जवळ जवळ येऊ लागली. अगदी जवळून दृष्टीच्या आत आपल्यावर एक दीर्घकाय माणूस धनुष्य हातात घेऊन उभा राहिला.

चांदणीच्या उजेडात त्याची मुखाकृती स्पष्ट दिसत नसली तरी ती एक आजानु-बाहु व्यक्ती आहे, एवढे मात्र स्पष्ट कळत होते. आपल्याला चांगल्याच धाडसी शत्रूचा सामना करावा लागणार ह्याची जाणीव त्यांना झाली.

आतां शंका करायला जागा नव्हती. ते धनुष्य बाण घेऊन तयार होऊन आले होते. "त्यांचा बाण आपल्याला लागणार नाही अशा तऱ्हेने नावेत बुडाजवळ वाकून बसणे बरे होईल." मंदरदेवाने या शब्दात साव-धान करायच्या आंत एक बाण 'सूं'...असा आवाज करीत आला आणि एका डोक्याला



लागला. तत्काल मंदरदेव व त्याचे अनुयायी सैनिक नावेत डोकी खाली करून खोलगट जागेत बसले. अत्यंत सावधगिरीने ते शत्रूची चाहूल घेत होते.

लोकं परस्परांना सावध करीत असलेले आणि जोरजोराने वल्ही मारीत असलेले. मंदरदेवाला व सैनिकांना त्या दबकून राहिलेल्या परिस्थितीतही ऐकू येत होते. शत्रू वेगाने जवळ येत असल्याचे त्यांना कळले. शत्रू जवळ येऊन तलवारीचा वार करण्या लायक टप्प्यात येई पर्यंत पडावांत वांकून राहणेच भाग होते. नंतर जवळून जी चकमक होईल तीत जे खड्ग युद्धात जास्त प्रवीण ठरतील, शूर ठरतील त्यांनाच जय मिळणार हेही निश्चित होते!

या विचारात गर्क झालेल्या मंदरदेवाला व सैनिकांना, होडक्यांच्या खोलगटात मुठीत प्राण घेऊन बसलेल्या मनःस्थितीत 'समर-सेन की जय' हा जयघोष ऐकू आला. हा नवीन जयघोष कोणाचा व कसा आला हे आश्चर्य करीत विचार करीत असतां मंदर-देव व त्याचे सैनिक बसले होते त्या होडक्यावर एक मोठी नाव धडकली व त्या धक्कयाने होडकी इतकी हलू लागली की पाण्यात बुडतात की काय वाटलं. तरी तत्क्षण मंदरदेव आपली तलवार उपसून उभा राहिला आणि त्याने 'जय मराळ देवी की' असा सिंहनाद ही केला. त्याची तलवार विजेसारखी एका शत्रूवर पडली आणि तो एक किंकाळी फोडून समुद्रात





पडला. त्या पाठोपाठ मंदरदेवाचे सैनिक आपापल्या तलवारी उपसून त्या मोठ्या नावात उड्या टाकून शिरले. परंतु तेवढ्यात एक आवाज ऐकू आला—"थांबा! आपण शत्रू नाही!" तो ऐकून सर्वथक्क होऊन परस्परांकडे पाहू लागले.

परंतु तेवढ्या वेळात आणखी दोघे मंदरदेवाच्या सैनिकांच्या तलवारींचा वार लागल्याने समुद्रात पडले. मंदरदेवाने आपली तलवार तशीच हातात वर धरून विचारले—"मग तुम्ही कोण? कुंडलिनीच्या नरवाहन मिश्राचे सैनिक नाही का?"

"आम्ही कुंडलिनी बेटावरच राहणारे आहों, परंतु नरवाहन मिश्र हा आमचा शत्रू आहे. तुम्ही सर्व मराळ द्वीपातरचेच असाल तर आपण मित्र आहों, तलवारी म्यानेत जाऊ द्या!" एक दीर्घदेहधारी म्हणाला.

मंदरदेवाच्या मनाला, ही काही लबाडी तर नसेल असा एक संशय चाटून गेला. परंतु शांत होऊन त्याने विचारले—"तर मग तुमचा नायक कोण आहे? त्याचे नाव काय?"

"माझे नाव शिवदत्त आहे. या नावांत असलेले सर्व माझे अनुयायी आहेत." उत्तर आले.

"स्वागत, सुस्वागत, शिवदत्ता!" मंदरदेव अत्युत्साहाने म्हणाला—"आज पासून सुमारे वीस वर्षांपूर्वी, म्हणजे मी दहा वर्षांच्या वयाचा असेन त्यावेळी तुमचे व शूरसेनापती समरसेन यांचे शूरवीर म्हणून नाव ऐकले आहे. तुम्ही व समरसेनाने कोणत्या तरी बेटावर जाऊन जे शौर्य साहस दर्शविले होते त्याचे वर्णन मी ऐकले आहे. आज त्या शूर सेनापतींच्या प्रमुख सरदाराला मोठ्या भाग्याने भेटून मला फार आनंद होत आहे. तुमचे मी हृदयपूर्वक स्वागत करतो!"

"तर मग तुम्ही कोण? मराळ द्वीपाचे महाराज मंदरदेवच तर नाही ना?" शिवदत्ताने विचारले.



"होय, दोन तासापूर्वीपर्यंतचा मीच तो मराळ द्वीपाचा दुर्दैवी राजा मंदरदेव! परंतु आतां मी फक्त मंदरदेवच राहिलो आहे. माझे राज्य व माझे सिंहासन त्या नरवाहन मिश्राने बळकाविले आहे." मंदरदेव म्हणाला.

शिवदत्ताने काहीच उत्तर दिले नाही. तो व त्याचे अनुयायी ज्या नावांवर होते त्या नावा मंदरदेवाच्या होडक्यांना येऊन टेकल्या. शिवदत्त मंदरदेव होता त्या होडक्यात आला. तो काही तरी सांगायला आला असावा, असे वाटून मंदरदेवाने आपल्या शेजारी त्याला बसण्यासाठी जागा करून दिली.

शिवदत्त बसत असतां म्हणाला—"राज्याबरोबर 'राजा' ही पदवीसुद्धा गेली हे म्हणण्यात काही खोटे आहे असे म्हणतां येणार नाही. तर मग मी तुम्हांला मंदरदेव म्हणूनच मी संबोधन करीन. तुम्ही आतां कोठे निघाला आहां? तुमचं गम्यस्थान कोणते हे सांगाल का?"

मंदरदेवाने एक दीर्घश्वास सोडला आणि लगेच स्मित करून म्हणाला—"गम्यस्थान विचारतां आहां, ते माझे मलाच माहीत नाही! नरवाहन मिश्राच्या हातातून निसटून स्वतःचा जीव कसा वांचवायचा एवढा एकच एक प्रश्न माझ्यासमोर आहे. हे चार



स्वामिभक्त सैनिकच तेवढे माझ्याबरोबर आहेत!"

"बरं झालं की मग! आपण एकाच परिस्थितीत आहों म्हणावयाचे! मी त्या क्रूर दुष्टाच्या हातांतून स्वतःला वांचविण्यासाठीच तर निघालो आहे!" शिवदत्त म्हणाला.

इतक्यात मंदरदेवाचा एक सैनिक उभा राहून म्हणाला—"महाराज, समुद्र किनाऱ्याकडे पहावे! एकदम बरेचसे दिवे हलत असल्यासारखे दिसत आहेत! एकदम बरेच लोक किनारा सोडून निघाल्यासारखे वाटत आहे. शत्रू आपल्या शोधार्थ तर निघत नसेल ना?"

शिवदत्ताने व मंदरदेवाने समुद्र किनाऱ्याकडे पाहिले. सैनिक म्हणाला त्यात त्यांना अतिशयोक्ति वाटली नाही. सर्व किनारा दिव्यांच्या प्रकाशाने स्पष्ट दिसत होता. हवेत काजवे चमकतात तसे समुद्राच्या लाटांवर दिवे खालीवर होत झळकत होते.

"आपण समुद्रात खोल दूर जितकं जातां येईल तितकं निघून जाणंच श्रेयस्कर आहे. नशीब चांगले असेल तर कोणत्या तरी बेटाला लागूच, नाहीतर भाग्यात लिहिलं असेल तेच...याहून जास्त काय होणार आहे! कोणत्याही परिस्थितीत नरवाहन-मिश्राच्या हातात सापडणं धोक्याचंच आहे." शिवदत्त म्हणाला.

मंदरदेवाने होकारार्थी मान हलविली. चारही नावा वल्ह्यांच्या सहाय्याने समुद्रात खोल निघाल्या. त्यांना संशय वाटला तसे, समुद्रकिनाऱ्या वर दिसत होते ते शत्रूचे आरमारच होते. ते समुद्रात शोध काढण्यासाठीच निघाले होते. ते आपल्या शोधार्थच निघाले असल्याचा संशय आल्यावर शिवदत्ताने आपल्या नावांवरचे सर्व दिव विझवून टाकायला सांगितले.

आतां चारही नावा काळोखातच पुढील प्रवास करू लागल्या. नावा एक दुसरीवर आदळू नये यासाठी नावावरच्या लोकांनी आवश्यक तेवढी सावधगिरी बाळगली होती. मंदरदेवाने आकाशात लखलखणाऱ्या ताऱ्यांकडे एकदा पाहून म्हटले—"शिवदत्ता! कुंडलिनी द्वीपाचे रहिवासी आणि सेनापती समरसेनाचे अनुयायी अशा तुम्हांलासुद्धां अशातऱ्हेने ते बेट सोडून पळून कां जावे लागत आहे? मला या गोष्टीचे थोडे आश्चर्यच वाटत आहे आणि खूप वाईटही वाटतं!"

शिवदत्त एक क्षणभरच थांबला व म्हणाला—"हे सर्व त्या दुष्ट नरवाहन-मिश्राच्या कुटिल कारस्थानामुळे घडले. यात सेनापती समरसेनाची थोडी चूकच झाली म्हणावे लागेल. ते सर्व मी सांगतो. ऐका!" असे सांगून शिवदत्त सांगू लागला.

(क्रमशः)





# सेनापतीची निवड

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला— "राजा एवढे त्रासाचे काम तुला कोणी करायला सांगितले. मला माहीत नाही. परंतु कधी कधी मनुष्याच्या विचारांविरुद्ध काही कारणांमुळे त्याला पटणाऱ्या किंवा न पटणाऱ्या गोष्टी कोणत्या आहेत ते देखील माणसाला कळेनासे होते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला चित्रपूरच्या राजाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

चित्रपूरच्या राज्यात सेनापतीची जागा एकाएकी रिकामी झाली. सामान्यपणे उपसेनापतीला त्या जागेवर नेमण्याची पद्धत अनादीकालापासून चित्रपूर राज्यात

## वेताळाच्या गोष्टी



होती. ती पद्धत चालू न ठेवायला एक मोठी अडचण यावेळी समोर आली. सेनापती पदाला योग्य असलेले असे दोन उपसेनापती होते. एकाचे नाव होते चेतनवर्मा व दुसऱ्याचे होते चंदनवर्मा. दोघांच्या मनात सेनापती पद मिळावे असे होते.

राजा चित्रग्रीव याला त्या दोघांपैकी कोणाला त्या पदावर नेमावे हे कळेना. मंत्रीसुद्धा एक मताने राजाला आवश्यक सल्ला देऊ शकले नाहीत. सेनापती पदाविषयी चेतनवर्मा व चंदनवर्मा यांच्या मनात काय आहे हे कळावे यासाठी राजाने एक उपाय योजला. चित्रपूर राज्यावर शेजारच्या दोन शत्रु राज्यांची कित्येक दिवसांपासून वांकडी नजर होती. त्या राज्यावर स्वारी करण्यात चेतन आणि चंदन यांच्यापैकी कोण जास्त चतुर निघतो, त्यावरून सेनापती पद देता येईल असे राजाने ठरविले.

ती गोष्ट राजाने दोघां उपसेनापतींना सांगितली. दोघांनी त्या गोष्टीस 'होकार' दिला. प्रथम चेतनवर्माच्या हाताखाली सैन्य देण्यात आले. त्या सैन्याच्या मदतीने चेतनवर्माने शत्रूचे राज्य जिंकावयाचे होते.

चेतनवर्मा अत्युत्साहाने शत्रूच्या राज्यावर चालून गेला. वास्तविक शत्रूच्या सैन्यापेक्षा चेतनवर्माचे सैन्य फारच लहान होते. त्याने त्या गोष्टीकडे दुर्लक्षच केले. त्याचे लक्ष काय ते सेनापती पदावरच होते.

त्यामुळे तो शत्रु सैन्यावर मोठ्या उत्साहाने चालून गेला होता तरी त्याच्या सैन्यातील सैनिक फार मोठ्या संख्येने हताहत झाले. उरलेल्या सैन्यासह त्याने माघार घेण्याचे ठरविले व निघालाही. परंतु त्याच वेळी शत्रूने हे समजून की आतां आपल्याला जय मिळालाच आहे, फक्त आपल्या अंगरक्षकांसह आला व चेतनवर्माला त्याने अडविले. चेतनवर्माला ही संधी चालून आल्यासारखे झाले. त्याने चटदिशी आपल्या मोजक्या सैन्यासह शत्रूच्या राजाला व त्याच्या अंगरक्षकांना चारी बाजूंनी घेरले व त्यांना कैद केले. त्याने शत्रु राजाला धमकी दिली की त्याने संधिपत्रावर सही केली नाही तर त्याचा शिरच्छेद केला जाईल. म्हणून शत्रूच्या राजाने चित्रपूरचा सामंत असल्याच्या संधिपत्रावर सही केली.

अशातऱ्हेने विजय गर्वोक्ति करीत चेतनवर्मा चित्रपूरला परतला.

नंतर चंदनवर्म्याच्या हाताखाली चेतनवर्म्याला दिले होते तेवढेच सैन्य देऊन दुसऱ्या शत्रु राज्यावर पाठविण्यात आले. चंदनवर्मा शत्रुराज्यावर एकाएकी चालून नाही. त्याने शत्रुराज्याच्या सरहद्दीवर तळ दिला आणि हेर पाठवून शत्रूचे सैन्य किती आहे आणि किल्ल्याच्या रक्षणार्थ शत्रूने कशी काय व्यवस्था केली आहे. याची माहिती काढून घेतली.

ती माहिती मिळाल्यावर शत्रूवर चालून गेल्यास शत्रूचा पराभव करणे शक्य नाही, हे त्याने ओळखले. या उलट शत्रूने आपले सैन्यबळ कमी आहे, असे समजून किल्ल्याबाहेर येऊन आपल्यावर हल्ला केला तर राज्याच्या हद्दीत त्याला पाऊल टाकू न देण्या इतकी शक्ती आपल्यात आहे, चंदनवर्म्याला त्या गोष्टीची ही पूर्ण जाणीव होती.

म्हणून चंदनवर्मा आपल्या राजाला भेटला व त्याने निवेदन केले–"महाराज, हेरांद्वारे मला शत्रूच्या शक्तीची पूर्ण कल्पना आली आहे. त्याचे सैन्यबळ चांगले आहे



व त्याने किल्लयाच्या रक्षणासाठी सर्व आवश्यक तजवीज केली आहे. म्हणून मी आपल्या राज्याच्या हद्दी बाहेर जाऊन शत्रूवर हल्ला करणे म्हणजे अनावश्यकपणे आपलंच नुकसान करून घेण्यासारखे होईल. म्हणून शत्रूवर हल्ला करणे योग्य नाही." राजाने लगेच चंदनवर्म्याला सेनापती पदावर नेमीत असल्याचे जाहीर केले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, चित्रपूरच्या राजाने सेनापतीपद अविचारपणेच चंदनवर्म्याला दिले असे नाही का वाटत? युद्धात जय मिळवून चेतनवर्मा आला होता, तरी त्याला ते पद न देतां, शत्रूवर चालून जाण्यासही तयार नसलेल्या चंदनवर्म्याला राजाने ते पद कां दिले? या शंकेचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर, तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला–"राजाने जो निर्णय घेतला तो अविचाराने घेतला असे म्हणतां येणार नाही. शहाणपणाचाच होता! सेनापती पदाला योग्य असलेल्या माणसात स्वतःचे शक्तिसामर्थ्य व शत्रूचे शक्ति-सामर्थ्य यांची पूर्ण कल्पना असायला हवी. चेतनवर्मा स्वतःच्या व शत्रूच्या बलाबलाची कल्पना केल्याशिवाय शत्रूवर चालून गेला होता व त्यामुळे त्याला फार मोठे नुकसान सहन करावे लागले. शिवाय त्याला जो जय मिळाला त्याचे कारण शत्रूचा अविवेक होता. या उलट चंदनवर्म्याला स्वतःच्या बलाबलाची पूर्ण कल्पना होती. त्याला हेरांकडून पूर्वीच शत्रूच्या बलाबलाची महिती मिळाली होती. अशा सेनापतीमुळे मोठमोठी राज्ये जिंकतां आली नाहीत तरी शत्रूच्या हाती पराभव तरी होणार नाही. या गोष्टीचा विचार करून चित्रग्रीव राजाने चंदनवर्म्याला सेनापती नेमले ते योग्यच होते.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# झाडावरचा ब्रह्मराक्षस

नागेशाच्या पाठीस लागल्यासारखी अनेक संकटे एका पाठीमागून एक त्याच्यावर ओढवली. त्याने गेल्या वर्षीच कर्ज काढून मुलीचे लग्न करून दिले. बायको आजारी पडली म्हणून तिच्या औषधोपचारासाठी त्याला बराच खर्च करावा लागला. चांगलं पीक आल्यावर हा कष्टकाळ संपेल असे वाटले होते, परंतु नेमका त्याच वर्षी पाऊस कमी पडला आणि शेत तसेच वाळून गेले. सावकार कर्ज व व्याज देऊन टाकण्यासाठी घर शेत विकून टाकायला उरावर बसला.

आतां या संकटातून सुटका नाही असे वाटून जिवाला कंटाळून नागेशाने जीव द्यायचे ठरविले आणि मध्य रात्रीच्या वेळी परसातल्या रीठयांच्या झाडाखाली येऊन उभा राहिला. त्या क्षणाला आपण देवाला शेवटची प्रार्थना करावी असे त्याला वाटले. हात जोडून तो म्हणाला–

"देवा, मला पुढल्या जन्मी तरी श्रीमंती दे!" त्याच वेळी त्याच्या पायांजवळ कसली तरी एक गाठोडी पडली. नागेशाने दचकून ते गाठोडं सोडून पाहिलं. त्याचा त्याच्या डोळयावर विश्वास बसेना, ते गाठोडं सोन्याच्या मोहोरांनी भरलेली होती. देवाचे उपकार मानून त्याने पुन्हां डोळे मिटून देवाला नमस्कार केला व मनात म्हणाला–"शेवटी देवाला माझी करुणा आलीच!" नागेश ते गाठोडं घेऊन घरात गेला आणि बायकोला उठवून त्याने घडलेली गोष्ट तिला सांगितली.

"भरल्या माणसाचं देव सदा भलंच करतो!" असं म्हणत बायकोने ते गाठोडं उचलून कपाळाला लावलं व पेटीत नेऊन ठेवलं.

त्या दिवसापासून नागेशाचे दारिद्र्य संपले. कर्ज वगैरे फेडून त्याने आणखी



थोडे शेत विकत घेतले आणि सुखाने राहू लागला.

परंतु नागेशासमोर आणखी एक प्रश्न उभा राहिला. बापाजवळ खूप पैसा आहे, हे कळल्यापासून त्याचा मुलगा वाईट संगतीला लागला आणि जुगार खेळू लागला.

एके दिवशी जुगारीच्या अड्ड्यावर एक मोठी भानगडच झाली. नागेशाच्या मुलाने एका श्रीमंत जव्हेऱ्याच्या मुलाला खूप बडविले आणि तो वाचत नाही असे प्रत्येकाला वाटले.

नागेशाला काय करावे सुचेना. मुलाला फांशी झाली तर तो या जगाचा कायमचा निरोप घेऊन जाईल, परंतु नागेशाला खुन्या मुलाचा बाप म्हणून कायम अपकीर्ती सहन करावी लागणार आणि मरेपर्यंत त्याची मान खाली होणार. त्यापेक्षा मरण बरं असे वाटून नागेश मागच्या सारखा मध्य रात्र उलटल्यावर रीठ्यांच्या झाडाखाली येऊन उभा राहिला. देवाला नमस्कार करून म्हणाला—"देवा, माझा मुलगा खुनी म्हणून मला आयुष्यभर अपकीर्ती सहन करावी लागणार. म्हणून पुढच्या जन्मी मला गुणी मुलगा देण्याची कृपा कर!"

तेव्हां रीठ्याच्या झाडावरून त्याला कोणी तरी म्हटल्यासारखं ऐकू आलं—"त्या जव्हेऱ्याचा मुलगा बेशुद्ध स्थितीत असतां तुझा मुलगा खुनी कसा होईल रे?"

नागेशाने मान वरकरून झाडाकडे पाहिले. परंतु त्याला कोणीच दिसले नाही. देवच ते म्हणाला असेल त्याला वाटले. लगेच तो जव्हेऱ्याच्या घरी गेला. जव्हेऱ्याच्या मुलाला अंगभर पट्ट्या बांधलेल्या होत्या आणि तो पलंगावर पडून होता. त्याचे आईवडील व इतर नातेवाईक दुःखी होऊन चारीबाजूला बसलेले होते.

जव्हेऱ्याच्याजवळ पोंचल्याबरोबर नागेश रागावून ओरडला—"काय रे, हा काय न्याय झाला? तुला माझ्यावर सूडच उगवायचा होता तर आणखी काही तरी करून तू उगवला असतास तरी चालले असते. परंतु



माझ्या मुलावर असा आरोप लावण्याची काय गरज होती? तुझ्या मुलाला काही झालेले नसून त्याला इतक्या पट्ट्या बांधायची काय गरज होती आणि माझ्या मुलाने त्याला मारले म्हणून दवंडी पिटायची काय गरज होती?"

जव्हेरी नागेशाला काही तरी उत्तर देणार, इतक्यात त्याचा मुलगा उठून बसला व म्हणाला—"आहे तरी काय ही भानगड? माझ्या सर्वांगाला या पट्ट्या काय बांधल्या आहेत? आहे तरी काय भानगड?" असे म्हणत त्याने अंगावरच्या सर्व पट्ट्या सोडून टाकल्या.



त्याच्या अंगावर एकादी लहानशी जखमसुद्धा नव्हती. सर्व चकित झाले. "ही काही तरी देवाची मायाच आहे!" असे म्हणत जव्हेऱ्याच्या बायकोने मुलाला पोटाशी धरले.

"माया की मंत्र काही असो, आमचा मुलगा आम्हांला परत मिळाला. उगाच नागेशाला असे म्हणत जव्हेऱ्याने नागेशाची माफी मागितली.

नागेश निश्चित होऊन घरी परतला. हे घडले त्या दिवसापासून नागेशाचा मुलगा चांगला वागू लागला. काही काळ लोटल्यावर नागेशाच्या मनात एक नवीन विचार आला. आपण श्रीमंत झालो आहो, हे खरं, पण कोट्याधीश कोठे आहो? पिढ्यान् पिढ्या आपले वंशज सुखी रहायला हवे असतील तर इतकं ऐश्वर्य संपादन केले पाहिजे. त्याला एकच एक मार्ग आहे. पुन्हां रीठ्याच्या झाडाखाली जाऊन फांस लावून घ्यायचा यत्न केला पाहिजे. तसा प्रयत्न केल्याचा आपल्याला दोनदा फायदा झाला.

तसा विचार करून एक दिवशी रात्री नागेश त्या रीठ्यांच्या झाडाखाली गेला. एकाएकी त्याच्या समोर एक ब्रह्मराक्षस उडी मारून उभा राहिला. त्याने विचारले—"काय रे, पुन्हां कशाला आलास?" असे म्हणत हुंकारला.

ब्रह्मराक्षसाला पाहताच नागेशाची बोबडीच वळली. तरी स्वतःला सावरून त्याने विचारले–"कोण रे तू?"

"तू जीव द्यायला आला आहेस ना? मग मला पाहून एवढा भ्यालास का? मी ब्रह्मराक्षस आहे, हे कळले नाही का तुला? कित्येक वर्षे झाली मी या झाडावर राहतो आहे. तू आत्महत्या करून घ्यायचा विचार सोडला तर मला या भयंकर रूपातून मुक्ती मिळेल व स्वर्गप्राप्ती होईल. म्हणून तुला दोनदां वांचविण्यासाठी मी यत्न केला होता." ब्रह्मराक्षस म्हणाला.

ते उत्तर ऐकून नागेशाला हायसे वाटले आणि ब्रह्मराक्षसाकडून आणखी काहीतरी मागून घ्यायला धैर्य आले. म्हणाला–"माझ्या आत्महत्येशी तुझ्या स्वर्गप्राप्तीचा हा कसा काय संबंध रे?"

ते प्रश्न ऐकून ब्रह्मराक्षसाने दीर्घश्वास सोडला व म्हणाला–"दैवाने प्रत्येक माणसाला ठराविक आयुष्य देऊन सुखाने रहा म्हणून पाठविले. तेव्हां माणसाने धैर्याने संकटांना तोंड देऊन रहावयाचे असते, आत्महत्या वगैरे करावयाची नसते. मी तुझा पूर्वज आहे. संकटांना घाबरून जाऊन मी आत्महत्या करून घेतली व त्या पापाचे फळ म्हणून ब्रह्मराक्षस झालो. माझ्या वंशात माझ्या नंतर पांचव्या पिढीपर्यंत कोणी आत्महत्या केली नाही तर पापमुक्ति मिळून मला स्वर्गप्राप्ति होईल. माझ्या वंशातल्या कोणालाही मी फक्त दोनदांच सहाय्य करून वांचवू शकेन. तू माझ्या वंशात पांचव्या पिढीत जन्मलास. मी तुला दोनदां सहाय्य केले आहे. तेव्हां तूच ठरव की आतां आत्महत्या करून घेऊन माझ्यासारखा ब्रह्मराक्षस होऊन या झाडावर माझ्या जोडीला बसावयाचे आहे की तुला आयुष्य आहे तेवढं घालवून मला स्वर्गप्राप्ति करून द्यावयाची आहे!" असे सांगून ब्रह्मराक्षस उडी मारून झाडावर निघून गेला.

त्यानंतर नागेशने कधीही आत्महत्येचा यत्न केला नाही.





# शांतिदेवता

प्राचीन काळी काही लोक केवळ खड्ग धारण करूनच आपली उपजीविका चालवीत असत. म्हणजे खड्ग धारण हा त्यांचा उदर निर्वाहाचा धंदा होता. युद्धात भाग घेतला तरच त्यांना पोटा पाण्याला मिळे.

अशा अनेक युद्धात शूरसिंह नावाचा एक महाप्रतापी योद्धा होऊन गेला. एकदां त्याला काही काळ नोकरीच मिळाली नाही. कारण राजपुरुषांना युद्धाचा वीट आला होता. त्यांनी परस्परांना भेटून आपसात समेट करून घेतला होता. अस्त्रशस्त्रें त्यांनी शस्त्रागारात कायमची बंद करून टाकली. राज्यात सर्वत्र शांतता नांदत असेल तर युद्धाची गरजच काय? मग सैनिकांची तरी गरज काय?

अशा परिस्थितीत शूरसिंहावर प्रसंगच ओढवल्यासारखे झाले. त्याला एकच एक काम करता येत होते, ते म्हणजे खड्ग धारण करून लोकांची डोकी कापून लोळविणे. परंतु आतां युद्धेच बंद झाली आणि त्याला दुसरे कामच येत नव्हते. त्याच्याशी लढायची कुणाची तयारीपण नव्हती.

शूरसिंहाला मनापासून वाटू लागले की सर्व राजपुरुष भितरे कापुरुष झाले आहेत आणि 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायाने प्रजाही पौरुषहीन झाली आहे. तर मग मी आपली तलवार खिळ्याला टांगूनच ठेवली पाहिजे का? गंज लागू द्यायचा का? तिचा आता काय उपयोग?

परंतु काय करणार! अन्न वस्त्रासाठी इतरांच्या तोंडाकडे पहावे लागल्याने शूरसिंह थकला व अशक्त होऊ लागला. घोड्यालासुद्धा पुरेसे दाणापाणी मिळेनासे झाल्यामुळे तोही थकला. शेवटी निरुपाय होऊन शूरसिंह नोकरीच्या शोधार्थ निघाला.

२५ वर्षांपूर्वीची चांदोबातली गोष्ट



जातां जातां तो उजाडण्याच्या सुमारास एका शेतांजवळ पोचला. शूरसिंहाने शेत नांगरत असलेल्या शेतकऱ्याला घोड्यावर बसल्या बसल्याच हाक मारली व म्हणाला–"माझं नाव शूरसिंह, ऐकलं का? मी एक शूर योद्धा आहे. तूर्त मला काहीच काम नाही. मला काही काम देशील का?"

ते ऐकून शेतकऱ्याने नांगर थांबविला आणि शूरसिंहाकडे वळून पाहिले. त्याच्या म्यानेत तलवार पाहून त्याला क्षणभर भय वाटले. तरी धीर करून म्हणाला–"तुला नांगर हाती धरतां येत असेल तर माझ्याकडे पुष्कळ काम आहे. पहिल्याने ती तलवार आणि कटयार दूर फेकून ये कोठेतरी!"

शूरसिंह म्हणाला–"मला नांगर नाही धरता येत बाबा! कोणी तुझा शत्रू असेल तर सांग, मी क्षणार्धात त्याचे डोके उडवून तुझ्या पायासमोर आणून टाकतो. माझ्या पोटा पाण्याची व माझ्या घोड्याच्या दाण्याची व्यवस्था केलीस म्हणजे पुरे. मला आणखी काही नको."

शेतकरी काहीच बोलला नाही. थोडावेळ शेतकऱ्याकडे पहात राहिला आणि नंतर पहिल्यासारखा नांगरू लागला.

"छे! सर्व पौरुषहीनच! अशा माणसांना शत्रूच नसतो का? शत्रू होत नसेल तरी शत्रुसंहार हा केलाच पाहिजे. पण वर हा मला नांगर धरतोस कां हातात विचारतो आहे! भित्रा, कापुरुष! माझ्यासारख्या शूरवीराने हे काम करायचे का?"

असा विचार करून शूरसिंह एका जंगलाच्या वाटेने निघाला. थोडे अंतर चालून गेल्यावर त्याला एक हिरवेगार मैदान दिसले. त्या मैदानात त्याला एका जागी एक उंच मूर्त कोणत्या तरी देवाची दिसली. ती युद्धदेवता होतीसे वाटले त्याला. आनंदाने त्याने घोड्याला टांच मारली आणि त्या मूर्तीसमोर येऊन उभा राहिला.





ती मूर्त सुमारे वीस फूट ऊंचीची असावी. हातात त्रिशूल तलवारी होत्या. ठिणग्या उडत असल्या सारखे लाल डोळे होते. पाहून अंगाचा थरकांपच उडेल असे रूप होते. देवीच्या हातातली तलवार पाहून शूरसिंहाचे हृदय उचंबळून आले.

तो आनंदोत्साहाने म्हणाला–"काय पण सुंदर सोन्याची मूर्त आहे! कितीतरी दिवसांनी अशा वीर देवतेचे दर्शन झाले म्हणजे अजून वीर योद्धा युद्ध करून जगू शकतो तर!"

"नाही रे, ती मूर्त चांदीची आहे! ही रजत मूर्त आहे, सुवर्ण मूर्त नाही!" कोणी तरी उत्तर दिल्यासारखा एक आवाज ऐकू आला. त्या आवाजा पाठोपाठ देवीच्या मागून एक ढाल तलवार धारण केलेला घोडेस्वार पुढे आला.

शूरसिंह त्याला पाहून चिडल्यासारखा तलवार उपसून द्वंद्वयुद्धाला तयार झाला आणि गरजला–"कायरे, तू मला ओळखलं नाहीस वाटतं! माझं नांव शूरसिंह आहे! लक्षात असूदे!"

दुसरा घोडेस्वार हेटाळणीकरीत हंसत तलवार उपसून म्हणाला–"कायरे, तुला डोळे नाहीत असे दिसतं आहे! सोन्याला चांदी म्हणणाऱ्याला पाहून मला तरी आश्चर्यच वाटतं आहे! माझं नाव काय आहे, माहीत आहे का? मी धीरसिंह आहे. लक्षांत असूदे! ये तुला माझ्या तलवारीचा प्रताप दाखवितो!" असे म्हणत त्याने घोड्याला टाच मारली आणि पुढे आला.

दोघे परस्परांना आव्हान करीत दोघांचे घोडे हिणहिणत असतां परस्परांवर तुटून पडायला पुढे सरसावले. इतक्यांत एक फिरटा आवाज ऐकू आला–"थांबा! तलवारी म्यानांत ठेवा!" दोघां वीरांनी आवाज आला त्या दिशेला वळून पाहिले.

दुधासारखे स्वच्छ पांढरे लुगडे नेसलेली शांत गंभीर चेहरा असलेली एक सुंदर स्त्री-समोर आली व म्हणाली–"तुम्ही दोघे शूर व पराक्रमी वीर आहांत यात शंका नाही!"

"त्याची गोष्ट काय ती मला माहीत नाही. माझं नांव शूरसिंह आहे!" शूरसिंह म्हणाला.

"त्याची गोष्ट काय ती मला माहीत नाही, माझं नांव धीरसिंह आहे!" धीर-सिंह म्हणाला.

दोघांकडे पहात ती स्त्री म्हणाली– "तुमच्या तलवारींच्या इतकीच तीक्ष्णता तुमच्या बुद्धीत असती तर तुम्ही द्वंद्वयुद्धाला तयार झाला नसतां!"

"त्या मूर्खाला दिसत नाही, आंधळा आहे, ती सोन्याची मूर्त चांदीची आहे, म्हणे!" शूरसिंह म्हणाला.

"त्याचे डोळे आहेत की डोळ्याची भोकं आहेत? चांदीच्या मूर्तीला हा सोन्याची म्हणतो आहे आणि भांडायला आला आहे!" धीरसिंह म्हणाला.

तेव्हां ती स्त्री खदखदां हसली आणि दोघां योद्धयांना बरोबर घेऊन मूर्तीच्या चारही बाजूंना फिरविले. मूर्त चांदीचीच असल्याचा वाद घालणारा धीरसिंह दुसऱ्या बाजूला सोन्याचा रंग पाहून डोळे फाड-फाडून पुन्हां पुन्हां पाहू लागला. मूर्त सोन्याची असल्याचा वाद घालणारा दुसऱ्या बाजूला चांदी पाहून तोंडात मारल्यासारखा गप्प झाला.

दोघे परस्परांकडे निष्कारण भांडल्या-बद्दल चकित होऊन पाहू लागले. तितक्यात ती स्त्री अंतर्धान पावली. दोघे तिला पाहण्यासाठी इकडे तिकडे पहात असतां त्यांना एका बाजूने आवाज ऐकू आला–

"शूर हो! मी शांतिदेवता आहे. तुम्ही दोघे वीर आहां. तुमची दोघांची ध्येयें सुद्धां चांगली आहेत. आतां ही द्वंद्वे आणि युद्धे थांबवा! उगाच पौरुष व्यर्थ खर्च करू नका. शांतपणे पुढील आयुष्य घालवा."

शूरसिंह व धीरसिंह आपापल्या घोड्यां-वरून उतरले, परस्परांना प्रेमाने भेटले. ढाली तलवारी मूर्तीसमोर टाकल्या. त्या दिवसा पासून दोघांनी शेतकीचा धंदा सुरू केला व पुढील आयुष्य शांतपणे आनंदाने घालविले.





# हृदय पालट

ज्यावेळी ब्रह्मदत्त काशीयेथे राज्य करीत होते. त्यावेळेस बोधिसत्वानी त्यांच्या मुलाच्या रूपाने जन्म घेतला. ब्रह्मदत्ताने त्याचे नाव शील असे ठेवले.

काही वर्षानंतर शील काशीचे राजे झाले. ते तेथील प्रजेला पुत्रा समान मानीत होते. गरिबीमुळे किंवा अज्ञानामुळे जर कोणी चोरी सारखी गुन्हेगारी करीत असतील तर त्यांना शिक्षा न करता, द्रव्य सहाय्य करून त्यांची समजून घालून त्यांना पाठवून देत. त्यामुळे राज्यांत गुन्हेगारी फारच कमी होऊ लागली आणि जनतेमध्ये राजा विषयी श्रद्धा, आदर आणि भक्ति वाढू लागली.

काशी राज्याच्या शेजारीच कोशल नांवाचे राज्य होते. कोशल राज्याच्या मंत्र्याच्या मनांत असा विचार आला की तो काशी राज्य सहसासहजी जिंकू शकेल. त्याने आपल्या राजाला सल्ला दिला– "महाराज, काशीचे राजा शील अगदी कमकुवत आहेत. ते चोरांना आणि खुनी लोकांना शिक्षा करताना भितात. अशा भित्र्या राजाला आपण सहज जिंकू शकू."

मंत्र्याच्या खरेपणाची पारख करण्या-साठी कोशल राजाने आपल्या सैनिकांना बोलावून आज्ञा केली." तुम्ही काशी राज्यांत घुसून तेथील काही गावांची लूट करून या!"

कोशल राज्याचे सैनिक काशी राज्यांतील गांव लुटावयास गेले, त्यावेळी तेथील जनतेने त्या शत्रूच्या सैनिकांचा चांगला खरपूस समाचार घेतला आणि त्यांना बंदिस्त करून. शील राजासमोर उभे केले.

शत्रूच्या सैनिकांना पाहून शील राजाने विचारलें–"आमची गांवे लूटण्यामागे आप- , काय हेतु आहे?"



"महाराज, आम्ही आमची भूक-तहान शमविण्याचे हेतूनेच लूट करण्याचे ठरविले. कोशल सैनिकांनी उत्तर दिले.

जर तुम्ही भूके-प्यासे आहात तर मला का सांगितले नाही?" असे म्हणून काशी राजा शील यांनी आपल्या खजिन्यांतून पुष्कळसे द्रव्य मागवून घेवून त्या सैनिकांना देऊन, त्यांना परत पाठवून दिले.

शील राजाच्या ह्या व्यवहारा विषयी कोशल राजाच्या मनात ईर्ष्या उत्पन्न झाली. कोशल राजाने ह्या खेपेस मोठ्या प्रमाणांत काशी राज्यांतील गांवे लुटण्यासाठी सैनिक पाठविले. ज्यावेळी कोशल राज्याचे सैनिक काशी राज्याची सीमा पार करीत होते तेव्हां काशी राज्याच्या जनतेने त्यांना पकडले. ह्या खेपेस शील राजाने पकडलेल्या सैनिकांना शिक्षा न देता द्रव्य देवून परत पाठविले.

ह्यामुळे कोशल राजाला आणखीच चेव आला. ह्याखेपेस कोशल राजा आपल्या सैनिकांबरोबर काशी राज्यावर चाल करून आला. कोशल राजाचे सैन्य चालू करून येत आहे. हे कळतांच, काशी राज्याचे मंत्री आणि सेनापती शील राजाकडे गेले आणि म्हणाले–"महाराज, कोशल राजाला आपल्या सैनिक शक्तीचा प्रताप माहीत नाही असे वाटते कोशल राजा मोठ्या घमेंडीत आपल्या राज्यावर चाल करून आला आहे. त्यांच्याशी दोन हात करण्याची परवानगी द्यावी."

तथापि काशी राजा शीलनी कोशल राज्या विरुद्ध युद्ध करण्यास परवानगी दिली नाही. ते म्हणाले–"उगीचच्या उगीच रक्तपात करण्याची माझी इच्छा नाही. जर त्यांना काशीचे राज्य हवे असेल तर खुशाल घेऊ देत. त्याना प्रवेश करण्यासाठी किल्ल्याचे दरवाजें उघडून ठेवा."

त्यानंतर शील राजाने आपल्या दूता मार्फत कोशल राजाला निरोप पाठविला की–"आपण आमचे शत्रू म्हणून नव्हे, तर मित्र म्हणून अवश्य या."



कोशल राजाला यांत शीलव राजाची कमकुवतता आढळून आली. काशीच्या राजदरबारांत प्रवेश करून आपल्या सैनिकाना हुकूम दिला की राजा शीलव व त्याच्या सैनिकांना कैदी करावे.

राजा शीलव मोठ्या स्नेहभावनेने म्हणाला–"अतिथीबरोबर अशाप्रकारचा व्यवहार करणे हे न्याय्य संगत नाही."

राजा शीलवचे हे वक्तव्य ऐकून कोशल राजा मोठ मोठ्याने हसू लागला. त्यानंतर त्याने आपल्या सैनिकांना सांगून त्यांचे राजोचित चिह्न काढून घेण्यास सांगितले.

राजा शीलव आणि त्यांचे मंत्री काशी नगर सोडून वनांत निघून गेले. कांही वेळाने काळोख पडला. तेव्हां सर्व लोक त्या वनात झाडाखाली झोपले. त्या रात्री त्यांना जेवणखाण सुद्धा मिळाले नाही.



मध्यरात्रीच्या वेळी जेव्हां त्यांची झोप उडाली, कांही चोर हातात मशाल घेऊन त्या ठिकाणी येऊन पोहोचले. त्या लोकांनी राजा शीलवला सांगितले–"महाराज, आम्ही चोर आहोत."

"आज पर्यंत आम्हाला चोऱ्या केल्या शिवाय कपडालत्ता मिळत होता. परंतु आतां आमच्या मागे साडेसाती लागली आहे म्हणून आज रात्री आम्ही सर्व राजमहलांत घुसलो आणि ही सारी धन-संपत्ति लूटून आणली आहे. घ्या, हे आपले राजकीय पोशाख, राजचिह्न आणि ढाल-तलवारी! हे राजभवनातील भोजन! आपण ही वस्त्रे घालावी, जेवण खाण आटोपावे आणि मग आम्हाला हुकूम द्यावा की, आम्ही जी धन-संपत्ति आणली आहे, त्याचे काय करावयाचे?"

राजा शीलव व त्याच्या मंत्र्यांनी कपडे वगैरे घातले. जेवणखाण आटोपले, तेव्हां शीलव राजा चोरांना म्हणाले–"प्रथम मला हे कळूदे की, नवीन राजा तुमच्या समस्या कशा काय सोडविणार आहे? तुम्ही हे सर्व धन घेऊन जाऊन राजाला देऊन टाका आणि विचारा की तो राजा

तुमची उपाजीविका चालविण्यासाठी कोणती व्यवस्था करणार आहे?"

चोर एकदम म्हणाले–"महाराज, आतिथ्य, देणाराला लुटारुंच्या बाबतीत न्यायाचा विचार कधीच येणार नाही! आम्ही त्या नीच माणसाकडे जाणार नाही! आपणच आमचे महाराज अहात!"

जर तुम्ही नवीन राजाकडे गेला नाहींत तर मी स्वत: ही धन संपत्ति घेऊन त्यांच्याकडे जाईन. शीलवने उत्तर दिले.

त्यानंतर आपल्या मंत्र्यांसमवेत राजमहालात पोहोचले. शीलवला पाहून कोशल राजा विस्मयीत झाला.

ह्यावर शीलव राजाने कोशल राजाला सारा वृत्तांत सांगितला–"महाराज, आपण माझ्या पेक्षांही न्यायपूर्वक शासन चालविण्याच्या विचारानेच मला घालवून लावून सिंहासन बळकावलेत ना? भोळ्या भाळ्या चोरांना हे समजले नाही, उलट त्यांनी काल रात्री आपला खजिना लुटला, मी त्यांना आश्वासन दिले आहे की तुम्हाला योग्य न्याय मिळेल आणि तुमच्या उपाजीविकेचा प्रश्न मिटेल; असा विचार करून मी आपली धन संपत्ति आपणांस परत करण्यास आलो आहे."

"हे सर्व ऐकून कोशल राजाचा हृदय पालट झाला. तो सिंहासनावरून उठला आणि शीलव राजाच्या पाया पडून म्हणाला–"महात्मा, चोर लोग सुद्धां आपणावर प्रेम करतात आणि आपण त्याचा आदर करता. आपल्या ह्या महान कार्याची आजच मला मला जाणीव झाली; मी आपल्या दुष्ट आणि नीच मंत्र्यांचा सल्ला ऐकून आपल्याशी द्रोह केला. मला क्षमा करा आणि आपण आपल्या सिंहासनावर बसा! मी फक्त आपल्याबरोबर मित्रता करू इच्छितो."

ह्यावर शीलव राजानी पुन्हा काशी राज्याच्या स्वीकार केला. तेव्हां कोशल राजाचा योग्य त्या प्रकारे अतिथि-सत्कार करून त्यास त्याच्या राज्यांत परत पाठवून दिले.



# गझनी महम्मदाचे हल्ले



सिंध प्रांतात काही वेळ अरबांनी राज्य केले, त्यांना ते काही प्रमाणात फायदेशीरच झाले. त्यांनी धनसंपत्तिबरोबर, भारतीय सभ्यता, वैज्ञानिक ग्रंथ, गणित आणि साहित्याचे ग्रंथ पण आपल्याबरोबर नेले.

भारताच्या फार मोठ्या वैभवाने अरबांना आश्चर्यचकित केले येथील कल्पनाप्रधान साहित्य, नीतिकथा, इतिहास याबाबतीत त्यांना खुप आनंद मिळाला. त्यांच्या मार्फत हे कथा साहित्य काही प्रमाणात युरोपीय देशांत सुद्धां पोहोचले.





खलीफा हरून अल रशीदच्या दरबारांत भारतीय पंडित, ज्योतिषी, आणि जादूगारांचा सन्मान होत होता. अरबच्या विद्वानांनी भारतीय गणित शास्त्र आणि विशेष करून खगोल शास्त्राचा मोठ्या कौतुकाने अभ्यास केला.



हळू हळू सिंध प्रांतात अरबांचा जोर कमी होत गेला. परंतु भारताच्या धन-संपत्ति विषयी ते विसरूं शकले नाहीत. दहाव्या शतकांत गझनी वर राज्य करणाऱ्या महम्मदाने आपण खलीफाचे प्रतिनिधी असल्याची घोषणा केली.

त्याकाळी पश्चिमेस पंजाबांत जयपाल-नावाचा राजा राज्य करीत होता. सुलतान महम्मदाने आपल्या सैनिकांना असे सांगून त्यांच्यात उत्साह भरून दिला की आपला धर्म प्रचार करण्या-साठी स्वारी करीत आहोत आणि त्याने राजा जयपालच्या राज्यावर स्वारी केली.





जयपाल आपल्या सैन्याबरोबर पेशावर जवळ महम्मदशी लढाई करताना हरला. हा अपमान झाल्यामुळे त्याने अग्नित उडी टाकून प्राणार्पण केले. यानंतर त्याचा मुलगा आनंदपाल याने उज्जयिनी, ग्वालियर, कलंजर, आणि कनौज या ठिकाणच्या राजांना आपल्या बरोबर घेतले आणि शत्रू-बरोबर लढण्यासाठी तयार झाले.

महम्मदाने पुन्हा एकदा भारतावर हल्ला केला. आनंदपालने आपल्या मित्र राजांच्या मदतीने साहसपूर्ण महम्मदाबरोबर लढाई केली. ह्या लढाईत अजयपालचा घोडा जखमी झाला व युद्धभूमी मधून पळून जाऊ लागला. त्याच्या मित्र राजांना वाटले की आनंदपाल हारला आणि ते सर्व युद्ध भूमितून परत आले.





अशाप्रकारे विजय मिळविणाऱ्या महम्मदाने राजमहल, शहरे आणि मंदिरे नष्ट करून मोठ्या प्रमाणांत लोकांची हत्या केली. त्याने एकंदर पंधरा वेळा स्वारी करून मुलतान, मथुरा, आणि कनौज नगरांचा सर्वनाश केला व आपल्या बरोबर त्या नगरांतील मौल्यवान धन संपत्ति आणि अन्यवस्तू लुटून नेल्या.

गझनी महम्मदाची लालसा, क्रूरता आणि धार्मिक अंध विश्वास हे कळसास पोहोचले होते. त्याने प्रभास स्थित सोमनाथ मंदिराविषयी ऐकले आणि ते लुटून नेले. त्यावेळी गुजरात मध्ये राज्य करीत असलेले. चालुक्य राजा ह्या पाशवी हल्ल्याला तोंड देऊ शकले नाहीत.





सोमनाथ मंदिराच्या पुजाऱ्यांना महम्मदाला सांगितले की निदान ह्या देवळाचा गाभारा मात्र मोडू तोडू नकोस. परंतु त्याने मोठ्या क्रूरतेने त्याच्यात लपवून ठेवलेल्या संपत्तिचा शोध लावला.

कित्येक वर्षांपासून भक्तांकडून देवास समर्पण केलेल्या अमूल्य वस्तू त्या खोलीत अगदी सुरक्षीत ठेवलेल्या होत्या. त्यांत विशेषकरून सोन्याचे व रत्नजडित दागिने होते. ही एवढी मोठी संपत्ति एके ठिकाणी पाहिल्यावर महम्मद चकित झाला. ही संपत्ति लुटल्यावर त्याने आपल्या शिपायांना सांगितले की हे मंदिर उध्वस्त करून टाका.



महम्मदच्या परतीच्या यात्रेच्या वेळी युद्धप्रेमी जाट लोकांनी त्याच्यावर हमला केला त्याने जी संपत्ति लुटली होती, त्याचा वैभवपूर्वक उपभोग तो घेऊ शकला नाही. थोड्या दिवसांतच तो आजारी पडला आणि ई. सन् १०३० मध्ये मरण पावला. परंतु त्याच्या क्रूरतेमुळे जी जखम झाली, ती भारताच्या इतिहासात कधी भरून

# विसरता न येणारे सत्य

कुडची नावाच्या गावी लक्ष्मणराव नांवाचा एक श्रीमंत माणूस रहात असे. त्याला चार मुलगे होते त्यांची पित्यावर पितृभक्ति होती. परंतु कधी कधी लहान मोठ्या कारणावरुन मतभेद होत व त्याच्यामुळे थोडी भांडण होत असत.

लक्ष्मणराव एकदा बरेच अजारी पडले आपण आता या अजारातून कदाचित वाचणार नाहीं, असे भय लक्ष्मणरावांना वाटू लागले. आपल्या मागे मुलांनी मिळून रहावे, असे लक्ष्मणरावांना सहाजिकच वाटत होते.

त्यांच्या घरासमोरच्या मैदानात पोळ इच्छा येईल तसा भटकत होता. म्हणून लक्ष्मणरावांनी आपल्या मोठ्या मुलाला एक दोरी देऊन त्या पाड्याला बांधून आपल्या घराच्या बाजूला आणून बांधून ठेवायला सांगितले.

मोठ्या मुलाने दोरी नेऊन त्या पाड्याच्या गळ्यात बांधली व त्याला ओढून आणू लागला, परंतु तो पाडा जोराने ओढून दोरी तोडून निसटून पळून गेला. तेव्हां लक्ष्मणरावांनी तिथल्या चार दोऱ्या आणल्या सर्वात धाकट्यामुलाला दाखवीत म्हणाले– "त्याचारही दोऱ्यांची एक दोरी करून त्याला बांधून आण. धाकट्या मुलाने तसेच केले आणि उंबरड्या जवळच्या खुंट्याला आणून बांधले.

नंतर लक्ष्मणराव आपल्या चौघां मुलांना म्हणाले–"पाहिलंत, त्या मस्तवाल पाड्याला जीवनात येणाऱ्या कष्टांचे प्रतीक समजा. संकटांवर मात करायला तुम्ही चौघे एक राहिलात तरच शक्य होईल. निरनिराळे राहिलात तर त्या पाड्यासारखी संकटासमोर मान खाली होईल."

—कमला परमगुरु





# हेवा भोवला

एका राजाच्या बागेत रामू व सोमू नांवाचे दोन माळी होते. एकदां रामू झाडांना पाणी देत होता तेव्हां त्याला पाण्याच्या थारोळयात काहीतरी चमकत असलेले दिसले. त्याने ती वस्तु हातात घेऊन पाहिली. ती एक सोन्याची माळ होती.

रामूने ती माळ रीठयाने घासून पुसून राजाला नेऊन दाखविली. राजाने ती अंत:पुरात राणीला नेऊन राणीला दाखविली तेव्हां कळले की राजकन्येची माळ काही दिवसापूर्वी हरविली होती तीच ती माळ आहे.

राजाने सर्व नोकरांसमोर रामूच्या प्रामाणिकपणाची प्रशंसा केली आणि रामूला शंभर मोहरा इनाम म्हणून दिल्या.

राजाच्या तोंडी रामूची प्रशंसा ऐकून व त्याला सोन्याची माळ मिळालेली पाहून सोमूला वाईट वाटले. तसे पाहिले तर पहिल्या पासूनच त्याचे रामूशी वांकडे होते. त्याला जो पगार मिळत होता. त्यावर त्याच्या कुटुंबाचा उदरनिर्वाह उत्तम प्रकारे चालत असे. तरी तेवढयावर त्याच्या मनाचे समाधान होत नव्हते. म्हणून काही तरी प्रयत्न करून राजाला खूष करून राजदरबारात चांगलीशी नोकरी मिळविण्याच्या खटपटीत तो होता. परंतु कित्येक दिवस संधी पाहूनही त्याला राजाला भेटण्याचा योग आला नाही.

तरी तो आपल्या बायकोजवळ म्हणे की एकदां का महाराजांना भेटण्याचा योग मिळाला तरी पुरे मी महाराजांना खूष करून मोठा ओहोदा पटकावीन. आयुष्यभर जरी माळयाचं काम केलं तरी फायदा नाही. पैसे सांठवता येणार नाही आणि यशप्राप्ती ही नशिबात येणार नाही. आतां राजाच्या तोंडी रामूची प्रशंसा ऐकून त्याच्या मनात निरनिराळ्या विचारांनी काहूर माजविले. त्याने प्रकृती बरी नसल्याचे सांगून एका आठवडयाची रजा काढली. त्याने आठवडाभर विचार करून एक युक्ती योजली.

त्यानंतर त्याने बायकोला खूप समजावून सांगून तिच्या गळयातली सोन्याची माळा मागून घेऊन ती एका झाडाच्या आरळयात पुरून ठेवली. त्यानंतर चार पांच दिवसांनी त्याने ती माळ राजाला नेऊन दाखविली आणि त्याला ती माळ झाडाला पाणी लावीत असतांना बागेत सांपडल्याचे सांगितले.

ती माळ घेऊन राजा अंत:पुरात गेला आणि राणीवर कावला म्हणाला—"तुम्ही सर्व, काही दिवसां पासून पाहतो अगदी बेफिकीर होऊन कामे करतां आहां. नाही तर बागेत असे दागिने कांही पडून राहतील. यापुढे सावध रहात जा. दासीवर कडक नजर ठेवा!"

राणीने ती माळ घेऊन अंत:पुरातल्या सर्व बायकांना व नोकर चाकरांना दाखविली आणि चवकशी केली तेव्हां कळले की ती माळ अंत:पुरातल्या कोणाही व्यक्तीची नव्हती.

ती गोष्ट कळल्यावर राजाला आश्चर्यच वाटले. त्याने दुसऱ्या दिवशी सोनाराला बोलावून माळेचे सोने कसे आहे, हे पारखून पहायला सांगितले. सोनाराने सोने कसून पाहिले व ते खोटे असल्याचे राजाला



श्री न. स. भिगवणकर

सांगितले व म्हणाला–"ही अंत:पुरातल्या कोणाही राजघराण्यातल्या व्यक्तीची असणे शक्यच नाही."

राजा विचारात पडला. राजोद्यानात अंत:पुरातल्या बायकांशिवाय कोणी जाणे शक्य नाही, मग ही माळ आली कोठून? त्याला एक संशय आला की माळ्यानेच काही लबाडी तर केली नसेल?

त्या दिवशी रात्री राजाने एका दोघां शिपायांना वेष पालटून सोमूच्या घराजवळ रहायला सांगितले. मध्यरात्र उलटल्यावर दोघां नवराबायकोंचे काही कारणावरून भांडण झाले.

सोमूची बायको रागाने म्हणत होती– "तुम्हीच मी 'नको नको'.म्हणत असतां ती माळ माझ्या गळ्यातून काढून नेऊन महाराजांना दाखविलीत. राजा इनाम काय व केव्हां देणार ते त्या परमेश्वरालाच माहीत!"

सोमू तिला समजावून सांगत होता– "तू अशी घाई करूं नकोस. महाराज राज्याच्या कोणत्या तरी कामात गर्क आहेत. त्यांना ती माळ अंत:पुरातल्या कोणत्याही व्यक्तीची नसल्याचे कळल्यावर ते ती खजिन्यात पाठवून देतील व मला रामूपेक्षा मोठे इनाम देतील. आपलं नशीब चांगलं असेल तर एखादी चांगली नोकरी सुद्धा मिळेल."

राजाच्या शिपायांनी रात्री जे ऐकले होते, ते सर्व राजाला जाऊन सांगितले. राजाने सोमूला बोलावून विचारले– "कायरे, तुला जी माळ मिळाली ती अंत:-पुरातल्या एका दासीची आहे. मी तिला दाखवितांच तिने खूष होऊन तुला एक इनाम द्यायला दिलं आहे. तू घेऊन जातोस का?"

नंतर राजाने एका शिपायाला ते इनाम आणून द्यायला सांगितले. शिपायाने एक केरसुणी आणून दिली.

सोमू केरसुणी कडे पहातच राहिला. नंतर मानखाली घालून काही एक न बोलतां निघून गेला.



# पोषाखाचा प्रताप

सिंगपूर नावाच्या गावी एकदां चोरांचा सुळसुळाट फारच वाढला. त्यांना पकडायच्या कामात कोतवालाला यश आले नाही. तेव्हां त्याने पोलीस शिपायांना चोरांसारखा डोक्याला फेंटा आणि सुरे हातांत देऊन खऱ्या चोरांना धरायला सांगितले.

त्याच वेळी तिकडे चोरांच्या नायकाने आपल्या अनुयायांना पोलीस शिपायांचा पोशाख घालून पाठविल्यास चोरी करणे सोपे जाईल असा विचार करून त्यांना तो पोशाख घालून जायला सांगितले.

एके दिवशी चोर आणि शिपाई त्यांच्या त्यांच्या बदललेल्या पोशाखात परस्परांना एका जंगलात भेटले. चोरांच्या पोशाखात असलेल्या शिपायांनी शिपायांच्या पोशाखात असलेल्या चोरांना विचारले–"आज कोणी सापडला का?"

त्या प्रश्नाचं उत्तर शिपायांच्या पोशाखात असलेल्या चोरांनी दिले–"कोणीच सापडला नाही. का तुम्हांला कोणी?"

"आम्हांला सुद्धां कोणी सापडला नाही." चोरांच्या पोशाख केलेले शिपाई उत्तरले.

त्यानंतर दोघे आपल्या वाटेने निघून गेले. शिपाई कोतवालाला भेटून म्हणाले–"आज आम्हांला जंगलात काही शिपाईच भेटले हो!"

कोतवाल आश्चर्य चकित होऊन म्हणाला–"तुम्ही आहां मूर्ख, शतमूर्ख! ते खरे शिपाई असते तर चोरांच्या पोशाखात असलेल्या तुम्हांला त्यांनी पकडले नसते का? ते वेष पालटून आलेले चोरच तर होते!"

चोरांचा नायकसुद्धा त्यांच्या अनुचरांनी सांगितले ते ऐकून म्हणाला–"मूर्खांनो! तुम्हांला भेटले होते ते चोरांचा पोशाख करून आलेले शिपाईच तर होते. नाही तर शिपायांच्या वेषात असलेल्या तुम्हांला पाहून ते पळून नसते का गेले? पोशाख बदलले तरी तुम्ही काय किंवा ते काय स्वभावधर्म कोठे बदलेला?"





# पारदर्शी डोळे

भिकाजी पाटलांचा मुलगा सदोबा दोनच वर्षांचा होता, तेव्हां पासूनच छान बोलू लागला होता. एके दिवशी त्याने बापाच्या हातातली डबी पाहिली आणि "पैसे, पैसे" म्हणून ओरडू लागला.

डबीत खरोखरीच पैसे होते. ही गोष्ट सदोबाला कशी कळली हे भिकाजीला कळेना. त्याचवेळी सदोबाची आई, रखुमाबाई सैंपाक घरातून बाहेर आली आणि मुलाला उचलून घेतले.

सदोबाने त्याचवेळी भितीला लागून एक लाकडी पेटी होती तिच्याकडे बोट दाखवून म्हणू लागला—"सांप, सांप!" नवरा बायको घाबरून जाऊन आश्चर्याने पेटीकडे पाहू लागले तर त्यांना पेटीचे झांकण थोडे थोडे हालत असलेले दिसले.

भिकाजीने पेटी रस्त्यावर उपडी नेऊन टाकली आणि काठी घेऊन सज्ज उभा राहिला. जुन्या कपडयातून एक साप बाहेर आला. भिकाजीने त्याला काठीने मारले.

मुलाने डबीत पैसे असल्याचे व पेटीत सांप असल्याचे सांगितले, त्यात काही तरी विशेष असल्यासारखे भिकाजीला वाटले. म्हणून भिकाजीने मुठीत गूळ ठेवून मुलाला विचारले—"सदोबा, मुठीत काय आहे, सांग पाहू!"

सदोबा चटदिशी म्हणाला—"गूळ!"

मुलाला कोणती तरी अद्‌भुत शक्ती उपजतच लाभली असल्यासारखे भिकाजीला वाटले. तेवढयात सदोबा—"म्हैस, म्हैस!" म्हणून ओरडला.

खोलीत म्हैस कोठून येणार भिकाजीने आश्चर्य करीत खोलीच्या बाहेर जाऊन पाहिले. भितीपलीकडे एक म्हैस उभी भिकाजीला दिसली. त्यावरून मुलाच्या डोळयात काहीतरी अद्‌भुत शक्ती असल्याची भिकाजीला खात्री झाली. असे पारदर्शी डोळे उसल्यावर गुप्त धन नक्कीच मिळू शकेल असे नवरा बायकोला साहजिकच वाटले. म्हणून मुलाच्या डोळयात असलेली ही अद्‌भुत शक्ती दुसऱ्या कोणाला कळू नये या गोष्टीची नवरा बायको जास्त काळजी बाळगू लागले. दोघं मुलाला कोठे एकटयाने जाऊ देत नव्हती. त्याच्या डोळयांना पट्टी बांधून समोरची वस्तू आणि भिती पलीकडच्या वस्तू त्याला ओळखायला सांगत व त्याने बरोबर सांगितल्या की त्यांना आनंद वाटे.

असे एक वर्ष गेले. भिकाजी चार चौघांना बोलावून म्हणाला—"मी आपल्या मुलाकरवी एक अद्‌भुत चमत्कार करवून दाखवितो." ती गंमत पहायला आणखी बरेच लोक आले. सदोबाच्या डोळयांवर पट्टी बांधण्यात आली. लोकांच्या मुठींतून, खिशांतून, पगडी पागोटयातून लपवून ठेवलेल्या वस्तू सदोबांनी ओळखल्या.

सदोबाच्या या अद्‌भुत शक्तीची कीर्ती मुखामुखी जवळपासच्या पंचक्रोशीत पसरली सदोबाच्या अद्‌भुत शक्तीचे प्रदर्शन करण्यासाठी भिकाजी काही फी वसूल करू लागला आणि गावोगाव फिरू लागला. अशा तऱ्हेने थोडयाच दिवसात भिकाजी पाटील श्रीमंत झाला.



एक दिवशी रात्री भिकाजी ज्या जागी उतरला होता त्या धर्मशाळेत चोर शिरले आणि सदोबाला उचलून घेऊन गेले. पैशाला हात न लावता चोर सदोबाला उचलून घेऊन गेला. कारण न कळल्यावर सदोबाचे आईवडील फार दुःखी झाले. त्याचवेळी त्यांना राजाकडून निरोप आला.

राजा त्यांचं सांत्वन करीत म्हणाला—"मी तुमच्याविषयी फार पूर्वीच ऐकले. परंतु हे सर्व काही तरी मंत्रतंत्र किंवा हातचलाखी असेल असे मला वाटत होते. तुमच्या मुलात जी अद्‌भुत शक्ती आहे तिचा स्वार्थसिद्धीसाठी उपयोग होईल असा विचार करून चोर त्याला पळवून घेऊन

श्री स. ना. चिकोडीकर

गेले असणार. मी तुमच्या मुलाचा शोध काढतो." त्यानंतर काही दिवसांनी एक व्यापारी काही नोकरांबरोबर जंगलाच्या वाटेने जात होता. वाटेत त्यांना चोरांच्या एका टोळीने अडविले. त्यांचा नायक घोड्यावर बसला होता. त्या घोड्यावर एक मुलगा सुद्धा होता.

चोरांच्या नायकाने व्यापाऱ्याचे नोकर काही पेट्या घेऊन जात होते त्यांच्याकडे बोट दाखवून त्या मुलाला विचारले—"या पेट्यांपैकी पैशांची पेटी कोठली रे?"

मुलाने नोकरांपैकी एकाकडे बोट दाखवून म्हटले—"त्याच्या डोक्यावरच्या पेटीत दागिने आहेत. चोरांच्या नायकाने आज्ञा करतांच त्याच्या अनुयायांनी त्या नोकराच्या डोक्यावरची पेटी काढून घेतली आणि पळू लागले. परंतु ते आपल्या गुप्तस्थानी पोचल्यावर पेटी उघडून पाहतात तर त्या पेटीत त्यांना नकली दागिने मिळाले.

चोरांचा नायक संतापून मुलाकडे पहात म्हणाला—"कायरे सद्या! तुझ्या एवढ्या पारखी पारदर्शी डोळ्यांना खऱ्या सोन्याचे दागिने कोठले व पितळ्याचे नकली कोठले हे कळले नाही वाटतं?"

इतक्यात राजाच्या शिपायांनी चोरांच्या गुप्तस्थानाला गराडा घातला. त्या आधी व्यापाऱ्याच्या वेषात असलेल्या सेनापती शूरवर्माने चोरांना मुकाट्याने शरण यायला दरडावून सांगितले व चोरांच्या नायकाला म्हणाला—"कायरे, रंगा! तू किती जुना चोर आहेस आणि व्यापाऱ्या वेषात असलेल्या सेनापतीला तू ओळखू शकला नाहीस ना? तुझं राहण्याचं गुप्तस्थान कोणतं हे कळावं म्हणून मी इतके दिवस तुला पकडलं नव्हते."

राजाच्या शिपायांना इतक्या मोठ्या संख्येने आलेले पाहून चोरांना शरण येण्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता. सेनापतीने सर्व चोरांच्या मुसक्या बांधवल्या व सदोबाला आपल्या घोड्यावर स्वतःजवळ बसवून घेऊन राजधानीच्या दिशेने निघाला.

राघववर्मा राजा भिकाजी पाटील व त्याच्या बायकोला बोलावून म्हणाला—"माझ्या शिपायांनी तुमच्या मुलाला चोरांच्या हातून सोडवून आणले. राज्यात आणखी काही चोरांच्या टोळ्या आहेत. यापुढे आणखी एखादी चोरांची टोळी तुमच्या मुलाला उचलून नेईल असा प्रयत्न करून पाहतां येण्यासारखा आहे. म्हणून तुमच्या सदोबाच्या रक्षणाची जबाबदारी आम्ही आपल्यावरच घेतो. तुम्ही दर आठवड्यात एकदां येऊन मुलाला भेटा."

भिकाजीला ते मान्य करावे लागले. सदोबा वीस वर्षांचा होईपर्यंत किल्ल्यातच वाढला. राघववर्मा वारल्यावर त्याचा मुलगा शक्तिवर्मा गादीवर आला. शक्तिवर्मा एकदां सदोबाला बोलावून म्हणाला—"तू इतके दिवस राजाश्रयाला राहून विद्याभ्यास व शस्त्रास्त्र विद्या शिकलास. यापुढे जीवनोपार्जनाचा काही मार्ग पाहिला पाहिजे नाही का? काय करावेसे वाटते तुला?'







सदोबा एक क्षणभरच विचार करायला थांबला व म्हणाला–"महाराज, आपली परवानगी असेल तर काही दिवस देशभर भ्रमण करण्याचा विचार आहे!"

शक्तिवर्माने होकार दिला व त्याला वाट खर्चासाठी चार पैसेही दिले. सदोबा देशभ्रमण करीत असतां एका गावी त्याला ताप येऊन तो आजारी पडला. तो जगन्नाथ शास्त्री नांवाच्या वैद्याकडे गेला. तेव्हां वैद्यबुवा पोटदुखीच्या एका आजाऱ्याला तपासत होते.

सदोबा म्हणाला–"वैद्यबुवा, एवढे तपासण्याची गरजच काय हो. मुलाच्या पोटात डाव्या बाजूला एक फोड झाला आहे."

"तुम्ही सदोबाच का?" वैद्याने विचारले.

सदोबाने 'हो' म्हटल्यावर वैद्याने त्याला आग्रह करून आपल्या घरीच ठेवून घेतले आणि एक आठवडाभर प्रेमाने त्याचा औषधोपचार केला. त्या आठवडाभर जे जे रोगी आले त्यांना काय आजार आहे हे ओळखायला सदोबाच वैद्यबुवांना फार सहाय्य झालं.

ताप उतरल्यावर सदोबा राज्याच्या सरहद्दीपर्यंत पोचला होता. तेथे एक अधिकारी धान्याची पोती घेऊन येणाऱ्या गाड्यांतून किती व कोणते धान्य आले होते याची नोंद करीत बसला होता.

सदोबा त्या अधिकाऱ्याला जवळ जाऊन एका गाडीकडे बोट दाखवून म्हणाला– "अहो, त्या गाडीवरच्या पोत्यांत धान्याच्या आत हिरे लपवून ठेवलेले आहेत हो!"

तो अधिकारी थोडा चिडल्यासारखा म्हणाला–"मी चांगलं चाचपून पाहिलं आहे, धान्यच आहे सर्व! धान्यामध्ये हिरे लपविलेले असल्याचे सांगणारा सदोबासारखा तू कोण रे?"

"मीच तर सदोबा!" शांत स्वरात सदोबा म्हणाला.

ते ऐकताच अधिकारी घाबरून गेला आणि त्याने धान्याची सर्व पोती ओतून पाहिली तेव्हां अनेक हिरे धान्यात मिसळलेले सापडले. त्याने सदोबाची माफी मागितली आणि धान्याच्या पोत्यात हिरे चोरून नेण्याच्या प्रयत्नाबद्दल धान्याच्या व्यापाऱ्याला अटक करविली.

सदोबा तेथून निघाले आणि काही दिवसांनी राजधानीस परतले आणि शक्तिवर्मा राजाला भेटायला गेले.

राजाने सदोबांना विचारले–"सदोबा, तुम्ही बरेच दिवस देशाटन केलेत, पुढे कोणते काम करण्याचे ठरविलेत?"

"महाराज, आपल्या राज्याच्या सरहद्दीवर आयात-निर्यात जो माल होतो आहे त्यात बरीच लबाडी चालू आहे. माझ्यासारख्याला ही लबाडी बाहेर काढणे सहजी साधेल. मला ते काम देण्याची कृपा करावी!" सदोबा म्हणाले.

"बरोबर, तुमच्यात ती जी पारदर्शी दृष्टी आहे, त्या योग्यच ती नोकरी ठरेल, यात शंका नाही. त्या कामाबरोबर तुम्ही काम कराल त्या जागी एक दवाखानासुद्धा स्थापन करवितो. तेथल्या वैद्याना, तुम्ही मागे मदत केली होतीत तशी मदत करणे तुम्हांला शक्य होईल. आजारी लोक लौकर बरे होतील." राजा म्हणाला.

सदोबा आश्चर्यचकित होऊन म्हणाले– "महाराज, मी एका वैद्याला अशा तऱ्हेची मदत केली होती, हे आपल्याला कसे काय कळले?"

"सदोबा, तुमच्या पारदर्शी डोळ्यांचं महत्त्व तुमच्या पेक्षा इतरांनाच जास्त कळतं! तुम्ही देशाटनाला निघाले असतां, तुम्हांला कोणी चोर पळवून नऊ नयेत यासाठी मी तुमच्या पाठोपाठ काही हेरांना पाठविलं होतं." राजा शक्तिवर्मा म्हणाला.

काही दिवसांनी राजाने सदोबाला सरहद्दीवरचा प्रमुख म्हणून नेमून तसा हुकूम जारी केला. सदोबांचे त्यांच्या गावाजवळच्याच एका गावच्या मुलीशी लग्न झाले. ते आपल्या आईवडिलांना बरोबर घेऊन सरहद्दीवरच्या आपल्या नोकरीच्या जागी गेले आणि सुखाने राहू लागले.



# सर्वांत हुशार

विदर्भ राजा स्वतःला फार हुशार व चाणाक्ष समजत असे. म्हणून तो दरबारी लोकांना निरर्थक प्रश्न करून निष्कारण त्रास देत असे. तो एकदां दरबाऱ्यांना म्हणाला की जगात सर्वात मोठा बुद्धिमान माणूस कोण हे जो सांगेल त्याला हजार सुवर्णमुद्रा बक्षिस देईन.

कित्येकांनी राजाचेच नाव सांगितले. तेव्हां राजा म्हणाला–"नुसते नाव सांगून भागणार नाही. उदाहरण देऊन सिद्ध करून दाखविलं पाहिजे." तेव्हां विदूषक उठून म्हणाला–"महाराज, लहानपणी माझ्या बाबांनी जो कोणी विचारलेल्या एका प्रश्नाचं बरोबर सांगतो तोच जगात सर्वांत जास्त हुशार असतो असे सांगितलं होते." राजा बरोबर सर्व दरबारी "तो प्रश्न कोणता ?" हे कुतूहलाने विचारू लागले.

"माणसाच्या देहाला मरण अटळ असते, परंतु आत्म्याला नसते. आपण जुने फाटके कपडे टाकून नवे धारण करतो तसा आत्मा नवीन देह धारण करतो. तर मग एक देह सोडून दुसऱ्या देहात प्रवेश करण्यापूर्वी आत्मा किती काळ विश्रांती घेतो ? हा प्रश्न होता माझ्या वडिलांचा." विदूषक म्हणाला.

त्या प्रश्नाचं उत्तर कोणालाच देता आले नाही. तेव्हां राजाने विदूषकालाच त्याचे उत्तर विचारले. विदूषक उदास चेहरा करून म्हणाला–"आमच्या बाबांनी त्या प्रश्नाचे उत्तर फक्त मलाच सांगितले. त्या प्रश्नाचे उत्तर आमच्या वंशातल्या लोकांशिवाय आणखी कोणाला सांगू नये असं बंधन आहे. माझे बाबा आता या जगात नाहीत. मी एकटाच आहे त्या प्रश्नाचे उत्तर माहीत असणारा. म्हणून मीच जगांत सर्वांत बुद्धिमान हे सिद्ध होते."

राजा रागाने म्हणाला–"म्हणजे तुझ्याहून जास्त हुशार माणूस या जगात नाही ?"

"असे काय म्हणतां महाराज ? मी इतका हुशार विदूषक आहे याची पारख आपणच तर करून मला या पदावर नेमलेत. म्हणजे माझ्याहून आपण हुशार आहां हे नाही का सिद्ध होत ?" विदूषक म्हणाला. ते उत्तर ऐकून राजाने विदूषकाच्या हुशारीची प्रशंसा करून त्याला एक हजार वराह इनाम म्हणून दिले.





# गणेश पुराण

कृष्ण म्हणाला ते ऐकून हंसत मृदंगकेसरी म्हणाला–"ओहो, तसं सांगून सुटून जाशील असं वाटलं होय तुला ? ते होणार नाही. तुझं मुरली वादन मोठं की माझं मृदंगवादन मोठं आतांच कळलं पाहिजे !"

कृष्णाने सर्व अंग हादरल्यासारखं सोंग करून मुली वाजवायला म्हणून काढली. मृदंगकेसरीने मृदंग काढला व वाजवू लागला. कृष्णाने यमुना कल्याणी वाजवायला सुरवात केली आणि मृदंगकेसरीला गडबडलेला पाहून एकदम हंसध्वनी रागाचे सूर काढले. मृदंगकेसरी तो राग ऐकून इतका गुंग झाला की मृदंग वाजवायचे सोडून देऊन डोलू लागला. त्याने मृदंग बाजूला सरकवून ठेवला आणि स्वतःला विसरुन नृत्य करुं लागला. कृष्ण हंसध्वनी रागाचे चित्रविचित्र तानांसह स्वर काढीत नादब्रह्मात पोचला असतां विघ्ननाश गणनायकाने मृदंगकेसरीचे रूप टाकून सोंड वर करून आपले मोठे पोट हलवीत तांडवनृत्य प्रारंभिले. मृदंग अदृश्य झाले आणि मूषकाने उड्या मारायला सुरवात केली.

विघ्ननाश गणनायकाला अवडणारा हंसध्वनी राग होता म्हणून त्या रागात स्वतःला विसरुन तो नृत्य करीत होता. तो अगदी दमून गेला आहे, हे पाहून कृष्णाने हंसध्वनी राग एकदम आवरता घेतला आणि गणपती आता खाली पडतो की काय हे पाहून कृष्णाने गणपतीला धरले व म्हणाला–"विघ्ननाशा, पार्वतीनंदना !



तू जमिनीवर पडलास तर तू पुन्हां मुरली गान ऐकू नकोस असे तुझी आई तुला बजावील म्हणून मी भिऊन तुला थांबविले, रागावू नकोस किंवा गैर मानू नकोस बरं का, लंबोदरा!"

विघ्नेश्वर म्हणाला–"कृष्णा, तुझं मुरली गान ऐकायला म्हणून मी असा आलो होतो, आपलं कृष्ण विनायक द्वंद्व खरोखर सुंदरकांडच होतं!

त्यावर कृष्ण म्हणाला–"विघ्नेश्वरा, तुझ्या उंदराने तुझ्या त्या मृदंगाचं दोन्ही बाजूंच कातड कुरतडून खाल्लं की रे!" असं म्हणत हळुवारपणे उंदराच्या पाठीवर हात फिरविला.

विघ्नेश म्हणाला–"कृष्णा, कंसाचा काळ जवळ येऊन ठेवला आहे. धनुर्याग समयी तुला घेऊन यायला तो अक्रूराला पाठवील. तर तू जा. विजयोस्तु!" असा आशीर्वादही गणपतीने दिला.

कृष्ण म्हणाला–"ही सर्व तुझी कृपा आहे, देवा!" असे म्हणत कृष्ण हात जोडून गणपतीसमोर वाकला.

विघ्नेश्वर म्हणाला–"तू अवतार पुरुष आहेस. माझी कृपा नाही, तुझी लीला आहे सर्व! कुब्जा मथुरेला तुझी वाट पाहते आहे, तिच्यावर कृपा कर." असे सांगून गणेश मूषकवाहनावर बसला आणि आकाशात उडाला. बघतां बघतां तो अंतर्धान पावला.

अक्रूर कृष्णबलरामांना रथात घेऊन मथुरेला गेला अष्टवक्रा असलेली कुब्जा सामोरी आली. तिने कृष्णबलरामांच्या पायांना चंदन लावले आणि पायांवर डोके टेकून त्यांना नमस्कार केला. नंतर तिने कृष्णबलरामांच्या गळयात पुष्पमाळा घातल्या. कृष्णाने कुब्जाचे दोन्ही हात धरून तिला उठविले. तिचे कुब्जा रूप नाहीसे झाले व तिला अप्सरेचे रूप आले व ती देवलोकाला गेली.

कंसाने कृष्णाला ठार करण्यासाठी केलेले सर्व प्रयत्न निष्फळ झाले व कृष्णाने



त्याला सिंहासनावरून खाली ओढून त्याचा वध केला.

नंतर कृष्णाने देवकी वसुदेवांना कारागृहातून सोडविले आणि नंतर उग्रसेनाला सुद्धा तुरुंगातून सोडवून त्याला त्याचे सिंहासन परत मिळवून दिले.

कृष्णबलराम मोठे झाले. कृष्णाने अनेक दुष्टांचा वध केला व राक्षसांचा संहार केला. समुद्रात प्रवेश केला आणि दुर्भेद्य अशी द्वारकापुरी स्थापन केली. त्याने बलरामाला राजधानीचा प्रमुख केला व त्याला द्वारकेचा राज्य कारभार सोंपविला.

कृष्णाने रुक्मिणी हरण करून तिच्याशी विवाह केला. सर्व वैभव प्राप्त असूनही कृष्ण नेहमीसारखा गाईंना चरायला घेऊन जाऊ लागला आणि त्यांचे दूध काढून गोपाळकृष्ण हे आपले नाव सार्थक करीत द्वारकेला राहू लागला.

द्वारकानगरीच्या जवळ सत्राजित नावाचा एक प्रमुख नागरिक राजासारखा सर्व ऐश्वर्य उपभोगीत व एक छोटे खानी राज्य स्थापन करून रहात होता. तो सूर्यवंशी म्हणून स्वतःला मिरवीत असे. तो सूर्योपालक होता. सूर्याचे स्मरण करून त्याने तपश्चर्या केली व सूर्याने प्रसन्न होऊन त्याला स्यमंतकमणी नावाचा एक तेजस्वी हिरा दिला. स्यमंतकमण्यातून जी कांती



बाहेर येई तिच्या किरणांतून दररोज सुवर्ण कण्या बाहेर येत. अशा तऱ्हेने त्याने अलोट सोने एकत्र केले.

सत्राजित आपला स्यमंतकमणी थोरा मोठ्यांना बोलावून दाखवी व त्याचं वैशिष्ट वर्णन करून मोठ्या गर्वाने सांगे. त्याने एकदां कृष्णालासुद्धा बोलावून आपला स्यमंतकमणी दाखवायचे ठरविले. त्या प्रमाणे त्याने कृष्णाला बोलाविले ही. परंतु कृष्ण आला नाही. केव्हांतरी येऊन पाहून जाईन असा निरोप पाठविला. घमेंडखोर सत्राजिताला त्याचा राग आला व तो त्याचा द्वेष करू लागला. कृष्णाने अनेक अद्भुत कार्ये करून दाखविल्याचे त्याने



ऐकले होते, परंतु तो त्यांकडे दुर्लक्षच करीत राहिला आणि कृष्णाला यादव-वंशियातला एक प्रमुख यापेक्षा जास्त महत्व त्याने कधी दिले नाही.

सत्राजिताला सत्यभामा नावाची एक असाधारण रुपवती अशी एक मुलगी होती. स्यमंतकमण्याबरोबर सत्यभामेच्या सौंदर्याची कीर्तीसुद्धा सर्वत्र पसरली. जरासंधासारख्या थोर राजाधिराजाच्या मनातसुद्धा सत्यभामेचे पाणिग्रहण करण्याची महत्वाकांक्षा होती. सत्यभामेची विघ्ननाश गणाधिपतीवर फार भक्ती होती. ती प्रत्येक गणेश चतुर्थीला गणपतीची पूजा करी व त्याची कृपा संपादन करून कृष्ण तिच्या अधीन होईल असं काहीतरी वरदान द्यायला प्रार्थना करी. कृष्ण त्यांच्या वाड्यावरून नित्य जाई तेव्हां ती त्याचे ध्यान आकर्षित करण्याचा प्रयत्न करी. परंतु कृष्णाने कधी तिच्याकडे मान वळवूनही पाहिलं नाहीं. म्हणून ती गणपतीचे ध्यान करून त्याला साकडे घाली.

सत्राजितला मुलीच्या मनातील हेतू चांगला कळला असूनही तो त्याला काहीच माहीत नसल्यासारखे दर्शवी. एके दिवशी सत्यभामा गणपतीच्या मूर्तीसमोर गुडघे टेकून बसली असतां तिला पाहून सत्राजित म्हणाला "आपलं कुलदैवत प्रत्यक्ष सूर्यभगवान याची आपल्यावर करुणा असतां असल्या देवांची प्रार्थना आणि नवस कशाला ग मुली?"

सत्यभामा दचकून उभी राहिली व म्हणाली—"असं बोलूं नये बाबा! मनोकामना निश्चितपणे पूर्ण करणारा देव हा एकटा विघ्ननाश गणाधिपतीच आहे!"

"तुझी मनोकामना काय ती तर सांगशील? रुक्मिणीच्या पोळीवरचं तूप ओढायचं आहे होय?" सत्राजिताने विचारले.

"तिच्या पोळीवरचं तूप कशाला ओढू? मी कृष्णाला आपल्या मुठीत ठेवीन!" सत्यभामा म्हणाली.

सत्यभामेचा हट्ट सत्राजितला माहीत नव्हता असे मुळीच नाही. तरी तो वाढावा असंच त्याच्या मनाला वाटलं व तो मनातल्या मनांत हंसत निघून गेला.





दुसऱ्याच दिवशी कृष्ण सत्राजिताकडे आला. कधी न येणाऱ्या कृष्णाची नजर तिच्यावर पडावी म्हणून सत्यभामा नटून-थटून दिवाणखान्यात आली तर पाहते की कृष्ण तेवढ्या निघून गेला होता. सत्राजित स्यमंतकमणी मुठीत घट्ट धरून कृष्णाकडे क्रुद्ध नजरेने पहात उभा होता.

सत्यभामेने बापाला विचारले—"बाबा! असे का उभे आहां? तो आला होता तो मला मागणी घालायला तर आला नव्हता?"

"त्याने तशी मागणी घातली असती तर मी तेवढे मनाला लावून घेतले नसते! पण त्याने काय मागितले माहीत आहे का? त्याने स्यमंतकमणी मागितला. त्याच्या-जवळ असला तर प्रजेच्या हिताची कित्येक कामे तो करू शकेल म्हणे!" सत्राजित म्हणाला.

सत्यभामा थोडी रागावल्यासारखी म्हणाली—"म्हणजे, तुम्हांला माझ्यापेक्षा स्यमंतकमणी मोठा वाटला म्हणावयाचा?" असे म्हणत ती तेथून निघाली. तेव्हां सत्राजित तिला समजाऊन लागला.

"तो स्यमंतकमणी सोनं देतो ते जमा करून ठेवतो असं नाही ना म्हणाला. मग त्याचा तो लोभ कसा होईल बाबा? कृष्णासारख्याने मागितल्यावर तुम्ही देऊन टाकला असतात तर किती बरं झालं असतं बाबा?" सत्यभामा म्हणाली.

सत्राजिताच्या अंगाचा जणू काही भडका उडाला. म्हणाला—"देणार नाही. जिवात जीव असे पर्यंत माझ्या जवळचा तो मणी कोणाला मिळणार नाही. हा मणी माझं सर्वस्व आहे!" सत्राजित संतापून म्हणाला.

सत्यभामा चिडल्यासारखी होऊन म्हणाली—"होय, तर, मणी म्हणजे तुम्हांला एवढा मोठा वाटतो ना! माझ्याहून मोठा! तो मोठा की मी मोठी हे तो कृष्णच सिद्ध करून दाखवील!" असं म्हणत सत्यभामा तितक्याच तोऱ्यात नेथून निघून गेली.



काही दिवसांनी गणेशचतुर्थी आली. सत्यभामेने गणपतीची पूजा केली आणि त्या दिवशी संध्याकाळच्या सुमारास पालखीत बसून द्वारकेला निघाली.

त्या दिवशी मध्याकाळी आकाश मेघाच्छादित होते. काळोख पडू लागला होता. कृष्ण गाईचं दूध काढीत होता. एकाएकी ढगा आडून चंद्र बाहेर आला व कृष्णाला कोर कासंडीतल्या दुधात दिसली. त्या पाठोपाठ तत्क्षणी चंद्र ढगाआड गेला.

गणेशचतुर्थीला आपण चंद्र पाहिला याबद्दल कृष्ण विचारात पडला. तो लगेच पुजेच्या खोलीत गेला. अक्षता गणपतीच्या डोक्यावर वाहिल्या आणि डोळे मिटून, गणपतीला मनातल्या प्रार्थना केली–"देवा मी चंद्राचं फक्त प्रतिबिंबच पाहिले. या उपर तुझी इच्छा!" नंतर दोन मिनिट ध्यानस्थ होऊन उभा राहिला. तो तसा ध्यान करीत उभा असता गणपतीच्या मूर्तीतून निघाल्यासारखा आवाज कृष्णाला ऐकू आला–"कृष्णा, तू चंद्र पहायला म्हणून गेला नव्हतास ना! म्हणून लोकनिंदा झाली तरी परिणामी तुला लाभच होणार आहे, बरं का!"

कृष्णाने डोळे उघडून म्हटले–"देवा, ही सर्व तुझी लीलाच मी मानतो!"

त्याच वेळी रुक्मिणीने पुजेच्या खोलीत पाऊल टाकले व कृष्णाला गणपतीसमोर जप करीत असल्यासारखा पाहून चकित होऊन पहात म्हणाली–"प्रभो! आपण गणपतीजवळ काही मागणं घालतां आहां वाटतं?"

कृष्ण म्हणाला–"रुक्मिणी, याच दिवशी मागं एकदां गणेश चतुर्थीच्या दिवशी मला वाढवणाऱ्या यशोदा मातेला मी म्हटलेले मला आठवलं एवढंच!"

"तेव्हां काय म्हणाला होतां मला ऐकू द्या तरी!" रुक्मिणी म्हणाली.

कृष्ण सांगू लागला–"यशोदा माता दूध काढीत होती व मी तिच्या पाठीवर चढून कासंडीतल्या दुधात चंद्राची कोर पाहिली व आईला ऐटीत सांगितलं. तेव्हां ती मला

रागेभरली व म्हणाली–"बाळारे बाळा! अरे, लोक तुझ्यावर निरनिराळे खोटे आरोप लावतील की रे! मोठा झाल्यावर-ही या लोकनिंदेतून सुटका नाहीरे, बाळा!' मी म्हणालो–"तर मग पाहिलेच पाहिजे की नाही आई!"

"तेव्हां तुमच्यावर कोणता आळ आला होता?" रुक्मिणी ने विचारले.

"मी माती खाल्ली हे माझ्या बलराम दादाने सांगितलेंच होतं!" कृष्ण म्हणाला.

"पुन्हां आतां चंद्राची कोर पाहिली नाहीत ना? बाकी तुम्ही पाहायची म्हटलांत तरी ती दिसणार नाही, म्हणा! छान आभाळ आलं आहे!" असं म्हणत तिला पुढे आणखी काही म्हणावयांच असल्या-सारखं पाहू लागली.

"रुक्मिणी, काय ग, अशी काय पाहते आहेस? तुला काही म्हणायचं आहे का?" कृष्णाने विचारले.

"होय, सत्राजिताच्या घरातला मणी आपल्या घरी आला आहे."

"सत्राजिताच्या घरचा स्यमंतक मणी आपल्या घरात?"

"अहो, तो मणी नाही हो! सत्राजिताच कन्यारत्न! सत्यभामा आली होती! आतांच तर ती निघून गेली." तिला निरोप देऊन मी इकडे आले आणि तुम्ही दिसलात! रुक्मिणी म्हणाली.

कृष्ण मान खाली करून म्हणाला–"अस्सं! आपल्या घरी गणपतीची मूर्ती पाहायला ती आली असेल. पाहिली का तिने?"

रुक्मिणी म्हणाली–"विघ्नेश्वर दर्शना-साठी आली की आपली नजर तिच्यावर पडावी म्हणून आली हे तिचं तिलाच ठाऊक! परंतु तिची फिरती नजर पाहून ती तुमच्याच दर्शनासाठी उतावीळ झाली होती असं मात्र मला भासलं!"

"हे काय विचित्र! कधी तोंडाबाहेर शब्द फुटत नसे त्या रुक्मिणी देवीच्या तोंडी हे गूढार्थ असलेले चातुर्य! मी काय ऐकतो आहे!" कृष्ण म्हणाला.





# गंधर्व राजकुमारी

[ ४ ]

हसनला वाटले की मोठ्या बहिणीने नको म्हणून सांगितले असूनही त्याने त्या विरुद्ध केले, म्हणून ती रागावेल व ओरडेल. परंतु त्याची ताई रागावली नाही. उलट त्याला त्या स्थितीत पाहून तिला त्याची दया आली. ती म्हणाली–"तू घाबरूं नकोस! मी स्वत: तुझे ज्या मुलीवर प्रेम आहे, ती तुला नक्की मिळेल असा प्रयत्न करीन परंतु तू माझ्या मोठ्या बहिणींना तुला हे गुपित कळल्याचे मुळीच कळू देता कामा नये. न उघडायच्या दरवाजा विषयी कोणी विचारले तर तू सांगून टाक की तुला त्या बाबत काहीच माहीत नाही. तुला त्या विचारतील की तू असा अशक्त कसा झालास? तर सांग की त्यांच्या काळजीमुळे तुझी ही स्थिति झाली." त्यानंतर हसनची ताई आपल्या मोठ्या बहिणींना म्हणाली–"बिचाऱ्या हसनने आपली आठवण काढ काढून आपल्या सर्वांच्या काळजीने खाट धरली आहे. म्हणत होता की त्याला त्याच्या आई वडिलांची आठवण होते आणि त्यामुळे त्याला असह्य दु:ख होते.

ते ऐकून राजकन्यांना फार वाईट वाटले व त्या त्याला भेटायला गेल्या आणि त्याच्या सेवा शुश्रूषेला लागल्या. त्याला गोड धोड खायला दिले व त्यांनी त्यांच्या वडिलांच्या देशात जे काही पाहिले त्याचे वर्णन करून सांगू लागल्या.

अशा तऱ्हेने राजकुमारींच्या सेवेशुश्रू-मुळे हसन बरा होऊ लागला.

एकदां सर्व राजकन्या शिकारीला गेल्या होत्या. सर्वांत धाकटी राजकन्या एकटीच हसनच्या सेवेला मागे राहली. थोरल्या



राजकन्या निघून गेल्यावर धाकटी राजकन्या हसनला सरोवराकाठच्या उद्यानात घेऊन गेली व म्हणाली–"हे पहा हसन, या तलवारीच्या बाजूला पहा कसे सुंदर घाट आहेत? तुला ज्या राजकन्या दिसल्या त्यांनी कोठल्या घाटावर स्नान केले?" तेव्हां हसनने तिला ती सिंहासनाची जागा दाखविली.

तेव्हां धाकटी राजकन्या चकित होऊन म्हणाली–"अरे बाबा, तू ज्या राजकन्यांना पाहिले होतेस, त्या गंधर्वांच्या चक्रवर्तींच्या मुली व त्यांच्या मैत्रिणी होत्या. त्या चक्रवर्तींच्या पदरीच आमचे बाबा एक सामंत आहेत. तुझे जिच्यावर मन बसले आहे, ती चक्रवर्तीची सर्वात धाकटी मुलगी आहे! गंधर्वांचा चक्रवर्ती ज्या लोकात राहतो त्या तेथे मानवाला प्रवेश नाही. एवढेच काय इतर गंधर्वांना सुद्धा प्रवेश नसतो. तू गंधर्व चक्रवर्तींच्या ज्या मुलीला पाहिलेस ती दर अमावास्येला आपल्या सखींबरोबर येथे उडत येते आणि स्नान वगैरे आटोपून पुन्हां गंधर्व लोकात निघून जाते. ते पंख तुला मिळू शकले तर तुला ती गंधर्वकन्या प्राप्त होईल. ती तलावात स्नानाला उतरली की तू त्यांच्या पंखांपैकी आपल्या जोगते पंख चोरून घे. त्या तुझ्या विनवण्या करून ते पंख मागू लागतील, तू विरघळून जाऊन देऊन टाकलेस तर आम्ही सर्व आमचे वडील वगैरसुद्धा तुझ्या बरोबर नष्ट होऊ. तू आपले हृदय दगडासारखे करून तिची वेणी पकड व तिला ओढून घेऊन ये, म्हणजे ती तू सांगशील ते करील व तुला शरण येईल."

हसन ते ऐकून आनंदाने नाचू लागला.

दुसऱ्याच दिवशी अमावास्या होती. काळोख पडतांच हसन तलावाच्या काठच्या पायऱ्यांजवळ जाऊन एका जागी लपून बसला. थोड्या वेळाने गंधर्व चक्रवर्तीची मुलगी आपल्या सखींबरोबर उडत उडत आली आणि पक्ष्यांचे पोशाख उतरवून ठेवून पाण्यात उतरली. हसनच्या छातीत धड धड होत होती तरी धाडस करून त्या पोशाखांजवळ गेला आणि आपल्या प्रियतमेचा पोशाख उचलून घेऊन पुन्हां जाऊन लपून बसला.

थोड्या वेळाने चक्रवर्तीची मुलगी तलावातून बाहेर आली. आपला पोशाख सापडला नाही तेव्हां ओरडू लागली. तिचा आवाज ऐकून सर्व सखी धावत आल्या. त्यांना पोशाख अदृश्य झाल्याची गोष्ट कळली. मालकिणीला काही मदत देण्या ऐवजी घाबरून जाऊन त्यांनी आपापला पोशाख धारण केला आणि उडून गेल्या.

त्यानंतर हसन गंधर्व राजकन्येजवळ आला. त्याला पाहून ती सरोवराच्या किनाऱ्यावर पळू लागली. हसनने तिचा पाठलाग केला आणि तिची वेणी धरून तिला फरफटत ओढत नेऊं लागला. ती डोळे मिटून काही बोलल्या शिवाय हसनच्या पाठीमागून चालू लागली. हसन तिला आपल्या खोलीत ओढून घेऊन गेला आणि दार बंद करून बाहेरून कुलूप लावले. नंतर ती बातमी कळवायला तो आपल्या ताईकडे गेला. चक्रवर्तीच्या मुलीला हसनने त्याच्या खोलीत आणून बंद करून ठेवल्याची गोष्ट ऐकून हसनची ताई तिच्याकडे गेली व तिचे पाय धरून म्हणाली–"राजकन्ये, आपण आल्याने आमचं हे घर पवित्र झाले."



काळजीत मुसमुसत एका कोपऱ्यात बसलेली गंधर्व राजकन्या मान वर करून हसनच्या ताईकडे पाहून म्हणाली–"ओहो, समजले! तू आपल्या मालकाच्या मुलीचा अशा तऱ्हेने एका मानवाकडून अपमान करविते आहेस नाही का? पहिल्याने हे सांग, तू एका मानवाला आपल्या घरात पाऊल ठेवायला जागा कशी दिलीस? तुझा हा मूर्खपणा पाहून मी थक्क झाले. तुझ्या मदतीशिवाय हा लपून राहून मला पकडूच शकला नसता."

तेव्हां हसनची ताई म्हणाली–"देवी, हा तरुण युवक कोणी सामान्य माणूस नाही. याची बरोबरी करू शकेल असा



दुसरा माणूस मानव सृष्टीत नाही. याचे जीवन चरित्रच अद्‌भुत आहे. देवाचीच प्रेरणा होती म्हणून त्याचे प्रेम आपल्यावर बसेल तो निर्णय कोणाला बदलता येईल का? प्रेमी नेहमी क्षमेस पात्र असतो. मी खरं सांगते, याने आपल्याला सर्वप्रथम पाहिले तेव्हां पासूनच आपण याचे मन हिरावून नेलेत. तेव्हां पासून तो आपली आठवण काढून आपल्या विरहाने प्राणत्याग करायला तयार झाला. आपल्याबरोबर आणखी नऊ सुंदर तरुण युवती होत्या, परंतु याचे मन हरण केले ते आपणच!"

ते सर्व ऐकून घेतल्यावर गंधर्व राजकन्येला वाटलं की आता त्या मानवाच्या हातून आपली सुटका होणे शक्य नाही. तेव्हां तिने दीर्घ निःश्वास सोडला. त्यानंतर हसनच्या ताईने चक्रवर्तीच्या राजकन्येला उत्तमोत्तम पोशाख घालायला दिला. तिला खायला पंचपक्वान्नं वाढली आणि तिची भीति नाहीशी करण्याचा सर्वप्रकारे प्रयत्न केला. शेवटी चक्रवर्तीची कन्या म्हणाली–"कदाचित् माझ्या नशिबात पित्याचा विरहच लिहिलेला दिसतो आहे! नशिबात असेल त्यातून सुटका मिळणेच शक्य नाही!"

आपल्या चक्रवर्तीच्या मुलीचे मन थोडे स्थिरावल्यावर धाकटी राजकन्या हसन-जवळ जाऊन म्हणाली–"तू आपल्या प्रेयसीचे चित्त आपल्याकडे आकर्षित करण्या-साठी यत्न कर. तू तिच्याशी प्रेमादराने बोल व वाग."

हसन चक्रवर्तीच्या मुलीसमोर उभा राहिला. तेव्हां तिने हसनकडे तिरच्या नजरेने पाहिले व त्याला आपादमस्तक पाहून घेतले. त्याचं सौंदर्य पाहून ती मोहीत झाली. हसन तिला अगदी नम्रपणे म्हणाला–"राजकुमारी, मी तुमच्या गुलामां-सारखाच एक आहे! माझ्या मनात तुमच्यावर बळजबरी करण्याचा विचार नाही. शास्त्रोक्त पद्धतीने तुमच्याशी निकाह करण्याची इच्छा आहे. त्यानंतर आपण माझे जन्मस्थान बगदाद येथे जाऊ. तिथ माझी आई आहे. ती आपल्याला स्वतःच्या मुलीप्रमाणे प्रेमाने वागवील. शास्त्रात तिचा हात धरू शकेल अशी बाई मिळणेच अशक्य! ती आपल्याला नित्य पंचपक्वान्नं करून वाढील!"

चक्रवर्तीच्या मुलीने हसनला कोणते उत्तर दिले असते, सांगणे कठीण आहे, परंतु त्याचवेळी दारावर थाप ऐकू आली. दार उघडण्याची जबाबदारी हसनवर होती. म्हणून त्याने पुढे होऊन दार उघडले. दारात हसनच्या सहाच्या सहा मोठ्या बहिणी उभ्या होत्या. त्या नुकत्याच शिकार करून परतल्या होत्या. हसनच्या प्रकृतीत झालेलाबद्दल त्यांच्या नजरेतून चुकला नाही. हसनने चक्रवर्तीच्या मुली संबंधी काहीच सांगितले नाही आणि बोलल्याशिवाय सहा बहिणींनी आणलेली शिकार खोलीत घेऊन आला. सर्वांत मोठी बहीण म्हणाली–"हसन काय भानगड आहे रे? आज तर तू प्रसन्न दिसतो आहेस? काहीतरी कारणं असल्या-शिवाय का प्रसन्न असशील? ऐकू तर दे, तुझ्या आनंदाचे कारण!" हसन लाजला तितक्यात तेथे धाकटी बहीण आली त्याने तिच्याकडे सूचक नजरेने पाहिले की तिने काय ते कारण सांगावे.

"तसं काही विशेष नाही! आज आपला हसन एक पक्षी धरून घेऊन आला आहे. त्याला माणसाळावयाचे आहे." धाकट्या राजकन्येने स्मित करून उत्तर दिले.

"तर मग, एवढ्याशा कारणासाठी त्याला एवढे लाजायचं कारण काय?" मोठी बहीण म्हणाली.

"त्या पक्ष्याच्या मनांत त्याच्या विषयी कितपत ओढ आहे? हे सांगणं कठीण आहे!" या शब्दांत धाकट्या राजकन्येने आपल्या थोरल्या बहिणींना सारा वृत्तांत सांगून टाकला. तेव्हां लगेच चक्रवर्तीच्या मुलीजवळ गेल्या व तिला नमस्कार केला. त्यांनी तिला हसनशी विवाह करून घेण्यास प्रोत्साहन दिले. त्यानंतर त्यांनी तिचा हात हसनच्या हातात देऊन तिचे पाणि-ग्रहणही करविले. (क्रमशः)





# सोळा आणे प्रेम

**सा**सरी आल्याबरोबर अमलाने सर्व घर एकदां फिरून पाहिले आणि स्वतःच्या भाग्य व ऐश्वर्यावर तिला कमालीचा अभिमान वाटू लागला. घर म्हणजे काय? मोठा चौसोपी वाडा आणि नोकरांचाकरांची गर्दी! हे सर्व पाहून आपण स्वप्न तर पहात नाही ना, असे तिला वाटले.

सुमारे तीन महिन्यापूर्वी एके दिवशी संध्याकाळी ती नदीवरून घागर भरून पाणी घेऊन येत होती. वाटेत एक तरुण युवक तिला भेटला. त्याने दोन एक मिनिटे तिच्याकडे लक्षपूर्वक पाहिले व तिला विचारले–"तू गैर मानू नकोस, माझं नाव सुदर्शन. तुझं नाव काय? घर कोठं आहे तुझं?"

एका अपरिचित माणसाने तिला एकांत जागी प्रश्न विचारला. अर्थातच अमला थोडी गोंधळली. तरी घाईघाईने उत्तर देऊन ती झपाझप पावले टाकीत निघून गेली. त्यानंतर दहा दिवसांनी सुदर्शन आपल्या आईला बरोबर घेऊन अमलाच्या घरी आला. खरी गोष्ट तेव्हां तिला कळली. मागे सुदर्शन तिला नदीवरून येतांना तिच्याशी बोलला होता त्या दिवशी तो त्या गावी आईवडिलांबरोबर एका मुलीला पहायला आला होता. त्या मुलीचे वडील व सुदर्शनचे वडील परस्परांना चांगले ओळखत होते.

ती मुलगी फार सुंदर साडी नेसून आली होती व दागिन्यांनी मढून आली होती. सुदर्शनला ती मुलगी मुळीच आवडली नाही. म्हणून वडिलांना फार राग आला व ते काही बोलल्याशिवाय आपल्या गावी एकटेच निघून गेले. काही उशिरां आपल्या गावी सुदर्शन निघाला तेव्हां त्याला अमला वाटेत भेटली होती.

श्री का. ना. शिरशीकर

अमलाचे उजळलेले भाग्य पाहून तिची सावत्र आई मनातल्या मनात बरीच जळफळली. परंतु शेजारपाजारचे लोक नांवे ठेवतील या भीतीने तिने त्या संबंधाला होकार दिला होता.

अमलाला सासरी आल्याबरोबर तिच्या सासऱ्याला हा संबंध व लग्न मुळीच आवडले नसल्याचे कळले. त्यांना मोठा हुंडा पाहिजे होता असे मुळीच नाही. मुलाने आपल्या मित्राच्या मुलीला नकार द्यावा, हे त्यांना खपले नाही, एवढेच!

ती एकदां नवऱ्याला म्हणाली–"या गावात माझे हितैषी म्हणविणारे एक जण आहेत. त्यांना एकदां भेटावे म्हणते. किती दिवसांपासून माझ्या मनांत राहून गेलेली एक इच्छा आहे."

सुदर्शनने चकित होऊन विचारले–"तुझे हितैषी आणि या गावात? त्यांचं नाव काय?"

"इतके आश्चर्यचकित होण्याचं कारण नाही. त्या हितैष्याची गोष्ट विचाराल तर अशी आहे." असे सांगून अमलाने झालेले सर्ववृत्त सांगितले.

अमला जन्मल्याबरोबरच तिची आई वारली. तिच्या वडिलांनी दुसरं लग्न करून घेतलं. सावत्र आई अमलाला फार छळत असे. तिला दहावं वर्ष सुद्धा लागलं नव्हतं



आणि घरातली सर्व कामें तिलाच करावी लागत. सावत्र आई शाळेत जाऊ देत नसे.

त्याच सुमारास सावत्र आईच्या धाकट्या भावाचे लग्न ठरले. ती दहा दिवस आधीच लग्नासाठी निघून गेली. जातांना तिने घरातल्या सर्व खोल्यांना कुलपें लावून ठेवली. पुढच्या खोलीत एक शेगडी व अमलासाठी एका पिशवीत तांदूळ ठेवून दिले. जातांना म्हणाली :–

"मी दहा दिवसांनी परत येईन. मी तुला सव्वा रुपया देऊन ठेवते. ताक व पालेभाजी दररोज दोन आणे प्रमाणे विकत घेत जा आणि सैंपाक करून राणीसारखी जेवून घेत जा." असे सांगून तिने अमलाच्या



हातात दहा चवल्या ठेवल्या आणि नवरा व मुलांबरोबर निघून गेली.

अमलाचे वडील बायकोच्या हातचे बाहुलें होऊन रहात होते.

अमला दोन्ही वेळांना पुरेल एवढा सैंपाक करून दुपारचं जेवण झाल्यावर खिडकीत बसून रस्त्यावरची गंमत पहात दिवस घालवी. तिला एकटं एकटं वाटे.

एके दिवशी ऐन दुपारी फक्त कमरेच्या धोतरावर एकजण रस्त्यात उभा राहून वाटेने जाणाऱ्या येणाऱ्यांसमोर हात पसरून म्हणत होता—"ग्रहण आहे, म्हणून समुद्र स्नानासाठी आलो आहे. कपडे किनाऱ्यावर ठेवून मी स्नान करीत होतो आणि कोणी तरी घेऊन सर्व कपडे लांबविले. आमच्या गावी जायचं म्हणजे भाड्याच्या गाडीने जाऊन तेथून पडावाने पलीकडे जायचे आहे. त्यासाठी एकूण सोळा आणे पाहिजेत. मदत केलीत तर मी पैसे नोकराच्या हाती लगेच पाठवून देईन."

परंतु कोणीच त्याला मदत केली नाही. प्रत्येक जण मान वळवून पुढे निघून जात होता. ते सर्व ऐकून व पाहून अमलाला त्याची फार दया आली. ती उंबरठ्यापर्यंत गेली व त्याला बोलावून, तो जवळ आल्यावर म्हणाली—"तुम्हांला सोळा आणे हवे आहेत. कळलं, पण तुम्ही जेवलात का?"

"पहिल्याने मला आपल्या गावी गेलं पाहिजे, मुली! तुझं नाव काय?" त्याने विचारले.

अमला आपले नाव सांगून म्हणाली—"मी देते सोळा आणे, पहिल्याने जेवून घ्या!" आणि तिने रात्रीसाठी म्हणून जो भात ठेवला होता, त्याबरोबर ताक वाढून त्याला जेवायला बसविले.

त्यांनी जेवून घेतले. जेवतांना त्यांनी निरनिराळ्या गोष्टी सांगून अमलाला खूप हंसविले.

"होय, पण, काहो, तुम्ही आपल्या गावाचं नांव सांगितले नाहीत." अमला म्हणाली.



"तुझंच गाव ग, अमलापुर!" असे सांगून ते खूप हंसले.

त्याने अंगावर काही तरी टाकावे म्हणून अमलाने आपला पांढरा दुपट्टा त्यांना दिला. काही आढेवेढे न घेतां त्याने फाटका दुपट्टा अंग झांकून राहील अशा तऱ्हेने तो अंगावर घेतला व म्हणाला—"तुला याच्या बरोबरच मी आपल्या गावाहून रेशमी दुपट्टा पाठवून देईन बरं का!"

अमलाने दिलेले सोळा आणे घेताना त्याचे हाथ थरथर कापत होते, डोळ्यांत अश्रू आले होते.

"मुली, कधी तुला आमच्या गावी यावं लागलं तर आमच्या घरी अवश्य ये. मी सांगतो त्याचा अर्थ तुला कळेल की नाही, मला माहीत नाही, परंतु एवढं खरं की संकट समयी जे मदतीचा हात पुढे करतात तेच खरे मित्र होत! तू एखादा लहान कागद दिलास तर मी माझे नाव व पत्ता लिहून देतो." असे सांगून अमलाने दिलेल्या कागदावर त्याने आपलं नांव, गावाचं नाव वगैरे लिहून दिलं आणि निघून गेला.

अमलाला लिहितां वाचतां येत नव्हतं. तिने, त्याने दिलेला कागद कपड्यात खाली जपून ठेवला. दोन दिवसांनी एका माणसाने रेशमी दुपट्टा आणि शंभर रुपये आणून दिले व म्हणाला—"तू अमलापूर येशील तेव्हां त्यांच्या घरी अवश्य यायला मालकांनी सांगायला सांगितले आहे."



त्या शंभर रुपयातले बारा आणे खर्च होताच अमलाची सावत्र आई आली. तिला सर्व कळल्यावर तिने अमलाकडून उरलेले पैसे घेतले. हे घडल्यानंतर दोनच महिन्यांनी अमलाचे वडील एकाएकी आजारी पडले आणि त्यातच त्यांना देवाज्ञा झाली. सावत्र आईचे माहेर दूर एका लहान खेडयांत होते. निरुपाय होऊन अमला सावत्र आईच्या बरोबर त्या गावी निघून गेली.

हे सर्व नवऱ्याला सांगून अमला म्हणाली–"लग्न ठरण्याच्या आधी तुमचं गाव अमलापुर आहे हे कळल्यावर मला अपार आनंद झाला. पितृप्रेम कसं असते हे त्या थोर मनाच्या व्यक्तीकडून मला कळले."

"बरं सर्व ठीक, परंतु त्यांचं नाव व गाव कळायला हवं ना! तुला लिहिता वाचता येत नाही, यामुळे किती त्रास होतो कळलं ना? त्या व्यक्तीने दिलेला कागद आण पाहूं!" सुदर्शन म्हणाला.

अमलाने रेशमी दुपट्ट्यात जपून ठेवलेला कागदाचा तुकडा आणून दिला. सुदर्शन तो वाचून हंसत म्हणाला–"तुझा तो लहान पणचा मित्र दुसरा तिसरा कोणी नसून माझेच बाबा आहेत!"

अमला आश्चर्यचकित होऊन नवऱ्याकडे पहात राहली. वयाबरोबर चेहऱ्यात बदल झाला व केसही पिकले होते म्हणून ती आपल्या लहानपणच्या मित्राला ओळखू शकली नाही.

सुदर्शनने वडिलांना बोलावून त्यांना तो कागद दाखविला व विचारले–"हिला ओळखलेत का, बाबा?"

वडिलांनी त्या कागदाकडे पुन्हापुन्हां पाहून विचारले–"म्हणजे, मला त्या दिवशी मदत करणारी अमला ती तूच का?" असे म्हणत असतां त्यांचे डोळे पाणावले व त्यांनी ते आपल्या उपरण्याने पुसले.

सुदर्शन म्हणाला–"तुमच्या प्रेमाचं बंधन बळकट होतं, बाबा! बारा वर्षांनंतर पुन्हां तुम्हां दोघांची भेट झाली.

"होय, बाबा! आमचं प्रेम सोळा आणे खरं निघालं!" सुदर्शनचे बाबा म्हणाले






[४]

[राजा मंदरदेव याचा किल्ला कुंडलिनी द्वीपाच्या सैनिकांच्या हातात गेला तेव्हां त्याने चार सैनिकांसह नावेत बसून समुद्रावर पळ काढला. त्यान वेळी नावांत व जहाजात बसून आलेल्या काही लोकांशी त्यांचे युद्ध झाले. परंतु त्या लोकांत शिवदत्त होता. मंदरदेवाने त्याच्याजवळ कुंडलिनी राज्याविषयी चवकशी केली पुढे–]

शिवदत्त म्हणाला ते ऐकून मंदरदेवाला आश्चर्यच वाटले. त्याला हे कळेना की इतक्या अनुभवी व साहसी समरसेनाच्या हातुन व्यवस्थेच्या कामात चूक कशी काय झाली? समरसेन दूरदूरच्या बेटातून जे अलोट धन घेऊन आला होता त्यामुळे कुंडलिनी द्वीपाच्या रहिवाशांना फायदा मिळण्याऐवजी नुकसानच झाले की काय असे त्याला वाटले

तो शिवदत्ताला म्हणाला–"मला वाटत होते की समरसेन मांत्रिक द्वीपातून जे अलोट धन घेऊन आला त्याचा त्या बेटावरच्या लोकांना फायदाच मिळाला असावा. तसे झाले नाही का?"

ते ऐकून शिवदत्त मोठ्याने हसला व म्हणाला–"ते अलोट धनच कुंडलिनी द्वीपावर अराजकता स्थापन करण्यास कारणीभूत झाले आहे. आम्ही ते अलोट



धन व ऐश्वर्य घेऊन कुंडलिनी द्वीपावर पोंचलों तेव्हां राजा चित्रसेन व द्वीपावरच्या प्रजेने आमचे अत्यंत उत्साहाने स्वागत केले. त्यानंतर सुमारे एक महिनाभर राजधानीत विजयोत्सव होत राहिला. राजा चित्रसेनने प्रजेवर जे थोडेफार नवीन कर लावले होते ते त्याने रद्द केले. सरकारी नोकरवर्गाचे पगार बेसुमार वाढविण्यात आले. त्यामुळे खर्च वाढला."

मंदरदेव म्हणाला–"म्हणजे कुंडलिनी राज्यातल्या प्रत्येक व्यक्तीला सुख व ऐश्वर्य उपभोगायला संधी मिळाली, होय ना?"

"महाराज, मी सर्व काही सांगतो, आपण लक्षपूर्वक ऐकावं!" असे सांगून शिवदत्त पुढे सांगू लागला–"राज्याचा खजिना सोन्या चांदीने भरल्यावर राजा चित्रसेनचे लक्ष राज्यकारभारात तितकेसे राहिले नाही. समरसेनालासुद्धा वाटले की राज्यासाठी मी एवढे धन घेऊन आलो असतां प्रजेला कोणत्याही गोष्टीची काळजी किंवा कष्ट असण्याचे कारण राहायला जागा नाही.

"राज्यातल्या सरकारी नोकरवर्गाचे पगार वाढल्यावर सर्वजण ऐशआरामात पूर्णपणे बुडून गेले. शेतकऱ्यांना कर माफ झाल्याचा आनंद झाला. शेतकरीवर्ग सुखा-समाधानाने राहू लागला. शेतांत पिके निघण्याचे काम बंद पडले. स्वतःच्या कुटुंबापुरते पीक काढून बाकी जमिनी शेतकऱ्यांनी पडीत जमीन म्हणून सोडून दिल्या. म्हणून राज्यात अन्नपुरवठा पुरेसा होईनासे झाले.

"या सर्व कारणांमुळे राजधानीत व राज्यातल्या इतर सर्व शहरात खाद्यान्नांचा तुटवडा भासू लागला. शहरातले लोक खेडेगावात जाऊन भरमसाट किमती देऊन खाद्यान्ने खरेदी करून घेऊन जाऊ लागले. म्हणून खाद्यान्नाच्या किमती वाढतच गेल्या. भाजीपाला मिळेनासा झाला.

"परिणामी राज्यभर अराजकता पसरू लागली. शहरातल्या गोरगरिबांना वाढत्या किमती देणे शक्य नव्हते, म्हणून ते टोळ्या करून खेडेगावांवर धाडी घालू लागले व राज्यात लूटमार सुरू झाली. शेतकरी-वर्गाने स्वरक्षणासाठी शास्त्रास्त्रे विकत घेऊन शहरातून येणाऱ्या धाडींना तोंड द्यायला सुरवात केली. बंडखोरवृत्ती वाढली व सर्वत्र अशांतता पसरली.

"वैभव व भोगविलासात बुडून गेलेल्या चित्रसेन राजाला राज्यात चालू असलेल्या या अराजकतेची कल्पनाच नव्हती. खरे बोलायचे तर राजालाच काय तर आम्हां अधिकाऱ्यांनासुद्धां या बंडाळीची कल्पना नव्हती. देशाच्या कोणत्या कोपऱ्यात काय घडत आहे, हे राजाला किंवा आम्हां अधिकाऱ्यांना माहीत नव्हते. खजिन्यातले धन पाण्यासारखे खर्च होत होते. तरी पैशाची गरज असणाऱ्यांची संख्या नित्य वाढत होती. कारण सर्व गरजेच्या वस्तूंच्या किमती तिप्पट चौपट वाढल्या होत्या. म्हणून लोकांजवळ पुष्कळ पैसा असूनही तो वाढलेल्या किमतीसमोर अपुरा पडत होता.

"तिकडे राजा चित्रसेन आपल्या करमणुकी खातर दररोज जे कार्यक्रम ठेवी ते देखील विचित्रच असत. मी आज त्या कार्यक्रमांविषयी विचार करू लागलो तर मला ते मनोरंजनाचे कार्यक्रम मानण्याचीही लाज वाटते आहे. परंतु तेव्हां ते कार्यक्रम पाहण्यासाठी सहस्रावधी लोक दूरदूरच्या प्रदेशातून येत असत.



"त्या मनोरंजनाच्या किंवा करमणुकीच्या कार्यक्रमांची कथा ऐका. जंगलातून धरून आणलेल्या क्रूर प्राण्यांना एका बंद मैदानात सोडण्यात येई आणि त्या जनावरांना तलवार किंवा इतर शस्त्रांनी ठार करणाऱ्या व्यक्तीला त्या मेलेल्या जनावरांच्या वजनाचे सोने बक्षिस देण्यात येई. धनलोभाने कित्येक धाडसी तरुण सिंहवाघांशी झुंजायला पुढे येत आणि त्यातले अनेक जागच्या जागी क्रूर जनावरांच्या आहारी पडत. तुम्हीच विचार करा, ही काय करमणूक म्हणावयाची ?

"हळूहळू हे कार्यक्रम जास्तजास्त भयंकर आणि रानटी होऊ लागले. कधी कधी हत्ती व सिंहाचे युद्ध यासारखे कार्यक्रमही होत. कधी कधी याहूनही भयंकर कार्यक्रम होत. मी समरसेनाजवळ पुष्कळदां या कार्यक्रमांविरुद्ध बोललोही. परंतु तो त्यांकडे दुर्लक्ष करी आणि मांत्रिक द्वीपावरच्या नरवाहन मिश्रच्या बोलण्यावर ज्यास्त विश्वास करी.

"समरसेन मला म्हणे–"खजिन्यात धनाचा तोटा नाही. महाराज वृद्ध होत चालले आहेत. प्रजेला साहसी व पराक्रमी करण्याची जबाबदारी आपल्यावर आहे. तेव्हां ती जबाबदारी अंशतः पार पाडण्यासाठी आणि राजाच्या व प्रजेच्या



करमणुकीसाठी असे कार्यक्रम ठेवण्यात काय चूक आहे?

"राजा व नोकरवर्ग अशा तऱ्हेने ऐशआरामात व भोगविलासात मग्न असतां खेडेगावातून निराळाच प्रकार पहायला मिळू लागला होता. खेडेगावातून जो कोणी थोडा अडदांड आणि बोलघेवडा निघे तो त्या गावाच्या राजासारखा गावात अधिकार गाजवी. काही लोक टोळया टोळयांनी जाऊन शेजारच्या खेडेगावातून लूटमार करीत. अशा तऱ्हेने एका राज्यात अनेक लहान मोठे राजे व संस्थानिक निर्माण झाले. प्रजेशी कोणत्याही प्रकारचा संबंध न उरल्यामुळे राजा चित्रसेन व त्याचे




अधिकारी यांना खेडोपाडी माजलेल्या या अराजकतेची माहितीच नव्हती. मी थोडी फार माहिती मिळविली, परंतु माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवणारी व्यक्ती मला एकही आढळली नाही.

"राज्यातला व्यापार व्यवसाय व शेतीभाती पूर्णपणे नष्टप्राय झाली. काही लोक बंडाळी करू लागले. गावोगावी लुटालूट सुरू झाली. काही काळ लोटल्यावर अशी परिस्थिती निर्माण झाली की राजा चित्रसेन याचा राज्यकारभार राजवाड्यापुरताच उरला. राज्यात राजाची पर्वा करणारा कोणी उरलाच नाही.

"एके दिवशी संध्याकाळी राजा चित्रसेन करमणुकीच्या कार्यक्रमात मग्न असतां एका दूताने येऊन राजाच्या हातात एक चिट्ठी दिली. राजाने ती चिट्ठी समरसेनाच्या हातात दिली. ती चिट्ठी वाचून तो चकित झाला. त्याचा चेहरा काळजीने घाबरल्यासारखा झाला. तो राजाला म्हणाला—"महाराज, आपण हा करमणुकीचा कार्यक्रम तत्काळ बंद करून मंत्रणेसाठी राजवाड्यात चलावे. तेथे राज्यकारभारासंबंधी महत्वाची बोलणी करणे आवश्यक आहे."

"राजा अनिच्छेने माझ्याकडे व समरसेनाकडे पहात तेथून निघाला. मी त्यांची अनुज्ञा घेऊन निघणार होतो, परंतु समरसेन मला थांबवून म्हणाला—"शिवदत्त, काही महत्वाच्या गोष्टीविषयी सल्लामसलत करणे जरूरीचे आहे, तूसुद्धां आमच्या बरोबर ये!"

"त्यानंतर आम्ही तिघे एका गुप्त मंत्रणागृहात गेलो. समरसेन दूताने आणून दिलेली चिट्ठी आम्हांला वाचून दाखवून म्हणाला—"आज पर्यंत आपण डोळे असून आंधळ्यांसारखे वागलो. आपल्या नजरेआड या कुंडलिनी द्वीपात कित्येक सस्थानिक उत्पन्न झाले आहेत. त्यांच्यापैकी कांहींनी आपल्याकडे ही चिट्ठी पाठविली आहे. ते आपल्या महाराजांना काढून टाकण्याच्या



विचारात आहेत. त्यांच्या चिट्ठीतला सारांश असा की किल्ला त्यांच्या हाती देऊन आपण सर्वांनी त्यांना निमूटपणे शरण जावे!"

"तेव्हां कोठे महाराजांच्या डोक्यातली धुंद उतरली. त्यांनी भयभीत नजरेने झोपेतून जागे झाल्यासारखे समरसेनाकडे पाहिले आणि म्हणाले—"समरसेन, राज्यकारभार विस्कळित झाला आहे व आतां सत्ता हातातून निसटणार की काय असे वाटते आहे. या घमेंडखोरांची चामडी लोळवली पाहिजे. इतरांना धडा मिळावा यासाठी बंडखोरांची मुंडकी उडवून त्यांना झाडाला टांगून ठेवले पाहिजे. तुला नाही वाटत की बंडखोरांचं शिरकाण झालं पाहिजे?"

"ठीक आहे महाराज, आपली आज्ञा!" असे म्हणत समरसेन बाहेर निघाला. त्याच्या पाठोपाठ मी मुकाट्याने निघालो. थोडे अंतर चालून गेल्यावर समरसेन थांबला व म्हणाला—"शिवदत्त, ती चिट्ठी तू वाचली आहेस, तुला काय वाटतं?".

समरसेनाच्या तोंडी एकाएकी तो प्रश्न ऐकून मी देखील चकित झालो. मला फक्त ऐवढेच माहीत होते की देशात अराजक पसरले आहे आणि आडदांड आडमुठे गुंड आपसात मारामाऱ्या करून



प्रजेला लुटीत आहेत. परंतु जेव्हां स्वतः महाराजांविरुद्धच लोक उलटलेले ऐकले तेव्हां मी चकितच झालो. मला काय करावे, सुचेना. परंतु एवढी मात्र माझी नक्की खात्री होती की राज्यातली परिस्थिती जेवढी माझ्या परिचयाची आहे, तेवढी समरसेनाच्या परिचयाची नक्कीच नाही.

"म्हणून मी समरसेनाला म्हणालो—"मला असे वाटते की शत्रू आपल्याला वाटते आहे तेवढा अशक्त किंवा दुर्बळ नाही. तसे नसते तर आपल्याला असे उघड पत्र पाठविण्याची हिंमत त्याला झाली नसती. दुर्बळ शत्रूने आपल्याला असावध

पाहून आपल्यावर छापेमारांसारखा अचानक हल्ला केला असता. तेव्हां थोडा खोलपणे सर्व गोष्टींचा विचार करूनच पुढील पाऊल टाकणे जास्त शहाणपणाचे होईल.

"समरसेन क्षण भर विचार करीत मौन राहिला. नंतर होकारार्थी मान हलवीत म्हणाला—"शिवदत्त, तू म्हणतोस त्यात सत्याचा अंश बराच आहे. तरी निराश होण्याचे कारण नाही. कारण आपल्याजवळ प्रशिक्षित सैन्य आहे. अनुभवी विश्वासपात्र व कर्तबगार सेनापती आहे. म्हणून या बंडखोरांना चिरडून टाकणे तेवढे कठीण नाही."

"मला समरसेनाच्या बोलण्याच्या धाटणी-वरून त्यांच्या मते विश्वासपात्र सेनापती कोण हे कळायला वेळ लागला नाही. समरसेनाबरोबर तळहातावर प्राण घेऊन सर्वस्व पणाला लावणारे जे मोजके व शूर सैनिक होते त्यांत नरवाहन मिश्र हा एक होता.

"म्हणून त्याला टाळण्याच्या हेतूने मी सुचविले—"तर मग शक्य होईल तितक्या लवकर बंडखोरांचा काटा काढला पाहिजे. आपण सैन्याला सज्ज करण्याची व्यवस्था करावी. आपल्या नेतृत्वाखाली कितीही कठीण प्रसंग असला तरी त्यात यशस्वी होणे शक्य आहे.

"समरसेन माझ्याकडे आश्चर्य चकित नजरेने पहात म्हणाला—"या लहानशा कामासाठी मी किंवा तू नेतृत्व हाती घेणे हास्यास्पद होईल. मी विश्वासपात्र नर-वाहन मिश्रावर या कामाची जबाबदारी टाकावी म्हणतो.

"मी नरवाहन मिश्र विषयी पूर्वी अनेक गोष्टी ऐकल्या होत्या. मला त्याची वागणूक पाहून शंका येत होती. परंतु ती गोष्ट त्यावेळी समरसेनाला कळविणे मला इष्ट वाटले नाही. त्याचबरोबर त्या प्रसंगी नरवाहन मिश्राच्या हाती सेनापतित्व देणे मला योग्य वाटले नाही. तरमग ते कोडे कसे उलगडावयाचे?" (क्रमशः)




# करमणुकीच्या कला

**वि**क्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, विद्वानांचं असं मत आहे की पाण्याच्या प्रवाहाची दिशा आणि राजाची चित्तवृत्ती सांगणे अशक्य आहे. दीर्घकाळ प्रामाणिकपणाने ज्या प्रधानाने राजा चतुरसेन याची सेवा केली होती त्याला सुद्धा राजाच्या मनात काय आहे हे कधी कळले नाही. मी त्या चतुरसेन राजाची कथा सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

गिरिकूट राज्याचा अधिपती चतुरसेन याच्या मंत्रिमंडळाचा प्रधान लोकनाथ नावाचा एक वृद्ध होता. त्याच्या बायकोच्या नातेवाइकांपैकी दोघे तरुण राजदरबारात

वेताळाच्या गोष्टी



नोकरी मिळावी या प्रयत्नात होते. लोकनाथची बायको आपल्या नवऱ्याच्या पाठीस लागली की त्याने त्या दोघां तरुणांना दरबारात नोकरी द्यावी.

लोकनाथानेसुद्धा त्यांना नोकरी देण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. त्याच्या बायकोच्या त्या दोघां नातेवाइकांपैकी एकजण एक मोठा कवी होता व दुसरा ज्योतिषी होता. त्या दोघांची शिफारस प्रधानाने या शब्दात केली—"महाराज, आपल्या दरबारात प्रतिभावान कवी व ज्योतिष्यांना ठेवले तर दरबाराची नक्कीच शोभा वाढेल."

परंतु राजा म्हणाला—"तूर्त आपला देश गरीब आहे. जोंपर्यंत प्रजा सुखी होत नाही तोंपर्यंत विविध कलांना प्रोत्साहन देण्याची इच्छा माझ्या मनात येत नाही."

म्हणून लोकनाथने दुसऱ्या एका मंत्र्याचा सल्ला घेतला. त्या मंत्र्याने लोकनाथला असा सल्ला दिला—"राजाची चित्तवृत्ती मोठी विचित्र असते. आपल्या नातेवाइकांना तुम्ही सुचवा की संधी पाहून त्यांनी महाराजांसमोर आपल्या कलेचे प्रदर्शन करावे. त्यांची कला पाहून महाराजांच्या मनावर नक्कीच अनुकूल परिणाम होईल."

लोकनाथाला ती सूचना आवडली. त्या दिवसापासून तो योग्य संधीची वाट पाहू लागला. एके दिवशी राजाने वेष पालटून लोकनाथाबरोबर जाऊन एका शहराची पाहाणी करण्याचे ठरविले. ही गोष्ट लोकनाथाला पूर्वीच कळली होती. म्हणून त्याने आपल्या बायकोच्या दोघां नातेवाइकांना बोलावून कळवून त्या शहरात राजाला वेष पालटून हिंडत असतां भेटून आपल्या विशिष्ट कलांचे प्रदर्शन करण्यास सुचविले.

परंतु ठरल्या दिवशी निघताना राजाने दुसऱ्याच शहरात जाण्याचे ठरविले. लोकनाथाने घाबऱ्या स्वरात विचारले—"महाराज! आपण पूर्वी दुसऱ्याच एका शहरात जायचे ठरविले होते नाही का?" तेव्हां राजा स्मित करून म्हणाला—"अगदी शेवटच्या घटकेपर्यंत मी काय करणार आहे, हे कोणाला कळतां कामा नये असा मी नियम घालून घेतला आहे."

लोकनाथाने शहर बदलल्याची बातमी एका विश्वासपात्र माणसाबरोबर कळविली. तोंपर्यंत त्याच्या बायकोचे दोघे नातेवाईक घरून निघाले होते.

लोकनाथ उदास मनाने राजाबरोबर निघाला. दोघे त्या शहरात पोचल्यावर एका गरीब ब्राह्मणाच्या घरी उतरले. राजाने त्या ब्राह्मणा बरोबर बोलताना त्याच्याकडून त्या गावातील सरकारी कामकाजाविषयी सर्व माहिती काढून घेतली. दिवसभर शहराच्या मोठ्या रस्त्यांतून व गल्ली बोळातून हिंडत राहून राजाने व लोकनाथाने प्रजेच्या मनात राजाविषयी कसे विचार आहेत याची माहिती काढून घेतली. एकदां दोघे ब्राह्मणाच्या घरी परतले तेव्हां तो ब्राह्मण कोणाचा तरी हात पाहून त्याला भविष्य सांगत होता.

राजाने चकित होऊन त्या ब्राह्मणाला विचारले—"हे सर्व काय चालले आहे?"

ब्राह्मण म्हणाला—"मी हस्तमुद्रा पाहून भूत, भविष्य वा वर्तमान सांगतो."

"मग माझं भूत भविष्य सांगता का?" असे विचारीत राजाने तळहात पुढे केला.

ब्राह्मण राजाच्या हस्तरेषा पाहून म्हणाला—"आपण भाग्यवान आहात, तरी



आपल्या मनात राजा होण्याची तीव्र इच्छा आहे. परंतु आपल्याला कधी राज्य पद मिळणार नाही. म्हणून नशिबात आहे त्यावर मनाचे समाधान करून घ्यावे."

राजाने ब्राह्मणाची प्रशंसा करून पुन्हा विचारले—"माझे भूत वर्तमान जरा विस्तार पूर्वक सांगतां का?"

हस्त सामुद्रिक जाणणाऱ्या ब्राह्मणाने राजाच्या आयुष्यातल्या अनेक चुकीच्या घटना सांगितल्या. तरी राजाने त्याला अनेक प्रश्न विचारून आपले भविष्य वर्तमान विचारून घेतले. शेवटी राजाने त्या ब्राह्मणाला विचारले—"तुम्ही ही विशिष्ट विद्या कशी शिकून घेतलीत?"



तो ब्राह्मण म्हणाला–"हे पहा, मी आहे कवी. परंतु मी आपल्या पूर्वजांनी ठेवलेले ग्रंथ पहात असतां माझी नजर 'हस्तरेखा' नावाच्या ग्रंथावर पडली. त्या दिवसापासून मी भविष्य वर्तविण्याचे काम सुरू केले."

"असं, तर मग तुम्ही कवी सुद्धां आहां तर. ऐकू तरी द्या तुमची एखादी कविता!" राजा म्हणाला.

ब्राह्मणाने स्वतः रचलेल्या काही कविता म्हणून दाखविल्या. साहित्यात गमन नसलेल्या लोकनाथालासुद्धा त्यात कांही घोड चुका दिसल्या. परंतु राजाने त्या ब्राह्मणाच्या काव्यकलेची स्तुती केली. फुरसतीच्या वेळी दोघे ब्राह्मणाच्या तोंडी त्याच्या कविता ऐकत. निघतेवेळी राजाने त्या ब्राह्मणाला शंभर सुवर्ण मुद्रा देत म्हटले–"तुम्ही आपल्या या दोन्ही विद्यांत आणखी साधना केल्यास थोर ज्योतिषी व मोठे कवी व्हाल."

मध्यंतरी लोकनाथाच्या बायकोकरवी दोघां नातेवाईकांना खरी बातमी कळल्यावर दोघे राजाला भेटायला निघाले. ते दोघे वाटेत राजाला व लोकनाथाला भेटले. त्यांना माहीतच होते की लोकनाथ कोणता वेष करून राजाबरोबर हिंडतो आहे. म्हणून राजाला व मंत्र्याला ओळखणे दोघांना सोपे झाले.

ज्योतिषी राजाचा चेहरा पाहून लोकनाथाला म्हणाला–"मी कोणाही व्यक्तीचा चेहेरा पाहून त्याच्या मागच्या पुढच्या तीन पिढ्यांचे भविष्य सांगू शकतो. हे आपल्या बरोबरचे गृहस्थ वेष पालटून हिंडणारे कोणत्यातरी देशाचे महाराज आहेत."

तेव्हां कवी म्हणाला–"असं म्हणतां तर त्या महाराजांची स्तुती करून एक कविता म्हणावीशी वाटते आहे मला." असे म्हणत त्याने लगेच एक कविता म्हणून दाखविली.

त्यानंतर लोकनाथाने राजाला विचारले "आपल्याला काय वाटतं, महाराज? हे प्रतिभावान तरुण दिसत आहेत. यांना आपल्या दरबारात स्थान दिल्यास नक्कीच दरबाराची शोभा वाढेल नाही का?"

चतुरसेन राजा चिडक्या स्वरात म्हणाला–"बरोबर, आहेत खरे दोघे प्रतिभावान!" असे म्हणत राजा तेथून पुढे निघाला.

वेताळाने येथवर गोष्ट सांगून विचारले–"राजा, चतुरसेन राजाची ती वागणूक विक्षिप्तपणाची वाटत नाही का तुला? शहरात त्या म्हाताऱ्या ब्राह्मणाची फालतू कविता व त्याने सांगितलेले खोटे भविष्य ऐकून राजा खूष तर झालाच, त्याचबरोबर त्याने त्याला शंभर सुवर्णमुद्रा पण इनाम दिल्या. परंतु खरे भविष्य सांगणाऱ्या आणि उत्कृष्ट कविता म्हणून दाखविणाऱ्या प्रतिभावान व्यक्तींना त्याने दरबारात कां नोकरी दिली नाही? राजाला कळले होते की काय की ते दोघे मंत्र्याचे नातेवाईक आहेत? या शंकाचं समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"ते दोघे लोकनाथाचे नातेवाईक आहेत. राजाला हे कळणे शक्यच नव्हते की मंत्र्याला राजा जे म्हणाला त्यावरुन ते दोघे प्रतिभावान असल्याची राजाची खात्री झाली होती, हेच स्पष्ट होते. परंतु राजाने विविध कलांना प्रोत्साहन देण्यासंबंधी आपले विचार मंत्र्याला सांगितले होते–"आपला देश गरीब आहे. म्हणून देशाची स्थिती सुधारल्यानंतरच मी कलांना प्रोत्साहन देण्याचा विचार करीन." दोघे ज्या ब्राह्मणाकडे उतरले होते त्याला दोन्ही विद्यांत काहीच येत नव्हते हे राजाला कळले होते. तरी त्या परक्या जागी करमणूक झाली, तशी इतरत्र कोठे झाली नव्हती म्हणून राजाने त्या ब्राह्मणाची प्रशंसा करून त्याला इनाम दिले होते."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर नाहीसा झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# हिंमत होईल का?

एका गावी नारायण व शिवराम नावाचे दोन शेतकरी रहात असत. एकदां शिवराम आठवडयाच्या बाजाराला निघाला, तेव्हां त्याला नारायणाने विचारले–"मित्रा, तु काय खरेदी करणार आहेस?" उत्तरादाखल शिवराम म्हणाला–"मी एक गाय विकत घ्यायला निघालो आहे." ते ऐकून नारायण म्हणाला–"तर मग आपणा दोघांना व्यर्थ त्रासातून वाचता येईल. कारण मी आपली गाय विकायला आज जाणार होतो. तू माझ्या घरी येऊन गाय पाहून जा."

शिवरामने गाय पाहून तीनशे रुपयाला नारायणची गाय विकत घेतली आणि गाय घेऊन गेला. त्याच दिवशी रात्री ती गाय कोणत्या तरी आजाराने मेली. शिवरामने रात्री गाय मेल्याचे सांगून नारायणकडून आपले पैसे परत मागितले. परंतु नारायण त्या गोष्टीस कबूल झाला नाही. तेव्हां शिवराम त्या गांवाच्या पोलीस पाटलाकडे गेला.

पोलीस पाटलाने नारायणला बोलावून दोघे म्हणाले ते ऐकले व नारायणला म्हणाला–"रात्रभरात गाय मेली म्हणजे गाईला पहिल्यापासून काहीतरी आजार होता. तू शिवरामला तीनशे रुपये परत दे!"

पण नारायण ते मानायला तयार होईना. तेव्हां पोलीस पाटील क्षणभर विचार करून म्हणाला–"नारायण, मी जर ही गाय खरेदी करून शिवरामसारख्या परिस्थितीत सापडलो असतो तर तू काय केले असतेस?" "अहो, तुमच्यासारख्या पोलीस पाटलाच्या हाती ती गाय विकायची हिंमत मला होईल का?" नारायण तत्क्षण उत्तरला.

नारायणची लबाडी सहजी प्रगट झाली. तेव्हां पोलीस पाटलाने नारायणकरवी शिवरामला गाईची किंमत तीनशे रुपयांबरोबर शंभर रुपये दंड म्हणून वसूल करून देवविले.





# तीन चित्रकार

मलय राज्याचा केतुवर्मा याने आपला मुलगा जयवर्मा याचा विवाह करण्याचे ठरविले.

मलय राज्याच्या सरहद्दीला कर्पूर राज्य होते. त्या देशाची राजकन्या पुष्पवल्ली नावासारखीच रूपवती होती. जयवर्माच्या विवाहाची गोष्ट निघाली तेव्हां तो आपल्या वडिलांना म्हणाला–"बाबा, लग्न करावयाचेच झाले तर मी पुष्पवल्लीशीच करणार!"

परंतु ते ऐकून केतुवर्माला आपल्या मुलाच्या लग्नाचा प्रश्न जास्त कठीण वाटला. कारण मलय राज्य आणि कर्पूर राज्य यांचे काही काळपूर्वी एक भयंकर युद्ध झाले होते.

राजाने आपल्या प्रधानाला सल्ला विचारला. प्रधान म्हणाला–"महाराज, आपले कर्पूर राज्याशी झालेले युद्ध फार पूर्वी झाले होते. म्हणून शत्रुत्वातला कडवेपणा तसा जास्त उरलेला नाही. म्हणून आपण आपल्याला जे वाटते आहे ते निःसंकोच कर्पूर देशाच्या राजाला कळवावे."

केतुवर्माने कर्पूर देशाच्या राजाच्या नावी पत्र लिहून आपल्या मुलाच्या विवाहाची गोष्ट कळविली व पुष्पवल्लीची एक तसबीर पाठवायला लिहिले. थोड्या दिवसात पुष्पवल्लीची तसबीर केतुवर्माकडे आली. राजकन्येचे सौंदर्य पाहून राजकुमार जयवर्माच नव्हे तर सर्व दरबारीसुद्धा चकित झाले. परंतु दरबारी पंडितांपैकी एकजण म्हणाला–"महाराज, ही तसबीर काढणारा चित्रकार कर्पूर देशाचा आहे. आपल्या कुरूप राजकन्येला रूपवती दर्शविणे त्याला कठीण नाही. म्हणून आपण आपल्या देशाच्या चित्रकाराला पाठवून तिची तसबीर काढवून आणविणे बरोबर होईल."

राजाला आपल्या पंडिताचा सल्ला समुक्तिक वाटला. त्याने तिघां सुप्रसिद्ध चित्रकारांची नेमणूक त्या कामावर केली. तिघे चित्रकार आपले काम पुरे करून एका आठवड्याने परतले.

तिघांपैकी एकाने राजाच्या अंत:पुरातील सर्वांना त्याने काढलेली तसबीर दाखविली. ती पाहून राजा केतुवर्माच नव्हे तर इतर सर्वांना कमालीचे आश्चर्य वाटले. कर्पूर देशाच्या चित्रकाराने पाठविली होती त्या तसबिरीत काढलेल्या राजकन्येच्या सौंदर्यापेक्षा या तसबिरीतली राजकन्या जास्त सुंदर होती. राजाने त्या चित्रकाराला इनाम देऊन निरोप दिला.

दुसऱ्या चित्रकाराने काढलेली तसबीर राजाने पाहिली. त्या तसबिरीत राजकन्या अप्सरा लाजतील इतकी सुंदर दिसत होती. राजाने पहिल्या चित्रकारापेक्षा जास्त मोठे इनाम देऊन त्या दुसऱ्या चित्रकाराला पाठविले. तिसरा चित्रकार गप्पच होता. राजाने त्याला बोलावून विचारले—"तू काढलेली तसबीर कोठे आहे?"

तो म्हणाला—"महाराज, माफ करावे. मी तसबीर काढलेलीच नाही. तिचे सौंदर्य देवकन्येलाही लाजवील असे आहे. ते सौंदर्य फक्त पाहून मनात उतरविणे शक्य आहे. ते चित्रात उतरविणे कोणत्याही निपुण चित्रकारालाही शक्य नाही. म्हणून कर्पूर देशाच्या चित्रकाराने काढलेली तसबीर एक प्रकारची व आपल्या देशाच्या चित्रकारांनी काढलेल्या तसबिरी दुसऱ्या तऱ्हेच्या आहेत. तेव्हां राजकन्येचे खरे रूप कसे आहे हे ठरविणे आपल्याला शक्य होत नाही."

राजाला आपली चूक कळली व त्याने राजकुमारीची तसबीर न काढणाऱ्या चित्रकाराचा दरबारात योग्य सत्कार केला. त्यानंतर दरबारी पुरोहिताकरवी राजाने कर्पूर देशाच्या राजाकडे निरोप पाठवून कर्पूर देशाच्या राजकन्येला आपल्या युवराजासाठी मागणी घातली.



कारणास्तव तोंड न उघडण्याबद्दल बजावून सांगितले.

दुसऱ्या दिवशी चपलला बरोबर घेऊन रुद्र कवि जयवर्माच्या दरबारात पोहोचला. तो राजाला म्हणाला—"महाराज, हा एक महान पंडित आहे. वेदांचे विवरण करणे म्हणजे ह्याच्या हातचा मळ आहे. हा आपल्या पांडित्याचा उपयोग फक्त हातवारे करून आणि डोक्याची हालचाल करूनच देतो."

राजा अत्यंत प्रसन्न होत म्हणाला—"तर मग मी ह्याच्या पांडित्याचा पुरेपुर अनुभव घेणार."

ह्यावर रुद्र कवीने चपलला विचारले—"पंडितवर्मा, माझ्या एका शंकेचे उत्तर देऊन समाधान करावे, ह्या जगाचा विधाता कोण आहे?"

चपलने जरा सुद्धा संकोच केला नाही व आकाशाकडे हात दाखवून तेजस्वी अशा सूर्यबिंबाचे अभिनयपूर्वक स्पष्टीकरण दिले.

रुद्र कवीने राजाला सांगितले—"प्रभू हे फक्त महान पंडितच नाहीत तर खूप मोठे दार्शनिक पण आहेत. माझ्या प्रश्नाचे उत्तर कोणताही पंडित झटकन हेच देईल की, ईश्वरच ह्या जगाचा विधाता आहे. पण हा तर सूर्य भगवान सांगत आहे. सूर्याशिवाय प्राणिमात्राचे अस्तित्व रहाणार नाही व पाऊस पण पडणार नाही."

राजाने शाबास! म्हणून डोके हलविले. नंतर रुद्र कवीने चपलला दुसरा प्रश्न केला—





# मूर्ख पंडित

चन्द्रगिरीचा राजा जयवर्मा हा कवी आणि पंडितांचा खूप मोठा आदर-सत्कार करीत असे. त्याच बरोबर कवि व पंडिताना त्याच्या दरबारात सुलभतेने प्रवेश मिळत असे. कवी दिग्गज नावाचा प्रसिद्ध रुद्र कवी त्याच्या दरबारात प्रमुख पंडित होता. विशाल नावाचा आणखी एक महापंडित त्याच्या दरबारात होता, परंतु तो व्यवहार चतुर नव्हता. आपल्या होणाऱ्या प्रशंसेवर अत्यंत आनंदित होणाऱ्या राजापाशी कवी रुद्रचा जास्त उदोउदो होत होता.

रुद्र कवि आपल्या असल्या प्रभावाचा संपत्ती मिळविण्याच्या कामी राजाचा अशा तऱ्हेने दुरुपयोग करित होता. रुद्र कवीच्या आश्रयाला येण्याऱ्या प्रत्येक व्यक्तीला तो चार कविता पाठ करायला सांगून त्या राजासमोर म्हणायला सांगून राजाच्या पदरी नोकरी देववित होता. अश्या तऱ्हेने रुद्रकवि मार्फत लोक राजाजवळून पुरस्कार मिळवीत असत व अशा तऱ्हेने दरबारात प्रवेश मिळवीत होते.

एके दिवशी चपल नावाचा माणूस रुद्र कवीच्या आश्रयाला आला. चपलला भाषेचे ज्ञान तिळमात्रही नव्हते. तरी रुद्र कवीला संपत्तीचे आमिष दाखवून त्याला दरबारात नोकरी देण्याविषयी त्याने विनंती केली.

रुद्र कवीने चपलला चार कविता पाठ करायला सांगितल्या, परंतु पाठ करणे तर दूरच त्याला त्याचा साधा उच्चारसुद्धा नीटपणे करता येईना. तेव्हां अशा व्यक्तीने जर पंडितांसमोर आपले तोंड उघडले तर आपलेच पितळ उघडे पडेल, असा विचार करून रुद्र कवीने एक योजना आखली व ती योजना त्याने चपलला समजावून सांगितली आणि दरबारात कोणत्याही

श्री भो. बा. हेगडे

"महात्मन्, हे सांगा की आपल्या शरिराचे प्रमुख अंग कोणते आहे?"

चपलने झटक्यात नाकाकडे हात नेला.

रुद्र कवि आनंदाने म्हणाले—"महाराज, आपल्या पूर्वजांनी डोळे हेच शरिराचे मुख्य अंग सांगितले होते. परंतू हा तर नाक प्रमुख अंग म्हणून सांगत आहे. ह्याच्या पाठीमागे काहीतरी सत्य लपलेले असले पाहिजे. आपण डोळ्याशिवाय जगू शकतो परंतु श्वासोच्छास करण्यास नाक नसेल तर क्षणांतच आपला अंत होतो.

राजाने आनंदाने डोके हलविले. त्यानंतर रुद्र कवीने चपलला विचारले—"कवि व राजा ह्या दोघांमध्ये कोण श्रेष्ठ?"

चपलने प्रथम हात रुद्र-कवीकडे दाखविला व नंतर राजाकडे दाखवून स्वीकार न केल्यासारखे डोके हलविले व परत प्रथम राजाकडे हात दाखवून नंतर रुद्र कवीकडे हात दाखवून स्वीकृतिसूचक डोके हलविले.

चपलच्या ह्या संकेताचा अर्थ दरबारी लोकांना राजापेक्षा रुद्र कवि महान आहे. असाच लागला व सर्वांना तसे अपमानकारक वाटले.

नाजुक होत चाललेली परिस्थिती ओळखून रुद्र कवीने त्याच्या म्हणण्याचा अर्थ सांगितला—"महाराज, हे वेदांतपरक दृष्टीने उत्तर देत आहेत. वरवर ह्याचा अर्थ काहीही असो, परंतु खोल दृष्टीने विचार केला तर ह्याचा अर्थ स्पष्ट होतो.



ह्यांनी प्रथम माझ्याकडे पाहिले व नंतर आपल्याकडे पहात संकेत केला. ह्याचा अर्थ कविराज. परंतु ह्यात श्रेष्ठ कोण आहे? हा प्रश्न निघतो. तेव्हां ह्याने प्रथम आपल्याकडे पहिले व नंतर माझ्याकडे पहात उत्तर दिले. ह्याचा अर्थ असा, जर कवि राज मी आहे, तर राज कवि आपण आहात तेव्हां कवि पेक्षा राजाच श्रेष्ठ आहे. असे ह्याचे उत्तर आहे."

ह्या उत्तरावर राजाचा आनंद गगनात मावेनासा झाला व तो सिंहासनावरून उतरून चालत येत आपला रत्नहार चपलला भेट दिला व म्हणाला–"महापंडित आपल्या विद्वत्तेने आणि आपल्या परिपूर्ण उत्तराने आपण सर्वांना आनंद दिलात तेव्हां ह्या क्षणीच मी आपली दरबारी पंडित म्हणून नेमणूक करीत आहे."

तेवढ्यात विशाल नावाचा विद्वान पंडित उठून म्हणाला–"महा पंडितांच्या समोर माझ्या एका छोट्याशा शंकेचे निवारण करू इच्छितो. माझ्या विचाराने ह्या जगाचे विधाते आईवडील त्यांच्या शिवाय आपण नाही आणि मी पण नाही. जगाचा आधार 'मी' आहे नाही का? ह्यावर चकीत होऊन चपल रुद्र कवीकडे पहातच राहिला.

ह्यावर विशाल झटक्यात म्हणाला– "अरे रे, आपल्यासारखे श्रेष्ठ पंडित मुके असणे म्हणजे सरस्वती देवीचे दुर्दैवच!"

चपल उत्तेजित होत ओरडून म्हणाला– "मी काही मुका नाही! तू पंडित रुद्र कवि पेक्षां कोणी मोठा आहेस होय?"

ते ऐकतांच राजाबरोबर दरबारी लोकांना चपलचे भाषाज्ञान किती आहे, हे कळून चुकले. त्यांना समजले की त्याने जी उत्तरे दिली ती सर्व रुद्र कवीच्या डोक्यातलीच होती.

ह्यावर राजा संतापला. त्याला रुद्र कवीची सर्व लबाडी कळली. त्याने रुद्र कवीला दरबारातून हांकलून लावले व खरा श्रेष्ठ पंडित विशाल ह्याला आपला प्रधान पंडित म्हणून नेमले.





# विश्वासघात

ब्रह्मदत्त काशी येथे जेव्हां राज्य करीत होते त्यावेळी बोधिसत्व त्यांच्या येथे पंडितामात्याच्या पदावर होते.

एकदा राजा ब्रह्मदत्त काही कारणांमुळे आपल्या मुलावर रागावला व त्याने त्याला देशाबाहेर हाकलून लावले. राजकुमार आपल्या पत्नीसमवेत खूप दिवस भटकत पुष्कळ हालअपेष्टा सहन करीत राहिला. त्यांना रहायला जागा नव्हती आणि खायला अन्न मिळत नव्हते; तरीपण त्या महासाध्वीने आपल्या नवऱ्याचे कष्ट बघून आपली सहनशीलता पणाला लावली व सर्व कष्ट झेलले.

काही वर्षांनंतर ब्रह्मदत्त निवर्तला. आपल्या वडिलांच्या मरणाची वार्ता समजताच राजकुमाराला खूप आनंद झाला. काशीला पोहचून गादीवर बसण्याच्या हेतूने तो उतावळेपणाने त्याची यात्रा संपुष्टात आणण्याचा प्रयत्न करू लागला.

परंतु त्या मुर्खाला एवढी समजूत नव्हती की त्याची पत्नी त्याच्या प्रमाणे लवकर चालू शकणार नाही, कारण तिनेही पतीबरोबर तेवढेच कष्ट सोसले होते. परंतु त्याने रात्रं दिवस खाणेपिणे व विश्रांती ह्याकडे दुर्लक्ष केले व बरोबर पत्नीला पण त्याच वेगाने चालण्यास सांगितले.

राज्याच्या लालसेने कितीही जलद जाऊ लागला तरी खाणे पिणे व विश्रांती शिवाय माणुस किती चालू शकेल? त्यामुळे त्याच्या बायको बरोबर त्यालाही जोराची भूक लागली. तहान भूकेने व्याकूळ होत शेवटी ते एका गावांत येऊन पोहोचले. तिथे पोहोचताच तिथले काही लोक त्यांचे झालेले हाल पाहून म्हणाले–" काय हो, असे वाटते आहे की भूक आवरून तुम्ही हा प्रवास करीत आहात आम्ही थोडे काही खायला तुम्हांला देतो ते तुम्ही बांधून

जातक कथा



तुमच्या बरोबर घेऊन जा. जेव्हां भूक लागेल तेव्हां खा.

राजकुमाराने आपल्या पत्नीला एका जागी थांबायला सांगितले व तो त्यांच्या पाठीमागे गेला. त्या लोकांनी दोघांना पोटभर खाऊन आणखी उरेल इतके अन्न एका पत्रावळीत दिले.

खाद्यपदार्थ घेऊन परत येत असतांना राजकुमाराने असा विचार केला हे खाणे दोघांनी मिळून खाल्ले तर दुसऱ्या दिवशी परत भूक लागले व नंतर परत अन्न केव्हां दृष्टीस येईल कोण जाणे? आपल्याला तर पुष्कळ दूरचा प्रवास करायचा आहे. लांब प्रवासाने आधीच आपली पत्नी रोडावली आहे. तेव्हाँ तिला काशीपर्यंत चालणे शक्यच नाहीं. तेव्हां काहीतरी कारण सांगून हे सर्व आपणच खाल्ले पाहिजे. त्या दुष्टाने असा विचार करून आपल्या पत्नीजवळ पोहोचताच सांगितले–"तु पुढे जा, मी माझे सर्व विधी आटोपून लवकरच परत येतो.

राजकुमाराच्या बायकोने त्याचे म्हणणे खरे मानले व ती चालू लागली. ती पुढे जायचाच अवकाश त्याने पत्रावळीतले सारे अन्न खाल्ले व परत पत्रावळ पोकळ बांधली व लवकर लवकर आपल्या बायकोपर्यंत येऊन पोहोचला.

पत्नीने डबडबलेल्या डोळ्यांनी त्या पुड्याकडे पाहीले. तेवढ्यात त्याने राग आल्याचे नाटक करून तिला सांगितले– "बघ, ह्या गावातले लोक किती लुच्चे आहेत. खाद्यपदार्थांच्या नावाने रिकामी पत्रावळ बांधून दिली आहे!"

राजकुमाराच्या बायकोने सत्य परिस्थिति ओळखली. तरीपण ती आपल्या पतीचा आदर करत होती. त्यामुळे ती गप्प बसली. थोड्या दिवसांचा प्रवास संपवून ते काशीला येऊन पोहोचले. राजकुमाराने आपला राज्याभिषेक मोठ्या सोहळ्याने साजरा केला व तो काशीचा राजा झाला.

राजा झाल्यावर तो आपल्या पत्नी-विषयी विचार करायला सुद्धा विसरला त्याला असे वाटले ही नाही की, पूर्वीच्या हालअपेष्टा सहन करत असताना आपल्याच प्रमाणे आपली पत्नीसुद्धा बरोबरीने सर्व सहन करीत होती. तरी तिला आता सुखाचा उपभोग बरोबरीने मिळाला पाहिजे. कधीही राजाने चौकशी केली नाही की तिने व्यवस्थितपणे खाणे-पिणे व कपडे केले की नाही. त्यामुळे राणी नेहमीच ह्या विचारांमुळे चिंताक्रांत दिसत असे.

राजाकडे पंडितामात्याच्या पदावर असलेल्या बोधिसत्वांनी राणीची ही करुण परिस्थिती पाहिली व ते तिला भेटायला गेले. राणीने मोठ्या आदराने त्यांचे स्वागत केले.

बोधिसत्व म्हणाले–"महाराणी कष्टां-पासून मुक्तता मिळवून राजा झालेल्या आपल्या पतीने मला आतांपर्यंत कित्येक वस्तू भेट म्हणून दिल्या. परंतु आतांपर्यंत आपण मला एकही भेट म्हणून काही दिले नाहीत."

"पंडितामात्य, मी नावापुरतीच राणी आहे. परंतु विचार केला तर अंतःपुरातल्या दासी आणि माझ्यात काहीही फरक नाही आपणच सांगावे की, कष्टाला सोडून सुखपभोगात जी भाग घेऊ शकत नाही तिला राणी कसे म्हणावे?" या शब्दात



सांगून राणीने सर्व हकिगत सांगण्यास सुरवात केली व काशी परतण्याच्या वाटेवर पतीने आपल्या वाटचाचे अन्न सुद्धा कसे खाऊन टाकले ते सांगून म्हणाली–"ह्या वेळेस सुद्धा माझे पती माझी विचारपूस सुद्धा करीत नाहीत. मी जेवले की, नाही, चांगले कपडे वापरते किंवा नाही याची फिकीर त्यांना नाही." असे म्हणत ती अश्रू ढाळू लागली.

बोधिसत्वांनी राणीची समजूत घातली– "राणीसाहेब, आपण चिंता करू नका. ही गोष्ट मी आपल्या तोंडून ऐकण्या करिताच आलो होतो. मी उद्या भर सभेत आपल्याला प्रश्न करीन, त्याचे उत्तर

आपण निःसंकोचपणाने द्यावे. म्हणजे मी आपली चिंता दूर करू शकेन."

दुसऱ्या दिवशी राजसभेत महाराणी येऊन बसली. तेव्हां बोधिसत्वांनी तिला प्रश्न केला. "महाराणी, आपण राज्य ग्रहण केल्यानंतर आपल्या नोकरचाकर दासदासींकडे अजिबात लक्ष देत नाही, हे खरे का ?" ह्यावर राणीने भर सभेत सर्व गोष्टी सांगितल्या व हे ही सांगितले की तिच्या वाट्याचे अन्न सुद्धा राजाने कसे खाल्ले, तेव्हां ही गोष्ट भरसभेत राजाला अपमानकारक वाटली.

राणीचे म्हणणे संपताच बोधिसत्वांनी सर्वांना समजावून सांगितले–"महाराणी, जर महाराज तुमची नीट काळजी घेत नाहीत तर आपण सुद्धा त्यांच्याबरोबर रहाण्याची जरूरी नाही. असे सांगतात–

चजे चजंत वनथं न कइरा,
अपेत चित्तेन न संभजेय्य;
द्विजो दुमं खीण फलंति इत्वा;
अडं समेक्खेय्य महाहे लोके ।

(ज्यांनी तुम्हांला सोडले, त्याचा त्याग करा. अशा माणसाशी स्नेहभाव ठेवू नका. जो तुमच्याबद्दल आदर ठेवीत नाही. तुम्ही सुद्धा त्याच्याबद्दल आदर ठेवण्याची काही गरज नाही. पक्षी सुद्धा शेवटी फळे नसलेले झाड सोडून दुसऱ्या झाडाकडे निघून जातात. हे जग खूप विशाल आहे.)

तसे तुम्ही ह्या राजमहालाचा त्याग करून त्या विशाल जगात निघून जा. जिथे तुमचा आदर होईल, तेथेच तुम्ही सुखी जीवन जगू शकाल."

बोधिसत्वांचे असे म्हणणे संपले नाही तोच राजा सिंहासनावरून उठून आला व बोधिसत्वांच्या पायावर डोके ठेवून त्यांची क्षमा मागू लागला व म्हणाला–"पंडितामात्य, आपण माझे अपराध पोटात घालून मला क्षमा करा. माझी अब्रू वाचवा, जी गोष्ट झाली ती झाली ह्यापुढे मी माझ्या पत्नीबरोबर धर्मपूर्ण व्यवहार ठेवीन." त्या दिवसांपासून राजा राणीचा आदर करू लागला व दिवस आनंदाने घालवू लागला.





# पृथ्वीराज–संयोगिता-१

अकराव्या शतकांत उत्तर भारतांत चार मुख्य हिन्दू राजे राज्य करीत होते. त्यांची राजधानीची शहरे दिल्ली, गुजरात, अजमेर, कनौज ही सांस्कृतिक व व्यापाराच्या दृष्टीने खूप चांगल्या प्रतीची होती.

प्रतिभावान तरुण पृथ्वीराज दिल्लीवर राज्य करीत होते. अजमेरचे महाराज त्याचे अजोबा होते. त्यामुळे आपल्या राज्याला वारस म्हणून मृत्युपूर्वी त्यांनी पृथ्वीराजाला आशीर्वाद देऊन वारस केले.





कनौजचा राजा जयचन्द्र हा त्याच्या बहिणीचा पती. त्याच्या मनात अजमेरचे राज्य बळकावण्याचा विचार होता. परंतु त्याला माहीत होते की; पृथ्वीराज खूप शूर वीर आहे. म्हणून










मोठ्या थाटामाटात पृथ्वीराजाचा राज्याभिषेक झाला. त्यावेळेस मोठी राज्ये दिल्ली व अजमेर ह्यांचा तो राजा झाला होता. मोठ्या धैर्यानी व जबाबदारीने तो राज्यकारभार सांभाळू लागला.

अफगाणिस्थानाच्या गोर प्रदेशाचा राजा गोरी महंमद दिल्लीवर चाल करून येण्याच्या विचारात होता. त्याने सहा-वेळेला दिल्लीवर चाल केली, पण सहाही वेळेला पृथ्वीराजच्या हातुन तो माघारी गेला. गोरीवर चाल करण्याच्या कामी एकटा जयचंद्र सोडून सर्वांनी पृथ्वीराजला मदत केली.





एकदा गोरी महम्मद पृथ्वीराजाच्या हाती बंदी झाला. तेव्हां सेनापतींपैकी काही लोकांनी असा विचार केला की, गोरीला बायकी पोशाख घालून पालखीत बसवून पाठवून द्यावे. अशा तऱ्हेने गोरी महम्मद खूप अपमानित झाला.

परंतु पृथ्वीराज ने त्याला सोडून दिले व धमकी घातली की; त्याने भारता-वर हल्ला करण्याची चूक करू नये. आपल्या दुष्ट शत्रुला प्राणांपासून मुक्तता दिली. त्याच्या उलट गोरीने पृथ्वी-राजबद्दल आपली कृतज्ञता प्रकट केली.





कनोजचा राजा जयचन्द्र ह्याला संयो-गिता नावाची एक सुंदर मुलगी होती. ती फक्त सुंदरच नव्हती तर हुषार ही होती. त्यामुळे सर्व दरादाराचे लोक तिची काळजी घेत होते.

जयचंद्राने संयोगितेचे स्वयंवर मांडले. त्याने पृथ्वीराजाला सोडून बाकी सर्वांना निमंत्रण पत्र पाठवले. परंतु खूप दिवसापूर्वी पृथ्वीराजाने संयोगितेला अजमेरच्या राजमहालात पाहिले होते. त्याच दिवसापासुन पृथ्वीराज संयोगि-तेला विसरला नव्हता.












जेव्हां संयोगितेच्या लग्नाची सर्व तयारी झाली तेव्हांच राजाला अचानक युद्धाची घोषणा कळली. काही राजकुमारांच्या तर्फे त्याने राजकुमारी संयोगितेचे स्वयंवर थांबवले. ह्याची सूचना नगरातल्या लोकांना दवंडी पिटवून देण्यात आली.

जयचंद्राने पृथ्वीराजाला स्वयंवराला निमंत्रण केले नाही, म्हणून पृथ्वीराजाला जयचंद्राचा खूप राग आला. त्याने आपली म्हातारी दासी हिच्या मार्फत संयोगितेला आपला परिचय करून देण्याचे व तिच्या मनात आपल्याबद्दल प्रेम निर्माण करून देण्याबद्दल सांगितले.





दासीने पृथ्वीराजाला वचन दिले व सांगितले की संयोगितेच्या मनात प्रेमभाव व आदर निर्माण करण्यास मी मदत करीन. त्याच वेळेस व्यापारी लोकांचा तांडा अजमेरला चालला होता. तेव्हां ती म्हातारी दाईसुद्धा त्यांच्याबरोबर निघाली.

( पुढील गोष्ट पुढील अंकी )



# मोठ्यांचे व्यवहार

चन्द्रनाथ जेव्हां पंचवीस वर्षांचा झाला, तेव्हां त्याचे वडील वारले. मरणापूर्वी त्यांनी आपल्या पाठीमागे एक एकर जमीन, एक घर व तीस हजार रुपये रोकड ठेवले होते. चन्द्रनाथने विचार केला की, एवढी रक्कम घरात राहिली तर निष्कारण खर्च होईल तेव्हां ती कोठेतरी गुंतविली पाहिजे.

ही बातमी कळताच गावातले प्रसिद्ध वैद्य गंगानाथ ह्यांनी चन्द्रनाथला आपल्या घरी बोलावणे धाडले आणि म्हणाले— "चन्द्रनाथ! हे जुने घर रोग्यांना पुरेसे होत नाही तेव्हां मी एक मोठा दवाखाना बांधावा म्हणतोय. तेव्हां मला दहा हजार रुपये कर्ज म्हणून दे. मी तुझे पैसे दरमहा व्याजासकट परत फेडत जाईन. जेव्हां माझ्याकडे पुरेशी रक्कम जमेल तेव्हां तुझे पैसे एकरकमी फेडीन व कर्ज चुकते करीन.

वैद्याच्या रूपात गंगानाथला एक चांगली प्राप्ती होती. तेव्हां चन्द्रनाथने विचार केला की, पैसे ठेवायला ही व्यक्ति योग्य आहे. म्हणून त्याने गंगानाथला दहा हजार रुपये उधारी देऊन कर्जरोखा लिहून घेतला.

काही दिवसांनंतर गावांतल्या वडीलधाऱ्यांमधल्या व्यवहार कुशल सोमनाथने चंद्रनाथला बोलाविले आणि म्हणाला— "तुला माहीतच आहे की लोकांचे माझ्याशी कसे संबंध आहेत. परंतु जेव्हां मुलीचे लग्न केलं तेव्हांपासून माझ्याकडे पैशाची चणचण भासते आहे. तरी मला पांच हजार रुपये उधार दे मी व्याजासकट लवकरात लवकर तुझे पैसे परत फेडीन.

ह्यावर चंद्रनाथने सोमनाथच्या नांवी पांच हजार रुपये देऊन कर्जरोखा लिहून घेतला.

एका आठवड्यानंतर गावातला सर्वात मोठा शेतकरी मंगलनाथ स्वतः चंद्रनाथच्या घरी आला आणि म्हणाला–"चंद्रनाथ, तू असा विचार करून आश्चर्यचकित होशील की याच्याकडे जमीन जुमला आहे आणि असा माणूस तुझ्याकडे कर्ज मागायला कसा आला आहे. परंतु मी आणखी थोडी शेतजमीन खरेदी करीत आहे. तेव्हां त्याकरितां मला पांच हजार रुपये कमी पडत आहे. तेव्हां वेळेला मला मदत कर, तुझे पैसे व्याजासकट परत फेडीन.

चंद्रनाथने मंगलनाथला पण पांच हजार रुपये देऊन त्याच्याकडून ऋणपत्र लिहून घेतले. सहा महिने लोटले. त्याला दर महिन्यात तिघां सज्जनांकडून बरोबर व्याज मिळत गेले. त्याने असा विचार केला की, व्याज मिळवण्याचा धंदा सुरू केला ते चांगले झाले.

सहा महिने असेच गेले तेव्हां तिघेही महिन्याच्या महिन्याला व्याज न देता दोन तीन महिन्यांनंतर एका महिन्याचे व्याज देऊ लागले. आता फक्त चंद्रनाथजवळ त्याच्या वडिलांनी ठेवलेले दहा हजार रुपयेच तेवढे राहिले होते. त्याने व्याज व्यवस्थित मिळत नसलेले पाहून कंटाळून उरलेल्यातले पाच हजार रुपये देऊन दोन एकर जमीन खरेदी केली. त्यात शेती करण्या करिता आणखी तीन हजार रुपये खर्च करावे लागले. व्याज वेळेवर न मिळाल्यामुळे घर खर्चाकरिता उरलेल्या दोन हजारापैकी आणखी एक हजार खर्च करावे लागले आता त्याच्याकडे नगद असे फक्त एक हजार रुपयेच उरले.

ती सर्व परिस्थिती पाहून चन्द्रनाथ काळजी करू लागला आणि एके दिवशी आपल्या कर्जदारांकडे जाऊन त्यांच्या विनवण्या करीत म्हणाला–"तुम्ही मला माझ्या पैशाचे व्याज महिन्याच्या महिन्याला दिले नाही तरी चालेल, परंतु माझे उधार नेलेले पैसे तरी परत करा.

वैद्य गंगानाथ म्हणाला–"अरे बाबा, मी कितीही हाल सोसले तरी मी माझ्या घरचे सोने विकून तुझे कर्ज लवकरात लवकर फेडीन."

गावचे वडीलधारे सोमनाथ ह्यांनीपण असेच उत्तर दिले–"मी माझ्या वाडवडिलांचे घर जे रामपूरला आहे ते विकीत आहे ते विकल्याबरोबर तुझे सर्व पैसे परत करतो."

मंगलनाथने सांगितले–"मी माझे दूरचे शेत विकायला जात आहे. ते विकल्याबरोबर तुझे पैसे व्याजासकट परत करीन.

ह्यानंतर एक महिना झाला. परंतु तिघांही कर्जदाराकडून काही एक रक्कम मिळाली नाही. ह्यावर चन्द्रनाथने गावांतल्या मोठ्या लोकांच्या कानावर ही गोष्ट घातली व त्यांची मदत मागितली.

परंतु गावांतल्या काही लोकांची वैद्याच्या विरुद्ध बोलण्याची हिंमत झाली नाही.





तसेच काही लोकांची श्रीमंत माणसाकडून मिळालेल्या मदतीमुळे त्याच्या विरुद्ध बोलण्याची हिंमत झाली नाही. काही लोक शेतकऱ्याला घाबरतच असत. त्यामुळे सर्वांनी चन्द्रनाथला समजावून सांगितले–"थोरा मोठ्याचे व्यवहार असेच असतात. तेव्हां तुम्हांला ह्यात काय मदत करणार?"

ह्यानंतर एका आठवड्यानंतर गाववाल्यांनी पाहिले की, एकदां सकाळी चन्द्रनाथची बायको व त्याची म्हातारी आई घराबाहेरच्या कठड्यावर बसून रडत आहेत. तेव्हां गावांतले सर्वजण तेथे एकत्र जमले व त्यांनी चन्द्रनाथच्या बायकोच्या हातातला कागद घेवून वाचला. तेव्हां त्यात असे लिहिलेले होते–"मी व्याजाच्या लोभाला बळी पडून अशा लोकांना मोठी रक्कम देऊ केली. परंतु आता असे वाटते की व्याज तर दूरच राहो, मूळ रक्कम सुद्धां मिळेल की नाही याची शंका वाटू लागली आहे. माझ्याजवळ काय थोडे धन होते त्यात मी शेती करू शकलो नाही. त्यात आयुष्याचा वीट येऊन मी साधू संन्याश्यांच्या जमावात जाऊन रहात आहे."

तेथे जमलेल्या लोकांना एवढे कळले की चन्द्रनाथ संन्यासी व्हायला जबाबदार गावचे वैद्य, श्रीमंत व शेतकरी हेच आहेत. त्यांनी त्यांची गांवभर टिका करायला सुरवात केली.

थोड्या वेळात ही बातमी तिघांना कळली. स्वतःची इभ्रत सांभाळण्यासाठी त्यांनी त्याच दिवशी रात्री चन्द्रनाथच्या घरी जाऊन व आपले ऋणपत्र परत घेऊन त्याचे पैसे व्याजासकट परत केले.

त्यानंतर एका आठवड्याने चन्द्रनाथ मळक्या कपड्यांनिशी व दाढीमिशा वाढवलेल्या स्थितीत घरी परत आला. त्यावर गावातल्या लोकांनी त्याच्याजवळ जाऊन त्याच्या संन्यासी होण्याची थट्टा केली. तेव्हां तो गाववाल्यांना म्हणाला–"मित्र हो! मी तरी काय करणार तुम्हीच सांगा! देवाने संन्यासी झाल्या नंतरच यांच्यात चांगुलपणा आणला!" असे म्हणत तो व्यंग्यात्मक हसला.



# निरुत्तर

विमल नावाच्या सेनापतीने राजाजवळ प्रार्थना करून आपल्या मुलाला व जांवयाला सरकार दरबारी नोकरी देवविली. तेव्हां काही लोकांनी सांगायला सुरवात केली की राजाने एकाच कुटुंबातल्या दोघां तरुणांना सरकारी नोकरी देणे बरोबर नाही.

ही गोष्ट राजाला कळली. काही दिवसांनी विमलने आणखी एका तरुणाची शिफारस केली–"महाराज, हा माझा भाचा आहे. याचे नाव आनंद याचे पणजोबा अवंतीच्या युद्धात, आजोबा कलिंग देशाशी झालेल्या युद्धात आणि वडील महाराष्ट्राशी झालेल्या युद्धात क्रमाने आपल्या पणजोबांच्या, आजोबांच्या आणि वडिलांच्या काळात धारातीर्थी पडले. आतां आपल्या पिढीत......" असे म्हणत विमल पुढे बोलायला संकोच करू लागला.

राजाने त्याच्या मनात काय आहे, हे ओळखले आणि म्हणाला–"हे ऐकून मला आनंद झाला की या तरुणाचे तीन पितर तीन पिढ्यांपासून आमची सेवा करीत वीरगतीला प्राप्त झाले; परंतु अशी संधी माझ्या पिढीत नव्या लोकांना मिळणे उचित होईल, नाही का?

अशा तऱ्हेने विमलचे तोंडच बंद झाले. त्यानंतर त्याने राजाकडे जाऊन कोणाचीही शिफारस केली नाही.





# फुकट सल्ला

भूपती नावाच्या एका श्रीमंताने आपल्या शेजारचे गांव श्रीपुर येथें दहा एकर पडीत जमीन विकत घेतली. तो आपल्या कामात गर्क असल्या कारणाने त्याने आपला मुलगा रमापती याच्यावर त्या पडीत जमिनीत लागवड करण्याचे काम टाकले.

भूपतीने आपल्या मुलाला सर्व परिस्थिती समजावून सांगितली व म्हणाला–"हे काम तुला नवे आहे. श्रीपुरला आपल्या नात्यातले नारायणराव राहतात. अडी अडचणीच्या वेळी तू त्यांचा सल्ला घेत जा.

रमापती श्रीपुरला गेला व वडिलांनी विकत घेतलेली पडीत जमीन पाहिली. त्या जमिनीत रानटी गवत व कांटेरी झाडे उगविलेली होती. ती जमीन साफ करवून घेण्यासाठी किती मजूर लागतील व किती दिवसांत ते काम पुरे होईल या गोष्टीचा तो विचार करीत असतां त्याला भेटायला एक गावकरी आला. तो रमापतीला म्हणाला–"अहो, माझे नाव रघुनाथ. मी विटा तयार करून त्या विकतो. तुम्हांला हरकत नसेल तर मी तुमच्या जमिनीतील काटेरी झाडे व झुडपे कापून नेऊन विटा जाळायला त्यांचा उपयोग करून घेईन. अशातऱ्हेने तुमचे काम फुकटात होईल व वेळही फुकट जाणार नाही."

रमापती रघुनाथला म्हणाला–"तुम्ही उद्यां येऊन भेटा, मी सांगतो काय करायचं ते!"

त्या दिवशी संध्याकाळी रमापतीने त्या गावचा त्यांचा नातेवाईक नारायणराव यांना ती गोष्ट जाऊन सांगितली. नारायणरावांनी सल्ला दिला–"तू तरुण युवक आहेस, तरी रघूनाथाला लगेच उत्तर देऊन मोकळा झाला नाहीस, हे सुदैव! येथे विटांचा धंदा करणारे पुष्कळ लोक आहेत. थोडक्यात या गावात लाकूडफाट्याला फार मागणी आहे. तू स्वत: मजूर लावून सर्वात प्रथम कांटेरी झाडी सर्व कापून घे. ती वाळल्यावर विकायला काढ, चांगली किंमत येईल.

रमापतीने मजूर लावून पडीत जमिनीतलं सर्व जंगल कापून काढून सर्व लाकूडफाटा एका जागी ढीग करून ठेवला. थोड्याच दिवसात सर्व लाकडे वाळून गेली. परंतु जो कोणी त्याच्याकडे ती लाकडे विकत घ्यायला येई, तो झाडी कापायला जो खर्च आला तेवढाच द्यायला तयार होई.

ते सर्व म्हणू लागले–"या गावानजीक तर जंगल आहे. आम्ही मजूर लावले तर आम्हांला वाटेल तेवढा लाकूडफाटा मिळेल. आतां तुम्ही मजुरांकरवी हे काम करविले आहे तर त्यांना जी मजुरी तुम्ही दिली आहे ती द्यायला आम्ही तयार आहो. पण त्याहून जास्त किंमत द्यायला आम्ही तयार नाही."

आता रमापती विचार करू लागला की काय निर्णय घ्यावा. एक आठवडा असाच गेला आणि पावसाळा सुरू झाला. सर्व लाकूडफाटा भिजून गेला. रमापतीने तो कुचका लाकूडफाटा काढून फेकून द्यायचे ठरविले. परंतु गाडीवाल्याने त्यासाठी शंभर रुपये भाडे मागितले.



ते कळल्यावर नारायणराव गाडीवाल्यावरच कावले आणि रमापतीला म्हणाले–"हे बघ, तू मी सांगतो तसे कर. हे लोक लोभी दिसत आहेत. माझ्या ओळखीचा एक बैलगाडीवाला आहे. परंतु तो आहे दारुड्या. त्याच्या हातात दहा रुपये ठेव म्हणजे झालें. तो हा सर्व पालापाचोळा आणि काटक्या वगैरे फेकून देईल."

रमापतीने त्या दारुड्याला दहा रुपये दिले आणि आपल्या गावी निघून गेला.

एका आठवड्याने रमापती श्रीपुरला परत आला तेव्हां गांवच्या पोलीस पाटलाने त्याच्याकडे शिपाई पाठविला. पाटलाने रमापतीला आदरपूर्वक जवळ बोलावून

श्री ना. ह. गिरासे

बसविले आणि म्हणाला—"मुला, तू जे काम करविले आहेस ते बरोबर नाही. तू आपल्या शेतातली कांटेरी झाडेझुडपे कापवून गावाच्या नाल्यात टाकविलीस. परवा जो पाऊस पडला त्यामुळे नाल्याच्या धारेबरोबर तो सर्व कचरा, लाकडे, काटक्या वगैरे पाटाचे पाणी अडवून बसल्या आहेत. त्या काढून पाटाचे पाणी वाहू लागावे यासाठी शंभर रुपये खर्चावे लागले. ही रक्कम तुला कचेरीत जमा करावी लागेल. तुझ्या वडिलांची व माझी चांगली ओळख आहे, म्हणून तुझ्यावर दंड वगैरे मी लावीत नाही. फक्त जितका खर्च झाला आहे तेवढाच वसूल करतो आहे.

आतां रमापतीला कळलं की ज्या दारुड्याला पैसे दिले त्यानेच हा सर्व गोंधळ केला. पैसे वांचवायला गेलो त्यासाठी हा भुर्दंड द्यावा लागला. हा सर्व फुकटचा सल्ला घेतल्याचा परिणाम आहे.

रमापतीने पाटलाजवळ माफी मागितली व शंभर रुपये कचेरीत भरले. हे कळल्यावर नारायणराव रमापतीकडे धावले व म्हणाले—"काय रे, पाटलाने तुझ्याकडून शंभर रुपये दंड वसूल केला काय? हा अन्याय आहे. मी तुझा नातलग आहे, हे माहीत असून सुद्धा त्याने हे धाडस केले आहे का? तो माझा हेवा करतो. हे कळल्यावर की तू माझा नातलग आहे, त्याने द्वेष भावनेने ही दुष्टता केली आहे. तरमग चल आपण तालुका कचेरीत जाऊन पाटलाविरुद्ध फिर्याद करू या."

रमापतीला चीड आली तरी स्वतःला आवरून तो नारायणरावांना म्हणाला—"नारायणराव, तुमच्या या फुकटाच्या सल्ल्यांना आजपासून हात जोडतो. मला स्वतःची कामे स्वतःच पाहिली पाहिजेत."

नारायणराव एवढेसे तोंड घेऊन आपल्या घरी परतले. त्यांना पश्चत्ताप होऊ लागला की त्यांनी फुकट सल्ला देऊन शहाणपणा नाही केला, काही तरी रक्कम प्रत्येक वेळी वसूल करायला हवी होती. म्हणूनच तो रमापतीच्या नजरेत मूर्ख ठरला.



# नोकराची हुशारी

कृष्णगिरी व धवलगिरी नावाची दोन गावे शेजारी शेजारीच होती. एकदा धवलगिरीचा राजा शूरवर्धन याने एकाएकी कृष्णगिरी राज्यावर स्वारी केली. धवलगिरी राज्याचा जसा फौज फाटा होता त्याच्याबरोबरीचा फौज फाटा कृष्णगिरीच्या रजाकड नव्हता कृष्णगिरीचा राजा कीर्तिवर्धन याने या कारणास्तव संधीची बोलणी सुरु केली. शूरवर्धन संधी करून घ्यायला तयार झाला आणि बोलणी करायला कृष्णगिरीला गेला. कृष्णगिरीच्या राजाच्या अंतःपुरात दोघां राजांची समेटाविषयी बोलणी सुरु झाली. त्यावेळी एक नोकर दोघां राजांना पिण्यासाठी थंड पेय दोन पेल्यांत घेऊन आला. त्यावेळी त्याच्यासमोर एक यक्ष प्रश्न उभा राहिला.

जर त्याने पहिल्याने पेयाचा पेला आपला राजा कृष्णगिरी याच्यासमोर ठेवला तर शूरवर्धनला राग येईल की त्याच्याकडे दुर्लक्ष केले व त्याचा अपमान करण्यात आला. या उलट जर शूरवर्धनसमोर प्रथम पेला ठेवला तर कीर्तिवर्धनला साहजिक वाटण्याची शक्यता आहे की त्याच्याच नोकराने त्याची मान खाली केली. म्हणून त्याने हुशारी करून आपल्या राजाला विनंती केली—"महाराज, आपणच महाराजांना हा पेला द्यावा. पाहुण्यांचे आतिथ्य नोकराकरवी करण्याऐवजी स्वतः करावयाचं असतं अशी आपल्या घराण्याची रीत आहे!"

नोकराचे हे चातुर्य पाहून दोघेही राजे खूष झाले. अशा तऱ्हेने नोकराच्या हुशारीमुळे एक कठीण समस्या सहजी सोडविली गेली.



मंत्र्याला आश्चर्य वाटले आणि तो लाकडांच्या ढिगाऱ्याजवळ गेला. परंतु मंत्र्याचं तसं जाणं लाकूडतोड्याला आवडलं नाही. मंत्र्याने एक लाकूड उचलून लाकूडतोड्याला विचारले–"हे लाकूड कसलं आहे रे?"

लाकूडतोड्याला नाइलाजाने खरे सांगावे लागले, म्हणाला–"अहो ही लाकडे साधी नसून चंदनाची आहेत."

मंत्र्याने लाकूडतोड्याला विचारले–"तरमग तुला यांची चांगलीच किंमत मिळेल की रे?"

लाकूडतोड्या तो प्रश्न ऐकून घाबरला. तो मंत्र्याचे पाय धरून म्हणाला–"आपण मला माफ कराल तर मी खरी गोष्ट सांगतो."

मंत्र्याकडून अभयदान मिळाल्यावर लाकूडतोड्या म्हणाला–"प्रधान, मी ते गुपित सांगतो. आपण माफ करा. आपले महाराज दयाळू धर्मभीरू आहेत! गरिबांची कणव त्यांच्या मनात आहे. मला ते प्राणापेक्षां ज्यास्त प्रिय आहेत. मला माझी गरीबी असह्य वाटते. म्हणून माझ्या मनात एक दुष्ट विचार आला. आपले महाराज म्हातारे होऊ लागले आहेत. आणखी किती दिवस या जगात राहणार? त्यांना ज्या दिवशी यमाचं बोलावणं येईल त्या दिवशी चंदनाच्या लाकडाला चांगली किंमत मिळेल. म्हणून चंदनाचे लाकूड आतांपासून जमवून ठेवले तर त्या दिवशी मला इतकी रक्कम मिळेल की माझं आयुष्यभराचं दारिद्र्य नाहीसं होईल."

लाकूडतोड्याच्या तोंडी ते ऐकून मंत्र्याचे तोंडच बंद झालं, तो डोळे विस्फारित करून नुसता पहात राहिला.

राजाला ते कळले तेव्हां त्याला लाकूडतोड्याच्या खऱ्या दुःखाचे कारण समजले व त्याने त्याचे दारिद्र्य कायमचे जावे यासाठी त्याला बोलावून खूप धन देऊन निरोप दिला.

तेव्हां राजाला कळले की त्याच्या मनातील ती गुप्त व्यथा खरोखरी लाकूडतोड्याच्या मानसिक व्यथेमुळे होती.






श्रीकृष्णाला आश्चर्यचकित झालेला पाहून रुक्मिणी स्मित करून त्याला म्हणाली–"होय, नाथ! माझ्या मनात आनंद मावेनासा झाला आहे. ही कन्या आपल्यावर किती जीव देते आहे! मला तिच्या अंतःकरणातील आपल्या विषयींचे प्रेम इतके आत्मीयतेचे भासलं की ती जणुंकाही आपल्याला आपल्या सर्वस्वासारखी हृदयात खोल राखू इच्छिते आहे!"

"तरमग तू आपल्या मनात काय आहे, हे नाही सांगितलेस!" कृष्णाने विचारले.

"आपल्या हृदयात एका अणूसारखी वास करण्याची माझी इच्छा आहे, मग तुम्हांला कोणी आपल्या मुठीत आवळून ठेवले तरी हरकत नाही." रुक्मिणी म्हणाली.

"रुक्मिणी तू केवढे मोठं तत्वज्ञान तितक्याच सूक्ष्म शब्दात सांगितलेस! म्हणून तर मी स्वेच्छेने तुझे हरण केले." कृष्ण म्हणाला.

"मला जे मनापासून वाटले तेच मी निवेदन केले सत्यभामेचे प्रेम माझ्या भावनेपेक्षा फार मोठे आहे. प्रभो, माझ्या हृदयात आपल्या विषयी भक्ति भावना मात्र आहे!" रुक्मिणी बोलतच होती, तिला अडवून श्रीकृष्ण स्मित करून म्हणाला–"रुक्मिणी, तू तत्वज्ञानाच्या गोष्टी बोलू नकोस!"

त्यानंतर आणखी काही दिवस लोटले आणि दावाग्निसारखी अफवा पसरली की श्रीकृष्णाने स्यमंतक मणी चोरला.



सत्राजित स्वतः त्या दुःखाने वेड्या सारखा फिरू लागला. तो आरोप खोटा की खरा हे वास्तविक कोणालाच माहीत नव्हते.

कृष्ण मनांतल्या मनांत विघ्ननाश गणनाथाचे स्मरण करून त्याला म्हणाला– "विघ्नेश्वरा, ही सर्व तुझीच लीला आहे. तुझी कृपा असेल तसेच होणार!" नंतर तो स्यमंतक मण्याच्या शोधार्थ जंगलाच्या दिशेने निघाला.

सत्राजितच्या मनात सत्यभामेचे लग्न त्याचा भाचा शतध्वनु नावाच्या राजाशी करून द्यावे असे होते आणि त्या संबंधी बोलणी करण्यासाठी त्याने आपला धाकटा भाऊ प्रसेनजित याला शतध्वनु याच्याकडे पाठविले होते. प्रसेनजित स्यमंतक मणी गळयात घालून जंगलाच्या वाटेने जात असतां त्याला एका सिंहाने ठार केले. जांबुवानाने त्या सिंहाचा वध करून तो स्यमंतक मणी आपली मुलगी जांबुवती हिला आणून दिला.

प्रसेनजित परत न आलेला पाहून सत्राजित गांव भर सांगत सुटला की श्री कृष्णाने तो मणी चोरला. तिकडे शतध्वनु व जरासंध सत्यभामेशी विवाह करून घेण्यास उतावीळ झाले होते. त्यांनी सत्राजिताला कळविले की ते आपला शत्रू कृष्ण याचा काटा काढण्यासाठी सत्राजिताच्या मदतीला धावून येत आहेत.

स्यमंतक मण्याच्या शोधार्थ हिंडत असतां कृष्णाला प्रसेनजिताचे प्रेत व सिंहाचा मृत देह दिसला व त्याच्याजवळ जांबुवानाच्या पावलांच्या खुणा दिसल्या. म्हणून तो त्या पावलांच्या खुणांच्या अनुरोधाने जांबुवानाच्या गुहेपर्यंत गेला.

त्या गुहेत जांबुवानाची मुलगी जांबुवती तो मणी घेऊन त्याच्याशी सागर गोट्यासारखी खेळत असलेली दिसली.

मणि घेण्यासाठी श्रीकृष्णाने जांबुवतीचा हात धरला. परंतु जांबुवतीने आपला हात सोडवून घेण्याचा प्रयत्नही केला नाही व तिरक्या नजरेने श्रीकृष्णाच्या दृष्टीला दृष्टी भिडवून त्याच्याकडे पाहू लागली. त्याचवेळी जांबुवानाने कृष्णाला पाहिले व त्याला मारण्यासाठी त्याच्यावर धावला. त्या घटकेपासून लागोपाठ बारा दिवस त्यांचे परस्परांशी मल्लयुद्ध चालू होते. श्रीकृष्णाने जांबुवानाच्या छातीत मुष्टिप्रहार केला तेव्हां जांबुवानाला श्रीकृष्णाच्या रूपात श्रीरामचंद्राचे दर्शन घडले.

जांबुवानाने तत्क्षण श्रीकृष्णाचे पाय धरले व त्याची माफी मागून निवेदन केले– "कृष्णा, तू जांबवतीचे पाणिग्रहण केलेच आहेस. आतां जांबुवती तुझीच आहे." असे सांगून जांबुवानाने स्यमंतक मणी बरोबर जांबुवतीलाही कृष्णाच्या हाती सोंपविले.



त्यानंतर श्रीकृष्ण जांबुवती व जांबुवानाला बरोबर घेऊन द्वारकेला आला आणि त्याने स्यमंतक मणी सत्राजितला आणून दिला. जांबुवानाने सत्राजितला स्यमंतक मणी त्याच्या हाती कसा आला हे सांगितले. सत्राजित पश्चात्ताप करून म्हणाला– "कृष्णा, आपली संपत्ति घालवून बसणारा पापी असतो, असे म्हणतात, तेव्हां तुला वाटेल तो दंड मला दे!"

कृष्ण म्हणाला– "सत्राजिता, पश्चात्तापाच्या अश्रूंनीच अशा चुकीचे क्षालन होते!"

त्यानंतर सत्राजिताने स्यमंतक मणी कृष्णाला भेट म्हणून दिला व सत्यभामेचे पाणिग्रहण करण्यास विनंती केली. श्रीकृष्णाने सत्यभामेचे पाणिग्रहण करण्याचे स्वीकारले व स्यमंतक मणी परत केला. तेव्हां सत्यभामेने आपल्या वडिलांकडे सार्थक दृष्टीने पाहिले. जणुंकाही ती म्हणत होती– "बाबा, स्यमंतक मणी मोठा आहे की मी हे तुम्हीच आता ठरवा!" नंतर उघड म्हणाली– "तुम्ही विघ्ननाश गणनायकाचे महात्म्य ओळखल्याशिवाय मनात आले ते बोललात. मी विघ्नेश्वराला शरण गेले. त्याच्यावरच माझा पूर्ण विश्वास आहे. त्यानेच माझे मनोरथ पूर्ण केले." असे म्हणत तिने दोन्ही हात जोडून विघ्नेश्वराचे ध्यान केले वत्याला नमस्कार केला.



तेव्हां विघ्नेश्वर लीलारूप धारण करून म्हणाला–"देव, नेहमीच त्याला जो खरोखर प्रिय असतो व जो सद्भावनेने भगवंताचे चिंतन करतो त्यालाच पावतो." पुढे तो म्हणाला–"सत्यभामेशी विवाह करून श्रीकृष्ण सत्यभामेचा प्रियकर म्हणून सर्व काळ प्रसिद्धी प्राप्त करील." असे म्हणत गणनायकाने आशीर्वाद स्वरूप अक्षता श्रीकृष्ण व सत्यभामेवर टाकल्या.

श्री कृष्णाने भक्तिपूर्वक विघ्नेश्वराला प्रणाम केला व म्हणाला–"विघ्नेश्वरा, ही सर्व तुझी लीला आहे. तुझ्या कृपेने मी दोषारोपाच्या पापातून मुक्त झालो आणि स्यमंतकमण्याहूनही एक अनमोल रत्न अशा सत्यभामेची प्राप्ती मला झाली." त्यानंतर विघ्नेश्वर म्हणाला–"जे लोक स्यमंतक मण्याची गोष्ट ऐकतात ते दोषारोपातून मुक्त होतात." असे सांगून गणनायक अंतर्धान पावला.

सत्राजिताने श्रीकृष्णाचे चरण धरले आणि सत्यभामेसारख्या कन्येचे दान करून स्वतःला धन्य मानू लागला. श्रीकृष्णाचा जांबुवतीबरोबरही यथाविधि विवाह झाला. जांबुवान श्रीकृष्णाला म्हणाला–"कृष्णा, तू रामावतारात असतां तुझ्याशी मल्लयुद्ध करण्याची इच्छा मी व्यक्त केली होती. त्यावेळी मी असेही म्हटले होते की तुझ्यासारखा जामाता प्राप्त करणारा श्वशुर हेवा करण्यासारखाच आहे. आतां माझ्या मनातल्या त्या दोन्ही इच्छा आज पूर्ण झाल्या. मी धन्य झालो. मी जीवन मुक्त झालो!" असे सांगून तपश्चर्या करण्यासाठी जांबुवान निघून गेला."

त्यानंतर काही दिवसांनी शतध्वनूने प्रतिकार भावनेने सत्राजिताचा वध केला आणि स्यमंतक मणी घेऊन कृतवर्मा व अक्रूराबरोबर पळून गेला. श्रीकृष्णाने सत्यभामेच्या मनाचे सांत्वन करून शतध्वनूला युद्धात ठार केले. कृतवर्मा व अक्रूर स्यमंतक मणी घेऊन पळून गेले. त्यांचा शोध काढून कृष्णाने स्यमंतक मणी आणला



व पित्याचे एक स्मृतिचिन्ह म्हणून तो सत्यभामेला दिला.

त्यानंतर कृष्णाने मित्रविंदा, कालिंदी, भद्रा, नाग्नजिती लक्षणा नावाच्या राजकन्यांशीसुद्धा विवाह केला. अष्टभार्यांसह कृष्णाने संसार थाटला व दरवर्षी गणेश चतुर्थीला त्याची पूजा करू लागला.

स्यमंतक मण्याच्या प्रभावामुळे सत्यभामेचे अंतःपुर सोन्याची जणुकाही खाणच झाले. त्या सोन्याच्या सहाय्याने सत्यभामेने निरनिराळी अमूल्य आभूषणे विकत घेतली व आपले अंतःपुर अनमोल पैठण्या व साड्यांनी भरून काढले.



श्रीकृष्णाच्या अष्ट महीषीत तिचे अंतःपुर सर्वात अधिक ऐश्वर्य संपन्न झाले. म्हणून तिला गर्व होऊ लागला की तीच श्रीकृष्णाच्या आठही राण्यात श्रेष्ठ व कृष्णाची सर्वात लाडकी पट्टराणी आहे.

श्रीकृष्णाच्या अष्टमहीषीत जांबुवती वीणा वादनात निपुण होती. नारदमुनी आकाश मार्गे आपली अपूर्व वीणा वाजवीत प्रयाण करीत होते. तेव्हा त्यांना थट्टा करीत कोणीतरी हसत असल्याचा आवाज ऐकू आला.

नारदाने चकित होऊन चहूकडे नजर फिरविली व विचारले–"हे कोण हंसते आहे?"

तेव्हां आकाशवाणी झाली–"नारदा, तुला अद्याप बरेच शिकावयाचे आहे. तुला वाटते आहे की तू वीणावादनात अद्वितीय आहेस. पण तू चुकतो आहेस, म्हणून हसू आले."

नारद विचार करू लागला–'मला ही विद्या कोणाजवळ शिकावी लागणार आहे, बुवा!' तितक्यात विघ्नेश्वर प्रगट होऊन म्हणाला–"जांबुवतीजवळ वीणा वादनातील मुख्य मुख्य गोष्टी शिकून घे." तेव्हां नारदाने श्रीकृष्णाच्या अनुग्रहाने जांबुवतीजवळून वीणावादनातील सर्व वैशिष्टये शिकून घेतली.

एके दिवशी श्रीकृष्ण रुक्मिणीच्या अंतःपुरात बसला असतां नारदाने तेथे प्रवेश



करून पारिजातकाचे एक फूल कृष्णाला दिले. कृष्णाने ते रुक्मिणीला दिले. ते कळल्यावर सत्यभामा रुसून बसली. कृष्णाने मोठ्या कष्टाने तिची समजूत घातली व तिला बरोबर घेऊन गरुडवाहनावर इंद्राच्या स्वर्गात गेला. नंदनवनात पारिजातक वृक्ष होता. तो उपटून सत्यभामेच्या अंगणात लावला. तरी सत्यभामेच्या मनात नित्य ही शंका राहू लागली की कृष्णाचे प्रेम तिच्यावर कमी होऊ लागले आहे की काय तिच्या मनात ही इच्छा नित्य वाढतच गेली की कृष्णाला आपल्या हातचं एक बाहुलं करून घेऊन त्याला नित्य आपल्या अंत:पुरातच ठेवून घ्यावे.

एके दिवशी नारदाने सत्यभामेच्या महालात प्रवेश करून तिला सांगितले की तिने जर पुष्पक व्रत केले तर श्रीकृष्ण पूर्णपणें तिला वशीभूत होईल. त्या व्रताच्या नियमाप्रमाणे सत्यभामेने श्रीकृष्णाला नारदाला देऊन त्याच्या हातावर पाणी सोडले. तेव्हां नारदाने श्रीकृष्णाच्या वजनाएवढे सोने देऊन कोणीही त्याला विकत घेऊ शकेल, असे सांगितले.

सत्यभामेने आपल्याजवळचे सर्व सोने तराजूत घालून शेवटी स्यमंतक मणीसुद्धा घातला. तरी कृष्णाच्या बाजूचे पारडे खालीच राहिले व सोन्याचे वरच राहिले. तेव्हां सत्यभामेने आपला अहंकार सोडून रुक्मिणीची पायधरणी केली की श्रीकृष्णाला काय वाटेल ते करून तिने सोडवावे.

रुक्मिणी म्हणाली—"ताई श्रीकृष्णाची बरोबरी करू शकेल अशी एकच वस्तू आहे व ती म्हणजे भक्ती. भक्तिपूर्वक आत्मसमर्पण करून एक तुलसीदलही टाकले तरी ते कृष्णाच्या वजनाबरोबर होईल!" या शब्दात रुक्मिणीने सत्यभामेच्या हातात एक तुळसीचे पान दिले. सत्यभामेने ते पान आपल्या डोळ्याला लावून भक्तिभावनेने तराजूत टाकले, त्या सरशी श्रीकृष्ण बसला होता ते पारडे एक दम वर झाले.

त्या क्षणापासून सत्यभामेच्या मनात ज्ञानोदय झाला. ऐश्वर्य व स्यमंतक मण्याविषयी तिच्या मनातला मोह कायमचा नाहीसा झाला. श्रीकृष्णच आपले सर्वस्व असल्याची भक्ति भावना तिच्या मनात उपजली. स्यमंतक मणी जे सोने देई ते ती श्रीकृष्णाच्या सल्ल्या प्रमाणे गोरगरिबांना व तीर्थयात्रा करणाऱ्या यात्रेकरूंना वाटू लागली. आपल्या पित्याच्या स्मरणार्थ तिने अनेक धर्मशाला बांधविल्या व धर्मसत्रे उघडविली आणि यात्रेकरूंच्या उतरण्याची व जेवणाची व्यवस्था करून दिली. त्या धर्मशाळा सत्राजिताच्या नावाप्रमाणे 'सत्र' नामे प्रसिद्ध झाल्या.

त्यानंतर काही दिवसांनी अर्जुन व बलराम यांची बहीण सुभद्रेचा विवाह झाला. तेव्हां सत्यभामेने स्यमंतक मणी सुभद्रेला अहेर म्हणून देऊन टाकला. अशा तऱ्हेने तो मणी पांडवांच्या घरी पोचला.

मण्याच्या सहाय्याने जे सोने मिळाले ते युधिष्ठिराने राजसूय यज्ञ केला त्या प्रसंगी उपयोगी पडले. त्यानंतर युधिष्ठिर द्यूतात सर्व राज्य व वैभव आणि स्वत:बरोबर द्रौपदीसह आपल्या भावंडांना घालवून बसला. राजसूय यज्ञ समयी दुर्योधनाने पांडवांचे वैभव पाहिले. तेव्हांपासून त्याच्या मनात पांडवांविषयी द्वेषभावना वाढली. पांडवांचे पुरोहित धौम्य यांनी अर्जुनाला सल्ला दिला कि स्यमंतक मण्यामुळेच पांडवांवर एकामागून एक संकटे येत आहेत. यास्तव त्याचा त्याग करावा. तेव्हां अर्जुनाने तो मणी आपल्या गांडिवाच्या प्रत्यंचेवर ठेवून सर्वशक्ति लावून पृथ्वीवर सोडला. तेव्हां तो मणी पृथ्वीत खोल तिच्या गर्भात अदृश्य झाला.

पांडव द्यूतात हारल्यावर वनवास करीत असतां त्यांना भेटायला नारद आला. त्याने सल्ला दिला की पुनरपि गेलेले सर्व राज्य वैभव प्राप्त करण्यासाठी त्यांनी श्रद्धा व भक्तिपूर्वक विघ्नेश्वराची आराधना करावी आणि गणेश व्रत स्वीकारून अज्ञातवासात प्रवेश करावा.





# गंधर्व राजकुमारी

[ ५ ]

हसन, त्याची बायको गंधर्व राजकुमारी तेथे चाळीस दिवस राहिले. एकदां रात्री हसनला स्वप्नात आई दिसली व त्याला खूप रागावली की किती दिवसापासून तो नाहीसा झाला आणि आईला विसरला की काय? हसन स्वप्नांतच आईची आठवण झाल्यासारखा रडू लागला आणि त्याची झोप मोडली. झालं तरी काय, असं विचारीत त्याच्या सर्व बहिणी घाबरून जाऊन विचारपूस करायला धावल्या परंतु हसनला काय झाले हे त्याच्या बायकोलाही कळले नाही.

हसनने स्वप्नात काय झालं ते सांगितल्यावर त्याची लहान अक्का म्हणाली–"आतां लगेच तू आपल्या आईकडे जा! परंतु दर वर्षी आम्हांला येऊन भेटशील ह्या गोष्टीचे वचन दे!"

प्रवासाची सर्व तयारी झाल्यावर जायच कसं हा प्रश्न समोर उभा राहिला. बेहरामच्या डफाची आठवण हसनला झाली. तो डफ कसा वाजवायचा हे त्याला त्याच्या लहान अक्काने शिकविले. तो वाजविल्या बरोबर असंख्य उंट, घोडे आणि खेचरं उडघा मारीत येऊन समोर उभी राहिली. त्यांपैकी उत्तमोत्तम निवडून जितकी हवी होती ती ठेवून घेतली व बाकीच्यांना परतवले. त्यानंतर हसनने त्याच्या सर्व बहिणींनी दिलेल्या भेटवस्तू घेऊन त्यांचा निरोप घेतला आणि आपली बायको गंधर्वराजकन्येला बरोबर घेऊन निघाला. त्यांचा प्रवास वायुवेगाने झाला व ती दोघं आपल्या गावी लवकरच पोचली.

हसन बसरा शहरात आपल्या घरासमोर उतरत असतां त्याला त्याच्या

अरब देशांतील कथा



घरातून त्याची आई रडत असल्याचा आवाज ऐकू आला. त्याचे डोळे पाणावले व त्याने आपल्या दाराची कडी वाजविली. हसनच्या आईने घाईघाईने येऊन दार उघडले आणि समोर आपल्या मुलाला पाहून तिला स्वतःच्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. ती आनंदातिरेकाने बेशुद्ध होऊन पडली.

हसनने आपल्या बायकोच्या मदतीने आईचा औषधोपचार केला आणि तिला लवकरच शुद्ध आली. त्याने आपल्या बायकोची ओळख करून दिली. आपल्या सुनेला पाहून व ती गंधर्वराजकन्या असल्याचे ऐकून तिला परमानंद झाला. अशा सुनेचे कोणत्या शब्दांत व कशा तऱ्हेने स्वागत करावे, हेच तिला कळेना.

ती लगेच बाजारात गेली व एका कापडाच्या दुकानांत जाऊन तिने दहा उत्तमोत्तम कापडांची ठाणं विकत आणली व घरी येऊन तिने ती सुनेच्या अंगावर पांघरली. नंतर तिने तिला माहीत असलेली चांगली पक्वान्ने शिजवून सुनेला स्वतः वाढले.

नंतर ती आपल्या मुलाला म्हणाली— "बाबा रे! तुझ्या बायकोला राहण्यासाठी आपलं हे बसरा शहर मुळीच कामाचे नाही. येथे आपण गरिबीत राहात आलो. म्हणून आपण आता बगदादला जाऊन चांगल्या श्रीमंतांसारखे राहू या."

हसनला सुद्धा, ती म्हणाली ते फार आवडले. त्याने आपले घर त्यातल्या सामानासह विकले आणि जे पैसे मिळाले ते घेऊन, आईला व बायकोला बरोबरघेऊन बगदादला आला. त्याने बगदादमधल्या काही दलालांना विचारून एक लक्ष दीनार देऊन एक हवेली खरेदी केली. त्या इमारतीत योग्य सर्व सामान—खुर्च्या टेबले, झुंबरे, हंड्या, पडदे वगैरे आणून घर सजविले आणि त्यांत राहू लागला. त्याचा थाटमाट त ऐश्वर्य बगदाद मधीलमोजक्या अमीर श्रीमंतातक गणना होण्यालायक झाले. तो



असे ऐश्वर्य भोगीत आनंदात राहू लागला. नऊ महिने लोटले. त्याच्या बायकोला एक जुळं झालं. दोघेही मुलगेच होते, पौर्णिमेच्या चंद्रासारखे सुंदर, नासिर व मन्सूर अशी दोन सुंदर नावे त्यांना ठेवण्यात आली.

एक वर्ष लोटल्यावर हसनला त्याने आपल्या धाकट्या अक्काला दिलेल्या वचनाची आठवण झाली आणि त्याने प्रवासाची सर्व तयारी केली. त्याच्या सर्व थोरल्या बहिणींना देण्यालायक सर्व भेट वस्तू त्याने विकत घेतल्या. नंतर आपण प्रवासाला निघणार असल्याचे सांगून तो आपल्या आईला म्हणाला—"आई, आतां एक अत्यंत महत्वाची गोष्ट सांगतो. मी, तुझी सून पक्ष्यांसारखा एक पोशाख घालते तो मी एका गुप्त जागी लपवून ठेवला आहे. मी परत येईपर्यंत तू रात्रदिवस डोळ्यात तेले घालून त्याचे रक्षण कर. तुझ्या सुनेचा स्वभाव थोडासा पक्ष्यांसारखा आहे. तुझ्या थोड्याशा निष्काळजीपणामुळे तिची नजर, जर त्या पोशाखावर पडली तर तिला कोणीही कशाही प्रकारे येथे थांबवून ठेवू शकणार नाही, आणि जर का ती एकदां येथून निसटली तर कधी परत येणार नाही. ती निघून गेली तर मीही या जगात जिवंत राहणे शक्य नाही. म्हणून तू तिच्या नजरेआड ठेवलेल्या तिच्या पोशाखाची सुध्दा काळजी घे. ती राजकन्या आहे व लाडात वाढलेली आहे, हे विसरू नकोस!" आई म्हणाली—"बाळा, तू मला सावध





केलेस हे बरे झाले. आतां तू थोडी देखील काळजी करू नकोस. माझं वय वाढले असले तरी माझी अक्कल तल्लख आहे. तू अगदी काळजी करू नकोस आणि आपला प्रवास संपवून लौकर परत ये. मी तुझ्या बायकोची सर्व प्रकारे काळजी वाहीन." परंतु त्या दोघांना माहीत नव्हते की त्यांचे संभाषण आड उभी राहून गंधर्व राजकुमारी ऐकत होती.

त्यानंतर हसन आपल्या बायकोचा व आईचा निरोप घेऊन व दोघां मुलांचे प्रेमाने मुके घेऊन निघाला.

हसनला भेटल्याचा त्याच्या थोरल्या बहिणींना परमानंद झाला, त्यातल्या त्यात त्याच्या धाकट्या अक्काला जो आनंद झाला तो वर्णनातीत होता. तिने आपला वाडा फुलांफळांनी आणि रंगबिरंगी दिवे लावून सजविला. हसनने तिला आपल्या जुळ्या मुलांचे वर्णन करून सांगितले. त्यानंतर तो आपल्या बहिणींबरोबर शिकारीला गेला.

हसन निघून गेल्यावर दोन दिवस त्याची बायको आपल्या सासूबरोबर गप्पा-गोष्टीत गुंतून राहिली. तिसऱ्या दिवशी ती सूर्योदयाच्या सुमारास आपल्या सासूला म्हणाली—"मी स्नानाला जाते, मनमोकळ-पणे स्नान केलेल्याला कित्येक दिवस झाले."

"अग मुली, तू असं काय म्हणतेस ? हे गाव आपल्याला अगदी नवं आहे. सार्व-जनिक स्नानाची जागा कोठे आहे आपल्याला माहीत नाही. मी आहे म्हातारी. मला तुझ्या बरोबर येतां येणार नाही. तुला विनाकारण. त्रास ही होणा.र" हसनची आई सुनेला म्हणाली.

हसनची बायको म्हणाली—"सासुबाई, स्नानाला जायला देखील तुम्हांला हरकत असेल तर कसे चालेल हो? गुलामांवर सुद्धा एवढी बंधने नसतात. अशा जिण्या-पेक्षा मरण पत्करले." तिने आपली नाखुशी या शब्दात व्यक्त केली.

सुनेच्या तोंडचे ते शब्द ऐकून हसनच्या आईला फार वाईट वाटले. तरी आंघोळ झाल्यावर अंगाला लावायला तेल अत्तरें वगैरे तयार करून देत ती म्हणाली—"मुली, हे घे व मनसोक्त आंघोळ करून ये. तुझा नवरा तुला रागावला तर मी त्याची समजूत घालीन. मी सर्व त्या अल्लावर सोडते." असे सांगून ती आपल्या सुनेला बरोबर घेऊन निघाली आणि बगदादमधल्या अत्यंत प्रसिद्ध अशा स्नानागारात गेली.

हसनच्या बायकोने स्नानागारात पाऊल टाकले तेव्हां तिला पाहून तिथल्या सर्व बायका आश्चर्यचकित झाल्या. कारण ती तशीच अपरूप सुंदर होती. काही तर स्नान करायचेच विसरून जाऊन तिच्याकडेच टक लावून पहात उभ्या राहिल्या.

त्याच वेळी बेगम जुबेदाची दासी तूफासुद्धा त्याच स्नानागारात स्नानाला आली. ती सुद्धा हसनच्या बायकोकडे टक लावून पहात उभी राहिली. स्नान आटोपून हसनची बायको परत निघाली तेव्हां तूफासुद्धा तिच्या पाठोपाठ तिच्या घरापर्यंत गेली. नंतर खलीफाच्या महालात पोंचल्यावर तिने जुबेदाबेगमसमोर हसनच्या बायकोच्या सौंदर्याचे तिखटमीठ लावून वर्णन केले.

जुबेदाबेगमला माहीत होते की तूफा सामान्य सौंदर्य असलेल्या बायकांकडे ढुंकून सुद्धा पहात नाही. कोणत्याही स्त्रीच्या सौंदर्याचे वर्णन ती कधीच करीत नसे. म्हणून त्या अपूर्व सुंदर स्त्रीला पाहण्याचे कुतूहल जुबेदाबेगमच्या मनात वाढले. तसे त्या सुंदर स्त्रीचे नांव तूफाला माहीत नव्हते, परंतु तिने ती रहात होती त्या घराच्या खाणाखुणा चांगल्या समजावून सांगितल्या.

म्हणून जुबेदाबेगमने खलीफांचा मुख्य अंगरक्षक मन्सूर याला बोलावून त्याला हुकूम सोडला की त्या घरात राहणाऱ्या तरुण बाईला बोलावून आण. तू एकटा परतलास तर तुझे मुंडके धडावर राहणार नाही!" (क्रमशः)





# सोन्याचं वेड

रवि आई बरोबर देवदर्शनाला देवळात गेला व दर्शन घेऊन निघाला. आई अजून देवळातच गर्भ गृहात बसून पूजा-अर्चेत मग्न होती.

"नव्या चपला लंपास करायला देवळात आलास कारे? तुला मी पूर्वी कधी देवळात पाहिलं नाही, म्हणून विचारते." असे म्हणत एक बाई त्याच्या जवळ आली.

रवि ते ऐकून घाबऱ्यासारखा बघू लागला.

"असा घाबरलास कां रे? रघू दिसला तर त्याला लगेच पाठवून द्यायला तुझ्या बाबांनी मला सांगितलं आहे." ती म्हणाली.

ती बाई आपल्याला कोणीतरी रघू समजून बोलली हे ओळखून रवि म्हणाला—"आमचे बाबा माझ्या लहानपणीच वारले. मी रघू नाही, तू चुकते आहेस!"

तिने आश्चर्यचकित होऊन रवीकडे आणखी जास्त न्याहाळून पाहिलं व म्हणाली—"काय म्हणालास? माझ्या डोळ्यावरचा विश्वासच उडाला! तू अगदी रघूसारखाच आहेस!"

अगदी आपल्यासारखाच आणखी एक-जण आहे, हे कळल्यावर रवीच्या मनात रघूच्या विषयी कुतूहल वाढले.

तिने रवीला आपल्या घरी बोलावून नेले व खोलीत एका खुर्चीकडे बोट दाखवीत म्हणाली—"आतां तू माझ्या कैदेत आहेस! या कागदावर मी सांगते ते मुकाट्याने लिही, म्हणजे तुझ्या आईला कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही."

रवीने चकित होऊन विचारले—"तू कोण? मला खोलीत कां बंद करून ठेवले आहेस?"

"या प्रश्नांचं उत्तर तुला मिळणार नाही. मुकाट्याने मी सांगते ते लिही." तिने थोड्या करड्या आवाजात म्हटले.

रवीने, त्या बाईने सांगितले तसें आईला 'सुखरूपघरी यावे असे वाटत असेल तर हे पत्र घेऊन येणाऱ्या बाईला अंगावरचे सर्व दागिने देऊन टाकावे' असे लिहिले. ती बाई रवीच्या आईजवळ गेली व तिच्या हातात चिट्ठी दिली.

चिट्ठी वाचतांच रवीची आई जास्तच घाबरली. तरी धीर करून ती कांपऱ्या आवाजात म्हणाली—"सर्व दागिने दे, म्हणून त्याने लिहिले आहे. मी देते मात्र माझ्या मुलाच्या जिवाला काही अपाय होऊ देऊ नकोस, बाई!"

रवीची आई त्या बाईला आपल्या घरी घेऊन गेली आणि तिजोरी ठेवली होती ती खोली दाखवून म्हणाली—"तुला हवे ते दागिने काढून घे." आणि दाराजवळ गेली.

त्या बाईने सर्व दागिने काढून एक गाठोडे बांधले वळून पाहते तर खोलीचे दार बंद रवीची आई बाहेर खिडकी जवळ उभी राहून म्हणाली—"माझा मुलगा या खोलीत आला की तुला बाहेर जाता येईल,—घरी नाही, सरळ तुरुंगात! माझा सैंपाक पुरा व्हायच्या आत माझा मुलगा कोठे आहे, मुकाट्याने सांग!" असे बजावून सांगून रवीची आई सैंपाकघरात गेली.



तोंपर्यंत चांगला अंधार झाला. आपल्याला खोलीत कोंडून ठेवून निघून गेलेल्या बाई-विषयी विचार करीत रवि खुर्चीवरून उठला व विजेचे बटण दाबून दिवा लावला.

त्यानंतर एक दोन मिनटेच गेली असतील बाजूच्या वाटेने येऊन एका बाईने खोलीचे दार उघडीत म्हटले—"अग, सरला, तुला एक आनंदाची गोष्ट सांगते, माझ्या होणाऱ्या सासुबाई पार बदलल्या की ग!" असं म्हणत खोलीत रवीला पाहून ती बाई थक्क झाली.

"कोण तुम्ही? आमची सरला कोठे आहे?" रवीकडे संशयित मुद्रेने पहात त्या बाईने विचारले.

श्री म. ना. नलवडे



"तुमची सरला मला या खोलीत कोंडून ठेवून माझ्या आईचे दागिने लुबाडून घेऊन यायला गेली आहे!" रवि तिला तोंड वेंगाडीत म्हणाला.

ती डोळे विस्फारित करून म्हणाली– "काय म्हणतोस काय! सरलाला असलंच सुचतं काहीतरी, विचार म्हणून नाहीच!"

"तुम्हां दोघांचीच नाहीका चोरांची जोडी की आणखी कोणी आहे?" सरला दागिने घेऊन येईल त्यांत तुझा वाटा किती?" रवीने विचारले.

"चल रे! आम्ही चोर नाही, माझं नाव अनिता. काय झालं ते सांगितलं तर सरला कोण व कशी आहे हे तुला बरोबर कळेल!" असे सांगून तिने घडलेली सर्व गोष्ट या शब्दात सांगितली.

सरला व अनिता लहानपणापासून एकाच घरात बाजूबाजूच्या बिऱ्हाडात रहात आल्या व लहानाच्या मोठ्या झाल्या. सरला हुशार व धैर्यशाली होती. अनिताचे वडील वैद्य होते. अनिताने वडिलांजवळच वैद्यकी शिकून घेतली व वडीलवारल्यावर वैद्यकी करूनच तिचा व तिच्या आईचा उदरनिर्वाह चालत असे.

चार दिवसांपूर्वीच सरला आई वडिलांबरोबर शेजारच्या गावी नातेवाईकांकडच्या एका लग्नाला गेली होती. त्या अवधीत अनिताला पहायला लोक आले होते. नवरा मुलगा काही दिवसांपासून अनिताला ओळखत होता. तो दररोज आईला बरोबर घेऊन देवळात जात असे! देवळाच्या आवारातील बागेत औषधी वनस्पतींच्या शोधार्थ अनिता जात असे. तीला त्याने पाहिले होते व तिच्याशी लग्न करण्याचा विचार त्याच्या मनात आला होता. परंतु अनिताने मात्र त्याला याचवेळी, म्हणजे तिला पहायला मायलेक आले तेव्हांच पाहिले. त्याच्या आईला सोन्याचं वेड फारच होतं– "सुनेच्या गळयात दहा तोळे तरी सोने असल्या शिवाय हे लग्न होणार नाही!" असे तिने अनिताच्या आईला सांगितले होते.



अनिताच्या अंगावर अर्धा तोळा सोने सुद्धा नव्हते!

सरला नातेवाइकांच्या कडचे लग्नकार्य चालू असतां त्या घरात तिला कंटाळा आल्याने एकटीच सकाळी उठून आपल्या घरी निघून आली. तिला अनिताच्या तोंडी तिला पहायला आलेल्या लोकांची त्यांनी म्हटलेल्या गोष्टींची माहिती कळली. सोन्याच्या वेडा पाठीमागे सोन्या सारखी सुनेला घालवून बसणार का ही एवढी मोठी बाई?"

—"तुला पुण्य लागेल, तू ही गोष्ट या पुढे विसर." अनिता अनुनय विनय करीत म्हणाली.

हे बोलणे झाले त्या दिवशी संध्याकाळी अनिता आपल्या घराच्या बाजूच्या गल्लीत एका रोग्याला औषध देऊन घरी येत होती, तेव्हां समोरच तिला मागणी घालायला आलेला नवरा मुलगा दिसला व तो म्हणाला–"आमच्या आईला पोटशूल झाला आहे व ती कण्हत पडली आहे. येऊन जरा पाहतेस का?"

तिला घेऊन तो घरी पोचल्यावर अनिताला जरा दारातच थांबायला सांगून आईजवळ जाऊन म्हणाला–"अनिता शिवाय जवळ कोणी दुसरा डॉक्टर मिळाला नाही आई!"



"कोणी असूदेरे, लवकर बोलावून घेऊन ये." म्हणत कण्हू लागली.

"अनिता येत नाही म्हणाली. तुमच्या आईला सोन्याचा मोह आहे, म्हणे ना? तेच थोडं खाऊन घे म्हणावं म्हणजे पोट दुखी थांबेल." असं त्याने खोटं खोटं सांगितलं आईला.

"माझी अक्कल गवत खायला गेली होती. होणाऱ्या सुनेला संकटांत लोटलं. मी तिची क्षमा मागते, सांग तिला अन् घेऊन ये!" आई म्हणाली. अनिताने बाहेरून ते संभाषण ऐकलं होतं. आत जाऊन तिने आपल्या होणाऱ्या सासूला एक दोन प्रश्न विचारून औषध दिलं. क्षणभराने पोटदुखी

बंद झाली. ती म्हणाली–"मुली, तू दिलेलं औषध संजीवनीबूटीसारखं निघालं, बघ. पूर्वी मी बोलले ते सर्व विसर मुली! उद्याच साखरपुडा करायला आम्ही येतो."

ही शुभवार्ता सांगण्यासाठी अनिता सरलांच्या घरी सांगायला आली होती.

अनिता हे सर्ववृत्त सांगून म्हणाली–"तुम्हां दोघां मायलेकांना पाहून सरलाला वाटले की मला पहायला आलेले मायलेकच तिला दिसले. तिच्या मनात परोपकाराचीच बुद्धी होती, स्वार्थ बुद्धी नव्हती."

रवि अनिताला बरोबर घेऊन आपल्या घरी गेला तेव्हां सरला खोलीत उदास व निराश होऊन बसली होती. अनिताने सरलाला झालेली चूक समजावून सांगितली. सरला नम्रपणे रवीला व त्याच्या आईला म्हणाली–"मी केलेल्या चुकीची माफी मागते. चुकीबद्दल वाईट वाटतं आहे!"

रवि स्मित करून सरलाच्या तोंडाकडे पहात म्हणाला–"माझी होणारी बायको हुशार व धैर्यशाली असावी असं मला वाटतं. माझ्या आईला वर्षभर भटकत राहिल्याशिवायच तुझ्यासारखीला हे चांगलं शिकविता येईल. तुला हरकत नसेल तर मी तुझ्याशी लग्नाला तयार आहे."

"माझ्यात हुशारी आहे हे खरं आहे म्हणा! दार लावून घेऊन विचारल्या-बरोबर पत्र लिहून देणाऱ्याला भितरा नाही तर काय म्हणावयाचं? अशा तुमच्याशी मी लग्न कसं करणार? सरला म्हणाली.

"तू शिकाऊ चोर आहेस हे तुझ्या वागणुकी वरुनच कळलं मला. तुझ्यासारखे लोक धंदेवाईक चोरासारखे यशस्वी होणेच शक्य नाही व सहजी सापडणार हे कळलं होतं मला म्हणून चिट्ठी लिहून दिली. मी चोराला जाळ्यात पकडणारा वस्ताद शिपाई आहे!" रवि म्हणाला.

"लहानपणापासून आपल्यादोघींना वाटत होतं तसं दोघींचं लग्न एकाच मुहूर्तावर होत आहे ग!"

सरलाने स्मित करून होकारार्थी मौन-पणे मान व नजर खाली केली.






[ ५ ]

[मंदरदेव व शिवदत्त यांची परस्परांशी ओळख झाली, त्यावेळी शिवदत्ताने कुंडलिनी द्वीपाचा राजा करमणुकीच्या कार्यक्रमात कसा गर्क होऊन गेला व परिणामी राज्यात कशी अराजकता पसरली व शेवटी शत्रूने राजधानीवरच कसा घाला घातला आणि त्याही परिस्थितीत नरवाहन मिश्राला सेनापतीपद देण्याची चूक कशी घडली सर्व सांगितले. पुढे–]

**शि**वदत्ताने सांगितले ते सर्व मंदरदेवाने लक्षपूर्वक ऐकले व त्याला क्षणाक्षणाला ते ऐकून आश्चर्यच वाटत गेले. महा-सागरात त्या घनांधकारात त्यांचे पडाव कोणत्या दिशेने चालले होते तिकडे त्याचे लक्षच नव्हते. शेवटी शिवदत्त सांगत होता त्याला थांबवून तो म्हणाला–"शिवदत्ता! सेनापतिपद दुष्ट नरवाहन मिश्राच्या हाती न जाऊ देण्यासाठी तुम्ही प्रयत्न केला पाहिजे होता, तसा तुम्ही केला नाही का?"

ते ऐकून शिवदत्त हंसून म्हणाला–"मंदरदेवा! त्या वेळच्या परिस्थितीत ते करणे सोपे नव्हते. मी स्वतःला सेनापतित्व मागून घेणे बरे दिसलं असतं का? तसं असूनही सेनापतित्व एखाद्या दुष्ट व्यक्तीच्या हातात जाऊ देणेही श्रेयस्कर नव्हत. म्हणून दुसरा उपाय काय होऊ शकतो या

गोष्टीचा विचार करू लागलो. माझ्या मनात चालू असलेले विचार ओळखूनच की काय समरसेन म्हणाला–"शिवदत्ता! काय रे विचार करतो आहेस? उघड सांगण्यासारखा काही विचार असेल तर नि:संकोच सांग."

ती संधी मिळतांच मी त्याला सुचविले:

"समरसेना! माझ्या मते आतांच्या परिस्थितीत तुम्हीच सेनापतीचे पद घेणे मला योग्य वाटते. शत्रूचे सैन्य व त्याने पाठविलेला निरोप पाहून शत्रूचा विमोड सहजी होईलसे वाटत नाही. दुर्दैवाने आपल्या सैन्याला शत्रूचा लहानसा तडाखा बसला तर पुन्हां आणखी काही शत्रू आपल्यावर चालून यायला उत्साहाने पुढे येतील. म्हणून तुम्हीच सेनापतिपद घ्यावे."

समरसेनाने क्षणभर विचार केला व होकारार्थी मान हलवून म्हणाला–"तरमग तसेच करतो!"

तितक्यात तेथे नरवाहन मिश्र धावत पळत आला.

त्याला पाहतांच समरसेन म्हणाला–"नरवाहना! तुझ्याकडेच निरोप पाठवावा, असा विचार करीत होतो, तू लगेच जा आणि सैन्याची जुळवाजुळव कर. एका तासाच्या आत कमीत कमी दोन हजार सैनिक तरी युद्धाला सिद्ध करून आणले पाहिजेस! सूर्यास्तापूर्वी शत्रूचा संहार झाला पाहिजे!"

नरवाहन मिश्र तिकडून निघते वेळी माझ्याकडे पाहून थोडा हसला. ते विषारी हसणे होते. परंतु त्या हसण्यात किती काळंबेरं होतं हे त्यावेळी माझ्या लक्षात आले नाही.

समरसेन माझ्याकडे वळून हसून म्हणाला–"शिवदत्ता! तू सुद्धा आपल्या अनुयायांची जुळवाजुळव कर. आधीच सावधगिरी बाळगलेली बरी. निदान गंज लागलेल्या तलवारी पुन्हा उजळून निघतील."

मी आपल्या अनुयायांपैकी तेजस्वी अशा निवडक पंचवीस जणाची निवड केली, आणि त्यांना कोणत्याही परिस्थितीला तोंड देण्यासाठी तयार केले. सेनापती समरसेनाच्या हाताखाली शत्रूशी युद्ध करून बरेच दिवस लोटले होते. आतां पुन्हां ती संधी त्या अवघड परिस्थितीत मिळत असल्याबद्दल मला मनस्वी आनंद झाला होता.

एक तास संपत आला. नरवाहन मिश्र सैन्याची जुळवा-जुळव करून ती बातमी देण्यासाठी येईल या आशेने मी व समरसेन दोघे वाट पहात होतों.

एका तासानंतर नरवाहन मिश्र आला खरा. परंतु त्याच्याकडे पाहून आम्ही दोघे ही आश्चर्यचकित झालों.

त्याच्या म्यानेत तलवार नव्हती. अंगावरचा पोशाख फाटलेला होता. तोंडावर जागोजागी जखमा होत्या. त्याच्या चेहऱ्यावर भीतीची चिन्हे स्पष्ट दिसत होती.

"काय रे नरवाहना! काय झाले तरी काय? कळूदे तरी. तू असा दिसतो आहेस,







"ते कां?" या शब्दांत समरसेनाने नरवाहनाला थोडयाशा घाई घाईने विचारले.

नरवाहनाने बोलण्याचा यत्न केला, परंतु त्याच्या तोंडातून शब्दच उमटेनात. शेवटी तो कांपऱ्या आवाजात म्हणाला—"परिस्थिती आपल्या हातातून निसटल्यासारखी दिसते आहे. आपण स्वरक्षणासाठी कोठे तरी पळून जाणेच या प्रसंगी योग्य होईल!"

ते ऐकतांच समरसेन शेपटीवर पाय दिलेल्या सापासारखा फडा उभारून ताठ उभा राहिला. त्याची ती क्रुद्ध मुद्रा मी त्यापूर्वी कधीच पाहिली नव्हती. इतका त्याला राग आला होता.

"मी माझ्या राज्यातून स्वरक्षणासाठी कोठेतरी पळून जावे म्हणतोस? या कुंडलिनी द्वीपावरची अंगुळ अंगुळ माझे रक्षण करीत आलेली आहे! तुला वेड तर लागले नाही?" समरसेनाने विचारले.

नरवाहन मिश्र आपादमस्तक थरथर कापत होता. समरसेन पुढे काहीं बोलणार इतक्यात बाले किल्ल्याच्या सिंहद्वाराकडून भयंकर आरडा ओरडा ऐकू आला. तो ऐकून वीज पडल्यावर मोठ मोठी झाडे कांपतात तशी आमची अंगे थरारली.

"तो कसला गल्का?" समरसेनाने नरवाहन मिश्राकडे डोळे वटारून पहात करड्या स्वरात विचारले.

"तीच भयंकर बातमी आपल्याला सांगावी म्हणून मी इकडे धांवलो. सैनिक सर्वांच्या सर्व प्रजेला सामील झाले आहेत, आणि 'राजाला गादीवरून हुसकावून लाव!' असे म्हणत राजधानीत गल्लोगल्ली फिरत आहेत. मी सैन्याची जमवाजमव करण्याचा प्रयत्न करीत होतो. तेव्हां त्यांनी मला दिलेली भेट आहे ही! स्वतःचा जीव मुठीत घेऊन तुम्हांला वांचविण्यासाठी मी येथवर धांवत आलो, ही सुद्धां त्या कुंडलिनीचीच कृपा!" नरवाहन मिश्र म्हणाला. ते ऐकून समरसेन डोक्यावर वीज पडल्यासारखा जागच्याजागी थबक होऊन पाय गारठल्यासारखा उभा राहिला. तर मग आपण कोणासाठी मंत्रद्वीपात जाऊन एवढे कष्ट सहन केले. तीच प्रजा आपत्काली आपले नेतृत्व झुगारणार काय? समरसेन त्या विचाराने किंकर्तव्यविमूढ होऊन शिवदत्ताकडे पहात राहिला त्या बिचाऱ्याला मध्यंतरी घडलेल्या गोष्टी व त्यात नरवाहन मिश्राने जी कारस्थाने केली होती त्यांची माहिती सुद्धा नव्हती.

शिवदत्त म्हणाला—"समरसेना! अधीर होऊन जाण्याचे कारण नाही. या संकटांतून बाहेर निघण्याचा काय मार्ग आहे याचा विचार करू या."

समरसेन एक दीर्घश्वास सोडून म्हणाला—"शिवदत्ता, मी घाबरलो आहे असे समजू नकोस. प्रजा माझ्याशी किती कृतघ्नपणे वागते आहे, याचा विचार करते वेळी माझ्या हृदयात आगीचा डोंब उठत आहे. आणखी काही नाही!" त्याला काय बोलून समजावून सांगावे मला सुचेना. नरवाहनाकडे मी पाहिले. तो जागच्या जागी मुखस्तम्भासारखा उभा होता. त्याच क्षणाला किल्ल्याच्या सिंहद्वाराकडून भयंकर जयघोष ऐकू येत होता. इतक्यात एक द्वार पालक आम्ही होतो तेथे धावत येऊन उभा राहिला.

"काय रे भानगड आहे?" असे मी विचारण्याच्या आतच तो म्हणाला—



"सेनापती, भयंकर मोठा प्रसंग आहे. प्रजा बाले किल्ल्याच्या सिंहद्वारावर आघात करून ते तोडण्याच्या प्रयत्नात आहे.

समरसेन एक क्षणभरच मान खाली करून उभा राहिला. द्वारपालक जे म्हणाला ते त्याने ऐकले की नाही ही शंका मला वाटली. मी काही बोलणार इतक्यात त्यानेच मान वर करून माझ्याकडे पाहिले. त्याच्या दृष्टीतला भाव मला कळल्यासारखा वाटला.

"शिकारखान्याच्या अधिकाऱ्याला असेल तसा इकडे बोलाविले आहे असे सांग!" अशी मी द्वारपालकाला आज्ञा केली. थोडयाच वेळाने शिकारखान्याचा अधिकारी



आला. तो येतांच मी आज्ञा केली–"तुझ्या अधिकारात जितकी क्रूर जनावरे आहेत त्यांना पिंजरा उघडून सोड. पण लक्षात ठेव ती वाड्यासमोरच्या पटांगणात सिंह-द्वाराच्या जवळपासच राहतील याची काळजी बाळग. जरूर असेल तेव्हां त्यांना पुन्हां पिंजऱ्यात घालतां यावे यासाठी तू आपल्या खालच्या सर्व नोकरांना बजावून सिद्ध रहायला सांग."

शिकारखान्याचा अधिकारी ती आज्ञा ऐकून गोंधळल्यासारख्या माझ्याकडे पाहून समरसेनाची काय आज्ञा आहे या हेतूने त्याच्याकडे पाहू लागला. समरसेन विषण्ण मुद्रेने म्हणाला–"शिवदत्ताची आज्ञा माझीच आज्ञा असल्याचे समजून त्याचे पालन कर."

"परंतु सेनापती! जर आपण त्या क्रूर जनावरांना पिंजऱ्यांतून बाहेर काढलं तर बाहेरच्या प्रजेवर..." असं काही शिकार-खान्याचा अधिकारी म्हणणार तितक्यात मी संतापून म्हटले–"त्या सर्व गोष्टींची फिकीर तू करण्याचे कारण नाही. बाले किल्ल्याचे सिंहद्वार तोडले तर समोर काय वाढून ठेवलं आहे ते त्या लोकांना कळले पाहिजे! तर मग तू तावडतोब जाऊन मी सांगितले तसे कर!"

शिकारखान्याचा अधिकारी लगेच निघून गेला. मी नरवाहन मिश्राकडे पाहिले. तो दातओठ चावीत माझ्याकडे तिरप्या नजरेने पहात असल्याचे मी ओळखले. तर त्याच्या मनात काय होते? त्याचा बेत काय होता? प्रजेच्या बंडाळीत त्याचा हात कोठवर होता? त्या प्रश्नांचे उत्तर मला त्याच्या चेहऱ्यावरून मिळाले नाही.

जेमतेम अर्धा तास लोटला असेल, कानाचे पडदे फाटून जातील इतक्या कर्ण, कठोर सिंहगर्जना, हत्तींचे चीत्कार ऐकू येऊ लागले. किल्ल्याचं सर्व मैदान क्रूरप्राण्यांच्या आवाजाने जमिनीपासून आकाशापर्यंत दुमदुमले.

समरसेन चटदिशी उठून उभा राहिला आणि राजवाड्याच्या समोरच्या उंच

गच्चीवर जाऊन उभा राहिला. तेथून पाहिलं तर वाड्यासमोर उघडे मैदान व त्याचबरोबर सिंहद्वार व त्याच्या पलीकडे उभे असलेली बडखोर प्रजा स्पष्ट दिसत होती.

समरसेनाच्या पाठोपाठ मी गेलो व त्याच्या पाठीमागे जाऊन उभा राहिलो. पिंजऱ्यातून बाहेर सोडलेले सिंह व इतर जनावरे मनाला वाटेल तिकडे हिंडत फिरत होती. काही जनावरे सिंहद्वाराला जे लोखंडी जाड पत्रे बसविलेले होते त्यांच्या भोकातून बाहेर पहात होती किंवा आपले पंजे बाहेर काढून गर्जना करीत होती.

"शिवदत्ता, तू काय पण गमतीदार युक्ती काढलीस रे!" म्हणत समरसेन माझ्याकडे पाहून हंसला, या क्रूर प्राण्यांच्या भीतीनेच सिंहद्वार फोडायला निघालेले या लोकांचे हात आंखडले आहेत. परंतु हे सर्व आपल्याला काही वेळ श्वास घ्यायला मिळावा एवढ्या पुरतेच आहे, असे मला वाटते. ही बंडाळी करविण्याला मूळ कारण कोण आहे? सर्व अनपेक्षितच वाटते आहे!" असे म्हणत समरसेनाने मागे वळून पाहिले.

नरवाहन आमच्या थोडा मागे हात बांधून उभा होता. तो आमच्या जवळ येऊन म्हणाला—"समरसेना, त्यांना राजाला पदच्युत करावयाचे आहे, म्हणे! तो हट्ट धरून बसले आहेत ते. त्यांचा पुढारी कोण आहे, हे मलाही माहीत नाही."

समरसेन काही वेळ गप्प राहिल्यावर म्हणाला—"देशात इतके मोठे अराजक माजलं आहे, याची मला थोडी देखील कल्पना नव्हती. राजधानीच्या बाहेर शत्रू उभा ठाकला आहे आणि किल्ल्याच्या आत त्याने फितवलेली प्रजा बंडाळी करायला उतारू आहे. यांना राजा सिंहासनावरून उतरला तर पुरे आहे; शत्रूला मात्र राज्याधिकारही पाहिजे आहे! मला वाटते, हीच परिस्थिती आहे. शिवदत्ता-तुला सुद्धा हेच वाटते आहे ना?" समर, सेनाने मला विचारलं. (क्रमशः)



# अनमोल हिरा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, मध्यरात्र उलटून गेली आहे. अशा वेळी तू जी मेहनत करतो आहेस ती पाहून मला तुझी कीव येते. काही तरी मोठी संपदा किंवा कीर्तीप्रतिष्ठा लाभावी या आशेने तू ही मेहनत करीत असशील कदाचित्! मला ते माहीत नाही. परंतु कधी कधी अशा इच्छा जास्त कष्ट व नुकसान होण्यास कारणीभूत होतात. याचे उदाहरण म्हणून मी तुला एक राजा व लाकूडफोड्या यांची गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

वज्रगिरी नावाच्या राज्याचा अधिपती रविवर्मा हा होता. त्या राज्याच्या एका



जंगलात दगडू नावाचा एक लाकूडफोड्या रहात असे. त्याच्या मुलाचे नाव गोपू. तो दहा वर्षांचा होता. बापाने त्याला शाळेत घातले परंतु गोपू जंगलात भटके आणि खेळण्यात सर्व दिवस घालवी. बापाच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करी.

एके दिवशी गोपू एका ओढ्याच्या काठी वाळूत खेळत बसला असतां विविध रंग फेकणारा गारगोटीसारखा एक खडा दिसला. तो दगड घेऊन गोपू काही वेळ खेळत राहिला आणि घरी जाताना तो खडा घेऊन गेला. गोपूचा बाप लाकडाची मोळी घेऊन घरी परतला व तो दगड पाहून खूष झाला.

गोपूचा गोविंद नावाचा एक बालमित्र होता. गोपूने तो खडा आपल्या मित्राला दाखविला. गोविंदला गोपूचा हेवा वाटू लागला. म्हणून त्याने तो दगड चोरायचे ठरविले. त्याने संध्याकाळपर्यंत गोपूकडेच खेळत राहून गोपूच्या दृष्टिआड तो खडा चोरला आणि घरी निघून गेला.

गोविंदचा बाप दारुड्या होता. त्या दिवशी रात्री गोविंद झोपल्यावर त्याच्या बाप तो हिरा दारूच्या दुकानात घेऊन गेला. त्या दुकानात एक जण जव्हेऱ्याच्या दुकानात काम करणारा येत होता. त्याची नजर त्या हिऱ्यावर पडली. त्याने मूल्यवान हिरा असल्याचे पाहतांच ओळखले.

गोविंदचा बाप दारूच्या धुंदीत असतां त्याच्या नकळत जव्हेऱ्याच्या नोकराने तो चोरला आणि दुसऱ्या दिवशी शहरातल्या एका जव्हेऱ्याच्या दुकानात घेऊन गेला.

जव्हेऱ्याने तो मूल्यवान हिरा असल्याचे ओळखले. परंतु त्याने त्याला ते कळले असल्याचे तोंडावर उमटू दिले नाही. म्हणून त्याला आश्चर्य वाटत होते तरी ते न दर्शवितां तोंड वाकडे करून म्हणाला—"काय रे, तुला कोठे मिळाला हा दगड? हा तर साधा काचेचा तुकडा दिसतो आहे. चार पैसे सुद्धा मिळणार नाहीत. तरी तू एवढी मेहनत करून आणा लावून हा दगड आणून दिला आहेस, म्हणून तुला मी चार रुपये देतो." असे सांगून त्याने चार रुपये त्या नोकराला दिले.

त्या दिवशी रात्री जव्हेऱ्याने तो हिरा सहाणेवर घासून पुसून उजळवला आणि त्याची कांती पाहून त्याचे डोळे दिपून गेले. वज्रगिरीचा राजा रविवर्मा हा रत्न पारखी होता व त्याला हिऱ्यांचे वेडच होतं. जव्हेऱ्याला ती गोष्ट माहीत होती. म्हणून त्याला नेऊन दाखविला तर हिऱ्याची चांगली किंमत मिळेल या आशेने त्या जव्हेऱ्याला परमानंद झाला.

उजाडतांच जव्हेरी राजाकडे गेला. हिरा पाहून राजा रविवर्मा खूष झाला तो हिरा त्याच्या मुकुटात शोभण्यासारखा आहे असे वाटून राजाने मोठी किंमत देऊन जव्हेऱ्याकडून विकत घेतला.

दुसऱ्या दिवशी राजाने तो हिरा आपल्या मुकुटात बसवून मुकुट घातला आणि दरबारात पाऊल टाकले. राजसभेत सर्वत्र त्या हिऱ्यातून निघणारी विविध रंगाची किरणे पसरली. सर्व दरबारी थक्क होऊन त्या हिऱ्याकडे पहात राहिले. अर्थातच राजाला त्याचा फार आनंद झाला.

त्या अनमोल हिऱ्याची कीर्ती शेजारचा राजा वीरसिंह याच्या कानापर्यंत पोचली. सैनिक शक्ति व संपत्ति दोन्ही दृष्टीने तो



राजा रविवर्म्यापेक्षा काकणभर मोठाच होता. म्हणून त्याला हेवा वाटू लागला की आपल्याला तो हिरा मिळाला नाही. आपण तो आपल्या मुकुटात बसवायला हवा होता.

तो विचार मनात येतांच वीरसिंहने रविवर्म्याकडे निरोप पाठविला की त्याने तो हिरा मुकुटाचाने दूतावरोबर पाठवून द्यावा, किंवा युद्धास तयार रहावे. वीरसिंहा समोर आपल्याला युद्धात पराभवच सहन करावा लागेल. हे रविवर्माला चांगले ठाऊक होते. परंतु हिऱ्याचा मोह सोडवेना आणि स्वाभिमानाचा प्रश्न ही होता. म्हणून रविवर्म्याने वीरसिंहाच्या दूताला



नकारात्मक उत्तर देऊन परत पाठविला. अर्थातच वीरसिंह वज्रगिरी राज्यावर चाल करून आला आणि त्याने रविवर्म्याचा पूर्ण पराभव केला. त्याने रविवर्म्याच्या मुकुटातील हिऱ्याबरोबर त्याचे राज्यही बळकावले. त्याने हिरा मुकुटात बसविण्यासाठी कारागिरांस बोलविले. हिरा एका सोन्याच्या तबकात ठेवून तो शयन-गृहात गेला.

वीरसिंहाचा पांच वर्षांचा मुलगा हिरा पाहून नाचू लागला आणि तो घेऊन राजो-द्यानात गेला. त्यावेळी आकाशातल्या एका घारीने तो हिरा काहीतरी खाद्यपदार्थ असावाअसे समजून तो झडप मारून उचलून नेला. वीरसिंहाला कळेना कां हिरा कोठे व कसा नाहीसा झाला. दासदासींना विचारल्या त्या म्हणाल्या त्यांनी तो हिरा पाहिलाच नाही. राजकुमार हिऱ्याची गोष्ट पार विसरून गेला.

घार घेऊन एका झाडावर जाऊन बसली व तो हिरा खाण्याचा प्रयत्न करू लागली. परंतु ती खाण्याची वस्तु नाही हे तिला कळले. म्हणून तो हिरा तसाच झाडावर टाकून घार निघून गेली.

एकदां गोपूचा बाप दगडू त्याच झाडा-वर लाकडे तोडायला आला. तो लाकडे तोडायला झाडावर चढला तेव्हां दोन फांद्यांच्या सांधीत त्याला तो हिरा दिसला. दगडूला क्षणभर तो हिरा पाहून फार आनंद झाला. हिरा उचलायला त्याने हात पुढे केला, परंतु तत्क्षण त्याने हात मागे घेतला आणि झाडावरून खाली आला. त्याने मागे वळूनही पाहिले नाही आणि आपल्या घरी परतला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, मला वज्रगिरीच्या राजाच्या वेडेपणा इतकाच लाकूडतोड्या दगडूचाही वेडेपणा पाहून हसू येते. त्या अनमोल हिऱ्याच्या मोहानेच तर रविवर्म्याने आपला पराभव आपल्यावर ओढून घेतला! नाही तर आपल्याहून वरचढ शक्तिशाली राजाशी त्याने वैर कां केले असते ? वीरसिंहाने मागतांच त्याने तो हिरा देऊन टाकला असता तर निदान त्याचे राज्य वांचले असते. तसेच त्या लाकूड तोड्याने त्या हिऱ्याला हात कां लावला नाही ? तो हिरा त्याने एखाद्या जव्हेऱ्याला विकला असता तर त्याचे सात पिढ्यांचे दारिद्र्य पार नाहीसे झाले नसते का ? या शंकांचे समाधान कारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"राजा किंवा लाकूडतोड्याच्या वागण्यात विक्षिप्तपणा मला मुळीच दिसत नाही. प्रत्येकाची समाजात एक विशिष्ट मानमर्यादा असते. मानव प्रकृतीनुसार एखाद्या अपूर्व वस्तूचा मोह होणे स्वाभाविक आहे. शेजारच्या राजाने मागतांच हिरा देणे म्हणजे शत्रू-समोर मान तुकविण्यासारखेच आहे. हा क्षत्रियोचित धर्म नाही. असला भितरेपणा राजाला शोभत नाही. म्हणून त्याने जे केले ते क्षत्रियधर्माला अनुसरूनच केले. आता पराभवाची गोष्ट. युद्धात जय किंवा पराजय धर्म व नीति यांवर अवलंबून नसतात.

लाकूडतोड्याला कदाचित् कळले असावे की एका अनमोल हिऱ्यासाठी एक राजा स्वतःचे सिंहासनच घालवून बसला होता. म्हणून हिरा हा सर्वनाशाला कारण होऊ शकतो, ही त्याची ठाम समजूत झाली. जेव्हां धनलोभ व मृत्युभय दोन्हींचा मानव-हृदयात प्रवेश होतो तेव्हां बुद्धिमान व्यक्ति स्वतःचा जीव वांच-विण्याचाच प्रथम प्रयत्न करतो. म्हणून लाकूडतोड्या स्वतःचा जीव वांच-विण्यासाठी त्या हिऱ्याला शिवला सुद्धां नाही आणि आपल्या गावाच्या दिशेने पळून गेला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# खेडेगावातली नोकरशाही

रंगपूरचे इनामदार त्यांना फुरसत मिळे तेव्हां आपल्या इनाम गांवांची पाहाणी करायला जात व कुळांच्या सुखदु:खाची चवकशी करीत.

एकदा ते रामपूर नावाच्या गावी गेले असतां प्रमुख मंडळी सोमेश्वराच्या देवळात जमली. बसण्याची व्यवस्था सभामंडपात होती. इनामदारसाहेब व गावचा पाटील व्यास-पीठावर बसले होते. गावकरी एकेक करून येऊ लागले होते. परंतु येणारी मंडळी व्यास पीठासमोरच्या चार खुर्च्या सोडून त्या मागच्याच जागी स्वत:ला सावरून बसू लागले.

इनामदारसाहेबांना थोडे आश्चर्यच वाटले व त्यांनी विचारले–"या खुर्च्या अशा तुम्ही रिकाम्या कां सोडल्यात ? गावातल्या वडीलधाऱ्या प्रमुख मंडळींनी बसावे की !"

इनामदारांनी ते म्हटल्याबरोबर सभेत बसलेला एक जण उठून म्हणाला–"बलाढ भीमराव, रावजी खोत, पार्वतीबाईचा धाकटा भाऊ सोनदेव आणि सावकार धनशेट निघाले असतील. त्यांना फर्शीवर बसायला सांगितले तर बरं होणार नाही."

ते उत्तर ऐकून इनामदारांना गावातली वास्तविक स्थिती लक्षात आली. ते म्हणाले–"ओहो, म्हणजे गावातली नोकरशाही तुमचे मायबाप सरकार म्हणविणारे असेच लोक आहेत तर !" ते पाटलावर कावले व म्हणाले–"पाटील, तुम्हांला मी कमी करतो आणि सभेत उघड हिंमत करून निर्भयपणाने खरी गोष्ट उघडकीस आणणाऱ्या व्यक्तीला त्या पदावर नेमतो !"

ते ऐकून सभेत हजर असलेल्या गावकऱ्यांनी टाळ्या वाजविल्या.





इस्लामपूरचे जमिनदार गोविंदराव यांच्याकडे गोपाळराव नावाचे एक मुनीम होते. ते एक प्रमाणिक व स्वामिभक्त व्यक्ति म्हणून प्रसिद्ध होते. म्हणून जमिनदारांची त्यांच्यावर फार मर्जी होती.

एकदा गोपाळराव आजारी पडले. जमिनदाराने आपल्या खास वैद्यबुवांकरवी गोपाळरावांचा एक आठवडा भर इलाज केला, परंतु गुण पडला नाही. तेव्हां वैद्यबुवांना वाटले की मुनीमांच्या प्रकृतीत काही सुधार होणे शक्य नाही. त्यांनी ती गोष्ट गोपाळरावांच्या घरच्या लोकांना कळविली.

दिवसेंदिवस प्रकृती खालावतच गेलेली ओळखून गोपाळरावांनी जमिनदाराला विनंती केली–"मालक, मला एकुलता एक मुलगा आहे. पाय धरून विनंती करतो, माझ्या या मुलाला अन्नाला लावा. आपण कृपा केली नाहीत, तर माझी सर्व मुलंबाळं अन्नान्न करीत रस्त्यावर पडतील." गोपाळरावांचे डोळे पाणावले.

गोविंदरावांनी आपल्या मुनिमांचा हात हातात घेऊन म्हटलं–"गोपाळराव, काळजी करू नका. तुमच्या नंतर मी तुमच्या मुलालाच मुनीम नेमणार आहे!"

त्यानंतर तीनच दिवसांनी गोपाळरावांचे प्राणोत्क्रमण झाले. एका पंधरवड्यानंतर जमिनदाराने गोपाळरावांच्या मुलाकडे निरोप पाठविला व तो येऊन जमिनदार साहेबांना भेटला. त्याच वेळी शेजारच्या गांवच्या एका व्यक्तीने येऊन जमिनदार साहेबांना एक चिट्ठी दिली. ती चिट्ठी शिवपूरच्या जमिनदाराने पाठविली होती. त्या चिट्ठीत चिट्ठी आणणारी व्यक्ती शिवपूरच्या जमिनदाराकडे सहा वर्षांपासून मुनीम म्हणून काम करीत होती. परंतु ती

व्यक्ती इस्लामपूरचीच राहणार असल्या-कारणाने गोविंदरावांकडे मुनीम म्हणून काम मिळालं तर सोयीचे होईल. यास्तव त्या व्यक्तीची नेमणूक करावी, असे लिहिले होते.

ते पत्र वाचून गोपाळराव विचारात पडले, ज्या व्यक्तीला, मुनीम म्हणून काम करण्याचा सहा वर्षांचा अनुभव आहे, त्याला काय म्हणून सांगून नोकरी द्यावयाची नाही? परंतु तसे केले तर एका विश्वास पात्र जुन्या नोकराला मरतेवेळी दिलेले वचन मोडल्याचं पाप लागणार आणि त्या गरिबाच्या कुटुंबाच्या पोटावर पाय येणार! म्हणून काही वेळ विचार करून जमिनदार त्या व्यक्तीला म्हणाला–"तुमच्या जमिनदार साहेबांनी गतवर्षी माझ्या कडून एक हजार रुपये उधार घेतले होते. परंतु ती रक्कम फेडली नाही. तू लगेच जाऊन त्यांना ही गोष्ट सांग व मला उद्या येऊन भेट."

तो माणूस लगेच निघून गेला आणि दुसऱ्या दिवशी गोविंदरावांना येऊन म्हणाला–"मालक, आमचे मालक म्हणाले, त्यांनी आपल्याकडून कधीच कोणती रक्कम उधार मागून घेतली नव्हती. त्यांच्या जमिनदारीच्या गावांपैकी आणखी एक छोटेसे गाव शिवपूर नावाचे आहे. तेथल्या कोण्या व्यक्तीने कदाचित आपणांकडून कर्ज घेतले असावे."

तेव्हां गोविंदराव हसून म्हणाले–"गृहस्था! तू त्यांच्या कडे सहा वर्षांपासून त्यांचा सर्व व्यवहार पाहतो आहेस आणि तुला एवढे लक्षात राहू नये की माझ्या सारख्याने तुझ्या मालकाला कर्ज दिले आहे की नाही? मी तुझी परीक्षा घेण्यासाठी हे थोडेसे खोटे बोललो होतो. तू आपल्या मालकाला विचारून आलो, म्हणतो आहेस! म्हणजे तुला स्वतःला शिवपूरच्या जमिनदार साहेबांच्या हिशोबाची मुळीच माहिती नाही किंवा तुला काही आठवतही नाही. अशा माणसाला मी मुनीम नेमून गोत्यात पडू म्हणतोस!"

त्यानंतर गोविंदरावांनी गोपाळरावांच्या मुलालाच मुनीम पदावर नेमले.



# स्वतःचाच फायदा

एका गावात सदोबा नावाचा एक तरुण रहात होता. तो खूप आळशी होता. लोकांनी कितिदा हांकलले तरी तो पुन्हा पुन्हा घरोघरी जाऊन भीक मागत असे, आणि जे काही मिळे ते खाऊन-पिऊन गावाच्या कडेला असलेल्या देवीच्या देवळात जाऊन मजेत लोळत पडत असे.

एकदा लागोपाठ दोन दिवस त्याला कुठेही खायला मिळाले नाही तेव्हां भुकेने तडफडत पायपीट करीत तो देवीच्या देवळात पोहोचला, आणि मनातल्या मनात बडबडू लागला–"ह्या गावांत अन्नदानाचा महिमा जाणणारे कोणी पुण्यात्मा राहिलेले दिसत नाहीत."

सदोबाची दशा पाहून देवीला दया आली, तिने प्रत्यक्ष दर्शन दिले आणि म्हणाली, "अरे, सदोबा! तू धट्टाकट्टा आहेस. तर अशा परिस्थितीत तू भीक कशाला मागतोस? तू रोज मेहनत मजुरी करून एक रुपया मला आणून दिलास तर मी तुला दहा रुपये देईन."

ते ऐकून सदोबा खूप आनंदित झाला. विनयपूर्वक हात जोडून म्हणाला–"देवी मी रोज मेहनत कशाला केली पाहिजे? तू जे मला दहा रुपये देण्याचे वचन दिले आहेस त्यातला एक रुपया तूच ठेवून घे. आणि बाकीचे नऊ रुपये मला दे. ह्यात एक रुपयाचा तुलाच फायदा होईल."





# दप्तरी रेडे

लक्ष्मीपूरचा जमिनदार सयाजी ह्याची काही शेती कृष्णापूरला पण होती. त्या शेताची देखरेख करण्यासाठी त्याने व्यंकटेश नावाच्या शेतकऱ्याची नेमणूक केली. व्यंकटेश ईमानदार व विश्वासपात्र होता. त्यामुळे त्याच्यावर देखरेख करण्यासाठी जमिनदाराला दुसऱ्या कोणाची गरज भासली नाही.

शेताच्या कामाकरिता जमिनदाराने दोन रेडे खरेदी केले व ते व्यंकटेशच्या हाती सोपविले. व्यंकटेश वेळच्यावेळी रेड्यांचे दाणा-पाणी करीत असे व दुपारच्या वेळेला त्यांना तळ्यावर घेवून जाऊन स्वच्छ धूत असे. रेडे धष्टपुष्ट व दणकट होते, त्यामुळ कितीही भारी वजन ते सहजपणे वाहून नेत असत. गावातील माणसे सांगत फिरत की ह्या रेड्याची बरोबरी करणारे रेडे शोधून कुठे सापडणार नाहीत. व्यंकटेशने त्यांची नांवे प्रेमाने 'दप्तरी रेडे' म्हणून ठेवल होते.

जमिनदाराचा मेहुणा रामदेव हा कृष्णापूरच्या शेतीचा सर्व जमाखर्च लिहून नेहमी पैसे गिळंकृत करण्याचा विचार करीत असे. परंतु व्यंकटेश ईमानदार होता. म्हणून त्याची डाळ तेथे शिजत नसे. ह्या कारणामुळे रामदेव व्यंकटेश्वर जळफळत असे.

एके दिवशी धान्याने भरलेली कोणाची तरी गाडी जमिनदाराच्या शेताजवळच्या नाल्यात अडकली. जवळपासच्या शेतात काम करणाऱ्या मजूरांनी येऊन गाडी बाहेर काढण्याचा प्रयत्न केला, परंतु चिखलात रुतून बसलेल्या रेड्यांना गाडी बाहेर काढणे काही जमले नाही. तेव्हां त्यांच्यावर दया येऊन व्यंकटेशने आपल्या रेड्यांना गाडीला जुंपून ती गाडी चिखलाच्या बाहेर काढून दिली.

ही बातमी समजताच रामदेव लक्ष्मीपूरला गेला आणि त्याने जमिनदाराजवळ गाऱ्हाणे सांगितले–"मालक, व्यंकटेश आपल्या रेड्यांना दुसऱ्याच्या कामाकरिता उपयोगात आणतो; आपण त्यांच्यावर किती खर्च करतो तो काय दुसऱ्याचे काम करायला का? आपल्या शेतात काम करायला म्हणूनच ना?

ते ऐकून जमिनदार हंसला आणि मिशांना पीळ देत म्हणाला–"रामदेव, चिखलात रुतून बसलेल्या गाडीला जर आपल्या रेड्यांनी बाहेर काढले तर ह्या गोष्टीचा आपल्याला अभिमान वाटायला हवा. ही गोष्ट मी आधीच ऐकली आहे! त्यावर मी बक्षिसरूपे पंचवीस रुपये व्यंकटेशकडे पाठवूनही दिले आहेत."

ते ऐकल्यावर रामदेवचा चेहरा एकदम खाली पडला. तो आपल्या मेहुण्याबरोबर गुपचुप जेवून कृष्णापूरला परत आला.

त्यानंतर एका सणाच्या दिवशी जमिनदाराने आनंदराव नावाच्या आपल्या एका मित्राला लक्ष्मीपूरला येण्याचे निमंत्रण पाठविले. आनंदराव जमिनदाराच्या घरी येऊन एक आठवडा लोटला. तेव्हां एके दिवशी एका माणसाला बरोबर घेऊन जमिनदाराची शेती बघून तो कृष्णापूरला परत आला,

नांगराला जोडलेल्या रेड्यांना पाहून आनंदरावांनी व्यंकटेशला विचारले–"हे रेडे लहानपणापासून तुम्हीच पाळले आहेत



ना ? मी असे ऐकले आहे की, ह्या रेड्यांची बरोबरी दुसरे कोणतेही रेडे करूं शकत नाहीत."

रेड्यांची स्तुती ऐकताच व्यंकटेशला अत्यंत आनंद झाला. आणि म्हणाला– "सरकार हे तर पशु बिचारे मुके आहेत ह्यांची काळजी वाजवीपेक्षा जास्त घ्यावी लागते. मला तर कचेरीत जावेच लागत नाही. ह्या रेड्यांनाच मी कचेरीचे स्थान देऊन माझ्या जिवापलीकडे मी त्यांना जपतो."

त्यावेळेला आनंदराव बरोबर रामदेवपण होता. त्याचे उत्तर ऐकून तो मनातल्या मनांत जळफळला. त्यानंतर आनंदराव बरोबर जाऊन जमिनदाराकडे म्हणाला– "मालक, आपला शेतकरी मजूर व्यंकटेश आपल्या कचेरीबद्दल जें तोंडाला येईल ते बरळतो आहे. त्याच्या नजरेला रेडे आणि कचेरी यात फरकच नाही. तो रेड्यांनाच कचेरी समजतो पाहिजे तर आपण आनंदरावांनाच विचारा!"

आनंदरावानी व्यंकटेशबरोबर जे संभाषण केले होते, ते त्यांनी सर्वच्यासर्व जमिनदाराला सांगितले.

जमिनदार आनंदरावांच्या तोंडून ऐकलेले संभाषण ऐकून खूप आनंदित झाला आणि म्हणाला– "व्यंकटेशने ह्या गोष्टी एकदांच नाही तर अनेकदा मला सांगितल्या आहेत. तो रेड्यांनाच आपली कचेरी समजून काळजीपूर्वक त्यांचे पालनपोषण करतो. त्यावरूनच तो किती विश्वासपात्र आहे, हे स्पष्ट समजते. आमच्या कचेरीमध्ये पैशांचा दुरुपयोग करून खोटा हिशोब लिहिणारे अनेक म्हशेपण आहेत त्या म्हश्यांचा मला खूप राग येतो. त्यांना थोडा फार घाबरतो सुद्धा!"

त्यानंतर जमिनदार रामदेवला म्हणाला– "कृष्णापूरला पोहोचताच माझ्यातर्फे म्हणून व्यंकटेशला पंचवीस रुपये बक्षिस द्या."

रामदेवची लबाडी चालली नाही. उलट व्यंकटेशला परत पंचवीस रुपये बक्षिस मिळणार म्हणून त्याचे हृदय दडपून गेले.





# गुरूची जबाबदारी

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी तक्षशिला नगरीत एका प्रसिद्ध शिल्पकाराच्या रूपे जन्म घेतला. त्यांच्याकडे शिल्पविद्या शिकण्यासाठी देशाच्या कानाकोपऱ्यांतून अनेक राजकुमार येत असत.

तक्षशिला नगरातील शिल्पाचार्यांचे यश ऐकून काशीच्या राजाने आपल्या मुलाला त्यांच्याकडे विद्याभ्यासासाठी पाठविण्याचे ठरविले. परंतु सोळा वर्षाच्या तरुण राजकुमाराला एकटयाला एवढ्या लांब तक्षशिला येथे पाठविणे मंत्र्याला व दरबारी लोकांना काही आवडले नाही.

त्यावर विचार करून सर्वांनी म्हटले– "महाराज शिलाविद्या शिकविणारे कित्येक लोक आपल्या राज्यात सुद्धा आहेत, तेव्हां राजकुमाराला तक्षशिला येथेच पाठविण्याची गरजच काय?"

राजाने कोणाचेही ऐकले नाही. आपल्या मुलाला राजधानीत शिल्पकला आत्मसात् करणे कठिण जाईल. असा विचार करून राजाने आपल्या मुलाच्या हातांत एक खडावांचा जोड व एक ताडपत्री छत्री दिली व म्हणाला– "तू तक्षशिला येथे जाऊन तेथील शिल्पाचार्यांकडे शिक्षण घे, शिक्षण संपताच परत ये. त्यांना गुरुदक्षिणेच्या रूपे द्यायला एक हजार चांदीची नाणी आपल्याबरोबर घेऊन जा."

राजकुमार आपल्या वडिलांची आज्ञा घेऊन तेथून निघाला. जातांना एक हजार चांदीच्या नाण्याच्या भरलेल्या गाठोड्याच्या वजनाने थकून जाऊन वाटेत ठिकठिकाणी विश्रांती करिता थांबत तो तक्षशिलेला येऊन पोहोचला.

राजकुमाराने गुरूचे दर्शन घेऊन आपल्या येण्याचे कारण सांगितले व एक हजार



चांदीच्या नाण्यांची थैली त्याने गुरूच्या हातात सोपवून विद्याभ्यासास आरंभ केला. राजकुमाराचा विद्याभ्यास चांगल्या तऱ्हेने सुरू झाला. त्याच्या प्रखर बुद्धीने गुरूसुद्धा प्रभावित झाले.

थोडे दिवस लोटले. गुरु आणि शिष्य रोज गावाच्या बाहेर वहात असलेल्या नदीत आंघोळ करून परत येत. एक दिवस ते दोघे स्नान करीत होते, त्या वेळी एक म्हातारी तेथे आली. हातातील तीळ स्वच्छ धुऊन तिने नदीच्या काठावर एका फडक्या-वर वाळत घातले.

राजकुमार तीळ पाहून झटपट आपली आंघोळ उरकून तेथे गेला व म्हातारीची नजर चुकवून त्याने एक मूठभर तीळ घेतले व तोंडात टाकले. ते म्हातारीने पाहिले, परंतु ती गप्प बसली.

दुसऱ्या दिवशीपण राजकुमाराने तसेच केले, म्हातारीने पाहून न पाहिलेसे केले. तिसऱ्या दिवशीपण राजकुमाराने मूठभर तीळ खाल्ले. म्हातारीला चोरून तीळ खाल्लेले पाहून राजकुमाराचा खूप राग आला.

जेव्हां शिल्पाचार्य स्नान करून काठांवर येऊन बसले तेव्हां म्हातारीने गुरूकडे तक्रार केली—"गुरुवर्य, तीन दिवस आपला शिष्य माझे तीळ चोरून खात आहे. तीळ नाहीसे झाल्याबद्दल मला दुःख होत नाही परंतु त्या तरुणाची चोरी करण्याची संवय पाहून मला दुःख होत आहे. ही गोष्ट आपल्या यशाला काळीमा फासणारी आहे. कृपा करून त्याला तुम्ही शिक्षा अशी करा की, पुन्हां तो चोरी करणार नाही.

घरी परत येताच गुरूंनी बाकीच्या शिष्यांना राजकुमाराचे हात घट्ट बांधण्यास सांगितले व राजकुमाराच्या पाठीवर काठीने तीन वेळा मारले आणि म्हणाले—"तू जे वाईट काम केलेस त्याबद्दल ही शिक्षा तुला मिळाली आहे. पुन्हां असे काम करू नकोस."

राजकुमाराला गुरूचा खूप राग आला. तो फक्त काशी राज्यापुरता राजकुमार होता. येथे सर्वांच्या प्रमाणे तो सर्वसाधारण माणूस होता. त्याला शिक्षा करण्याचे काम गुरूचेच होते.

राजकुमार क्रोधाने लाल झाला. त्याने मागचा पुढचा विचार न करता शपथ घेतली—"मी राजा झाल्यावर ह्या दुष्टाला काहीतरी कारणाने काशी राज्यात बोलावून त्याचा प्राण घेईन."

काही दिवसांनी राजकुमाराचे शिक्षण पूर्ण झाले. काशीला परत निघतांना त्याने आपल्या गुरूला नमस्कार करून त्यांचा आशीर्वाद घेतला.

त्यानंतर राजकुमार आपल्या गुरूंना म्हणाला—"गुरुवर्य, मी राजा झाल्यानंतर आपण काशी राज्यात नक्की आले पाहिजे. त्या वेळेस मी आपला चांगल्या तऱ्हेने आदर सत्कार करावा म्हणतो."

आपल्या शिष्याचे आमंत्रण ऐकून गुरु-वर्यांना खूप आनंद झाला. त्यांनी येण्याचे आश्वासन दिले.

काशी राज्यात पोहोचताच थोड्या दिवसांनी राजकुमाराचा राज्याभिषेक झाला. एके दिवशी त्याला गुरूची आठवण झाली. त्याने तावडतोब एका नोकराला बोलावून आज्ञा केली—"तू तक्षशिला येथे जाऊन तेथील शिल्पाचार्यांचे दर्शन घे आणि त्यांना माझे हे निमंत्रण-पत्र दे."



शिल्पाचार्य निरोप मिळतांच काशीला गेले नाहीत. त्यांनी विचार केला की, राजा गादीवर बसण्याच्या आनंदात असणार. त्याला राज्यकारभाराचा अनुभव आल्यानंतर त्याला भेटायला जाणेच चांगले.

असा विचारकरून शिल्पचार्य काही दिवसांनी काशी राजाला भेटायला काशी राज्यात आले व राजमहालात रहाणाऱ्या आपल्या शिष्याला भेटायला गेले. राजाचा गुरु म्हणून दरबारी लोकांनी त्यांची बडदास्त चांगल्या तऱ्हेने राखीवली आणि त्यांना आदरपूर्वक एका उंच आसनावर बसण्यास सांगितले.

गुरूना पाहताच राजाला त्यांचे पूर्वीचे वागणे आठवले व राग जास्तच वाढला. त्याने गुरूकडे क्रोधाने दृष्टिक्षेप केला व विचारले–"मूठभर तीळ खाणाऱ्या मला शिक्षा देणाऱ्याला असा हातात आलेला असतांना सोडून देता येईल काय?"

राजाने विचार केला की, राजदरबारी लोकांना सर्व सांगून शिल्पाचार्यांच्या मनांत मरणाचे भय निर्माण करून त्याला वेळ साधून मारणेच जास्त सोयिस्कर होईल. परंतु राजाला वाटले तसे शिल्पाचार्य घाबरले नाहीत. उलट ते सौम्य शब्दात राजाला म्हणाले–"हे राजा, जेव्हां तू माझ्याजवळ शिष्य म्हणून होतास तेव्हां तुझी जबाबदारी माझ्यावर होती व तू लायकीप्रमाणे काम केले नाहीस. शिष्याला वाईट मार्गापासून परावृत्त करून चांगल्या मार्गी लावणे हे गुरूचे कर्तव्य आहे. परंतु त्यावेळेस मी तुला शिक्षा न करता तसेच सोडून दिले असते तर आज तू काशी नगराचा राजा न होता काशी राज्यातला चोर लुटेरा झाला असतास. बुद्धिमान लोक जेव्हां काही अपराध करतात तेव्हां त्यांना शिक्षा देणाऱ्यावर नाराज होऊन चालत नाही. तर त्यांच्यावर जास्त प्रेम व आपुलकी वाटावयास पाहिजे."

त्यामुळे राजदरबाऱ्यांसमोर खरी गोष्ट बाहेर आली. राजाचा अपमान झाला. राजा सिंहासनावरून उतरून आला व त्याने खाली वाकून गुरूचे पाय धरले आणि म्हणाला–"गुरुवर्य, माझे मन परत एकदा वाईट मार्गाने जात होते, परंतु परत आपण मला चांगला मार्ग दाखविलात मी आपला ऋणी राहीन."

राजात झालेला बदल पाहून सर्व दरबारी लोकांना व त्यांच्या बरोबर शिल्पाचार्यांना खूप आनंद झाला.

त्यानंतर राजाच्या सांगण्यावरून शिल्पाचार्यांनी आपले निवासस्थान काशीला आणले आणि राजाच्या दरबारी आचार्यांच्या पदावर राजाला चांगले मार्गदर्शन देत राहिले.



# पृथ्वीराज–संयोगिता-२

म्हातान्या दासीने कनोजला पोहोचताच सगळ्यात प्रथम संयोगितेच्या सखीशी मैत्री केली. तिने दासीला संयोगिते-कडे नेले. दासीच्या गोड बोलण्यावर व तिच्या गुणांवर संयोगिता भाळली.



संयोगितेच्या जवळ राहून तिची सेवा-शुश्रूषा करीत असतांना वेळ साधून दासीने पृथ्वीराजाबद्दल त्याच्या शौर्य व पराक्रमाच्या गोष्टी सांगून संयोगि-तेच्या मनांत त्याच्याबद्दल प्रेम निर्माण करण्याचा प्रयत्न केला.





दासीने कनोजला येतांनाच पृथ्वी-राजाची एक तसबीर बरोबर आणली होती. संयोगितेने जेव्हां पृथ्वीराजाची तसबीर पाहिली त्यावेळी तिला अजमेरला राजमहालात त्याला पाहि-ल्याचे आठवले. तेव्हां तिने निश्चय केला की, पृथ्वीराजाशिवाय कोणाशीहि मी लग्न करणार नाही.



राजा जयचंद्राने आपल्या दूतांकरवी लग्नाला योग्य अशा राजकुमारांकडे संयोगितेच्या लग्नाचे निमंत्रण पाठवले. कनौज नगरातील प्रजा मोठ्या उत्साहाने संयोगितेच्या स्वयंवराची वाट पहात होती.

विवाह प्रसंगी पुष्कळ राजपुत्र आले होते. संयोगितेच्या सखीने मंत्र्याकडून माहिती मिळविली की, लग्नाचे निमंत्रण पृथ्वीराजाला दिले गेले नाही. ती माहिती सखीने येऊन संयोगितेला सांगितली.





संयोगितेच्या सखीने राजाकडे जाऊन सांगितले की, संयोगितेने पृथ्वीराजाला पण निमंत्रण देण्याविषयी कळविले आहे. त्यावर जयचंद्र म्हणाला—"मी पहातो तो कोणत्या रूपाने लग्नमंडपात हजर राहतो ते." संयोगितेला माहीत होते की तिचे पिता पृथ्वीराजाशी कपट भावाने वागत होते. त्यामुळे ती काळजीत पडली.

आपल्या सखींच्या बरोबर लग्नमंडपात येत असतांना तिने दरवाज्याजवळ पृथ्वीराजाची एक मूर्त पाहिली. ती द्वारपालाच्या पोशाखाने नटवली होती. संयोगिता क्षणभर चकित झाली, परंतु एक निश्चय करून ती निघाली.





सुंदर सुंदर सुशोभित केलेल्या आसनांवर बसलेल्या राजकुमारांचा परिचय सखीने संयोगितेला करून दिला. संयोगितेने फिरून सर्व राजकुमारांच्या समोरून वरमाला नेली. परंतु कोणाच्याच गळ्यात घातली नाही.

लग्नमंडपातून बाहेर जात असलेल्या संयोगितेला पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. परंतु त्याचे काय कारण असावे कोणाच्याच लक्षात आले नाही. तेवढ्यात संयोगितेने दारावर उभी केलेल्या पृथ्वीराजाच्या प्रतिमेला हातातील वरमाला घातली व प्रणाम केला.





दुसऱ्याच क्षणी एक आश्चर्यकारक घटना घडली. प्रेक्षकांच्या पाठीमागून विजेच्या गतीने एक घोडेस्वार संयोगितेच्या आला जवळ. त्याने तिच्या कानांत काहीतरी सांगितले. संयोगितेने सुद्धा मंदहास्य करून मान हलविली.

सर्वजण आश्चर्यचकित होऊन पहात राहिले. तेवढ्यात संयोगिता घोड्यावर चढून बसली व त्याने घोड्याला टांच दिली तो वेषांतर करून आलेला पृथ्वीराजच होता. लोकांमध्ये गडबड गोंधळ उडाला. पृथ्वीराजाने घोडा भरधांव सोडला व संयोगितेसह त्याने तो प्रदेश सोडला.





जयचंद्राला अतिशय क्रोध आला आणि तो ओरडला–"त्या दोघांना पकडा." आपल्या राजाची आज्ञा मिळतांच सर्व घोडेस्वार पळून जाणाऱ्या पृथ्वीराजाचा पाठलाग करू लागले. तेथे गोंधळ उडाला. संयोगितेला भीतीने कांपरेच भरले. (पुढील अंकी समाप्त)

# जिवाची भीती

एके दिवशी राजाच्या महालातून एक हिऱ्यांचा तोडा नाहीसा झाला. तेव्हां अंतःपुरात तीन पाहरेकरी होते. त्यांना बोलावून राजाने दटावून भीती दाखवून विचारले. परंतु तिघांनी हिऱ्यांच्या तोड्याबद्दल काहीही माहिती नसल्याचे सांगितले.

त्यावर राजा अत्यंत संतापला. त्याने मांगाला बोलावून तिघांची डोकी छाटण्याची आज्ञा दिली. त्याचवेळी मंत्री तेथे आला. सर्व वृत्त ऐकून घेऊन म्हणाला–"महाराज, ह्या तिघांपैकी एकच चोर आहे, तेव्हां त्या अपराधाकरिता बाकी दोघांचा नाहक बळी घेणं न्यायाला धरून होणार नाही. तेव्हां मला माहीत आहे की, ह्यात चोर कोण आहे ?"

"तरमग त्याच चोराचे डोके छाटून टाका." राजा म्हणाला. मंत्र्याने पाहरेकऱ्यांना सांगितले–"हे पहा, मांगाच्या हातातील तलवार पाहून घाबरून जाऊ नका. तो त्याचेच डोके छाटील ज्यांने हिऱ्यांचा तोडा चोरला आहे. तुम्ही सर्वजण खाली मान करून शेवटची देवाची प्रार्थना करा."

त्यावर तिघांनी आपली डोकी खाली झुकवली परंतु त्यातला गंगाराम नावाचा शिपाई सारखे डोके वर करकरून मारेकऱ्याकडे पहात होता. त्यावर मंत्र्याने त्याच्याकडे बोट दाखवून आज्ञा केली व राजाला सांगितले–"राजा, हाच खरा चोर आहे !"

त्यानंतर राजाने आपल्या शिपायांकरवी गंगारामच्या घराची झडती घेवविल्यावर हिऱ्यांचा तोडा सांपडला. राजाने मंत्र्याची तारीफ केली व गंगारामला शिक्षा ठोठावली.





# मूर्खपणाचे फळ

**चा**ळीस वर्षांचा एक मध्यम वयाचा माणूस एका पांढऱ्या झिपऱ्या कुत्र्याला बरोबर घेऊन विजयनगरला चालला होता. रस्त्यात रामचंद्र नावाच्या माणसाची गाठ पडली.

गप्पा मारीत असताना रामचंद्राने आपण आपल्या मुलीच्या लग्नाकरिता दागिने खरेदी करण्यास जात असल्याचे सांगितले. तेव्हां त्याने वाटसरूला विचारले–"आपण ह्या कुत्र्याला गावांत कां घेऊन चालला आहांत ?"

"माझे नाव भैरव आहे. हा माझा पाळलेला कुत्रा आहे मी काही महत्वाच्या कामासाठी गावात जात आहे." असे उत्तर कुत्र्याच्या मालकाने दिले. सुंदर अशा त्या कुत्र्याला पाहून रामचंद्रचे मन त्याच्यावर जडले आणि पुढचा मागचा विचार न करता त्याने भैरवला विचारले–"आपण ह्या कुत्र्याला विकणार आहांत काय? ह्याची काय किंमत होईल ?"

तो प्रश्न ऐकून भैरवला खूप आश्चर्य वाटले त्याने रामचंद्रकडे पायांपासून डोक्या-पर्यंत न्याहाळले आणि म्हणाला–"ठीक आहे मी विकायला तयार आहे. ह्याची किंमत एक हजार रुपये आहे."

"एक हजार रुपये ! हा हव्यास बरोबर नाही. ह्याची किंमत पांच सहा रुपयांहून जास्त येणार नाही." रामचंद्र रागाने म्हणाला.

"अरे, तू ह्याला फायदा समज नाहीतर गैर फायदा समज, माझा ह्याच्याशी काहीही संबंध नाही ? माझ्या कुत्र्याची किंमत एक हजार रुपये आहे !" भैरवने दरडावून सांगितले.

आपण जी किंमत सांगितली आहेत तेवढी किंमत कोणी मूर्खच काय शतमूर्ख-सुद्धा देऊन खरेदी करणार नाही." रामचंद्र त्याची थट्टा करीत म्हणाला.

"ठीक आहे, तर आपण पैज लावू या, तुझ्या डोळ्यासमोर मी त्याला एक हजार रुपयांना विकून दाखवतो !" भैरवने पैज लावली.

"ठीक आहे. तू एक हजार रुपयांना जर कुत्रा विकलास तर मी तुला शंभर रुपये देईन आणि तू तो कुत्रा विकला नाहीस तर तू मला शंभर रुपये दिले पाहिजेस, समजले !" रामचंद्राने पैज लावली. नंतर ते दोघे विजयनगरच्या सगळ्यात मोठ्या बाजारात गेले. एका दोघांनी भैरवाला कुत्र्याची किंमत विचारली. त्याने एक हजार रुपये सांगितली. त्यावर सर्वजण त्याच्याकडे वेडातर नाही ना ह्या दृष्टीने पाहून पुढे जाऊ लागले.

"पहात आहात ना ! कुत्रा विकला जाणे तर दूरच, परंतु सर्व लोक आपल्याला वेडा समजत आहेत !" रामचंद्र आनंदाने म्हणाला.

"घाई करू नकोस, मी माझ्या कुत्र्याला एक हजार रुपयांना विकतो," असे म्हणत भैरव गल्लीच्या कोपऱ्यावर पिंजऱ्यात पोपट ठेवून विकण्यास बसलेल्या माणसा-जवळ आला.

"अरे वाहवा ! माझ्या कुत्र्यासारखेच हे पोपटपण देव जातीचेच दिसत आहेत ऐ बाबा, एका पोपटाची काय किंमत आहे ?" भैरवने विचारले.



"चार रुपये!" पोपटवाल्याने झटक्यात उत्तर दिले.

"अरे इतका स्वस्त! तू कोणी भोळा-भाबडा दिसतो आहेस मी एक पोपट पांच रुपयाला विकत घेतो. विकायला तयार आहेस?" पिंजऱ्यातल्या दोन पोपटांना भैरवने आपल्या हातात काढून घेतले व विचारले.

"काय म्हणालास? तू माझ्या एका पोपटाला पांच रुपये देऊन खरेदी करतोस? तुझे डोके तर ताळ्यावर आहे ना?"

भैरव त्याच्या विचारण्याकडे दुर्लक्ष करून आपल्या कुत्र्याला दाखवीत म्हणाला– "ह्या कुत्र्याची किंमत एक हजार रुपये आहे! रुपयांच्या बदल्यात तू हा ठेवून घे."

पोपटवाल्याने विचार केला की, दोन पोपट विकले तर येऊन जाऊन आठ दहा रुपये मिळतील, तर कुत्रा घेऊन तो विकला तर नक्कीच पोपटाच्या किंमतीपेक्षा जास्त किंमत आपल्याला मिळेल. असे मनांत म्हणत मुकाट्याने पोपटांच्या बदल्यात त्याने कुत्रा घेतला. त्यानंतर भैरव रामचंद्रकडे जात म्हणाला–"पहाताय ना! तुमच्या डोळ्या-समोर मी एक हजार रुपयांना माझा कुत्रा विकला. द्या आता शंभर रुपये."

रामचंद्रचे मन खट्टू झाले. त्याने गुपचूप भैरवाला शंभर रुपये काढून दिले. भैरवने पोपटांना जवळच्याच झाडावर सोडून दिले आणि रामचंद्राला म्हणाला–"आता सम-जले का? जी वस्तू मी विकणार नव्हतो त्या वस्तूचा लोभ धरून तू तुझे कसे नुकसान करून घेतलेस? तरी बरे, हे नुकसान फक्त शंभर रुपयांवरच निभावले. विचारपूर्वक काही गोष्टी केल्यास तर बरे, चुकून तुझे हजार रुपयांचे सुद्धा नुकसान होऊ शकते."

रामचंद्र मान खाली घालून निघून गेला व भैरव पोपटवाल्याच्या हातात दहा रुपये ठेऊन नव्वद रुपयांचा आपला फायदा करून घेऊन आपल्या वाटेने परत आपल्या गावी निघाला.





# भुतांना दैवत लाभले

श्रीरंगपूर गावाच्या वेशीवरच्या एका वडाच्या झाडावर पुष्कळ भुते रहात होती. एकदां एक नवीन भूत त्या झाडा-जवळ आले.

"हे झाड भरून गेले आहे, या झाडावर आणखी कोणाला जागा उरली नाही. तू आणखी कोठल्या तरी झाडावर जाऊन रहा." एका भुताने नव्या भूताला सांगितले.

"मी कोठे जाऊं?" रडक्या आवाजात नवे भूत म्हणाले.

"तरमग गावात वस्तीत जाऊन कां नाही रहात?" एका भुताने सल्ला दिला.

"माणसांबरोबर रोज भांडणे कठीण आहे. बुवा! ते मांत्रिकाला बोलावून मला त्याच्याकरवी इतका त्रास देतील की त्या यातना सहन करताना मला 'नको जीव' होईल. मी असाच तर पळून अलो आहे! वडाच्या झाडाशिवाय मला आतां कोठेही पाय ठेवायला जागा उरली नाही." नवे भूत म्हणाले.

त्या झाडावर एक उदार मनाचे भूत रहात होते. त्याला नव्या भुताची कीव आली. ते म्हणाले–"ठीक, तर तू काही दिवस या झाडावर माझ्या जागी रहा. मी गावात जाऊन राहातो." असे सांगून ते भूत गावात जाऊन एका घरात शिरून बसले.

त्या घराचा मालक शंकरराव नावाचा एक माणूस होता. त्यांना दोन मुले होती. दोघांची लग्ने झाली होती. सुना सासरी नांदू लागल्या होत्या. मोठ्या मुलाला तीन वर्षांचा एक मुलगाही होता.

भुताला त्या घरात रहात असताना कोणत्याही तऱ्हेचा त्रास झाला नाही. ते कोणाच्या नजरेस न पडता घरात सर्वत्र हिंडत फिरत असे. वडाच्या झाडापेक्षा त्याला



त्या घरातच आराम वाटत होता. शंकररावांच्या नातवाच्या बाललीला पाहून भुताला आनंद होई. म्हणून त्या भुताने विचार केला की, हे घर सोडून पुन्हां वडाच्या झाडावर जाण्याचा विचारसुद्धा मनात आणायचा नाही.

एक महिना आनंदात लोटला. एके दिवशी घरातल्या तिघी बायका बोलत बसल्या होत्या. धाकटी सून सासूची स्तुती करीत म्हणाली—"आणखी आपली शेजारीण पहा, दिवसभर सुनेला शिव्या देत असते, अगदी भुतासारखी वागविते. आमचं नशीब चांगलं म्हणून आपल्याला शांत स्वभावाच्या सासबाई मिळाल्या."

"तू आपल्या शेजारणीची तुलना भुताशी कां करतेस ग? भुते तर तिच्याहून चांगली असतात!" थोरली सून म्हणाली.

तेव्हां सासू हसत म्हणाली—"तुला माहीत आहेत वाटतं, ती कशी असतात ती?"

"होय, म्हणून तर मी म्हटलं! आपण भुतांची स्तुती केली तर ती आपली कष्टाची कामे करून देतात. आपली शेजारीण किती कामे केली तरी आपल्या सुनांना शिव्या देत राहाते." मोठी सून म्हणाली.

"तू भुतांची एवढी स्तुती करते आहेस, तर हे सांग की आज तुझ्या पाळीचं हौद भरण्याचं काम भुतं येऊन करणार आहेत का?" धाकट्या सुनेने विचारले.

"कदाचित तसा हौद कोणीतरी भरेलही, कोणी सांगावे?" थोरली सून म्हणाली.

त्यानंतर सर्व जणीं झोपल्या. भूत हे सर्व संभाषण ऐकत होते. त्याची स्तुती करणाऱ्या थोरल्या सुनेविषयी त्याच्या मनात आदरभाव निर्माण झाला. त्या बाईच्या मनात भुतांविषयी जी सहानुभूती आहे, ती खरी करून दाखविली पाहिजे, असे भुताला वाटले. त्याप्रमाणे थोरली सून उठायच्या आधीच भुताने हौद भरून ठेवला होता.

दुसऱ्या दिवशी थोरल्या सुनेने विहिरीवर जाऊन पाहिले तर एकच नाहीतर दोन्ही हौद तुडुंब भरलेले होते. आश्चर्यचकित होऊन तिने आपल्या सासूला व धाकट्या सुनेला बोलावून विचारले—"काय हो, तुम्ही दोघींनी दोन्ही हौद रात्री भरले वाटतं?"

दोघी म्हणाल्या—"नाही बाई!" धाकटी सून क्षणभर चुप राहिल्यावर म्हणाली—"रात्री आपण बोलत होतो ना, ते मामंजींनी ऐकलं असावं आणि आपली थट्टा उडविण्यासाठी दोन्ही हौद भरून ठेवले असावेत." परंतु शंकरराव व त्यांच्या दोघां मुलांनी त्यांना कोणी हौद भरले हे माहीत नसल्याचे सांगितले.

"हे काम एखाद्या भुताचे तर नसेल?" धाकट्या सुनेने शंका व्यक्त केली.

"भुतात असली उपकारबुद्धी नसते. थट्टेखातर आपल्या पैकीच कोणीतरी हे काम केले आहे!" असे शंकररावांना सर्वांच्या चेहऱ्यावर उमटल्यासारखं भासलं.

शंकररावांचा थोरला मुलगा थट्टेखातर म्हणाला—"जर भुतात एवढी उपकार बुद्धीच असेल तर त्याने एवढेसे काम करून मनाचे समाधान करून घेऊ नये. त्याने आपल्या घरावरची कवलं कां नाही पालटू? कवलं पालटून चार वर्षे तरी झाली असतील. पाऊस पडला की घरभर गळतं."

भुताला याबद्दल फार वाईट वाटले की त्याने सेवावृत्तीने केलेल्या कामाचं चीज झालं नाही. नंतर त्याने रात्रभरात घरावरची सर्व कवलं पालटून टाकली.





भूत उजाडल्यावर लोक काय म्हणतात, हे ऐकायला उत्सुकतेने वाट पहात बसले होते. परंतु झोप मोडल्याबरोबर एक किंकाळी फोडून शंकरराव बेशुद्ध होऊन पडले. दोघे मुलगे घाबरले आणि डॉक्टरला बोलावून घेऊन आले.

वैद्याने रोग्याला तपासून पाहिले व म्हणाला–"यांच्या पोटांत फोड झाला आहे. ऑपरेशन करावे लागणार. मी भूल देऊन ऑपरेशन करतो. मुळीच कळणार नाही."

त्यानंतर डॉक्टर ऑपरेशन करून निघून गेला. भुताने आश्चर्यचकित होऊन ते सर्व दृश्य पाहिजे. त्याला याबद्दल निराशा वाटली की शंकररावांची तब्येत सुधारल्या-वरच त्या घरच्या लोकांना आपण केलेल्या उपकाराची गोष्ट कळणार. चार दिवस गेले. मधूनमधून शुद्ध येई, परंतु भूल येणारं औषध पाजून घरातली मंडळी त्यांना झोपवीत असत. त्यामुळे कोणालाच घरा वरची कवले पालटल्याची वानवाच नव्हती.

एके दिवशी रात्री एकाएकी मुसळधार वृष्टी झाली आणि गंमत अशी की नेमकी त्याच वेळी शंकररावांना शुद्ध आली. ते आपल्या मुलांना बोलावून म्हणाले–"अरे बाबा, आणि कोठारात गळत असेल तर धान्याच्या पोत्यांवर ताडपत्री टाका. सर्व धान्य भिजून जाईल व मोठं नुकसान होईल. खायलाच मिळणार नाही."

सर्वांनी कोठाराची खोली पाहिली. कोठाराच्या खोलीत गळत नव्हतेच, आणखी घरात कोठेही गळत नव्हते. सर्वांनी चकित होऊन वडिलांना सांगितले की घरात कोठेच गळत नव्हते. तेव्हां शंकरराव म्हणाले–"हे काम एखाद्या भुताचे तर नसेल?"

तेव्हां घरातल्या सर्वांना शंकररावांच्या मोठ्या मुलाने भुताविषयी जे सांगितले होते, ते आठवले. पाऊस थांबल्यावर सर्वांनी घराचे छप्पर पाहिले. ते छान शाकारलेले होते. सर्व कवले पालटलेली होती. म्हणून दोघी सुना घाबरून गेल्या. सासुबाईंनी तर सर्व घरच डोक्यावर घेतले. ओरडू लागल्या–"या घरात भूत शिरलं आहे."

थोरला मुलगा म्हणाला–"ओहो! मी आता जातो आणि श्यामभट मांत्रिकाला बोलावून आणतो."

भुताला कळेना की आपण या कुटुंबावर एवढे उपकार केले तरी हे लोक आपल्या नावाने शंख कां फोडतात? तो विचार मनात येतांच ते वडाच्या झाडाकडे धावले.

एक भूत चिडून म्हणाले–"कशाला परतलास रे? येथे कोणाला जागा नाही, हे तुला माहीत होते की नाही?"

परंतु त्या घरातल्या जुन्या भुताला ओळखून शंकररावांच्या घरातून नुकतेच परतलेले भूत म्हणाले–"तूच मांत्रिकाला भिऊन पळून आला होतास नाही का रे?"

भूत म्हणालं–"ते मंत्र म्हणू लागतात तेव्हां आपलं अंग आतल्या आत भाजून निघाल्यासारखं होतं. ती पीडा आपल्याला सहन करणे अशक्य आहे. म्हणून पळून जावे लागते."

"अस्सं, एवढंच ना?" असे म्हणत शंकररावांच्या घरातलं भूत परत शंकर-रावांच्या घरी गेले. वैद्यांनी शंकररावांना भूल येणारं जे औषध दिलं होतं, त्या औषधाच्या बाटलीतलं औषध पिऊन ते एका कोपऱ्यात जाऊन झिंगून पडून राहिले.



त्यानंतर थोड्या वेळाने श्यामभट मांत्रिक आला. तो मोठ मोठ्याने मंत्रोच्चार करीत ओरडत राहिला. परंतु त्याला भूत कोठे आहे हे कळलेच नाही. तरी त्याने शंकररावांना खोटे सांगितले की त्याने विजेचा धक्का लागावा असे मंत्र म्हटल्यामुळे मोठमोठी भुतेसुद्धा पळून गेली आहेत. नंतर मांत्रिक आपलं इनाम घेऊन निघून गेला.

धाकट्या सुनेने थोरलीला विचारले–"काय हो वहिनी, खरंच का हो भूत घर सोडून निघून गेलं?

थोरली सून म्हणाली–"पळून गेलं नसेल तर ते आपल्या खोलीतलं सर्व भात काढून तांदूळ सडून ठेवील."

तोपर्यंत भुतावरचा भूल येणाऱ्या औषधाचा परिणाम कमी झाला होता. थोरली सून म्हणाली ते त्याला ऐकू आले. त्याने रात्रभरात खोलीतले सर्व भात कांडून तांदूळ सडून ठेवले.

दुसऱ्या दिवशी भात ठेवले होते त्या खोलीत जाऊन पाहिले तर भात कांडून तांदूळ सडून ठेवलेले दिसले. सर्व घाबरून गेले. थोड्या वेळाने थोरली सून स्वत:ला सावरून म्हणाली—"ही सर्व कामे भूत करणे शक्य नाही. भूतच असतं तर श्यामभटाच्या मंत्रांना भिऊन पळून गेलं असतं. कोणीतरी देव या घराचं रक्षण करीत असला पाहिजे. तो देव कधी आपलं नुकसान करणार नाही.

ते ऐकून सर्वांच्या मनाचे समाधान झाले व सर्वांना धीर आला.

शंकररावांच्या घरातलं भूत उत्साहाने वडाच्या झाडाजवळ गेले. एका भुताने विचारले—"काय रे, श्यामभटाने तुला पळवून लावले की काय?"

"छे:, नाही बुवा! तुम्हां सर्वांना माणसांच्या वस्तीत सुखाने कसे राहतां येईल हे सांगण्यासाठी आलो आहे." असे सांगून शंकररावांच्या घरातल्या भुताने भूल येणाऱ्या औषधाची गोष्ट सांगितली.

काही भुतं ते ऐकून ओरडू लागली—"ही तर चांगलीच युक्ती आहे! या पुढे आपल्याला झाडावर लोंबकळत राहण्याची गरजच नाही!"

शंकररावांच्या घरातलं भूत त्यांना शांत करून म्हणालं—"आजपर्यंत मला वाटत होतं की आपण सर्व भुतं वाईट आहो. आपण भुतं असलो तरी चांगली कामे केली तर लोक आपल्याला देव म्हणू लागतील. आपण माणसांच्या वस्तीत आनंदाने राहण्याचं ठरविलं तर चांगली कामे करून त्यांच्याकडून देवत्व मिळविलं पाहिजे."

त्या दिवसापासून चांगली कामे करणारी भुते देवत्व प्राप्त करू शकली आणि वाईट कामे करणारी भुतेच राहून गेली.





# अंतर

चंद्रापीड कांचन नगरचा राजा होता. त्याच्याकडे धवलमुख नावाचा नोकर होता. तो दरबारातून सरळ घरी परत येत नव्हता. मध्यरात्र उलटल्यावर घरी परते.

धवलमुखच्या बायकोने एके दिवशी आपल्या नवऱ्याला विचारले—"काय हो, दररोज तुम्हांला कोण जेवायला वाढतो?"

धवलमुख हंसून म्हणाला—"माझे दोन मित्र आहेत. दोघेही चांगले आहेत. एकाचे नाव आहे, मंगल. त्याच्याजवळ मागायाची खोटी, तो लगेच मला देतो. दुसऱ्याचे नाव आहे, भीमू. तो माझा जीवश्चकंठश्च मित्र आहे. तो माझ्यासाठी जीव सुद्धा द्यायला तयार होईल."

ते ऐकून धवलमुखच्या बायकोला आनंद झाला. कारण असे मित्र असल्यावर आणखी काय पाहिजे? वेळ पडल्यावर जो मदत करतो तोच खरा मित्र! तरी तिने विचारले—"तुम्ही कधी आपल्या मित्रांची ओळख करून द्याल का?"

"त्यात काय मोठेसे? उद्या चल माझ्या बरोबर, दोघां मित्रांच्या घरी जाऊन येऊ." धवलमुख म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सकाळी दोघं पहिल्याने मंगलच्या घरी गेली. त्याने दोघांना प्रेमपूर्वक बोलावून त्यांचं सर्व प्रकारे आदरातिथ्य केले.

त्यानंतर दोघं भीमूच्या घरी गेली त्यावेळी भीमू कोणाबरोबर तरी बुद्धिबळे खेळत होता. त्याने धवलमुखकडे एकदां पाहिले व म्हणाला—"मित्रा, आलास?" पुन्हां बुधिबळे खेळण्यात गर्क झाला.

थोडा वेळ नवराबायको गप्प बसून राहिली: नंतर म्हणाली—"बरं भीमू, येतो आम्ही!"

भीमूने मानसुद्धा वर केली नाही व म्हणाला—"बरं ये!"

घरी परत येत असतां धवलमुखच्या बायकोने नवऱ्याला विचारले—"कायहो, तुम्ही भीमूला मंगलपेक्षा तो तुमचा गाढा मित्र आहे, म्हणाला होतात. परंतु प्रत्यक्षात मी पाहिले की मंगलनेच किती प्रेमाने आपलं आदरातिथ्य केले? तुम्हांला काय वाटतं?"

"दोघां मित्रांतील अंतर तुला पहायचं आहे वाटतं? तरमग तू एकटीच उद्यां दोघांकडे जाऊन ये, त्यांना जाऊन सांग की महाराज माझ्यावर रागावले आहेत!" धवलमुख आपल्या बायकोला म्हणाला.

दुसऱ्या दिवशी धवलमुखची बायको पहिल्याने मंगलच्या घरी गेली आणि म्हणाली—"अहो, मी मुद्दाम आले आहे. हे सांगायला की महाराज यांच्यावर फार रागावले आहेत. तुम्ही येऊन आपल्या मित्राला काही मदत कराल का?" ते ऐकून मंगल थोडा घाबरून गेला आणि म्हणाला—"वहिनी, मी आहे व्यापारी. मी महाराजांशी वाकडे येईल असे काही करणार नाही. तुम्ही दोघं देश सोडून कोठे तरी निघून जाणंच हिताचे होईल."

त्यानंतर धवलमुखची बायको भीमूकडे गेली व तिने त्यालासुद्धा तेच सांगितले. ते कळतांच भीमू ढाल तलवार घेऊन धवलमुखच्या बायकोबरोबर तिच्या घरी गेला आणि आवेशाने म्हणाला—"मित्रा, तुझ्या विरुद्ध राजाचे कान भरणारा कोण दुष्ट आहे, सांग मला! मी आत्तांच्या आत्तां जाऊन त्याचे मुंडकं उडवितो."

तेव्हां धवलमुख हसत म्हणाला—"मित्रा, शांतपणे बस घाबरण्यासारखं काही नाही. प्रधानाने गोड गोड बोलून महाराजांना सर्व समजावून सांगितलं आहे व महाराजांची मेहेर नजर माझ्यावर पुन्हां संपादन केली आहे."

भीमू निघून गेल्यावर धवलमुख बायकोला म्हणाला—"पाहिलंस ना, माझ्या दोघां मित्रांतील अंतर किती आहे ते?"





# गणेश पुराण

पांडवांनी नारदाच्या सांगण्याप्रमाणे गणेशाची आराधना करण्याच्या हेतूने धौम्य ऋषींना पुरोहित करून गणेशव्रत केले आणि वेष पालटून विराट राजाच्या दरबारात अज्ञातवास यशस्वीरीत्या पुरा केला. श्रीकृष्णाच्या मदतीने पांडवांनी कौरवांचा युद्धात पराभव केला. हस्तिनापूर येथे धर्मराज युधिष्ठिर याचा राज्याभिषेक झाला आणि व तो राज्य करू लागला. त्याने अश्वमेध यज्ञ करण्याचे ठरवून यज्ञाचा घोडा सोडला. घोड्याबरोबर अर्जुन ससैन्य निघाला. त्यावेळी पांडवांचे पुरोहित धौम्य मुनीही त्यांच्याबरोबर होते.

यज्ञाचा घोडा अनेक राज्ये पादाक्रांत करीत निघाला. कित्येक राजांनी नम्रपणे धर्मराजाचे अधिच्छत्र मान्य केले. घोडा जात जात एका जागी थांबला व एक पाऊलही पुढे टाकेनासा झाला. अर्जुनाला त्या गोष्टीचे आश्चर्य वाटले व त्याने धौम्य ऋषींना त्याचे कारण काय असू शकेल असे विचारले. धौम्य 'सांगतो चल' असे म्हणत पुढे निघाले. अर्जुन ससैन्य त्यांच्या पाठीमागून निघाला. काही अंतर चालून गेल्यावर एक मोठे नगर दिसले. त्या नगराच्या मध्यभागी एक विशाल गणपतीची मूर्त होती. एका मोठ्या खडकाला कोरूनच ती मूर्त तयार केली होती. ती मूर्त अत्यंत सुंदर मूर्त होती.

"अर्जुना, या गणेशमूर्तीची पूजा कर व या देवाला साष्टांग नमस्कार घाल. नंतर



मी वातापि गणपति या नामे प्रसिद्धी पावलेल्या या देवाची व नगराची कथा सांगतो" धौम्यऋषी म्हणाले.

अर्जुनाने धौम्य मुनींच्या सांगण्याप्रमाणे पूजा केली आणि भक्तिपूर्वक वातापि गणपतीला साष्टांग प्रणाम केला. त्यानंतर धौम्य मुनी वातापि नगराच्या दिशेने निघाले. त्यांच्या पाठोपाठ अर्जुनाने जाऊन वातापि नगर पाहिले. एके काळी ते नगर फार भरभराटीला पोचले होते, या गोष्टीची चिह्ने तेथे स्पष्ट दिसत होती, परंतु तेथे वस्ती नसल्या कारणाने आज ते एक ओसाड नगर झाले होते. काही मोजके लोकच त्या गावात रहात होते. अर्जुनाला त्या नगरात आलेला पाहून त्यांनी आनंदाने त्याचे स्वागत केले आणि त्या नगरात राज्यव्यवस्था कायम करून त्या नगराचा पुनरुद्धार करण्यासाठी विनंती केली.

धौम्य मुनी म्हणाले–" अर्जुना, वातापि नगर ते हेच, शहराच्या मध्यगी जी गणेशाची मूर्त आहे तिची स्थापना अगस्त्य मुनींनी केली याचे शिल्प अद्‌भुतच आहे. हे वातापि गणपति क्षेत्र या नावे प्रसिद्ध आहे. याचे महात्म्य मी सांगतो :

" गंगा नदी, कवेर नावाच्या राजर्षीच्या कमंडलात अवतरली आणि कावेरी हे नाव धारण करून त्याच्या आश्रमात लहानाची मोठी झाली. अगस्त्य मुनींनी त्या मुलीला पाहून तिच्याशी लग्न करण्याची इच्छा कवेर यांच्या समोर व्यक्त केली.

कवेरने आपली संमती दिली व म्हणाले– "अगस्त्य मुने! कावेरीची संमतीसुद्धा घेणे बरोबर होईल नाही का ?"

अगस्त्य मुनी, आश्रमात कावेरी बरोबर रहात असतां ती त्यांना म्हणाली–"सह्याद्री पर्वतावर हिंडावं फिरावंसं मला वाटतं आहे." अगस्त्य तिला सह्याद्री पर्वतावर भ्रमण करायला घेऊन गेले.

वनविहार करीत असतां एका लहानशा तलावात तिने कमळे उमलेली पाहिली व ती काढायला धावत तलावात गेली व गंमत अशी की पाण्यात पाऊल पडताच ती पाणी होऊन वाहू लागली आणि वहात पूर्वेकडे समुद्रापर्यंत गेली. तिला कावेरी नदी हे नाव मिळाले.

अगस्त ऋषी कावेरीचाच ध्यास धरून कित्येक दिवस ब्रह्मचारी राहिले. त्यानंतर त्यांनी घोर तपश्चर्या केली व ऋषि श्रेष्ठ झाले. एके दिवशी अरण्यात त्यांनी झाडाला उलटे लोंबत असलेल्या पितरांना पाहिले व विचारले–"तुम्ही कोण व असे का लोंबतां आहां ?"

निःश्वास सोडीत पितर म्हणाले– "आमचा वंशज अगस्त्य लग्न करून त्याला पुत्रसंतती लाभेपर्यंत असेच आम्हांला रहावे लागणार आहे !"

अगस्त्य ऋषींना दिव्य दृष्टीने विदर्भ देशाच्या राजाला कावेरीचा अंश असलेली लोपामुद्रा नावाची विवाह योग्य कन्या असल्याचे दिसले. अगस्त्य ऋषी विदर्भ राजाकडे गेले व त्याच्या कन्येशी विवाह करण्याची इच्छा असल्याचे त्यांनी सांगितले.

कंदमूळफळे खाणाऱ्या व वल्कल वस्त्रे धारण करणाऱ्या मुनीला आपल्या सुकुमार राजकन्येला कसे द्यावयाचे ? नकार दिला तर मुनी शाप देतील या भीतीने शंकाकुल झालेल्या राजाला लोपामुद्रा स्वतः येऊन म्हणाली–"बाबा, मी अगस्त्य मुनीशी विवाहाला तयार आहे."



विदर्भराजाने लोपामुद्रेच्या इच्छेप्रमाणे व मुनींनी इच्छिल्याप्रमाणे दोघांचे पाणिग्रहण करवून मुलीला मुनींबरोबर पाठविले.

अगस्त्य मुनी लोपामुद्रे बरोबर आपल्या आश्रमात आल्यानंतर एके दिवशी तिला म्हणाले–"माझे पितर पुत्राम नरकात आहेत. त्यांचा उद्धार व्हायला तुझ्या पोटी मला पुत्रसंतती झाली पाहिजे. याचसाठी मी तुझ्याशी विवाह केला आहे!"

तेव्हां तिने आपल्या अंगावरच्या वल्कल वस्त्रांकडे पाहून उदास मुद्रेने म्हटले– "तुम्हांला माहीतच आहे, मी एक राजकन्या म्हणूनच जन्माला येऊन वाढले आहे. तेव्हां विवाह झाल्यानंतर का होईना, मला



माझ्या योग्य. वस्त्राभूषणे देण्याची तुम्ही व्यवस्था करायला हवी होती, नाही का? तेव्हां त्यासाठी धन संपादन करणे आवश्यक आहे, असे नाही का वाटत तुम्हांला?"

अगस्त्य मुनींनी पत्नी जे म्हणाली त्याचा विचार केला आणि धन संपादनार्थ निघाले. ते अनेक राजांकडे गेले आणि राज्यकारभार सुरळित चालविण्यास आवश्यक तेवढे धन ठेवून घेऊन बाकी धनातील योग्य तेवढे द्यावे अशी राजेरजवाड्यांना विनंती केली. परंतु एकही राजाने काही उरत असल्याचे सांगितले नाही. उलट म्हणाले—"आम्हांलाच धन पुरत नाही तेव्हां धनसंपादनाचा काही मार्ग असेल तर सांगावे." अशी विनंती केली.

अगस्त्य ऋषी हताश होऊन जंगलात भटकत एका मोठ्या शिलाखंडाजवळ आले. तो शिलाखंड गणपतीच्या आकारासारखा त्यांना वाटला. त्या शिलाखंडासच विघ्ननाश गणाधीश मानून त्यांनी नमस्कार केला आणि प्रार्थना केली—"गणनायका! मला तपश्चर्या तेवढी कळते. धनसंपादनाला लागणारी विद्या मला माहीत नाही. तरमग मला धनप्राप्तीचा काही मार्ग दाखविलास तर तुझे उपकार होतील!"

"तरमग, काय हो, मुनिवर्य! तुम्ही हे या दगडाला विचारीत आहां का?" गणनायकाने दर्शन देऊन विचारले.

अगस्त्य मुनींनी गुढघे टेकून नमस्कार केला व आपले दुःख निवेदन केले.

विघ्नेश्वर म्हणाला—"अगस्त्य मुने! तुम्ही जेथे यायला पाहिजे होतं तेथेच आलातं की! काही वेळाने इल्वल तुम्हांला जेवायला बोलवायला येईल तेव्हां तुम्ही जा. इल्वल जवळ अलोट धन खजिन्यात कुजत पडले आहे. तुमच्या हातून होण्यासारखे एक कार्य ही आहे!"

अगस्त्य मुनी म्हणाले—"विघ्नेश्वरा! मला या शिलाखंडात तुझे रूप दिसले, म्हणून ही शिळा अपूर्व गणपति नामे



ओळखली जावी असे मला वाटते आहे. माझी ती इच्छाही पूर्ण व्हावी!"

विघ्नेश्वर म्हणाला–"तथास्तु!" आणि अंतर्धान पावला.

अगस्त्य मुनी फार दमलेले होते. त्यांना भूकही फार लागली होती. म्हणून त्या शिलाखंडास टेकून ते बसले असतां समोरून बरोबर काही पाहुण्यांना घेऊन येत असलेला इल्वल दिसला. अगस्त्य मुनींना लवकरच सर्व गोष्टी कळल्या.

त्या अरण्यात वातापि व इल्वल नावाचे मोठे मायावी राक्षस ऋषींना, प्रवाशी वाटसरूंना व तीर्थयात्रा करणाऱ्यांस ठार-करून त्यांचं धन लुटीत होते आणि एका मोठ्या दगडी किल्ल्यात धनराशी जमा करीत होते. एका धर्मभीरू राजाचे रूप घेऊन इल्वल आपल्याकडे आतिथ्य स्वीकारायला आलेल्या पाहुण्यांना आदरपूर्वक बोलावून त्यांना कुशलप्रश्न वगैरे विचारीत असतां वातापि हा एखाद्या बोकडासारखे रूप धारण करतो. इल्वल त्या बोकडाला मारून त्याचे मांस शिजवून आपल्या पाहुण्यांना वाटतो.

अतिथी मांस भक्षण करून विश्रांती घेत पडले असतां इल्वल मोठ्याने ओरडून "वातापि" म्हणून हाक मारतो. वातापि अतिथि अभ्यागतांची पोटे फाडून बाहेर येतो. हे अगस्त्य मुनींना कळल्यावर ते संतापले.

इल्वल अगस्त्य मुनींजवळ आला व त्यांना पाहून त्याला वाटले की हे कोणी थोर मोठे मुनी आहेत. यांच्या सारख्या कित्येकांना ठार केले तर फायदाच फायदा आहे, असा विचार करून इल्वलेने अगस्त्यांना जेवायला बोलाविले.

अगस्त्यांनी त्यांना फार भूक लागली असल्याचे दर्शवून म्हटले–"तुमच्या सारखे धर्मदाते या जगतात आहेत म्हणूनच ही पृथ्वी आकाशात अधांत्री स्थिर राहिली आहे. तरमग चला!" असे सांगून इल्वल बरोबर किल्ल्यात गेले व म्हणाले–



"अन्नदाता! मी कित्येक दिवसांपासून काही खाल्लो प्यालो नाही. खूप भूक लागली आहे. मी एक सहस्त्र यज्ञ केले असल्या कारणाने मला बोकडाच्या मांसा-शिवाय दुसरे कोणते ही मांस पचत नाही." असे सांगून इल्वलच्या हाती वातापीचा वध करविला.

अगस्त्य बोकडाला पाहून म्हणाले–"काय पण बोकड होता! मी एक सहस्त्र यज्ञ केले आहेत. परंतु या बकऱ्याच्या मांसासारखं मांस कधी मला खायला मिळालं नव्हतं! प्रथम मला याचं हृदय वगैरे मांसाचे मुख्य मुख्य तुकडे खायला वाढ. नंतर इतर तुकडे खायला वाढ. नंतर इतर तुकडे इतरांना वाढ. मी प्रथम सांगून ठेवतो, गैर मानू नकोस, मी जितकं खाऊ शकेन तितके मला वाढले पाहिजे, बरं का!

इल्वलने बकऱ्याला भाजून काढले व मांस शिजवून अगस्त्यांना वाढले. किती वाढलं तरी अगस्त्य खातच गेले व सर्व बकरा त्यांनीच खाऊन पचविला.

इल्वलला आश्चर्याबरोबर थोडी थोडी भीतीसुद्धा वाटू लागली म्हणाला–"मुनिवर्य, आपण थोर धनपाठी दिसता आहां!"

अगस्त्य स्मित करून म्हणाले–"धनपाठी म्हणून माझं नाव आहे रे या पंच क्रोशीत! तर मग थोडे मद्य मागव पाहू! एक मोठे मडकं भरून तरी लागेल!"

इल्वल आतां मात्र थक्कच झाला, म्हणाला–"मडकं भरून व ते सुद्धा मोठं मडकं भरून तुम्हाला पाहिजे म्हणतां?"

अगस्त्य म्हणाले–"आपलं पोट आहे ना, त्यात सप्त समुद्रसुद्धा जाऊन पुन्हां रिकामं राहील!"

इल्वल म्हणाला–"ठीक आहे, तर मग आपण आपल्याला हवं असेल तेवढे घ्यावे. आमचा वातापि ते आणवून देईल! असे म्हणत त्याने मोठ्याने हाक मारली–"अरे वातापि!"

अगस्त्य हळूच म्हणाले–"आता वातापि कोठे आहे? वातापि पुन्हा येणार नाही. जीर्ण झाला, पचला तुझा वातापि!" असे म्हणत त्यांनी पोटावर हात फिरविला व म्हणाले–"वातापि केव्हांच जीर्ण होऊन गेला!"

इल्वल प्राणभयाने थरथर कापू लागला आणि पळून गेला, कोठे गेला पत्ताच लागला नाही. अशा तऱ्हेने वातापि आणि इल्वल यांचे भयंकर हत्याकांडाचे नाटक कायमचे थांबले.

त्यानंतर अगस्त्यांनी इतर अतिथि अभ्यागतांना जे घडले ते थोडक्यात सांगितले आणि किल्ल्यात जो अस्थि-पंजरांचा व कवच्यांचा ढीग पडला होता तो नेऊन दाखविला. ते दृश्य पाहून सर्वांनी आपल्या भाग्याला धन्यवाद दिले की अगस्त्य मुनींच्या कृपेने त्यांना जीवदान मिळाले. त्यांनी अगस्त्यांचे आभार मानून त्यांना नमस्कार केला. त्या किल्ल्यात सुरक्षित स्थानी ठेवलेल्या कित्येक धनराशी अगस्त्यांनी जाऊन पाहिल्या. त्यांना हवे होते तेवढे घेऊन बाकीचे धनखर्च करून एक मोठे नगर वसविता येईल. सहस्रा-वधी लोकांचा उदरनिर्वाह चालू शकेल असे त्यांना वाटले.

लगेच अगस्त्यांनी सर्वांना धन वाटण्यास सुरवात केली. जवळपासच्या राज्यातून सहस्रावधी गरीब लोक तिकडे आले व अगस्त्यांनी दिलेले धन घेऊन आपापली घरे बांधून त्यांत सुखाने राहू लागले.

अगस्त्य मुनींना जो गणेशाकृतीचा शिलाखंड दिसला होता त्याच्या चारी बाजूला एक मोठे नगर निर्माण झाले. वातापि राक्षसाला त्या जागी अगस्त्यांनी खाऊन जीर्ण केले होते. म्हणून त्याला वातापि नगर हे नांव प्राप्त झाले. अगस्त्यांनी आपल्या राज्याचे नियम शिलालेखांवर कोरून जागोजागी शिला-फलक लावून ठेवले. प्रजेचेच राज्य म्हणून एक आदर्श लोकतंत्र त्या नगरात स्थापन झाले.





# गंधर्व राजकुमारी

[ ६ ]

राणी जुबेदाच्या हुकमाप्रमाणे मसूर लगेच हसनच्या घरी गेला व दाराची कडी वाजवली.

हसनच्या आईन दार उघडलं व मसूरला पाहून विचारलं–"काय पाहिजे?"

"माझं नाव मसूर. मी खलीफांचा अंगरक्षक आहे या घरात राहणाऱ्या मुलीला घेऊन ये, असा आमच्या बेगम साहेबांचा हुकूम आहे!" मसूर म्हणाला.

हसनची आई घाबरली. ती कापऱ्या आवाजात म्हणाली–"मसूर आम्ही या गावी नवे लोक आहों, माझा मुलगा दूर प्रवासाला जातो, म्हणून सांगून गेला आहे. जातांना त्याने बजावून सांगितलं आहे की त्याच्या बायकोला उंबरठा ओलांडून बाहेर जाऊ देतां कामा नये. ती घराबाहेर गेली तर आमच्या घरावर आकाशच कोसळेल म्हणे. तिच्या जिवाला काही झालं तर माझा मुलगा जीव देईल!" मग मी तरी काय करू बाबा?"

"घाबरण्याचं मुळीच कारण नाही, आई! आमच्या बेगमसाहेबांनी तुमच्या सूनबाईच्या सौंदर्याचं वर्णन ऐकलं तिला एकदां पहावं म्हणून बोलावलं आहे, त्या मुलीवर कोणतीही आपत्ती येऊ नये हे पहायला मी नाही का बरोबर! मी तिला सुरक्षित पणे घेऊन जाऊन सुखरूप परत घरी पोचती करतो. मी असं कितीजणींना घेऊन गेलो आणि किती जणींना घरी पोचत केलं म्हणून सांगू?" मसूर म्हणाला.

आता सुटका नाही असं वाटून ती बिचारी घरात गेली सुनेला व नातवाला चांगले कपडे घालायला दिले आणि स्वत: पोशाख करून दोघांना बरोबर घेऊन



मसूर बरोबर निघाली. सर्वजण पोचली त्यावेळी बेगम जुबेदा सिंहासनावर बसलेली होती. तिच्या चारी बाजूला दासी उभ्या होत्या. त्यांच्यात तूफा सुद्धा होती. जुबेदा हसनच्या बायकोला म्हणाली–"ये मुली! इकडे कोणी पुरुष मंडळी नाहीत हो! तू तोंडावरचा बुरखा काढलास तरी चालेल!" असं म्हणत तिनें तूफाकडे पाहिलं. तूफाने पुढे जाऊन हसनच्या बायकोच्या तोंडावरचा बुरखा हळूच बाजूला सारला. गंधर्व कन्येचे तोंड काळ्या ढगाआडून बाहेर येणाऱ्या पौर्णिमेच्या चंद्रासारखं होतं. तिला पाहून जुबेदा व तिच्या दासींचा श्वास काही क्षण वरचा वर व खालचा खाली राहिला. "काय पण सौंदर्य आहे," असं पुटपुटल्या.

जुबेदा बेगम स्वतःला विसरून जाऊन सिंहासनावरून उतरून आली व हसनच्या बायकोला तिने पोटाशी धरले. नंतर तिला सिंहासनावर बसवून आपल्या गळ्यातला मोत्याचा हार तिच्या गळ्यात घातला. तो हार जुबेदा बेगमचा खलीफांशी निकाह झाला त्या दिवशी तिच्या गळ्यात घातला होता, तो आजपर्यंत तिच्या गळ्यात होता. तो हसनच्या बायकोला एक प्रेमाची भेट म्हणून तिने दिला.

"मुली तुला गायला, वाजवायला येते का तुला नृत्य येते का? तुझ्या सारखीला या कला येणार नाहीत हे शक्यच नाही." जुबेदाराणी म्हणाली.

"सामान्य पणे मुलींना येतात त्या नृत्य, गायन आदि कला मला येत नाहीत. आश्चर्यचकित करून सोडणारी एक कला मला येते. मी पक्ष्यांसारखी आकाशात उडू शकते." हसनची बायको म्हणाली.

"खरंच! आश्चर्यच आहे!" सर्व दासी म्हणाल्या.

"पंखाशिवाय कशी उडतेस ग? उडून दाखवितेस का?" जुबेदाने विचारले.

जुबेदा म्हातारीला म्हणाली–"अम्मा! तुम्ही जाऊन तो पक्ष्यांचा पोशाख आणता का? तुमच्या सुनबाईंना उडतांना पाहून मनाला बरं वाटेल!"

हसनच्या आईच्या पोटात 'धस्स' झाले. आता आपल्याला अल्लाने वांचविलं तरच आपण वांचणार असं तिला वाटले व ती धीर करून जुबेदा बेगमला म्हणाली– "माणसं कधी पक्ष्यांचा पोशाख घालतात का हो? बेगमसाहेबांच्या समोर माझी सून काहीतरी भ्रमिष्टासारखी बोलते आहे."

परंतु हसनची बायको सासूला मध्येच थांबवून म्हणाली–"मी म्हटला तो पक्ष्यांचा पोशाख आमच्या घरातच कोठेतरी सुरक्षितपणे लपवून ठेवलेला आहे."

जुबेदा बेगम तिच्या हातातला एक अनमोल दागिना काढून म्हातारीला देत म्हणाली–"आजी, तो पोशाख तुम्ही घेऊन या. नाही तर माझी शपथ! किती वेळ हो? थोडा वेळ गंमत पाहून तुम्हांला तो पोशाख परत देईन मी!" परंतु म्हातारी तिला तो पोशाख कसा आहे, कोठे आहे, मुळीच माहीत नसल्याचे सांगू लागली. तेव्हां मात्र जुबेदा बेगमला राग आला. तिने मसूरला बोलावून हसनच्या घराची झडती घेऊन पक्ष्यांचा पोशाख मिळेल तो घेऊन यायला हुकूम केला. घराच्या किल्ल्या म्हातारीच्या हातात होत्या त्या मसूरला देवविल्या.



मसूरने हसनच्या घराची झडती घेतली आणि त्याला बराच शोध केल्यावर शेवटी पक्ष्यांचा तो पोशाख सांपडला. त्याने तो आणून जुबेदा बेगमला दिला. जुबेदाने तो लक्षपूर्वक पाहिला व त्यातली कलाकुसरी पाहून चकित झाली आणि तिने तो हसनच्या बायकोच्या हातात दिला. तिने त्याचा प्रत्येक पंख उघडून पहिला व त्यात काही बिघाड झालेला नाही हे पाहून तिला फार आनंद झाला. तिने तो अंगात घातला व त्या मोठ्या दिवाणखान्यात इकडून तिकडे दोनदां तरंगत उडून दाखविले व जमिनीवर उतरली. नंतर तिने आपल्या दोघां मुलांना एकेका हाताने



अशा एक खिडकीत उडत जाऊन बसली व म्हणाली–"बरं तर मी येते मला निरोप द्यावा." हसनची आई ते ऐकून दिवाण-खान्यातल्या गालिच्यावर पडून रडू लागली. तेव्हां तिची सून तिला म्हणाली–"सासु-बाई, मी तुम्हांला व तुमच्या चिरंजीवांना सोडून जाते आहे. तुम्हांला सोडून जातांना मला फार वाईट वाटते आहे. पण मी काय करू? उडण्याचा जो एक नशा किंवा मोह असतो त्यामुळे मी स्वतःला आवरू शकत नाही. तुमच्या मुलाला माझा शोध काढावासे वाटले तर 'वाक् वाक्' नावाच्या द्वीप समूहात त्याने माझ्या शोधार्थ यावे, असे सांगून ती आपल्या मुलांना घेऊन खिडकीच्या वाटेने आकाशात उडत निघून गेली. हसनची आई बेशुद्ध होऊन पडली होती. तिला जुबेदा बेगमने हाताने उठवून बसविले व म्हणाली–"आजी, हे माहीत नसल्याचं न दाखविता परिणाम काय होणार आहे हे पूर्वीच मला सांगितले असतेत तर मी हे संकट येऊच दिले नसते. नकळत घडलेल्या माझ्या चुकी बद्दल माफी करावी."

"सर्व चूक माझीच आहे, बेगम साहेब! तुम्हांला मी काय माफ करणार? मी व माझ्या मुलगा या दुःखाने झुरून मरायचेच नशिबात लिहिलेले असल्यावर कोण काय करणार?" असं म्हणत हसनची आई रडत घरी निघून गेली. कदाचित घरात सून व नातवंडे दिसतील म्हणून घर तीन तीन-दां फिरून पाहिलं पण ती कशी दिसणार? त्यांची काळजी करीत रात्रंदिवस रडत राहिली.

तिकडे सात राजकन्यां बरोबर तीन महिने राहील्या नंतर हसनला वाटू लागले की त्याची बायको व मुले आणि त्याची वाट पहात असतील. म्हणून त्याने आपल्या सर्व बहिणींचा निरोप घेतला आणि डफ वाजवून त्याने उंटांना बोलविले. सोने, चांदी, रत्न जवाहीर पिशव्यात भरून उंटांच्या पाठीवर टाकले आणि त्यांच्यावर बसून बगदाद नगरी येऊन पोंचला.

त्याने घरात पाऊल टाकले, परंतु तो आपल्या आईला ओळखू शकला नाही. इतका तिच्यात बदल झाला होता. नंतर त्याने तिला विचारले–"माझी बायको व मुले कोठे आहेत ग, आई?"

त्या प्रश्नाचे उत्तर म्हणून त्याची आई मोठ मोठ्याने रडू लागली. हसनला वेड लागल्यासारखे झाले. त्याने त्याची बायको घरात कोठे तरी असेल, या विचाराने सर्व घर शोधले व शेवटी तिचा पक्ष्यांचा पोशाख त्याने लपवून ठेवला होता ती पेटी उघडून पाहिली, तर ती रिकामी होती. तीन नव्या कबरी पाहून तो कपाळावर हात मारून जमिनीवर आदळला.

आईने अनेक प्रकारे उपचार केले. परंतु रात्र होईपर्यंत ही हसनला शुद्ध आली नाही. शुद्ध आल्यावर तो आपले कपडे फाडू लागला. सुरा छातीत भोसकून घ्यायचा त्याने यत्न केला. परंतु आई आडवी पडली. लहान मुलांना कवटाळून घेतात तसे तिने मुलाला पोटाशी धरून त्याचे सांत्वन कर-ण्याचा प्रयत्न करू लागली. म्हणाली–"बाळा; निराश हताश होण्याचं मुळीच कारण नाही. वाक् वाक् द्वीपसमूहात तू गेलास तर तुला तुझी बायको व मुले भेटतील."

ते ऐकतांच हसनच्या जिवात जीव आल्यासारखे झाले. तो झट दिशी उठून उभा राहिला आणि म्हणाला–"आई, मी लगेच वाक् वाक् द्वीपांकडे जातो."

परंतु पक्ष्यांच्या आवाजासारखा द्वीपसमूह कोठे रे असणार? कदाचित चीन देशात जावे लागेल! त्याला काहीच सुचेना.

तो सरळ खलीफांच्या दरबारात गेला व तेथल्या मोठमोठ्या मौलवींना त्याने विचारले–"वाक् वाक् द्वीपसुमह कोठे आहे?" परंतु एकालाही ते माहीत नव्हते. कोणी त्या नावाचे द्वीपसमूह असल्याचे ऐकलेही नव्हते. त्याच्या मनांत जो आशेचा अंकुर रुजला होता, तो खुंटला गेला. "तर मग मी जाण्यासारखे स्थान म्हणजे पितृ लोकच!" असा विचार करून हसन घरी गेला व पडून राहिला.





# गैरसमज

**त्या**च्या कचेरीतला मित्र रवि आग्रह करू लागला म्हणून अशोक हेमाला पहायला त्याच्याबरोबर गेला. त्यापूर्वी त्याने हेमाविषयी मित्राच्या तोंडून बरंच ऐकलं होतं. तिला आईवडील नव्हते. एक थोरला भाऊ मात्र होता. हेमा तशी जास्त शिकली सवरलेली नव्हती, परंतु घरातली सर्व कामे छान करी.

अशोक रवीबरोबर हेमाला पहायला गेला त्या दिवशी तिचा भाऊ कामानिमित्त परगावी गेला होता. परंतु तिच्या वहिनीने तिला दाखविण्याची सर्व व्यवस्था केली.

हेमा होतीच तशी सुंदर. रवीने इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर अशोकला विचारले–"कायरे, मग काय वाटतं तुला? हेमाशी लग्न होईल तो नशीबवान, असे नाही वाटत तुला? एवढेच की हुंडाबिडा देण्याची त्यांची परिस्थिती नाही. बाकी स्थळ चांगलं आहे." "पैशाचं काय? पैसे देऊन सर्व मिळतेच असे तरी कोठे आहे? तेव्हां हुंड्याचा विचारच नाही." अशोक म्हणाला.

"म्हणजे, तुला हेमा पसंत आहे तर! हेमाचे वडील लक्ष्मणराव असते तर किती आनंद झाला असता त्यांना!" रवि म्हणाला.

लक्ष्मणराव हे नाव उच्चारतांच अशोक दचकला लक्ष्मणराव? ते काय करीत असत? कोठले राहणारे?" अशोकने विचारले.

"ते एक मोठे वैद्य होते. आपल्या स्वतःच्या गावी रामपूरलाच नव्हे तर जवळपासच्या पंचक्रोशीत त्यांचं नाव ऐकलं नाही असा माणूस मिळणे कठीण." रवि म्हणाला.

रवीचे बोलणे पुरे होण्याच्या आधीच क्रुद्ध मुद्रेने अशोक उठून उभा राहिला व म्हणाला–"मला हे पूर्वीच कळले असते तर मी या घराच्या वाऱ्याला ही आलो नसतो. त्या पापी माणसाच्या मुलीशी लग्न केले असते तर प्रायश्चित्तच करावं लागलं असतं." असं म्हणत झपाझप पावले टाकीत बाहेर निघून गेला.

ते सर्व पाहून रवि थक्कच झाला. हेमाचा चेहराच लाजेने लाल झाला. तिच्या डोळ्यातून दोन थेंब पडले. रवि काय बोलावे हे न सुचल्यामुळे, बाहेर येऊन सरळ अशोकच्या घरी गेला. अशोकचा पारा अद्याप उतरलेला नव्हता.

रवि काही वेळ गप्प राहिल्यावर म्हणाला–"अगदी गरीब, धर्मभीरू आणि उदार म्हणून पंचक्रोशीत प्रसिद्ध असलेल्या लक्ष्मणरावांवर तुझा एवढा राग कां? हे नाही कळलं मला!"

"सांगतो, पण या पुढे त्या गृहस्थाच्या नावाच्या उच्चारही माझ्या समोर करू नकोस." असे सांगून अशोक सांगू लागला.

अशोकचा रामू नावाचा एक बालमित्र होता. अशोक नोकरीला लागला त्याच दिवशी रामूचे लग्न झाले. त्यामुळे तो आपल्या मित्राच्या लग्नाला हजर राहू शकला नाही. रामू सरकारी नोकर म्हणून रामपुरला रहात असे.

नोकरी लागल्यानंतर तीन महिन्यांनी अशोकला एकामागून एक दोन दिवसांची



सुट्टी लाभली. म्हणून तो मित्राला भेटायला म्हणून रामपूरला गेला. तो गावात पोचला तों पर्यंत चांगला काळोख झाला होता. तरी रामू राही त्या घराचा शोध काढणे तेवढे त्रासाचे झाले नाही.

अशोकने दारावर थाप देतांच रामूच्या बायकोने येऊन दार उघडले. तिच्यावर कोणतातरी प्रसंग आल्या सारखे तिला पाहतांच अशोकला वाटले.

"माझे नाव अशोक मी रामूचा बालमित्र आहे." अशोक म्हणाला.

ते ऐकतांच जानकीने पदराने डोळे पुसले व म्हणाली–"दादा, तुम्ही कसे वेळेवर आलात. तुमच्या मित्राला बरे नाही."



रामू खाटेवर बेशुद्धावस्थेत पडलेला होता.

"तीन दिवस झाले. डोळे मिटून पडलेले आहेत. मला बाई, भितीच वाटते आहे." जानकी म्हणाली.

अशोकने रामूच्या कपाळाला हात लावून पाहिला व म्हणाला–"भिण्याचं कारण नाही, वहिनी, वैद्याला बोलावून आणतो."

"या गावात लक्ष्मणराव नावाचे एकटेच वैद्य आहेत. दोनच तासां पूर्वी यांना बघून औषध देऊन शेजारच्या गावी जातो असे सांगून गेले. ते परत आले की नाही कोण जाणे?" जानकी म्हणाली.

अशोक बेशुद्धावस्थेत पडलेल्या रामूला त्याला माहीत असलेले औषधपाणी करीत काही वेळ बसला. जानकीने अशोक आहे नवऱ्याजवळ असे समजून जमिनीला जरा अंग टेकले आणि तत्क्षण झोपी गेली. मध्य रात्र उलटण्याच्या सुमारास रामूची तब्येत आणखी जास्तच बिघडली.

अशोकने घाबरून जाऊन जानकीला उठविले व म्हणाला–"मी जाऊन लक्ष्मण-रावांना बोलावून आणतो तुम्ही रामूच्या जवळ जरा वेळ बसता का?" म्हणाला.

जानकीने लक्ष्मणरावांच्या घराच्या खाणाखुणा नीट समजावून सांगितल्या. कडुलिंबा समोरच्या लक्ष्मणरावांच्या घराची खूण ओळखून अशोक तेथे गेला आणि जोरजोराने दार वाजविले. बाजूच्या खिडकीचे दार उघडले.

"लक्ष्मणराव तुम्हीच का हो? माझा मित्र रामू याची परिस्थिती..." असे अशोक म्हणतच होता इतक्यात आवाज आला– "होय, लक्ष्मणराव आमचे वडील, मध्य रात्रीच्या वेळी दार काय हो बडविता?" असे रागाने कोणी म्हणाला.

"आजाऱ्याची परिस्थिती गंभीर आहे, सांगता का वडिलांना." अशोक म्हणाला.

खिडकीतून बघणारा मागे वळून म्हणाला–"कोणी रामू नावाचा माणस फार आजारी आहे, म्हण[illegible] जाता का बाबा?"

"गरज असली की लोक अर्ध्या रात्री सुद्धा येऊन त्रास देतात. झोपेचं खोबरं झालं! तू ये झोप! तो उद्या सकाळपर्यंत जिवंत राहिला तर येऊन पाहीन!" असा आतल्या खोलीतून आवाज आला.

त्या पाठोपाठ खिडकीचे दार बंद झालं. अशोक संतापला, तो परतला आणि जानकीला घडले ते सांगितले. तो तरी काय करणार? म्हणाला–"त्या वैद्याला वैद्य म्हणणेच स्वतःचा अपमान करून घेण्यासारखे आहे! चला शहरात रामूला घेऊन जाऊ. जवळपास एखादी गाडी भाडयाने मिळेल का?" त्याने विचारलं.

जानकी पलीकडच्या गल्लीत धावत गेली व एका ओळखीच्या गाडीवाल्याला बोलावून घेऊन आली. दोघांनी मिळून रामूला उचलून आणून गाडीत झोपविले. परंतु शहराच्या वाटेवरच रामूचे प्राणो-त्क्रमण झाले.

अशोकच्या तोंडी ते सर्व वृत्त ऐकून रवि म्हणाला–"अस्सं! तर मग तू हेमाच्या घरात तू वागलास त्याबद्दल मी तुला दोष देणार नाही."

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी अशोक घरात असतां बाहेरचं दार वाजलं. उंबऱ्याबाहेर



उभी असलेल्या हेमाला पाहून अशोक चकितच झाला. "तू? कशाला आलीस इकडे?"

"लग्नाच्या गोष्टी विषयी बोलायला आले नाही!" असे म्हणत हेमा भीतभीत आत येऊन बसली.

तिच्याकडे रागाने पहात असलेल्या अशोककडे पहात ती म्हणाली–"रवीने मला सर्व काही सांगितले. उजाडण्यापूर्वीच तुम्ही त्या गावाबाहेर निघून गेल्यामुळे रात्री आमच्यावर आलेला प्रसंग तुम्हांला कळला नाही. आमच्या वडिलांविषयी तुमच्या मनात फार मोठा गैरसमज झाला आहे. घडलं ते असं.

"त्या रात्री माझा मोठा भाऊ लग्नासाठी परगावी गेला होता. मी सैपाक करून वडिलांची वाट पहात बसले होते. बाबा भाड्याची गाडी करून परतले तर दोन प्रहर रात्र उलटली होती. म्हणाले– "बाळ, हे गाडीवाले दोघे भाऊ आहेत ग! उपाशी आहेत बिचारे! त्यांना प्रथम वाढ. नंतर आपण दोघे जेवू."

मी पुढल्या पडवीत दोन पत्रावळीवर त्या दोघांना वाढले. दोघे जेवून विहिरीवरून हात धुवून आले. सुरे दाखवून त्यांनी आम्हा दोघांना पलंगाच्या खुरांना बांधून ठेवलं व तोंडात बोळे घालून ठेवून घरातलं सर्व मूल्यवान सामान गोळा करून गाठोडे बांधू लागले.

त्याच वेळी "लक्ष्मणराव" अशी हाक ऐकू आली व दारावर थाप पडली. दोघे चोर गोंधळले. काही वेळ परस्परांशी फुसफुसले. नंतर एकाने खिडकी उघडून आमच्या भावाचे सोंग केले.

रामूची तब्येत बरी नसल्याचे बाहेरच्या माणसाने सांगितल्यावर माझ्या बाबांनी स्वतःला सोडवून घ्यायचा यत्न केला. आतला चोर त्यांना सुराभोसकून निघून गेला. मी तर बेशुद्धच झाले. मी शुद्धीवर आले तों पर्यंत बाबांचे अंत्येष्टी संस्कारही आटोपले होते."

सर्व ऐकल्यावर चकित झालेल्या अशोकला हेमा म्हणाली–"तुमच्या मित्राखातर माझ्या बाबांनी स्वतःचा जीव दिला. तेच तुम्हांला दुष्ट वाटले! आपण पहिलेलं व ऐकलेलं सर्व खरंच असतं असं समजू नये. चोरांना दुसऱ्याच दिवशी शिपायांनी धरलं ते आता तुरुंगात आहेत!"

लक्ष्मणरावांच्या त्यागाची गोष्ट ऐकून अशोकच्या डोळ्यांना पाणी आलं. तो हेमाला म्हणाला–"तू म्हणालीस त्या प्रमाणे पाहिलं ऐकलं ते खरं मानू नये ही गोष्ट मात्र खरी! परंतु मी तुझ्या गळ्यात मंगळसूत्र बांधीन ते मात्र सर्व पाहतीलच! त्यात खरं नाही असं काहीच दिसणार नाही!"

ते ऐकून हेमा लाजली व हंसत मान खाली करून उभी राहिली.






[६]

[शिवदत्ताच्या सल्ल्याप्रमाणे समरसेनाने स्वतःच सेनापति पद स्वीकारले. सैन्याची जमवाजमव करण्यासाठी त्याने नरवाहन मिश्राला पाठविले. सैनिक व प्रजेच्या हातचा मार खाऊन तो परतला. त्या कठीण परिस्थितीत निरुपाय होऊन राजवाड्याच्या रक्षणासाठी शिकारखान्याच्या अधिकाऱ्याला पिंजऱ्यातून क्रूर जनावरांना सोडावे लागले. त्यानंतर–]

समरसेनाने त्याला विचारल्यासारखंच शिवदत्त सांगत असलेले ऐकून मंदरदेवाने स्मित केले. नंतर म्हणाला– "शहराच्या कोटाच्या चारी बाजूला वेढा देऊन बसलेल्या शत्रूला आणि शहरात खवळलेल्या प्रजेलासुद्धा राजाने गादी सोडावी एवढेच पाहिजे होते ना! त्यानंतर राज्याधिकार कोणाच्याही हातात गेला तरी एकच नाही का?"

"होय!" असे म्हणत शिवदत्ताने होकारार्थी मान हलवीत म्हटले–"तोंपर्यंत समरसेनाला इतका खोल विचार करायला वेळच मिळाला नाही. कारण सर्व गोंधळच उडून गेला होता. म्हणूनच मी त्याला म्हणालो–"होय रे, समरसेना, तेच तर प्रस्तुत परिस्थितीत दिसत आहे! मला विचारशील तर राज्याधिकार इतर कोणाच्या हातात जाण्याऐवजी, राजाला पदच्युत

करून याच प्रजेच्या मदतीने शत्रूचा बिमोड करणे ज्यास्त बरोवर होईल!"

समरसेन तत्क्षण म्हणाला—"तोच विचार मी सुद्धा करीत होतो! चित्रसेन महाराज वृद्ध झाले आहेत. त्यांना वारस सुद्धां कोणी नाही. ते स्वतःच गादी सोडायला तयार होतील असे वाटते. प्रजा थोडी शांत झाल्यावर तटाच्या बाहेरच्या शत्रूला चिरडून टाकणे तेवढे कठीण नाही!"

आम्ही हे बोलत होतो, त्याच वेळी चित्रसेन महाराज स्वतःच आले. त्यांना पाहतांच प्रजेने "राजाला गादीवरून काढा, त्याची सत्ता नको!" असा घोष सुरू केला.

चित्रसेन राजा आम्ही होतो तेथे सरळ पोंचतांच म्हणाला—"समरसेना! तटाच्या बुरुजावरुन पाहिले तर शत्रू तंबू ठोकून किल्लावर तुटून पडण्याची सर्व तयारी करीत असल्याचे दिसले. शत्रुसैन्य शेंकडो-वर आहे. नंतर किल्ल्यातल्या प्रजेचा माझ्यावर जो राग आहे तो मला कळत नाही, असेही आही. आपल्या ऐशआरामांत आणि मनोविनोद व करमणुकीच्या साधनात गुरफटलेला माझ्या सारखा राजपदास योग्य नाही. प्रजेच्या इच्छेप्रमाणे मी सिंहासन तर सोडतोच, त्याहूनही मोठा त्याग करण्यास तयार आहे!" असे म्हणत राजा वर चढून आला.

चित्रसेन महाराजच असे बोलूं लागल्या-वर मी व समरसेन दोघेही थक्कच झालो. आपल्या दोघांच्या तोंडावाटे शब्दच उमटेना



चित्रसेन महाराज स्वतःच प्रजेला संबोधन करून व हात जोडून म्हणाले—"कुंडलिनी द्वीपनिवासी प्रजाबंधु हो! तुमचा राग व तुमची न्याय्य मागणी मी ओळखतो. मी भोगविलासात निमग्न होऊन तुमच्यावर येणाऱ्या संकटांची, दुःखांची पर्वा केली नाही. अशा माझ्यासारख्या राजाला तुम्ही सिंहासन सोडून जा, म्हणून सांगणं धर्माला अनुसरूनच आहे. मी आपला राजमुकुटच नव्हे तर त्याहून मूल्यवान वस्तू सुद्धा सोडायला तयार झालो आहे. परंतु तुम्ही मात्र तुमचा सेनापती समरसेन याच्या आज्ञेचे पालन केले पाहिजे!"

दुसऱ्याच क्षणाला प्रजेच्या जय जय काराने असमंत दुमदुमले. त्या पाठोपाठ चित्रसेन राजाने सभामंडपावरून खाली उडी मारली. हे सर्व एकदां पापणी लवायच्या आत घडलं. आम्ही दोघे थक्क होऊन खाली पाहू लागलो. चित्रसेन जमिनीवर निश्चेष्ट पडला होता. त्याचे प्राणोत्क्रमण झाले होते.

अकस्मात त्यांच्यामध्ये कोण प्राणी पडला हे न कळल्यामुळे घाबरून जाऊन सर्व क्रूर जनावरे तेथून पळून गेली. सर्व प्रजा निश्चेष्ट होऊन आपल्या राजाच्या देहाकडे पाहू लागली.

"संपले, सर्व नाटकच संपले!" असे म्हणत समरसेन स्वतः तेथल्या एका खांबाच्या आधारे अर्धवट शुद्धीत टेकून उभा राहिला. त्याच्या डोळयांतून पाण्याचे दोन थेंब गळून






पडले. मी प्रजेकडे वळून पाहिले. सगळीकडे स्मशानस्तब्धता पसरलेली होती. अकस्मात घडलेल्या या घटनमुळे ती किंकर्तव्य-विमूढ झालेलो होतो. समरसेन तर हालत डुलतही नव्हता. नरवाहन सुद्धा निश्चेष्ट झालेला होता.

इतक्यात त्याबाजूला शिकारखान्याचा अधिकारी धावत पळत आला. "आतां... आतां..." असे म्हणत तो पुढे काही बोलू शकला नाही.

मी त्याला जवळ यायला खूण केली व म्हणालो—"आतां तू सर्व जनावरांना त्यांच्या त्यांच्या पिंजऱ्यांत ते जातील असे काही तरी कर. हे काम जितक्या लवकर करशील तितके बरे. एक दोन मिनिटांतच किल्ल्याची दारं मी उघडविणार आहे. त्याच्या आत महाराजांचा देह मैदानांतून दूर नेऊन सुरक्षित जागेत नेऊन पोचविला पाहिजे." मी त्याला आज्ञाच केली.

समरसेन मी म्हणालो ते ऐकतच होता. काही अंतरावर नरवाहन उभा होता. तो माझ्याकडे एकदा तिरप्या नजरेने पाहून सभामंडपावर चढून गेला.

थोड्याच वेळात सर्व क्रूर जनावरांना त्यांच्या पिंजऱ्यांत पोचविण्यात आले. चित्रसेन महाराजांचा देह बाजूला नेण्यात आला. मी व समरसेन राजवाड्याचा जिना उतरून दाराकडे जाऊ लागलो.

आम्ही किल्ल्याच्या दाराजवळ पोचलो त्यावेळी प्रजेची हालचाल सुरू झाली. एका-एकी समरसेनाचा जयजयकार प्रजेने केला. त्या जयजयकाराने जमिनीपासून आकाशा-पर्यंत सर्व अंतराळ दुमदुमले.

किल्ल्याचे फाटक उघडले. समरसेन एक दोन पावले पुढे टाकून गरजला—"कुंडलिनी द्वीपवासि हो!" त्याचा आवाज ऐकून सर्वत्र शांतता पसरली. म्हणाला—"आतां जे काही घडलं आहे त्या विषयी मी बोलत नाही. देशांत अराजक व बंडाळी माजली आहे, हे खरं आहे. याला कोण किती जबाबदार आहे, याचा विचार करण्याची ही वेळ नव्हे! आज आपले महाराज नाहीत. म्हणून राजभक्तीचेही महत्व उरले नाही. आतां प्रस्तुत परिस्थितीत प्रत्यक व्यक्तीच्या मनात देशभक्ती व ऐक्यभाव राहिला पाहिजे!"

"कुंडलिनी द्वीपाचा जयजयकार असो!" प्रजेने जयजयकार केला.

समरसेन पुन्हा गरजला—"शहराच्या तटाबाहेर आपल्या राजधानीवर चालून येण्यासाठी शत्रूने पडाव टाकला आहे. प्रथम राजधानीचे रक्षण करावयाचे, नंतर देशाचे रक्षण करावयाचे आहे! शस्त्र धारण करण्याची शक्ती असलेल्या प्रत्येक नागरिकाने तळहातावर जीव घेऊन पुढे पाऊल टाकलं पाहिजे!"

प्रजेची हालचाल पुन्हां दिसली. प्रत्येक जण पुढे येण्यासाठी खटपट करू लागला. "मला तलवार द्या, मला तलवार द्या, मला धनुष्यबाण व भाता द्या!" हाच आवाज ऐकू येऊ लागला.

समरसेनाने मागे वळून पाहिले. जवळच उभा असलेला नरवाहन दिसला. "नरवाहना! आतां तुझे काम सोपं झाल्यासारखं दिसतं आहे. सैन्याची जमवा जमव कर!" असे म्हणत समरसेन मागे फिरला.

"मी आणि समरसेन किल्ल्याच्या बुरु-जावर चढून गेलो. दूर शत्रूचे असंख्य तंबू




ठोकलेले दिसले. मुंग्यांसारखे शत्रू हिंडत फिरत होते.

समरसेन म्हणाला—"शिवदत्ता, शत्रूला युद्ध म्हणजे काय, व्यूहरचना कशी कराव-याची वगैरे गोष्टी कळत नसल्यासारखा तो नुसता ठोकळा दिसत नाही. त्यांचा शस्त्राभ्यास पाहून सैन्य शस्त्रास्त्र विद्येत निष्णात असल्या सारखं दिसत आहे."

समरसेन म्हणाला त्यात सत्याचाच अंश जास्त होता. उघड्यावर त्यांचा शस्त्रा-भ्यास पाहून व शत्रुसैनिकाकडे पाहून त्यांना शस्त्रास्त्राचे चांगले शिक्षण मिळाल्याचेच कळत होते. मी किल्ल्याला लागून असलेल्या खंदकाकडे पाहिले. त्यात तितकेसे पाणी






नव्हते. लगेच मी एका सैनिकाला बोलावून त्याला खंदक भरेपर्यंत पाणी सोडायला सांगितले. तेव्हां समरसेन माझ्याकडे वळून म्हणाला.

"शिवदत्ता, सेनापतिपद मी स्वतः घेणे आतां आवश्यकच वाटत आहे. परंतु किल्ल्याच्या रक्षणाची जबाबदारीमात्र मी तुझ्यावर टाकीत आहे. कारण प्रस्तुत परिस्थितीत मला दुसरा मार्गच दिसत नाही. काय, ठीक आहे ना ?"

मी लगेच त्या प्रश्नाचे उत्तर देऊ शकलो नाही. किल्ल्याच्या रक्षणाची जबाबदारी घेणे म्हणजे शत्रूवर चालून जाणाऱ्या सैन्याबरोबर मी रहावयाचे नाही असंच म्हणावयाचे. म्हणजे उपसेनापती म्हणून नरवाहनाला समरसेनाबरोबर जायला संधी मिळणार. म्हणून मी काहीच बोललो नाही. ह्या कोड्यातून कशी सोडवणूक करून घ्यायची या विचारात मी असतां नरवाहन स्वतःच तेथे आला.

तो म्हणाला—"सेनापती! मी दोन हजार उत्तम शिकलेल्या सैनिकांचं सैन्य तयार ठेवलं आहे. प्रजेत जे धट्टेकट्टे सैन्यात भर्ती होण्यालायक दिसले त्यांची निवड करून आणखी चार हजारांना शस्त्रे वाटली आहेत. आतां पुढे काय करावयाचं, आज्ञा करावी."




समरसेन माझ्याकडे वळून म्हणाला—"राजधानीच्या रक्षणास दोन हजारांचं सैन्य पुरेल नाही का ?"

मी होकारार्थी मान हलविली.

"तरमग राजधानीच्या रक्षणाची सर्व जबाबदारी तुझी. मी दोन हजार सैनिकांना आणि आयुध धारण करू शकणाऱ्या आणखी दोन हजारांना बरोबर घेऊन जाऊन शत्रूवर चालून जातो. आम्ही बाहेर पडतांच किल्ल्याचे दार सावधपणे बंद करून घे!"

सर्व सैन्य किल्ल्याच्या फाटकाबाहेर जातांच मी राजधानीच्या रक्षणाकरितां कायकाय करणे आवश्यक आहे, याची







पाहणी करण्यासाठी मी निवडक पंचवीस जणांना बरोबर घेऊन निघालो. शस्त्रास्त्र घेऊन सज्ज असलेल्या प्रजेकडे पाहून मला शंका आली. यांना या आयुधांचा कसा उपभोग करावयाचा हे तरी माहीत असेल का ?

कारण शिस्तीने त्यांना उभे करणे देखील कष्टसाध्य वाटले. शिवाय त्यांच्या पैकी काही लोक निरनिराळे घोळका करून आपापसात काही तरी कारणे काढून भांडत असल्या सारखे दिसले.

मी किल्लाचे फाटक बंद करून किल्ल्याच्या बुरुजावर चढून उभा राहिलो. तेथून बाहेरचे दृश्य छान दिसत होते. समरसेनाच्या नेतृत्वाखाली किल्ल्यातील सैन्य काही अंतर चालून गेल्यावर शत्रु सैन्यात थोडी हालचाल सुरू झाल्यासारखे दिसले. शत्रुसैनिक घाईघाईने शस्त्रास्त्रे घेऊन युद्धाला तयार होत असल्या सारखे दिसले. घोडेस्वार मोठमोठे भाले घेऊन तयार झाले व पैदळ सैन्याच्या पुढे जाऊन उभे राहिले. काही लोक लहान लहान टोळ्या करून समरसेनाच्या सैन्या-वर चहूकडून हल्ला करण्याच्या तयारीने निघाले.

दोन्ही सैन्ये परस्परांशी भिडली तर कोणाला जय मिळेल, हे लगेच सांगणे अशक्य आहे हे मी ओळखले. शत्रूच्या दहाबारा घोडेस्वारांचे एक दळ जिवावर उदार होऊन समरसेनाच्या सैन्यावर तुटून पडण्यासाठी पुढे निघालेले मला दिसले. त्यांनी शक्य झाले तितक्यांना ठार केले आणि लगेच दूर पळून गेले. अशा विद्युत वेगाने आपल्या सैन्यावर हल्ले होतील आणि गनिमी काव्याने शत्रू युद्ध करील, याची कल्पना देखील समरसेनला नसावी. त्याने आपल्या सैन्याला एका जागी उभे करून आपल्या घोडेस्वारांच्या दहा दहा बाराबारांच्या टोळ्या केल्या.

(क्रमशः)





# नित्यानंदाचे पापकर्म

**वि**क्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू इतरांचे हित करून पुण्य संपादन करतां येईल व एक थोर महापुरुष म्हणून म्हणवितां येईल या हेतूने इतके त्रास सहन करतो आहेस, अशी एक शंका मनात येते. कोणी कितीं पुण्यात्मा झाला तरी परमेश्वराची इच्छा काय आहे ते त्याला कळणे शक्य नाही! म्हणून पुण्यकार्य करायला कोणी निघाला असतां त्यांच्या हातून नकळत पापकर्म घडते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला नित्यानंद नावाच्या एका परोपकारी व्यक्तीची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

वेताळाच्या गोष्टी



नित्यानंद हा लहानपणापासूनच परोपकार करीत असे. दुःखीकष्टी कोठे आहेत याचा शोध काढून तो त्यांच्या मदतीला धावे. इतरांना मदत करता यावी या साठीच तो व्यापारधंदा करीत असे. दानधर्म करण्यात संसार आड येऊ नये म्हणून त्याने लग्न सुद्धा केले नाही. दानधर्म घेण्यास कोणी पात्र किंवा अपात्र आहे की नाही याचाही त्याने कधी विचार केला नाही.

नित्यानंद राही त्या गावाच्या शेजारच्या गावी नारायण शेट नावाचा एक सावकार रहात असे. तो कर्जाऊ पैसे देऊन व्याज वसूल करीत असे. त्याच्याकडे कर्ज घेणारे सर्व स्वतःचा नाश करून घेतात असेच लोक म्हणत. कर्ज वसूल करण्याच्या बाबतीत नारायण शेट धर्माधर्माचा विचार करीत नसे.

काही काळ नारायण शेट खूप वैभव भोगीत राहिला. त्यानंतर त्याला वाईट दिवस पहावे लागले. एके दिवशी त्यांच्या घरात चोर शिरले व त्याचे घर लुटून नेले. एवढेच नव्हे तर जाता जाता त्यांनी घराला आगही लावली. नारायण शेटशी गावात सर्वांचेच वाकडे, म्हणून कोणी मदतीलाही धावलं नाही. म्हणून तो इतका श्रीमंत असूनही त्याला भिकारी व्हावे लागले.

त्यानंतर नारायणशेटला कोणी आपल्या थाऱ्याला उभे राहू दिले नाही. उलट त्याच्यावर आलेल्या संकटाबद्दल सर्वांना आनंदच झाला. म्हणून गावात राहणंही अशक्य झाल्यामुळे नारायणशेट मुलां बाळांना घेऊन दुसऱ्या एका गावी निघून गेला. तेथे राहून तो स्वतः व बायको आणि मुलं मेहनत मजुरी करून कमाई करू लागले. चार पैसे जमा झाले की पुन्हा काही व्यापार करावा असे नारायण शेटच्या मनात होते. परंतु त्याच्या हातात कधी पैसे शिलकीतच पडत नसत. कारण किमती भरमसाट वाढत चालल्या होत्या आणि घरात कोणी तरी नित्य आजारी पडत असे. मिळे तो पैसाच पुरत नसे.

आपल्या पाठीशी कोणता ग्रह लागला आहे बुवा, या विचाराने नारूशेट नेहमी दुःखी असे.

एके दिवशी त्या गावी एक साधू आला. नारूशेट त्याच्या दर्शनाला गेला आणि आपले दुःख त्याच्याजवळ निवेदन केले.

तो साधू त्याचे म्हणणे ऐकून घेतल्यावर म्हणाला—"तू, कित्येक लोकांच्या तोंडचे अन्न ओढून घेऊन त्यांना दुःखी केले आहेस, म्हणून तुझी ही दशा झाली आहे. तेव्हां तू दरिद्रनारायणाला अन्नदान कर. तुझे पाप धुवून निघेल व पुन्हां चांगले दिवस येतील. पण त्यानंतर मात्र शहाणपणाने वाग."

त्या दिवसापासून नारूशेट जास्त काळजीपूर्वक राहून चार पैसे मागे टाकू लागला. परंतु एकाएकी कोणतातरी अनपेक्षित खर्च होई आणि जमविलेले पैसे खर्च होऊन जात. आता आपल्याला पापमुक्ती नाही, असे मनाला लावून घेऊन तो दुःखी कष्टी झाला असतां त्याला नित्यानंदाच्या औदार्याविषयी कळले.

नारूशेट लगेच बायकोपोरांना घेऊन नित्यानंद राही त्या गावी निघाला. गावाच्या वेशीवरच त्याला एक माणूस भेटला. नारूशेटने त्याला विचारून नित्यानंदाविषयी सर्व माहिती काढून घेतली.





तो म्हणाला–"नित्यानंद तुला नक्कीच मदत करील. तेव्हां तुझे काम लवकर व्हावे यासाठी तुला मी एक युक्ती सांगतो, ती ऐक. नित्यानंद हा थोर महात्मा आहे. तो दररोज देवळात पाऊल टाकतो न टाकतो तोंच कोणी दिवे लावायची गरजच नसते, दिवे आपो-आप लागताता व उजेड होतो. त्या थोर पुरुषाला बोलावून तू जेवायला वाढलंस की सहस्त्रावधी लोकांना अन्नदान केल्याचं पुण्य लागेल !"

नारूशेट गावात गेला आणि नित्यानंदाला भेटून त्याने त्याला येण्याचे कारण निवेदन केले.

नित्यानंद त्याला म्हणाला–"तुला मदत करायला मला मुळीच हरकत नाही. परंतु मला हे नाही कळत की मी एकट्याने जेवलो तर एक हजार गरिबांची पोटें भरतील, हे कसे काय म्हणतोस तू ? मी एक सामान्य माणूस आहे. तेव्हां असला अंधविश्वास घेऊन बसू नकोस."

"आपण किती थोर पुण्यात्मे आहां हे देवळातले दिवेच सांगतात की, स्वतः आपोआप लागून ! तसेच या बद्दलही असे काही न घडेल असे नाही म्हणता येणार !" नारूशेट म्हणाला.

नारूशेटच्या कुटुंबियांनी त्या गावात चार दिवस खूप श्रम करून चार पैसे मिळविले आणि ते पैसे खर्च करून नित्यानंदाला एक मोठी मेजवानी दिली. नित्यानंदाचे जेवण झाल्यावर एक अत्यद्भुत घटना घडली. नारूशेटच्या बायकोने नित्यानंद ज्या पानावर जेवले होते ते पान उचलतांच तेथे आणखी एक पान दिसले. अशा तऱ्हेने एका मागून एक पान ती उचलत गेली आणि अशी पाने एक हजार झाली.

हे पाहून स्वतः नित्यानंदांना सुद्धा आश्चर्य वाटले. ते तृप्त होऊन तेथून परत निघून गेले. नारूशेटला सुद्धा वाटले की त्या दिवसापासून त्याची कष्टदशा संपली आणि त्याला परमानंद झाला. परंतु त्या दिवशी संध्याकाळी आणखी एक अद्‌भुत गोष्ट घडली. नित्यानंद नित्याप्रमाणे देवालयात गेले. परंतु नेहमी-प्रमाणे दिवे आपोआप लागले नाहीत. गावांत त्या गोष्टीची चहूकडे साश्चर्य चर्चा पण झाली. स्वतः नित्यानंद चिंतित झाले. आपल्या हातून काही चूक तर घडली नाही ?

त्या दिवसापासून नित्यानंदांनी देवळात पाऊल टाकतांच दिवे लागायचे कायमचे बंदच झाले. आपण कमाविलेले सर्व पुण्य घालवून बसलो की काय असे त्यांना वाटू लागले. नारूशेटला आपण सहाय्य करायचे मान्य केले तेव्हांपासूनच हे घडू लागलं आहे, हे नित्यानंदांनी ओळखले.

एके दिवशी ते आपल्या घरी देवासमोर बसून देवाला म्हणाले–"देवा, माझ्या हातून असा कोणता अपराध घडला ? आजपर्यंत मी चांगल्या लोकांना व वाईट लोकांनाही भेदभाव न करतां मदत करीत आलो. नारूशेटच्या बाबतीत मी अशी कोणती चूक केली ? त्याने काही काळ पापकर्म करीत जीवित घालविले हे खरे, पण आता त्याला आपल्या चुकीची जाणीव झाली आहे ना ! त्याला मदत करणें चुकीचे झाले का ?"



देवाकडून काहीच उत्तर आले नाही. तरी नित्यानंद आपला हट्ट न सोडता देवा-समोरच बसून म्हणाले–"माझ्या हातून काय चूक घडली तू सांगेपर्यंत मी अन्न-प्राशन करणार नाही की घोटभर पाणी ही पिणार नाही, येथेच बसून राहातो."

ही गोष्ट कळल्यावर प्रमुख गावकरी मंडळींनी नारूशेटला बोलावून असं काय घडले म्हणून विचारले. नारूशेटने घडले ते सांगितले. त्याच दिवशी गावातल्या प्रमुख मंडळींनी एक सहस्र भिकाऱ्यांना अन्नदान करण्याचे ठरविले. परंतु नारूशेट त्यांना म्हणाला–"आतां तुम्ही हा जो खर्च करणार तो सर्व मी देईन. मी तूर्त गरीबच आहे.

परंतु मी मेहनत मजुरी करून तेवढी रक्कम उभी करतो. माझ्यावर दया करा.''

त्यांनी ते मान्य केले. एक सहस्र गोर-गरिबांना अन्नदान करण्यात आले. त्या दिवशी रात्री नित्यानंदामुळे पुन्हां आपोआप दिवे लागले. त्यानंतर नारूशेटची परिस्थिती सुद्धा सुधारली. तो न्यायनीतीपूर्वक व्यापार धंदा करू लागला आणि सुखासमाधानाने राहू लागला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–''राजा, इतका थोर पुण्यवान होता तो नित्यानंद, पण फक्त एक वेळ तो नारूशेटच्या घरी जेवला त्यामुळे त्याच्या सर्व पुण्याचा नाश कसा काय झाला? नारूशेटने केलेले पाप नित्यानंदाच्या माथी आले म्हणून का? की याला आणखी काही कारण होते? या शंकांचं समाधान कारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस, तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.''

उत्तर देत विक्रमादित्य म्हणाला–''या जगात थोर पुरुषांचे पुण्य सुद्धा किती थोर असते हे दर्शविण्यासाठी देवाने नित्यानंदाला काही अद्‌भुत शक्ती दिल्या होत्या. त्यावरून आणखी जास्त पुण्यकार्य करायला प्रोत्साहन मिळावे हा हेतू देवाच्या मनात होता. नित्यानंदाने नारूशेटला मदत केली त्यात काही चूक नव्हतीच. परंतु कष्ट करून मिळविलेले पैसे खर्च करून एक हजार गरीबलोकांना अन्नदान करण्याचे नारूशेटने ठरविले होते. परंतु नित्यानंदाला एकट्याला मेजवानी दिल्याने ती हजार पोटें नकळत अन्न, बिना उपाशी राहिली ते पाप नकळत का होईना, नित्यानंदाच्या हातून घडल्याने त्याने देवळात पाऊल टाकतांच दिवे लागले नाहीत. ते पाहतांच त्याला आपली चूक कळली.''

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# नुकसान भरपाई

शिवपुर नावाच्या गावी ज्ञानबा आणि लखुजी नावाचे दोन शेतकरी रहात असत. गावाच्या पूर्वेला ज्ञानबाची अमराई होती आणि पश्चिमेला लखुजीची. त्या दोघांमध्ये वैर होते.

उन्हाळ्याच्या सुरवातीला मोहोरापाठोपाठ बारीक बारीक कैऱ्या दिसू लागल्या, तेव्हां ज्ञानबाच्या मनात एक दुष्ट विचार आला. तो जिल्ह्याच्या गावी गेला व तेथून त्याने एक माकड खरेदी करून आणले आणि त्या माकडाला रात्र पडल्यावर लखुजीच्या आमराईत सोडले. माकड या झाडावरून त्या झाडावर उड्या मारू लागले. सर्व कैऱ्या खाली पडल्या व सर्व आमराईची नासधूस झाली.

लखुजीने माकडाला पकडण्यासाठी कातकऱ्याकरवी खूप प्रयत्न केला. परंतु पिंजरा, जाळे वगैरे सर्व निरुपयोगी ठरले. कातकरी म्हणाला–''मालक, आपला हुकूम झाला तर मी एक तीर मारून माकडाला 'राम' म्हणायला लावतो.

लखुजी म्हणाला–''नको रे बाबा, तो रामाच्या सैन्यातला आहे. त्याला मारलं तर पाप लागेल. त्या ज्ञान्याने माझ्या आमराईत हे माकड आणून सोडले आहे. पाहातों मी, जशास तसे!'' लखुजी चिडून म्हणाला.

दुसऱ्या दिवशी लखुजीने दुसरं एक माकड आणलं आणि ज्ञानबाच्या आमराईत सोडलं. माकडाने ज्ञानबाच्या आमराईची अशोक वाटिका करून सोडली. ज्ञानबाने माकडाला धरण्याचे सर्व उपाय केले. सर्व निष्फळ ठरले.

प्रत्येक जण दुसऱ्याचं किती नुकसान झालं हे तिखटमीठ लावून गावभर सांगत फिरत होता. एकूण दोघांच्या बागातल्या

वर्षी आंवा पहायला सुद्धा मिळाला नाही. तीन चार आठवडे गेले. माकडे गावातल्या इतर बागात शिरली. त्यांनी सुद्धा माकडांना पकडायचे शिकस्तीचे प्रयत्न केले. परंतु व्यर्थ ठरले. सर्वांनी गावच्या पाटलाकडे तक्रार केली आणि या सर्वनाशाला ज्ञानबा व लखुजी जबाबदार असल्याचे सांगितले.

पाटलाने दोघांना बोलावून तंबी दिली व दोघांना जबाबदार ठरवून म्हणाला– "तुम्हा दोघांच्या आपसातील वैराचा परिणाम साऱ्या गावाला भोगावा लागत आहे. तुम्हां दोघांच्या माकडांचा हा उपद्रव आम्हां सर्वांना भोवत आहे. याची नुकसान भरपाई तुम्हांलाच द्यावी लागेल."

ज्ञानबा व लखुजी नम्रपणे आपली बाजू मांडीत म्हणाले–"या माकडांमुळे आमचे किती नुकसान झालं आहे, माहीत आहे का पाटील? आम्ही माकडांना धरायचा किती प्रयत्न केला आणि त्यासाठी किती तरी खर्चही केला."

पाटील म्हणाले–"मला ते सर्व माहीत आहे. तुमच्या तोंडून ऐकायची गरज नाही!" नंतर आपला निकाल देत म्हणाले–"तुम्ही दोघे परस्परांचं नुकसान करण्यासाठी माकडांना घेऊन आलात. या सर्व माकडचेष्टा तुमच्याच आहेत. म्हणून या माकडांमुळे ज्यांचं जितकं नुकसान झालं आहे. त्याची भरपाई तुम्ही दोघांनीच दिली पाहिजे. आता राहिलं माकडांनाकसं आवरायचं? तुम्ही शहरातून ज्यांच्याकडून ही माकडे खरेदी करून आणलीत त्याच लोकांना बोलावून आणून त्यांना माकडे घेऊन जायला सांगा. "त्या करितां जो खर्च होईल तो तुम्हां दोघांनी केला पाहिजे उशीर केलात तर दुप्पट दंड भरावा लागेल."

पाटलाचा निकाल ऐकल्यावर ज्ञानबा व लखुजी दोघांची तोंडे बंद झाली. बोलायला जागाच उरली नाही. ते दोघे माकडांना पकडविण्यासाठी त्यांच्या जुन्या मालकांकडे धावले.



# बिचारा विदूषक

एका राजाचा मंत्री कोणत्याही कायद्याची अमलबजावणी करण्याआधी दरबारी विदूषकाला निराळे बोलावून त्याच्याकडून कायद्याचा अर्थ वदवून घेत असे आणि नंतर त्या कायद्याचा परिचय जनतेला करून देत असे

अशा तऱ्हेने कित्येक वर्षे लोटली. तेव्हा विदूषकाचा गर्व वाढला. एके दिवशी त्याने मंत्र्याला विचारले–"महामंत्री, आपण कोणत्याही कायद्याची अंमलबजावणी करण्याआधी माझ्याकडून त्याचा अर्थ समजावून घेता त्यावरून असे स्पष्ट होते की, इतर लोकांच्यात जी प्रतिभा नाही, ती माझ्या एकट्यात आहे. परंतु अशा परिस्थितीत एक गोष्ट स्पष्ट होते की, दरबारी लोक जेवढा आपला आदर ठेवतात, तेवढा माझा ठेवत नाहीत."

मंत्र्याने हसून उत्तर दिले–"ह्याचा अर्थ असा होत नाही की तू खूप हुषार आहेस. मी तुझ्याकडून नियम म्हणून घेतो तो यासाठी की त्याचा अर्थ तुझ्या तोंडून यावा. तुला त्याचा अर्थ समजला तर राज्यातल्या प्रत्येक माणसाला त्याचा अर्थ समजेल याची मला खात्री आहे."

तेव्हां विदूषकाला कळले की, मंत्र्याच्या नजरेत तो एक मूर्ख गणला जातो. तेव्हां बिचाऱ्या विदूषकाची घमेंड जिरली.















# अंध विश्वास

रंगनाथ जोडप्याला रागिणी नावाची एकुलती एक मुलगी होती. त्यामुळे त्यांनी रागिणीला लाडात वाढविले. त्यांचा असा विश्वास होता की, रागिणी खूप नशिबवान आहे. म्हणून जेव्हां केव्हां त्यांना वेळ मिळे ते रागिणीला म्हणत–"मुली, तू खूप भाग्यवान आहेस. तू ज्या घरात पाय ठेवशील त्या घराचे भाग्य उजळेल!"

हळूहळू रागिणीच्या मनांत पण आई-वडिलांच्या म्हणण्यावर विश्वास बसू लागला. दुसऱ्यांच्या बरोबर गप्पा मारतांनासुद्धा ती आपल्या भाग्याचे गाणे गात असे. काही दिवसांनी तिचे लग्न आनंद नावाच्या मुला बरोबर झाले. तो त्या गावात नोकरी करीत होता.

रागिणी सासरी आली. थोड्या दिवसांनी आनंदला पगार वाढ व बढती मिळाली त्याने घरी येऊन आपल्या बायकोला सांगितले–"अग, ऐकलेस का? मला बढती मिळून पगारात वाढ पण झाली आहे. आता आपल्याला पूर्वी पेक्षा मजेत राहता येईल."

"वा रे वा, हे तर छान झाल! बहुतेक आपल्याला माहीत नाही की, आपल्या बढतीचे कारण मी आहे!" रागिणीने हसत उत्तर दिले.

आनंदने आश्चर्याने विचारले–"माझ्या बढतीचे कारण घरात बसून तू कशी काय होऊ शकतेस?"

काही लोक जन्मतःच दरिद्री असतात तसे काही जन्मतःच भाग्यवान पण असतात. त्यात मी दुसऱ्या नंबरची आहे. मी ज्या घरात पाय ठेवीन त्या घराचे भाग्य उजळेल. आता समजले का?"

"तू आपली बडबड थांबव पाहू. माझ्या घरात तू पाय ठेवलास म्हणून माझी बढती झाली नाही तर मी जी आजपर्यंत नोकरी केली ती प्रामाणिकपणे व जबाबदारीने केली म्हणून माझ्यावर खूष होऊन माझ्या अधिकाऱ्याने मला पगार वाढ दिली व नोकरीत बढती केली आहे." आनंदने हसून खरे कारण काय ते सांगितले.

"तर ह्याचा अर्थ असा होतो की, आजपर्यंत आपल्या अधिकारी लोकांनी आपले काम व प्रामाणिकपणा ओळखला, नव्हता आणि मी आपल्या घरात पाय ठेवल्याबरोबर ओळखला, असेच ना?" रागिणीने आनंदची थट्टा उडविली.

आनंदने विचार केला की, ह्या बाबतीत बायकोबरोबर वाद घालून काही फायदा होणार नाही. म्हणून तो पुढे न बोलता गप्प बसला.

त्याच दिवशी मध्यरात्री माजघरांत झोपलेली त्याची आई किंचाळून ओरडत उठली. आणि म्हणाली–"मुला, दागिने व जरीच्या साड्या ठेवलेली पेटी ह्या पलंगाखालून काढून चोरांनी उचलून नेली. बघ, त्या बदमाशाने भिंतीला केवढे मोठे भोक पाडले आहे." असे म्हणत ती मोठमोठ्याने रडू लागली.

आनंद त्याच्या आईचे किंचाळणे रडणे ऐकून बायकोबरोबर आईच्या खोलीत आला व तिला धीरी देत म्हणाला–"आई, जे व्हायचे होते ते होऊन गेले. आता रडण्यात काय अर्थ आहे? शांत हो.



परंतु आनंदची आई रागिणीकडे संतापाने पहात म्हणाली—"मला समजावून सांगण्याची काही गरज नाही, आजपर्यंत कधी घरात चोरी झाली होती कां? आपलं नशीबच फुटकं जेव्हां पासून तुझ्या बायकोने घरात पाय ठेवला तेव्हां पासून असेच काहीतरी घडते आहे."

आई तू रागिणीला दोष कशाला देतेस? तिने घरात पाय ठेवण्याचा आणि चोरी होण्याचा काही एक संबंध नाही?" आनंदने आईला दटावले.

आनंदची आई आपले डोळे पुसत म्हणाली—"मला, कोणाकोणाचा पायगुणच लमा असतो. त्यानेच हे फळ असू शकेल."

सासूचे बोलणे ऐकून रागिणीला खूप दुःख झाले. तिने तावडतोब परसदार उघडले आणि ती विहीरीच्या दिशेने धावत सुटली. आनंदने तिला अडविले व तिला म्हणाला—"तुला वेडबीड तर नाही ना लागले. हे तू काय करायला चालली आहेस?" तुला काही कळते की नाही.

"आपल्या मोतोश्रीच्या तोंडून असे ऐकल्यावर माझा जगून तरी काय उपयोग?" माझे नशिबच फुटके रागिणी रडत रडत म्हणाली.

आनंदने आपल्या बायकोला समजावून सांगितले—"तू आईच्या बोलण्याकडे लक्ष देऊ नकोस. जसे तू म्हणालीस की तुझ्या येण्यामुळे आपल्याला बढती मिळाली, तसे तिने पण विचार केला की, तुझ्या येण्यामुळे घरात चोरी झाली. तुम्ही दोघीही अंधविश्वास ठेवण्यावर एकीपेक्षा एक सरस आहांत!"

सासूचे बोलणे कठोर असेना का. परंतु खरोखर त्यामुळे माझे डोळे उघडले, आपले म्हणणेच खरे आहे. मी अंधविश्वासामुळे मला भाग्यशाली समजून अनेकांची मने दुखविली आहेत. आता माझी अकल ठिकाणावर आली." असे म्हणत पश्चातापाने रागिणीने पदराने आपले डोळे पुसले व ती आनंदाने आपल्या नवऱ्याकडे पाहू लागली.





# धर्माचरण

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां. बोधिसत्वानी धनंजय नावाच्या कुरु राजाच्या रूपाने इन्द्रप्रस्थ येथे जन्म घेतला. त्याच्या राज्यात वेळेवर पाऊस पडत असे, दुष्काळ कधी पडत नसे. त्यामुळे सर्व प्रजा सुखी होती. साऱ्या जंबूद्वीपात अशी बातमी पसरली की, धर्माचरण आणि दानधर्म करण्यात इंद्रप्रस्थचा राजा धनंजय याची बरोबरी करणारा दूसरा कोणी नाही.

त्याचवेळेस कलिंग देशाचा राजा कालिंग हा दंतपूर ही आपली राजधानी करून तेथे राज्य करीत होता. त्याच्या राज्यात एकदा भयंकर दुष्काळ पडला लोक भूकेने मरू लागले. काही मुले आपल्या आयांच्या मांडीवरच भूकेने तडफडू लागली. प्रजेत हाहाकार माजला.

देशाची वाईट परिस्थिती पाहून राजा कालिंगला राहवले नाही. त्याने आपल्या मंत्र्यांना बोलावून विचारले—"ह्या वर्षी आपल्या देशात भयंकर दुष्काळ पडण्याचे कारण काय असावे? ह्या वाईट अवस्थेतून वांचण्यासाठी काही उपाय आहे काय?"

मंत्र्यांनी उत्तर दिले—"महाराज, देशात जेव्हां धर्माची हानी होते, त्यावेळेस असा उत्पात होतो. इंद्रप्रस्थचा राजा धनंजय हा मोठ्या ईमानदारीने आपल्या धर्माचे पालन करतो आहे! त्यामुळे त्याच्या देशात महिन्यांतून तीनदा पाऊस पडतो. देशात कधी दुष्काळ पडत नाही. प्रजा सुखी आहे आणि देश समृद्ध आहे."

"तर तुम्ही लोक एक काम करा. आजच इंद्रप्रस्थला जाऊन राजा धनंजयाचे दर्शन घ्या, आणि एका सुवर्णपत्रावर धर्माचे नियम लिहून घेऊन या. आपल्यालासुद्धा त्या नियमांचे पालन करून देशाला सुखी व समृद्ध करता येईल."











कलिंग देशाचे मंत्री सुवर्णपत्र घेऊन इंद्रप्रस्थला पोहोचले. आणि राजा धनंजयाचे दर्शन घेऊन म्हणाले—"महाराज, आम्ही कलिंग देशाचे रहिवाशी आहोत. आमचा देश भयंकर दुष्काळात सांपडला आहे. आपण धर्मात्मा आहात, धर्माचे पालन करून प्रजेचा सांभाळ करीत आहात. त्यामुळे आपली प्रजा सुखी व संपन्न आहे. आमच्या राजाने ज्या धर्माचे पालन करावयास हवे ते आपण ह्या सुवर्णपत्रावर लिहून द्या. म्हणजे आमचा राजा त्या धर्मनियमांचे पालन करून दुष्काळापासून जनतेला वाचवील." असे म्हणत कलिंग देशाच्या मंत्र्यांनी सुवर्णपत्र धनंजयच्या समोर आणून ठेवले.

धनंजय नमस्कार करीत म्हणाला—"हे मंत्र्यानो मला क्षमा करा. ह्या कागदावर धर्मसूत्र लिहिण्याची माझी योग्यता नाही. कारण एकदा माझ्याकडून धर्माचे उल्लंघन झाले. आमच्या देशात तीन वर्षांने एकदा कार्तिक उत्सव होतो. त्यावेळेस राजाला तलावाच्या काठांवर यज्ञ करावा लागतो. व यज्ञाच्या चारी बाजूला चार बाण सोडावे लागतात. एकदा मी चारही बाण चार दिशेने सोडले. तीन बाण बरोबर गेले, परंतु चौथा तलावात पडला. बाणाच्या आघाताने तळ्यातले मासे बेडूक मरुन गेले. अशा प्रकारे माझ्या हातून अधर्माचरण झाले. जर कां माझ्या राज्यात अत्याचार, अन्याय त्रास नसेल तर त्याचे कारण माझ्या पूर्वकालीन शासन करणाऱ्यांपैकी कोणीतरी असेल तेव्हां आपण कृपा करून त्याचा शोध काढावा."

ही गोष्ट ऐकताच सर्व मंत्र्यांना आश्चर्य वाटले. त्यानंतर ते सर्व राजमाता माया-देवीच्यापाशी आले. सर्व गोष्ट तिला सांगून म्हणाले—"देवीजी, आपण कृपा करून आमच्या करिता धर्म नियम लिहून द्या."

"मुला, मी सुद्धा धर्माचे अतिक्रमण केले आहे. एकदा माझ्या मोठ्या मुलाने मला सोन्याची माळ भेट म्हणून दिली. मी माझ्या मोठ्या सूनेला श्रीमंत घराण्यातली समजून तिला ती न देता धाकट्या सुनेला देऊन टाकली, परंतु दुसऱ्याक्षणीच मी पक्षपात केला असे मला उमजले आणि झालेल्या गोष्टीचे मला खूप दुःख झाले, त्यामुळे दुसऱ्यांना धर्माचे सूत्र लिहून देण्याची माझी लायकी नाही. तरी तुम्ही कृपया कोणातरी योग्य अशा माणसाला शोधा व त्याच्याकडे जा."

त्यानंतर कलिंग देशाचे मंत्री राजाचा भाऊ नंद ह्याच्यापाशी गेले. त्याने सुद्धा एकदा धर्माचे उल्लंघन केले होते ती गोष्ट त्याने सांगण्यास सुरवात केली—"मी रोज संध्याकाळी रथात बसून अंत:पुरात जात होतो. केव्हां केव्हां तेथेच रात्रभर रहात होतो. जर मी माझा चाबूक रथात सोडला तर, त्याचा अर्थ मी रात्री अंत:पुरात राहाणार नाही. तेव्हां तशा परिस्थितीत माझा सारथी माझी वाट पहात बसे. आणि मी चाबूक बरोबर घेऊन गेलो तर सारथी रथ चालवीत घेऊन जात असे, व दूसऱ्या दिवशी सकाळी रथ घेऊन येत असे. एकदा मी चाबूक सोडून अंत:पुरात गेलो. त्या दिवशी माझा परतायचा विचार होता. परंतु थोड्या वेळाने पाऊस कोसळू लागला. तेव्हां राजाने म्हणजे माझ्या मोठ्या भावाने मला परत जावू दिले नाही



त्यामुळे मी रात्रभर अंत:पुरातच राहिलो. माझी वाट पहात माझा सारथी रात्रभर पावसात भिजत रथातच बसून राहिला. अशा प्रकारे त्याला त्रास झाला व मी धर्माचे अतिक्रमण केले."

त्यानंतर कलिंग देशाचे मंत्री असा विचार करून राजपुरोहिताकडे गेले की, कमीत कमी राजपुरोहित तरी त्याची इच्छा पूर्ण करतील. परंतु त्याने सुद्धा धर्माचे अतिक्रमण केल्याची गोष्ट सांगितली—"एके दिवशी मी राजमहालाकडे जात होतो. रस्त्यात मला एक रथ दिसला. त्या रथाला सोन्याचा मुलामा केलेला होता. तो बघताच माझ्या मनांत लोभ उत्पन्न

झाला. मी विचार केला की, जर राजाने हा रथ मला दान केला तर किती छान होईल! मी जेव्हां राजाच्याकडे पोहोचलो. तेव्हां मला बघून राजा म्हणाला—"पुरोहितजी हा रथ मी आपल्याला भेट दिला आहे. तो आपण घेऊन जा. त्यावेळेला माझ्यात उत्पन्न झालेल्या लोभाची मला आठवण झाली आणि मी पश्चातापाने तो रथ घेण्यास नकार दिला. अशा तऱ्हेने मी धर्माचे आचरण केले नाही तरी मी आपल्याला धर्मसूत्र लिहून देऊ शकत नाही."

कलिंग देशाच्या मंत्र्यांच्या लक्षात काहीच आले नाही. शेवटी ते इंद्रप्रस्थच्या महामंत्र्याच्याकडे गेले. त्याने सुद्धा त्याना निराश केले. म्हणाला—"मी सुद्धा एकदा शेतकऱ्याच्या शेताचे माप घ्यायला गेलो होतो. माप घेऊन मला जेथे खुंटी ठोकायची होती तेथे एक मोठे बिळ होते. माझ्या मनांत एक शंका आली की त्या बिळात कोणीतरी रहात असावे. परंतु थोडे अलिकडे खुंटी ठोकायची तर शेतकऱ्याचे नुकसान होणार व थोडे पुढे ठोकायचे तर राजाचे नुकसान होणार म्हणून त्याने त्या बिळातच खुंटी ठोकायची आज्ञा केली. खुंटी ठोकताच आतून एक खेकडा बाहेर आला आणि त्याच्या प्रहाराने मेला. तेव्हा मी सुद्धा धर्माचे अतिक्रमण केले आहे. तरी अशा अवस्थेत मी तुम्हांला कसे लिहून देऊ शकेन?"

त्यावर कलिंग देशाच्या मंत्र्यांनीच एक उपाय शोधून काढला त्यांनी सर्वांनी सांगितलेल्या गोष्टी त्या सुवर्णपत्रावर लिहून घेतल्या व त्या नेऊन राजाला वाचून दाखविल्या. राजा कालिंगला समजले की, धर्म करतांना त्याच्यावर ईमानदारीने राहणेच सर्वात उत्तमकार्य आहे. त्याचप्रमाणे त्याने स्वतःच त्याचे पालन करून राज्यकारभार करण्यास सुरवात केली त्यानंतर थोड्या दिवसात पाऊस पडू लागला व देशातील दुष्काळ नाहीसा झाला. त्या दिवसापासून कलिंग देशाची प्रजा सुखाने व समृद्धीने नांदू लागली.





# पृथ्वीराज–संयोगिता-३

पृथ्वीराजाचा मित्र आणि दरबारी कवी चंदवरदाई आपल्या राजाला भेटला. तेव्हां ते दोघे वेष बदलून कनोजला परत आले. राजा जयचंद्रने घोडेस्वारांना पकडण्याची शिकस्त केली. परंतु त्यात ते यशस्वी झाले नाहीत.

कनोज राज्याच्या सरहद्दीवर पृथ्वीराजाचे काही वीर योद्धे लपून बसले होते. जेव्हां पृथ्वीराज व संयोगिता जयचंद्र राज्याची सीमा ओलांडून बाहेर पडले. तेव्हां जयचंद्राच्या सैनिकांशी त्यांनी लढाई करून त्यांना पळवून लावले.





ह्या घटनेमुळे राजा जयचंद्रला आपला अपमान झाल्यासारखे वाटले. त्याला खूप दुःख झाले. त्यानंतर तो रात्रंदिवस पृथ्वीराजावर सूड उगवण्याची मनोराज्ये रचू लागला. दुसऱ्या देशांच्या राजपूत लोकांकडे त्याने दीनवाणेपणाने मदत मागितली परंतु त्याला मदत करण्यास कोणीच तयार होईनात.



तशा परिस्थितीत राजा जयचंद्राच्या मनात दुर्बुद्धि निर्माण झाली. त्याने मुहम्मद गोरीकडे एक संदेश पाठविला की जर तो पृथ्वीराजाच्या राज्यावर चाल करून जात असेल तर त्याला मदत करायला आपण तयार आहोत. त्यावर मुहम्मद गोरीला खूप आनंद झाला. त्याच्या मनात जयचंद्राची मदत घेऊन दिल्लीवर विजय मिळविण्याची इच्छा उत्पन्न झाली.

दिल्लीला पृथ्वीराजाने राणी संयोगिते करिता खास महाल बांधला. ते दोघे त्यांत आनंदाने राहू लागले. आता लढाईची भीती नव्हती. त्याकरिता पृथ्वीराजाने प्रजेच्या कल्याणा करिता सोयीच्या काही योजना आखल्या.





परंतु मुहम्मद गोरी व राजा जयचंद्राच्या सैन्यानी अचानक दिल्लीवर हल्ला केला. त्यांच्या सैन्याने वाटेत असलेली गावे जाळून टाकली. राज्याची सीमा रक्षण करणारे थोडेफार सैनिक व गावातील प्रजा असा अचानक झालेला हल्ला पाहून आकांत करू लागले.

सरहद्दीवर असलेल्या सैनिकांनी तातड-तोब पृथ्वीराजाकडे येऊन शत्रू सैन्याने केलेल्या हल्ल्यांचा समाचार दिला. पृथ्वीराजाने त्याच क्षणी लढाई करिता सैन्यांची जमवाजमव शुरू केली.





राणी संयोगितेने स्वतःच्या हाताने पृथ्वीराजाच्या डोक्यावर शिरस्त्राण घातले. पृथ्वीराजाने राणीचा निरोप घेतला व तो लढाईला निघाला. तेव्हां शत्रुसैन्य दिल्ली नगराच्या सरहद्दीवर येऊन पोहोचले होते.

पृथ्वीराजाला व प्रजेला कल्पनाही नव्हती की, शत्रुसैन्य इतक्याजवळ म्हणजे राजधानीपर्यंत येऊन पोहोचले असेल तरीपण पृथ्वीराजाने आपल्या सैन्याला उत्तेजन दिले व शत्रुसैन्यावर हिंमतीने हल्ला केला.





पृथ्वीराजाच्या सैन्याने मोठ्या उत्साहाने व पराक्रमाने शत्रुसैन्यावर हल्ला करून त्यांना सळो की पळो करून लावले. परंतु मुहम्मद गोरी व राजा. जयचंद्र ह्यांचे सैन्य त्यांच्या सैन्याच्या मानाने कितीतरी पटीने मोठे होते शेवटी लढत असतांनाच पृथ्वीराज जखमी झाला काही वेळाने मरण पावला.

ही बातमी क्षणातच राणी संयोगितेला समजली. राणीने चितेत प्राणार्पण करण्याकरीता अग्निकुंड तयार करा-वयास सांगितले त्यानंतर पृथ्वी-राजाच्या तसबिरीला फुलांची माळ घालून तिने अग्नित उडी घेतली.





पृथ्वीराजाच्या मृत्यू नंतर दिल्लीत हिंदूचे शासनपद्धति नष्ट झाली. परंतु राजा जयचंद्राला त्यांच्या विजयावर गर्व करण्यास वेळ मिळाला नाही. दुसऱ्याच वर्षी मुहम्मदगोरीने कनोज-वर चाल केली व त्याच्या क्रूर सेनापती कुतुबुद्दीनने दुष्टपणे राजा जयचंद्रला मारून टाकले.



# पत्नी भक्त

नारायण पत्नी भक्त होता. तो आपल्या बायकोला विचारल्या शिवाय कुठचेही काम करीत नसे किंवा तिचे कुठलेही म्हणणे नाकारीत नसे. तो कुठेही गेला कोणालाही भेटला तरी त्याच्या तोंडावर कोणी काही म्हणत नसत, परंतु त्याच्या पाठीमागे त्याची पत्नीभक्त म्हणून टिंगल करीत असत. थोड्या दिवसांनी लोक त्याच्या तोंडावरही त्याची टिंगल करू लागले. नारायणला कळेना की, हा प्रकार कसा थांबवावा.

नारायणचा एक मित्र दत्तोपंत नावाचा होता. एकदा त्याने आपल्या पुढील समस्या त्याला सांगितली. म्हणाला–"मित्रा, तुझ्यावर ही आपत्ती येण्यास कारण म्हणजे तू तुझ्या बायकोचे सर्व म्हणणे गप्प बसून ऐकतोस तिला कधी विरोध करीत नाहीस. त्यामुळे तू असे कर की एकदा तुझ्या बायकोचे न ऐकता गप्प रहा, म्हणजे मग पहा काय होते ते ?"

नारायण क्षणभर विचार करीत राहिला, जर आपण आपल्या बायकोचे म्हणणे ऐकले नाही तर, ती असा काही कांगावा करील की, सगळ्यांच्या समोर आपला अपमान होईल.

त्याने ते मित्राला सांगितले. दत्तोपंत म्हणाले–"आता समजले नां.? तू अशा परिस्थितीत जाऊन पोहोचला आहेस की, तुझ्या बायकोने सांगितलेले नाकारणे तुला केंव्हांही शक्य होणार नाही. म्हणून मी तुला असा एक उत्तम उपाय सांगतो.

नारायण परत विचार करु लागला. ही अट तर त्याला जास्तच कठिण वाटू लागली. कारण बायकोचे न ऐकणे किंवा तिच्या बोलण्याकडे कानाडोळा करणे एकवेळ शक्य होईल. परंतु आपल्या इच्छे-



प्रमाणे तिचे मन वळविणे ही गोष्ट अशक्य आहे. हे फक्त तिच्या इच्छे-अनिच्छेवरच अवलंबून आहे.

नारायणला गहन विचारात पडलेला पाहून दत्तोपंत हसत म्हणाले–"मित्रा हे सत्य आहे की, मी जो सल्ला तुला दिला त्याची अंमलबजावणी करणे तुला जमणार नाही. अशा परिस्थितीत तुझ्याबद्दल गावात ज्या अफवा उठल्या आहेत त्या नाहिशा करणे कठीण आहे."

नारायण उदास होत म्हणाला–"तर दुसरा काही उपाय नाही का?"

"एक काम करता येईल. माझ्या घरी काही मंगलकार्य आहे, असे सांगून मी तुम्हां उभयतांना जेवणाचे आमंत्रण देईन. तेव्हां तुमच्या बायकोच्या स्वभावाचे मला निरीक्षणपण करता येईल."

नारायणला ही गोष्ट आवडली दोन तीन दिवसानंतर दत्तोपंतांनी त्याच्या घरी जाऊन त्यांना जेवणाचे आमंत्रण दिले.

खरी गोष्ट अशी होती की, नारायणची बायको स्वभावाने भांडकुदळ नव्हती परंतु तिच्या मनांत अशी एक इच्छा होती की बायकांच्या मध्ये तिचे एक वैशिष्ठ्य असावे. तिला सर्व बायका म्हणत की तुझे भाग्य काय विचारावे. तुझा नवरा तुझे सर्व म्हणणे ऐकतो. तसे ऐकल्यावर तिला बरे वाटत असे.

नारायण बायकोला बरोबर घेऊन दत्तोपंतांच्या घरी पोहोचला. तेव्हां सर्व जय्यत तयारी झाली होती. दत्तोपंतांनी दोघांचेही हंसमुखाने स्वागत केले. आणि म्हणाला–"मी त्यादिवशी तुम्हांला सांगितले की माझ्या घरी मंगलकार्य आहे परंतु तसे काही नाही. आमच्या लग्नाचा दहावा वाढदिवस आहे, त्याकरिता तुम्हांला हे आमंत्रण दिले होते.

जेवतांना प्रत्येक गोष्टीत दत्तोपंत आपल्या बायकोवर आरडाओरड करीत होते. हा पदार्थ किती खारट केलास भाजीत तिखट किती घातलेस. असे तसे करून रागवित होते परंतु त्याची बायको काही एक न बोलता गप्प बसून ऐकत होती व चुकल्याबद्दल क्षमा मागत होती.

दत्तोपंतांचे हे बोलणे ऐकून व वागणे पाहून शांताबाईला खूप राग आला तिच्या अंगाची लाही झाली. तिच्या मताने दत्तोपंत म्हणजे एक अत्याचारी माणूस निघाला.

जेवण आटोपताच शांताबाईने दत्तोपंतांच्या बायकोला एकीकडे बोलावून घेतले आणि म्हणाली–"तुझे पती छोटया छोटया गोष्टीत दखल घेऊन तुझ्यावर सारखे ओरडत असतात आणि तू ते मुकाटयाने ऐकून घेत असतेस, ते मला काही आवडले नाही. जर का तुझ्या जागी मी असते तर...?"

दत्तोपंतांची बायको हसत म्हणाली–"शांताबाई संसारात पती नेहमी पत्नीचे सुखदुःख निम्मे वाटून घेत असतो. तिला प्रत्येक गोष्टीत हातभार लावत असतो. तेव्हां अशा पतीचा नेहमी आदर करणेच पत्नीचे कर्तव्य आहे. आपले म्हणणेच खरे करणे, कोणतीही गोष्ट न ऐकणे, अधिकार गाजविणे चेष्टा करणे हे अगदीच गैर आहे. ह्याखेपेस माझे पती माझ्यावर रागावले आहेत थोडयावेळाने त्यांनाच त्याबद्दल पश्चाताप होईल. ही गोष्ट माझ्या अनुभवावरुन तुला सांगते आहे."

शांताबाई विचार करू लागली. दत्तोपंतांच्या बायकोचे बोलणे तिला पटू लागले. नारायण घरी परत येताच गदगदलेल्या



स्वरात म्हणाला–"छे, छे, काय अत्याचार, मी कधीही विचार केला नव्हता की, दत्तोपंत असा मूर्ख आणि दुष्ट माणूस असेल. बायकोवर प्रत्येक गोष्टीत ओरडत होता. बिचारी गरीब बाई आहे म्हणून मुकाट्याने सहन करीत गप्प बसते."

शांताबाई रागाने म्हणाली–"माझ्या एका प्रश्नाचे उत्तर द्या. तुम्ही माझ्या प्रत्येक म्हणण्याला कां मान हलविता? तुम्हांला त्या दत्तोपंतांसारखे पुरुषाप्रमाणे वागता येत नाही का?"

नारायण आश्चर्यचकित झाला आणि म्हणाला–"मला असे दुष्टासारखे वागणे पसंत नाही. मला लोक म्हणेनात कां पत्नीभक्त. माझ्यात काय थोडीच त्यांच्या म्हणण्याने झीज होणार आहे. माझे म्हणणं ऐकण्याची मी तुझ्यावर जबरदस्ती थोडीच करणार आहे."

"ह्यापुढे असे कधीही होणार नाही. तुम्हांला सुद्धा दत्तोपंतांसारखे वागायला हवे. मी काही दत्तोपंतांच्या बायकोपेक्षा आपली अब्रू सांभाळण्यात कमी नाही!"

आपल्या बायकोत झालेला फरक पाहून नारायण आनंदित झाला परंतु जे लोक त्याची पत्नीभक्त म्हणून अवहेलना करीत होते. त्यांना कळायला हवे तर त्याचा काहितरी उपयोग म्हणून एका आठवड्या-नंतर नारायणने त्याच्या वाढदिवसा निमित्ताने काही ओळखीच्या लोकांना आमंत्रण दिले. परंतु सर्वजण अशा हेतूनेच त्याच्या-कडे आले की, शेवटपर्यंत पाहूया तरी नारायण आपल्या बायकोचे किती ऐकतो ते?"

काहीवेळाने सर्व लोक निराश झाले. कारण नारायण छोट्या छोट्या गोष्टीत बायकोवर आरडाओरड करीत होता. ती ते निमूटपणे ऐकून गप्प बसत होती न[illegible] सर्व व्यवहार सांभाळत होती.

नारायण एक दिवस दत्तोपंतांना भेटायला गेला. आपल्या बायकोत झालेले परिवर्तन सर्व सांगून त्याने त्याचे कृतज्ञतापूर्वक आभार मानले.



# प्रश्न करावा तर असा

एका गावी सर्जेराव नावाचे एक श्रीमंत गृहस्थ रहात असत. ते आपल्या सुस्वभावामुळे आणि हुशारीमुळे गावात फार प्रसिद्ध होते. कोणी कधी खोटे बोलला तर सर्जेराव त्याला एखादा मार्मिक प्रश्न टाकीत आणि त्याचा खोटेपणा उघडकीस आणीत.

सर्जेरावांना लग्नाचं वय झालेली एकुलती एक मुलगी होती. त्यांचा जमीनजुमला पाहून कित्येक लोकांनी त्यांच्या स्थळावर नजर ठेवली होती. प्रत्येक जण आपल्या श्रीमंतीचे वर्णन थोडेसे तिखटमीठ लावूनच करीत. परंतु सर्जेराव त्यांना एखादा सवाल टाकीत आणि त्यांचे उत्तर कळतांच त्यांना खरी परिस्थिती कळे.

एकदां दूर गावचे बाजीराव नावाचे गृहस्थ स्थळाच्या चवकशीकरिता आले आणि म्हणाले–"माझा मुलगा सर्व तऱ्हेने तुमच्या मुलीला योग्य वर आहे. आतां म्हणाल, तर आमचा जमीनजुमला? तुम्ही गैर मानणार नसाल तर खरं खरं सांगतो. तुमच्याहून काकण भर जास्तच आहे."

सर्जेरावांनी शांतपणे विचारले–"मीही, तुम्ही गैर मानत नसाल तर एकच प्रश्न विचारावा, म्हणतो! तुमच्या घरात उंदीर, मांजरं आणि कुत्री आहेत का हो?"

बाजीरावांना राग आला आणि म्हणाले–"छे, छे, छे! ती सर्व नाहीत बुवा माझ्याकडे!"

"तरमग मला दुसरं स्थळच पहावे लागणार." सर्जेराव एकदम म्हणाले. बाजीराव निघून गेल्यावर सर्जेरावांच्या बायकोने त्यांना विचारले–"मुलीच्या स्थळाची चवकशी करायला आलेल्यांना असला का प्रश्न विचारतात?"

सर्जेराव स्मित करून म्हणाले–"अग, जेथे धनधान्य असतं तेथे मांजरं असतात. जेथे दूध दुभतं असतं तेथे मांजरं असतात, आणि जेथे मोठा जमीनजुमला असतो तेथे राखण करायला कुत्री असतात. त्या गृहस्थाकडे तिन्ही पैकी काहीच नाही. तरमग त्यांच्याकडे जमीनजुमला तो काय असणार?"





# घमेंडखोर कालकेतू

कधी एका काळी कांचनपुर येथे कालकेतू याचे राज्य होते. राजा कालकेतू हा भयंकर घमेंडखोर होता. त्याचा अहंकार इतका वाढत गेला की त्याला वाटू लागले की त्याच्यासमोर स्वतः सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाचीही डाळ शिजणे शक्य नाही.

राजाचे हितैषी आणि मंत्री त्याला सावध करून सांगत की, महाराज हे वैभव-संपत्ती शाश्वत नाही. त्याचा एवढा गर्व करणे रास्त नाही. परंतु अधिकारमद चढल्यामुळे राजाने त्यांच्या सल्ल्यांकडे दुर्लक्ष केले. राजा लहानथोर सर्वांशी उर्मट पणाने बोले व वागे व निःसंकोचपणे कोणाचाही अपमान करी. त्याला राज्यपदावरून कोणी काढू शकणार नाही. या गोष्टीची त्याला खात्री होती म्हणून तो कोणाची फिकीर करीत नसे. अशा तऱ्हेने त्याचा अहंकार वाढतच गेला.

कांचनपूर राज्याच्या एका प्रमुख शहरात एक सुप्रसिद्ध देऊळ होते. त्या देवळात दरवर्षी अनेक उत्सव होत असत आणि मोठमोठ्या जेवणावळी ही होत असत.

गादीवर बसल्यानंतर एके दिवशी अगदी पहिल्याने कालकेतू आपल्या मंत्र्यांसमवेत लव्याजम्यासह देवळातला उत्सव पाहण्यास गेला. राजा देवळात पोचला त्यावेळी पुरोहित पुराणप्रवचन करीत होते. अनेक श्लोकांच्या संदर्भात एक श्लोक त्यांनी म्हटला. त्याचा अर्थ थोडक्यात असा होता–"देवा, तू सर्वशक्तिमान आहेस. तुझ्या मनात आलं तर तू राजाला रंक व रंकाला राजा करू शकशील."

तो श्लोक कानावर पडताच राजाच्या सर्वांगाची आग होऊ लागली. तो मनात म्हणू लागला–"अस्सं! देव इच्छील तर रंकाचा राजा आणि राजाचा रंक होईल का? ही सर्व पंडित व पुरोहित मंडळी म्हणजे निरर्थक पोपटासारखे बडबडत आहेत."

राजाच्या मनात ती गोष्ट आली मात्र, त्याला अचानक डोळ्यासमोर अंधेरी आल्यासारखे झाले. त्याने जांभया घेऊन डोळे बंद केले. काही वेळ बेशुद्धावस्थेत राहिल्यानंतर त्याने शुद्धीवर येताच डोळे उघडून पाहिले तर त्याला चारही दिशांना काळोख पसरलेला दिसला. त्याच्याबरोबर आलेले मंत्री व लव्याजम्यातील लोक इतर त्याला दिसले नाहीत. त्याला जवळपास दिव्याची लुकलुकणारी ज्योतसुद्धा दिसली नाही. त्याची स्थिती आंधळ्यासारखी झाली.



कालकेतू घाबरला, तो घामाघूम झाला. त्याचा कंठ कोरडा पडला. त्या काळोखात एखाद्या आंधळ्यासारखा राजा चाचपत चालू लागला. मोठ्या कष्टाने तो कसा बसा एका दाराजवळ आला. दार जोर जोराने ठोठावून तो ओरडू लागला–"कोण आहे आत? येथे आहे का कोणी? दार उघडा, मी या देशाचा राजा कालकेतू आहे. लवकर दार उघडा. नाही तर मी एकेकाला फाशी देईन."

तो आवाज देवळाच्या आतून ऐकू येत होता. देवळाबाहेर पाहरेकरी उभे होते. तो आवाज ऐकून ते परस्परांकडे पहात पुसट आवाजात परस्परांस म्हणत होते–"महाराज, तर आताच नाही का पुजा संपवून बाहेर गेले. त्यांना बाहेर येतांना आम्ही स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले. हे काय विचित्र आहे! आतून कोणी तोतया स्वतःला राजा म्हणवून ओरडत आहे वाटत? कोणी दारुड्या, नाही तर कोणी वेडापीर असावा!"

असं परस्परांशी बोलत पाहारेकऱ्यांनी भीत भीत दार उघडले. तेव्हां त्यांना कोणीतरी विद्युत वेगाने त्या काळोखात पळत जात असलेला दिसला. परंतु पाहरेकऱ्यांनी त्याला धरण्याचा प्रयत्नही केला नाही.



कालकेतू देवळातून निघाला तो सरळ राजवाड्यात आला आणि नोकरांचाकरांवर ओरडत म्हणाला–"कोण आहे येथे? मी देवळात झोपलो होतो. त्यावेळी माझ्या अनुज्ञेशिवाय मंत्री वगैरे मला सोडून कसे काय आले? माझ्याजवळ असला उर्मटपणा दाखविणारांना लगेच कैद करा."

लगेच सेनापतीने हुकूम केला–"या वेड्याला अटक करा. हा वेडा राजवाड्यात पाऊल कसा काय टाकू शकला? तुम्ही सर्व झोपा काढीत होता की काय? करा कैद याला."

मग काय कालकेतूला कैद करण्यात आले त्याच्या हातात हतकड्या पडल्या. त्याला राजासमोर हजर करण्यात आले कालकेतू रूपे एक देवदूत सिंहासनावर बसला होता. त्याने समोर कालकेतूला पाहिले व स्मित करून विचारले–"कोण रे तू?"

"मि...मि..." म्हणत कालकेतू सिंहासारखा गुरगुरू लागला. नंतर क्षणभर थांबून म्हणाला–"तू ओळखत नाहीस मला? मी महाराज कालकेतू आहे." शिपायांकडे वळून म्हणाला–"हा कोण तोतया, माझे सोंग करून सिंहासनावर बसला आहे! करा याला कैद!"

राजाचे सोंग करून सिंहासनावर बसलेल्या देवदूताला कालकेतूचा वाढता अभिमान व क्रोध पाहून हसू आले. तो म्हणाला–"हा कोणी तरी दारुड्या किंवा वेडा दिसतो आहे. तरी अर्धवट बरोबरच बोलतो आहे. हा आमच्या दरबारात विदूषक म्हणून राहण्या लायक आहे. याची धुंदी उतरेपर्यंत याला तुरुंगात टाका."

शिपायांनी राजाला धरून नेऊन तुरुंगात टाकले. तरी कालकेतू ओरडतच होता–"मला नाही ओळखलंत मी कोण आहे? मीच कालकेतू महाराज आहे!" परंतु त्याच्या ओरडण्याकडे कोणी लक्ष दिले नाही. वेड्याकडे पाहून जसे लोक हसतात तसे सर्व पाहरेकरी व कैदी हसू लागले व त्याची थट्टा करू लागले.

काही दिवसांनी त्या देवदूताने राजवाड्यात एक मोठी मेजवानी दिली. कित्येक देशाचे राजे व सामंत मेजवानीला हजर होते. राजवाडा सजवलेला होता.

त्या सर्वांबरोबर यक्ष देवदूताने तुरुंगातून कालकेतूला घेऊन यायला सांगितले. थोड्याच वेळाने कालकेतूला हजर करण्यात आले.

रंगबिरंगे ठिगळ लावलेल्या कपड्यांसह कालकेतूला आणण्यात आले त्याच्या डोक्यावर संकासुरासारखी लांब टोपी होती. हातात लांब काठी आणि खांद्यावर 'किच किच' करणारी माकडे होती.

देवदूताने सर्व राजांना संबोधन करून विचारले–"तुम्ही ओळखलेत का याला?"

ते ऐकून चिडून जाऊन दात ओठ चावीत कालकेतू म्हणाला–"तुम्ही मला नाही ओळखलेत? मीच तर या देशाचा खरा राजा कालकेतू आहे. हा कोणी तरी तोतया माझे सोंग करून हे सर्व नाटक करीत आहे!"

ते ऐकून सर्व राजे व पाहुणे हसू लागले आणि कालकेतूची थट्टा करीत म्हणाले–"हा कोणी तरी घमेंडखोर दिसतो आहे! तरी अजून याची थोडी अक्कल ठिकाणावर आहे. चांगलं सोंग करतो आहे. चांगला विदूषक आहे!". ते ऐकून कालकेतू हताश होऊन बसला.

एके दिवशी देवदूताने कालकेतूला अंतःपुरात बोलावून आणविले आणि विचारले–



"खरे खरे सांग, तू कोण आहेस?" ते ऐकून कालकेतूचे उरलेले अवसान सुद्धा हरपले. तो जमिनीवर लोळू लागला. त्याला वाटू लागले की त्याला खरोखरच वेड तर नाही लागले? त्याचे डोळे उघडले. आपण देवाचा अपमान केला. थोरा मोठ्यांचा अपमान केला. म्हणून आपली कानउघाडणी करण्यासाठीच देवाने हे सर्व केले असणार. त्याने स्वतःचे कान धरून देवाची क्षमा मागितली. त्याला पश्चात्ताप झाला. पश्चात्तापाच्या अश्रूंनी त्याची सर्व पापें धुवून निघाली.

थोड्या वेळाने स्वतःला सावरून तो म्हणाला–"महाराज, मी वेडा आहे. मानव व दैव सर्वांच्या शक्तीचा धिक्कार करून घमेंडीत राहलो व मूर्ख झालो. आतां मला कळू लागलं आहे की देवाचा अनुग्रह नसल्यामुळे मला माझे अधिकारी व प्रजा-ही ओळखत नाहीशी झाली आहे. माझे डोळे उघडले. माझा गर्व उतरला. मी एक दीन असहाय माणूस आहे. प्रजेचा दासानुदास आहे!" असे म्हणत कालकेतू छाती बडवून व कपाळ आपटून ओक्सा बोक्शी रडू लागला.

तेव्हां देवदूताने प्रसन्न होऊन आपले दोन्ही हात उचलून आशीर्वाद दिला– "तुझ्यातला अहंकार व अभिमान नष्ट झालेला आहे. आता तू खरोखरच राजा झाला आहेस, तू कालकेतू आहेस!"

दुसऱ्या क्षणाला देवदूत अदृश्य झाला. राजाच्या अंगावरचे ठिगळ लावलेले कपडे अदृश्य होऊन त्या जागी त्याच्या अंगावर राजवस्त्रे आली. डोक्यावरच्या संका-सुराच्या टोपीच्या जागी राजमुकुट आला.

काही दिवसांनी कालकेतूने त्या देवळात सर्व उत्सव यथासांग व्हावेत यासाठी सर्व तजवीज केली. या वेळी विद्वान पुरोहि-तांच्या तोंडी ऐकलेले श्लोक ऐकून राजाला परमानंद झाला व त्याच्या डोळ्यातून आनंदाश्रू आले. त्याने स्वतः देवाचा जय जयकार केला. त्या दिवसापासून तो प्रजा रंजन करणारा राजा म्हणून प्रसिद्ध झाला.





# खजिनदार

कित्येक शतके लोटली. अमरपुरचा राजा विजयसेन हा स्वतःच सर्व खजिनदाराचे कामे पहात असे. राजा स्वतःच खजिनदाराचे काम पाहू लागला, ती गोष्ट विजयसेनाच्या वडिलांपासून सुरू झाली. तो प्रघात पडला त्याला एक कारण झाले. पगारी खजिनदाराने खजिन्यातले पैसे इतके खाल्ले की खजिनाच लुटला.

अर्थातच राजाची जबाबदारी राज्य कारभाराबरोबर वाढली, आणि ती वाढतच गेली. परंतु दोन्ही कामें संभाळणे कठीण होत असल्याचे पाहून खजिन-दाराच्या पदावर एका विश्वासपात्र माणसाला नेमायचे ठरविले.

एकदां राजा आपला मंत्री सुगुणगुप्त याच्याशी त्या विषयी म्हणाला–"माझ्या जबाबदाऱ्या दिवसेंदिवस वाढत चालल्या आहेत. म्हणून खजिन्याची कामे पुढल्या दिवसावर पडू लागली आहेत. मी कोणा-तरी विश्वासपात्र योग्य आणि कार्यकुशल व्यक्तीला खजिनदाराचे पद द्यावे म्हणतो. तुमचा काय सल्ला आहे?"

राजाचा निर्णय ऐकून प्रधान खूष झाला व म्हणाला–"खजिन्याचा हिशोब ज्या दिवसाचा त्या दिवशी करणाऱ्या माणसाला नेमणे योग्यच होईल. याबाबतीत आपल्या वडिलांनी जे धोरण ठेवले होते तेही लक्षात ठेवणे उचित होईल. म्हणून कोणत्यातरी प्रामाणिक माणसालाच हे पद देणे बरोबर होईल."

"तुम्ही म्हणतां तसेच मलासुद्धां वाटते आहे. परंतु कोणा अनोळखी माणसाला हे काम देण्याऐवजी, तूर्त राजवाड्यात काम करणाऱ्यां पैकी कोणातरी योग्य व्यक्तीला हे काम देणे जास्त बरे होईल." राजा म्हणाला.

त्यानंतर मंत्र्याने खजिनदाराच्या पदाकरितां माणसाची गरज असल्याची सूचना तयार करून सर्व नोकरवर्गात ती वाटविली. जवळ जवळ सर्वांनीच त्या पदासाठी अर्ज पाठविले. मंत्री ती सर्व पत्रे घेऊन राजाच्या दर्शनार्थ गेले.

राजाने सर्व पत्रे वाचून पाहिली. त्याच्या दृष्टीने अनुभवी व जास्त योग्य असा अनंतशर्मा नावाचा माणूस होता. राजा मंत्र्याला म्हणाला—"माझ्या मते अनंत शर्मा सर्व दृष्टीने योग्य आहे. तुम्हांला काय वाटतं?"

तेव्हां मंत्र्याने आपली सूचना निवेदन केली. म्हणाला—"महाराज, माझ्या मतें खजिनदाराच्या पदासाठी ज्यांनी ज्यांनी अर्ज केले आहेत त्यांच्या पैकी एकालाही त्या पदावर नेमणे बरोबर होणार नाही. मला असे वाटते आहे की या सर्वांनी स्वतःचा स्वार्थ सिद्ध करून घेण्याच्या हेतूने च हे अर्ज केले आहेत. राजवाड्यातल्या नोकरांपैकी फक्त ज्ञानेश्वर एकट्यानेच अर्ज केलेला नाही. मला वाटते, तोच सर्वांत जास्त विश्वासपात्र आहे."

मंत्र्याचा सल्ला ऐकून राजा चकित झाला. त्याने विचारले—"मग अर्जवगैरे मागविण्याची तुम्हांला गरज कां वाटली नाही?"

"महाराज, मी जी सूचना सर्वांकडे वाटविली होती तीत ही गोष्ट स्पष्टपणे नमूद केली होती की खजिनदाराचा पगार ज्याची नेमणूक होईल त्याला यावेळी जो पगार मिळतो आहे, त्यापेक्षा कमीच मिळणार आहे; तरी सुद्धा सर्व नोकरवर्गाने अर्ज केले आहेत. याचा अर्थ काय होतो? त्यांचा स्वार्थ सिद्ध करण्याला त्यांना हे पद योग्य वाटले असाच अर्थ घ्यावयाचा. फक्त ज्ञानेश्वरने अर्ज केला नाही." प्रधान म्हणाला.

राजाने प्रधानाच्या चाणाक्षपणाची स्तुती केली आणि दुसऱ्या दिवशीच ज्ञानेश्वरला बोलावून त्याची त्या पदावर नेमणूक केली.





# गणेश पुराण

वातापिनगराच्या मध्यवर्ती जागी असलेली विघ्नेश्वराच्या आकृतीची शिला जगातले एक अपूर्व शिल्पकलाकौशल्य म्हणून प्रसिद्धीस यावे, अशी एक इच्छा अगस्ती मुनींच्या मनात होती. लोपामुद्राही चित्रकलेत प्रवीण होती. ती त्या जागी आली व तिने ती शिला लक्षपूर्वक पाहिली. त्या शिलेवर गणनायकाचे रूप कसे असावे याची कल्पना करून तिने त्याचे एक चित्र रेखाटले.

परंतु त्या चित्राप्रमाणे विघ्नेश्वराचे रूप शिलेवर कोरणं म्हणजे सामान्य गोष्ट नव्हती. कोणी शिल्पकार ते काम करायला मिळाला नाही. अगस्त्य मुनी चिंतित होऊन त्या शिलेसमोर बसले व ते चित्र आणि शिला बारंबार पहात राहले.

सर्व शिल्पकार चित्र पाहून म्हणाले—"या चित्रात दाखविल्या प्रमाणे या शिळेला गणपतीचे रूप देणे विश्वकर्मा किंवा मयासुर या दोघां व्यतिरिक्त कोणाला शक्य होईल से वाटत नाही."

त्यावेळी विश्वकर्म्याची बायको, म्हणजे विष्णूची मानस पुत्री विश्वकला रुसून माहेरी निघून गेली होती. म्हणून विश्वकर्मांची बुद्धी काम करीत नव्हती. राक्षसाचा शिल्पी मयासुर याची बायको, अप्सरा हेमाही परत देवलोकी गेली असल्या कारणाने तो वेड लागल्या सारखा भटकत फिरत होता.

अशा तऱ्हेने अगस्त्य मुनींना त्या महाशिळेला लोपामुद्राने चितारलेल्या गण-



नायकाचे रूप देणे म्हणजे एक मोठा प्रश्नच होऊन बसला. म्हणून त्या शिळेसमोर मुनी रात्रंदिवस विघ्नेश्वराचं ध्यान लावून व आहार निद्रा विसरून बसून राहिले. ते विघ्नेश्वराचं स्मरण करून म्हणत होते– "गणेशा ! या पुढची सर्व जबाबदारी तुझ्या वरच टाकीत आहे !" असे म्हणत प्रतीक्षा करीत मुनी बसुन राहिले.

एके दिवशी संध्याकाळच्या सुमारास एक मोठे पोट असलेला गिड्डासा लहान मुलगा डुलत तेथे आला. त्याचे कुरळे लांब केस धुळीने माखलेले व अस्ताव्यस्त वाऱ्याबरोबर उडत कपाळावर आणि डोळ्यावर येत होते. त्याच्या हातात छेनी-सारखं काहीतरी होतं आणि विजेसारखं चकाकत होतं. त्याचे स्नायू पुष्ट व कणखर होते, एखाद्या कारागिरासारखे.

अगस्त्य मुनींनी त्याच्या हातातली वस्तू जास्त लक्ष देऊन पाहिली तर हत्तीच्या दाताचा टोकाचा तुकडा त्याने मुठीत घट्ट धरला असल्याचे कळले. मुनी आश्चर्यचकित झाले.

तो तरुण शिल्पकार अगस्त्य मुनींच्या जवळ येऊन म्हणाला–"काय हो मुनिवर्य, या महाशिळेसमोर काही तरी मंत्र म्हणत बसला आहां वाटतं ! काही काम मिळेल म्हणून मी या बाजूला आलो आहे !"

"चिरंजीव बाळा ! ह्या महाशिळेला गणनायकाचे रूप देऊन गणेशाची मूर्त करता आली तर करवून घेऊन तिचे दर्शन घ्यावे. या हेतूने कित्येक दिवसांपासून वाट पहात बसलो आहे." असे म्हणत अगस्त्य मुनींनी त्यांच्या जवळचे गणपतीचे रेखाटलेले चित्र दाखवून विचारले–"बरं पण तू कोण हे नाही सांगितलेस ? तू काय काम करतोस ?"

"मी जी कामं करतो त्यांतलं सर्वात पहिलं काम म्हणजे मी खूप खातो. नंतर दगड कोरण्याचे काम. मला बाल शिल्पाचार्य म्हणून हाक मारतात." तो छोटा शिल्पकार म्हणाला.

त्याचे ते बोबडे बोल ऐकून अगस्त्य मुनींना हंसू आले. त्याच्याकडे संदिग्ध दृष्टीने पहात ते म्हणाले–"या महाशिळेला रूप देऊ शकणाऱ्या एका महाशिल्पकाराची मी वाट पहात केव्हां पासून बसलो आहे. तू स्वतःला शिल्पकार म्हणतो आहेस, परंतु तू बालशिल्पकार आहेस. ही शिळा म्हणजे एक महाशिळाच आहे, ही खूप उंच आहे. तू तर गिड्डा आहेस, मग तू हे एवढे मोठे काम कसा काय करशील, हीच एक शंका माझ्या मनात येते आहे !



तो बालशिल्पी हंसू लागला. म्हणाला– "मी बालशिल्पी असलो म्हणून माझ्या हातून थोर शिल्पकलेचे काम होणार नाही, असे समजू नका ! नुसतं 'महा' म्हटल्याने 'मोठं' होतं असं समजू नका. माझ्या छेनीला साध्य नाही, असे एकही शिल्प नाही." असं म्हणत त्याने आपली छेनी दाखविली. ती हिऱ्यासारखी चकाकत होती.

अगस्त्य मुनी पहातच राहिले व त्या बाल शिल्पकाराने आपली छेनी त्या शिळेवर फेकली. ती शिळेला लागताच विद्युत् प्रकाशापाठोपाठ वीज कडाडल्या सारखा आवाज झाला आणि त्या जागी शिळेला एक भोक पडले.

"ती बेंबी आहे. मूर्त करायची म्हणजे त्यात बेंबीच मुख्य असते, म्हणून लंबोदराची ती नाभी आहे ! लंबोदरापाठोपाठ शिल्प सुरू होतं ! असं तो बालशिल्पी म्हणत असतां त्या शिळेतून "लंबोदर लक्ष्मीकरा"* या आवाजापाठोपाठ मायामालव गौड रागाचे स्वर अगस्त्य मुनींना ऐकू येऊ लागले. "हा आहे काळवत्री दगड, वज्रासारखा टणक आहे, म्हणून खोदकाम करीत असतां विजेसारखी कांती व आवाज प्रगट होतात. म्हणून माझं खोदकाम पुरं होईपर्यंत जवळपास कोणी पशुपक्षी किंवा माणसाने राहतां कामा नये. मोठा कडकडाट होईल. शहरात राहणारांनी तो ऐकून भयभीत होण्याचं कारण नाही. तेव्हां हे मुनिवर्य, तुम्ही दूर निघून जाणं



बरोबर होईल. दूर निघून जाऊन निश्चित पणे झोपा करे ! उजाडतांच माझं खोदकाम पुरं होईल !" बालशिल्पी म्हणाला.

अगस्त्य ऋषी आश्चर्यचकित झाले. परंतु त्याहून जास्त काही करण्यासारखेही त्यांना सुचले नाही. त्यांचा मेंदु त्यावेळी मंद पडल्यासारखा झाला. काही वेळ थांबून अगस्त्य त्या बालशिल्पकाराला रेखाचित्र देऊ लागले तेव्हां तो म्हणाला–"तुम्ही आत्तांच तर थोडया वेळा पूर्वीच दाखविलेत नाही का? एकदां पाहिले की पुरे. पुन्हा पुन्हा पहात बसलो तर मोठा शिल्पकार मी कसा म्हणवू शकेन? हे शिल्प म्हणजे मला खेळासारखे आहे. सर्व झाल्यानंतर चित्र काढले त्याला येऊन पाहून जा म्हणावे. सांगू दे त्यालाच की शिल्प बरोबर आहे की नाही ते! हे चित्र काढवून घ्यायला तू काय दिलेस कोणास ठाऊक? तू मला काय देतोस ते मी पाहणार आहे!" शेवटचे वाक्य ऐकतांच अगस्त्य मुनींना कसंसं वाटलं.

त्यांची पत्नी लोपामुद्रेच्या अंगाखांद्यावर जे काही होते त्याशिवाय अगस्त्यांजवळ स्वत: चे असे काही ही नव्हते. होते ते सर्व त्यानी वांटून टाकले होते. त्या शिल्पकराला काहीतरी दिलं हे पाहिजेच. लोपामुद्रेला काय सांगून विचारायचे? असा मनात विचार करीत अगस्त्य निघून गेल्यावर लोपामुद्रेच्या तोंडावर एक अत्यंत तेजस्वी कांती विलसू लागली. काय झालं ग? या अर्थी मुनी लोपामुद्रेकडे पाहू लागले.

लोपामुद्रा उचंबळून आलेल्या आनंदाने म्हणाली–"अगस्त्य महर्षींनी मला क्षमा करावी! ऋषिपत्नीने ऋषिपत्नीसारखेच रहावे ही गोष्ट मला लहानपणापासूनच चांगली माहीत आहे. वस्त्रालंकार पाहिजेत म्हणून किंवा धन दौलत घेऊ नका असे मी कां म्हटले माझे मलाच आश्चर्य वाटत आहे आज. कोणते तरी महाकार्य पूर्ण व्हावे या साठी अनिर्वचनीय अशी कोणती तरी शक्ती माझ्या तोंडी ते बोलून गेली असे वाटते आहे. मला कोणतेही दागदागिने नकोत. रेशमी जरीची वस्त्रे नकोत. धन दौलत नको. माझ्या डोक्यात त्या वेळेपुरते शिरलेले अज्ञान आत्तां आत्तांच निघून गेले."



ती म्हणाली ते ऐकून अगस्त्य ऋषींना बरे वाटले

"शिल्पकार मिळाला व काम पुरे होईल. से वाटते आहे. उजाडण्याच्या सुमारास काम पुरे होईल असे म्हणतो आहे." अगस्त्य ऋषी म्हणाले.

"काय म्हणतां? उजाडतां उजाडतां त्या महाशिळेवरचे कोरीव काम संपेल म्हणतां? तो शिल्पकार मनुष्य आहे की देव?" लोपामुद्रेने चकित होऊन विचारले.

"माणूसच आणि लहान पोरगाच आहे. त्याला योग्य मजुरी कशी द्यायची? किती द्यायची, काही सुचत नाही!" अगस्त्य म्हणाले.

"आणखी उद्या भाद्रपद शुद्ध चतुर्थी नाही का? गणेश चतुर्थी ना! शिल्पकलेचा ध्यास घेऊन बसलात आणि तिथि मास सुद्धा विसरलात वाटतं!" लोपामुद्रेने विचारले.

"काय म्हणालीस? उद्या गणेशचतुर्थी म्हणतेस! गणेशाची मूर्त तयार होणार! सर्व विचित्रच दिसतं आहे!" असं अगस्त्य मुनी आश्चर्याने म्हणू लागले तेव्हां लोपामुद्रा म्हणाली–"तो शिल्पकाराचा मुलगा नाही आणि मानव ही नाही!"

पत्नी म्हणाली त्यात सत्याचा काही अंश असला पाहिजे असे अगस्त्यांना वाटले. बरीच रात्र लोटली होती. त्यांना झोप येत नव्हती. कुतूहल वाढतच होते. काय होणार हे कळत नसल्यामुळे अगस्त्य घराबाहेर पडलेच.

अगस्त्य महाशिळेजवळ पोचेपोचेतो. त्यांना महाशिळेजवळ जे दृश्य दिसले. ते पाहून त्यांचे सर्वांग हादरले. जागच्या जागी ते जमिनीवर बेशुद्ध होऊन पडले. शेकडों छेनी आपल्या आप कोरीव



काम करीत होत्या. विविध रंगाची विद्युत कांती लकाकत प्रकाश पाडीत होती. 'खण खण' चा आवाज सतत चालू होता. सर्व छेनी हस्तिदंती होत्या आणि विजेसारख्या चकाकत होत्या. ते एक स्वप्न आहे की खरंच काही घडत आहे न कळल्यामुळे भ्रम झाल्यासारखं वाटून अगस्त्य अर्ध बेशुद्धावस्थेत तसेच पडून होते.

अर्धनिद्रावस्थेत पडून राहिलेल्या अगस्त्य ऋषींनी डोळे उघडून पाहिले तर तो शिल्पकार बालक त्यांना दिसला. पूर्वेकडे दिशा फाकू लागल्या होत्या.

"काय हो, महर्षी! येथे झोपेत स्वप्ने पहात पडलां आहांत? तुम्ही योगविद्येत पारंगत आणि तुम्हांला ही स्वप्ने आणि झोप कशी काय? माझं काम संपलं! चित्रकाराला येऊन पाहून जा म्हणावं, चित्रात जे रूप आहे तसेच आले आहे की नाही पहा म्हणावं!" असं बालक शिल्पकार म्हणत असतां तेथे ताटभर मोदक, पाणी, फुलं वगैरे घेऊन लोपामुद्रा आली.

अगस्त्य ऋषी थक्क होऊन स्फटिकासारखी चकाकणारी ती गणेश मूर्त पहात असतां बालक शिल्पकार त्यांना म्हणाला—बरं तर माझी मजुरी? मला काय द्यायचं असेल ते द्या तर!"

अगस्त्य मुनी अडखळत म्हणाले—"महा शिल्पी! तुला काही कितीही दिलं तरी पुरणार नाही. तरी चंद्राला सुताचे वस्त्र दान करतात तसं थोडं धन बाजूला काढून ठेवलं आहे, आणतो!"

बाल शिल्पकार म्हणाला—"बरं तर प्रथम, चित्र रेखाटलं त्याला काय दिलं हे सांगा पाहू! दगडावर खोदकाम करणे म्हणजे थोडे त्रासाचे असले तरी मोठी कला नव्हे. शिल्पकलेला मूळ म्हणजे चित्र रेखाटणें. चित्र काढणे मेधावी कलाकारालाच साध्य असते."

"अहो बालशिल्पाचार्य! चित्रकाराला निराळे काही देण्याची गरजच पडली नाही. ते चित्र माझ्या पत्नीनेच काढले आहे!"

असे म्हणत अगस्त्यांनी सूचनार्थ लोपामुद्रेकडे पाहिले. लोपामुद्रा कोणात्यातरी विचारात त्यावेळी गर्क झालेली होती.

"हे काय म्हणतां मुनिवर्य! मी म्हणाल, तर एका शहराच्या निर्मितीला लागणारे धन चित्रकाराला दिले असते. इतके उत्तम रेखाचित्र आहे हे! ते धन यानाच मिळाले पाहिजे!" बालक शिल्पकार म्हणाला.

अगस्त्य लगेच चुकून म्हणाले—"खरं तर ते धन मी तिच्याचसाठी काढून बाजूला ठेवले आहे!"

बालक शिल्पकार चकित होऊन म्हणाला—"म्हणजे! ते सर्व स्त्रीधनच आहे तर! तुम्ही सांगितलेत म्हणून बरे झाले. तुम्ही दिले व मी घेतले तर किती मोठा अन्याय होणार होता? त्यातली मला कवडी देखील नको!" असे म्हणत लोपामुद्रेकडे पहात पुढे म्हणाला—"बाई! तुम्ही आपल्या हाताने मला एक मोदक द्या, मला तोच पुरे! खोदकाम केले त्यातली माझी मजुरी ब्रह्मदेवाने केव्हांच लिहून ठेवली आहे."

ते ऐकतांच लोपामुद्रेने मोदकांचे ताटच शिल्पकाराच्या समोर ठेवले आणि बाल शिल्पकाराला साष्टांग नमस्कार घालून त्याचे पाय धरले आणि म्हणाली—"विघ्नेशा, तुझ्या अनुग्रहाने आम्ही मुक्त झालो!" ती असे म्हणत असतांच तो बाल शिल्पकार अंतर्धान पावला.

अगस्त्य मुनींना झालेला भ्रम व माया नाहीशी झाली. विघ्नेश्वराच्या कला कौशल्यासमोर प्रणाम करून ते म्हणाले—"विघ्नेश्वरा! मी स्वतःला किती योगबल सिद्धीवाला आणि तपस्वी म्हणून मानीत आलो. परंतु तुझ्यासमोर अबोध बालकच ठरलो. कोणी किती मोठा झाला तरी तुझी माया त्याला कळणे शक्यच नाही!" असे म्हणत ते नमस्कार करीत, थोबाडीत मारून घेत असतां त्या शिल्पातल्या सर्व देवता गाणे गात असल्यासारख्या भासल्या "वातापि गणपतिं भजे!" आणि त्या स्वरांबरोबर निरनिराळी वाद्येही वाजू लागली.





# गंधर्व राजकुमारी

[ ७ ]

निराश होऊन घरी पोचल्यावर हसनच्या मनात तेवढ्यात एक आशेचा अंकुर फुटला. त्याला राजकन्यांची आठवण झाली. त्याने पुन्हा आईचा निरोप घेतला आणि उंटाला बोलवून तो त्यावर बसला आणि आपल्या बहिणीकडे गेला. तो इतक्या लवकर परत आलेला पाहून त्यांना तर आनंदच झाला. त्याने घडलेले सर्व वृत्त सांगितले व पत्नीच्या विरह दुःखाने रडू लागला. त्याच्या बहिणींनी त्याचे सांत्वन केले.

तो त्यांना म्हणाला—"वाक् वाक् बेटावर कसं जायचं, त्याची वाट मला सांगा. तेथे गेल्यावर चवकशी केल्यास माझा पत्ता मिळू शकेल असे माझ्या बायकोने माझ्या आईला सांगितले होते." हसनने ते सविस्तर सांगितले.

सातही बहिणी परस्परांची तोंडे पाहून मान खाली करून बसल्या. काही वेळाने त्या म्हणाल्या—"हसन, हात वर करून हाताने तुला स्वर्गाला स्पर्श करणं कदाचित शक्य होईल, परंतु वाक् वाक् द्वीपांवर जाणे तुला अशक्य आहे." हसन आशा धरून होता, ती पण आता लयाला गेली. पुन्हा दुःखाचा पगडा त्याच्यावर बसला.

प्रेमाने त्याची काळजी घेणाऱ्या राजकुमारीने त्याचे सांत्वन केले व म्हणाली—"तुला तुझी बायको व मुले भेटण्याचा योग असेल तर कोणता तरी मार्ग निघेलच हसन, आम्हीं आम्हांला शक्य होईल ते सर्व करू, स्वस्थ मात्र बसणार नाही. तू मनाला फार लावून घेऊ नकोस." तिने त्याला धीर दिला.

त्या राजकुमारींचा अब्दुल खुद्दूस नावाचा एक मामा होता. तो दरवर्षी एकदां आपल्या



भाच्यांना भेटायला येत असे. अत्यावश्यक परिस्थितीत त्याला बोलवायचं म्हणजे एका तऱ्हेची राळ विस्तवात टाकावी लागे. ती राळ मोठ्या मक्काजवळ होती. ती थोडी घेऊन विस्तवात टाकतांच सोसाट्याचा वारा सुटला. त्याचा जोर ओसरल्याबरोबर एका पांढऱ्या हत्तीवर बसून अब्दुल खुद्दूस आला. "मी येऊन एक वर्ष झालं. उद्या निघावं, असा विचार करीतच होतो; तेवढ्यात तुम्हीच बोलाविलेत. काहीतरी विशेष गोष्ट असावी. बोला, कशाला बोलाविलेत?" त्याने आपल्या भाच्यांना विचारले.

"तसं काही नाही. आम्हांला तुमच्या मदतीची थोडी गरज आहे." राजकुमारी म्हणाल्या. दिली, कोणती ती सांगा आतां?" त्याने विचारले.

त्यांनी त्याला हसनची कथा सविस्तर सांगितली व म्हणाल्या–"आमचा भाऊ हसन याला 'वाक् वाक्' द्वीपाचा मार्ग तू दाखव. तो कपाळावर हात ठेवून बराच वेळ मनातल्या मनात विचार केल्या नंतर म्हणाला–"काही उपयोग नाही. तुमच्या भावाने असाध्य असेच काम मनावर घेतले आहे. वाक् वाक् द्वीपात पोचणं त्याला शक्यच नाही."

"ही गोष्ट त्याला कळेल, अशा शब्दात त्याला समजावून सांग. नंतर आपला सल्लापण काय तो दे!" राजकुमारी म्हणाल्या.

अब्दुल खुद्दूस हसनला म्हणाला–"बाबा रे, ग्रॅडे नक्षत्रे, ग्रह सुद्धा तुला वाक् वाक् द्वीपात घेऊन जाणे शक्य नाही. त्या बेटांवर गंधर्वांचा चक्रवर्ती निश्चित होऊन निवास करतो. त्या द्वीपाचं रक्षण सैनिक कन्यांच्या तुकड्या सतत करीत असतात. सप्तसमुद्र आणि सप्तपर्वत पार करून गेल्या शिवाय तुला तेथे पोचतां येणार नाही. तेथे पोचणं थोडक्यात अशक्य आहे! म्हणून तो विचार मनातून काढून टाक आणि आपल्या बहिणींबरोबर सुखाने रहा! नाही नाहीत्या संकटांत उडी कां घेतोस?" अशा त्याने हिताच्या चार गोष्टी सांगितल्या.

ते ऐकून हसनचे तोंड लाल झाले. मोठ्याने किंकाळी फोडून जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला. त्याला त्या स्थितीत पाहून अब्दुल खुद्दूसला त्याची कीव आली. हसन शुद्धीवर आल्याबरोबर अब्दुल खुद्दूस त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला–"तुला या अवस्थेत सोडून निघून जाणे मला सुद्धा पसंत नाही. काही मार्ग आहे का, पाहातो, माझ्या बरोबर येतोस का?" त्याने विचारले.



हसनला पुन्हा जिवात जीव आल्यासारखं वाटलं. एकदम उठून उडी मारली आणि त्या म्हाताऱ्याबरोबर निघाला. दोघे पांढऱ्या हत्तीवर बसले. खुद्दूसने हत्तीच्या कानात काहीतरी सांगितले. लगेच तो हत्ती आकाशात उडाला आणि विद्युत् वेगाने जाऊ लागला. ते नील पर्वतावर येऊन पोचले. नील पर्वतात एक गुहा होती व त्या गुहेला पोलादी दार होते. म्हाताऱ्याने दार ठोठावतांच निळ्या रंगाचा एक नीग्रो, एक निळ्या रंगाची तलवार व त्याच रंगाची ढाल धारण करून समोर आला. म्हाताऱ्याने क्षणार्धात त्याची ढाल तलवार हिसकावून घेतली आणि दूर फेंकून दिली. लगेच त्या नीग्रोने पुन्हां ते दार पूर्वी सारखे बंद केले.

गुहेत दोघे एक मैल दूर चालून गेल्यावर त्यांना दोन दरवाजे दिसले. दोन्हींना सोन्याची कुलुपे लाविलेली होती. अब्दुल खुद्दूस एका दाराला धक्का देऊन आत शिरला. त्याच्या सांगण्याप्रमाणे हसन बाहेरच थांबला.

एका तासानंतर अब्दुल खुद्दूस एका घोड्याला घेऊन बाहेर आला. तो घोडा व त्याच्यावरचं खोगीर वगैरे निळेच होते. त्याने हसनला घोड्यावर बसून दुसरे दार उघडले. त्या दारापलीकडे निळ्या आकाशशिवाय काहीच दिसत नव्हते.

"बाबा रे, अगदी शेवटचा म्हणून विचार करून काय ते ठरव. तुला एका



मागून एक घोर धोक्यांना तोंड द्यावे लागणार आहे. आहे ना तयारी? की आपल्या बहिणीकडे परत जातोस?" त्याने हसनला विचारले.

"हजारदां मरावे लागले तरी मी त्याला तयार आहे." हसन म्हणाला.

"तुला जन्म देणाऱ्या आईचा विचार करून तरी तू मागे फिरणार नाहीस का?" म्हाताऱ्याने विचारले.

"मी माझ्या बायको व मुलांनाबरोबर घेतल्या शिवाय आईकडे परतायला तयार नाही." हसन म्हणाला.

"तर मग ठीक आहे, हसन! हे पत्र घे. तू घोड्याला चालवायची गरज नाही. त्याला वाट माहीत आहे. तो तुला काळ्या पर्वतावर उतरवील. काळ्या गुहेजवळ तू उतर आणि घोड्याला काळ्या गुहेत जाऊ दे. एक म्हातारा बाहेर येईल. तो काळाकभिन्न आहे. परंतु त्याला गुडघ्यापर्यंत लोंबणारी पांढरी दाढी आहे. त्याला सलाम करून हे पत्र दे. तो पक्ष्यांचा राजा आहे. माझ्याहून मोठा आहे. त्याच्या मदतीशिवाय तुझे काम होणे अशक्यच समज. त्याची खुशी संपादन कर." असे सांगून अब्दुल खुद्दूस गुहेत शिरला. निळा घोडा जोराने हिणहिणला आणि आकाशात उडू लागला.

अब्दुल खुद्दूसने दिलेल्या घोड्यावर हसन बसला होता. त्याने लगाम हातात धरलाच नाही. तो घोडा बाणासारखा सरळ व अतिवेगाने उडत दहा दिवसांनी दहा वर्षांत चालून जाण्याइतके अंतर कापून एक काळ्या पर्वताच्या रांगेपर्यंत पोचला. त्या पर्वतांच्या रांगा पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत पसरलेल्या होत्या. निळा घोडा जोराने हिणहिणला व पर्वतांवर उतरतांच कोठून तरी काळे घोडे अकस्मात आले आणि निळ्या घोड्याला वेढा देऊन उभे राहिले. त्यांच्या मधून चालत चालत निळा घोडा एका काळ्या गुहेजवळ आला. गुहेच्या बाहेर हसनला उतरवून तो घोडा गुहेत गेला.

हसन गुहे बाहेर सुमारे एक तासभर उभा राहिल्यावर गुहेतून एक वृद्ध बाहेर आला. त्याला पाहतांच हसनला तो कोणी थोर पुरुष असावासे वाटले. तो अगदी काळा कभिन्न तर होताच, वर त्याने काळी वस्त्रे परिधान केली होती. कमरे खालपर्यंत लोंबणारी त्याची दाढी मात्र पांढरी शुभ्र होती. तो साक्षात् सुलेमानचा मुलगा अली होता.

हसन नम्रपणे त्याच्यासमोर गुडघे टेकून उभा राहिला. नंतर त्याने अब्दुल खुद्दूसने दिलेले पत्र त्याला दिले. अलीने ते पत्र घेतले आणि काही बोलल्या शिवाय गुहेत गेला.

बराच वेळ गेला. हसन अगदी निराश होत होता. तितक्यात तो वृद्ध पांढरी शुभ्र वस्त्रे परिधान करून बाहेर आला व हसनला आत यायला त्याने खूण केली. त्याने त्याला आपल्याबरोबर आत बोलावून एका मोठ्या दालनात नेले. ते दालन सर्वच्या सर्व रत्नखचितच होते. त्याच्या चारही कोपऱ्यात गालिच्यावर चार थोर विद्वान मौलवी बसलेले होते. त्यांच्या चारही बाजूंना मोठ मोठे ग्रंथ पसरलेले होते. दालनाच्या मधोमध त्या वृद्धाचे सात शिष्य बसलेले होते. ते काहीतरी लिहीत होते व वाचीत होते.

अलीने पाऊल टाकतांच सर्व उभे राहिले. तो मध्यस्थानी बसल्यावर सर्व त्याच्या चारी बाजूला बसले. तेव्हां हसनने त्या सर्वांना आपली करुण कहाणी सांगितली. नंतर त्या सर्वांनी बराच वेळ आपसात चर्चा करून त्याला मदतच द्यावी असा सल्ला दिला.

त्यांचा सल्ला ऐकून तो वृद्ध म्हणाला—"सर्व खरे आहे, परंतु वाक् वाक् द्वीपांत जाणे सोपे नाही. तिकडून परतणे त्याहून ही कठीण. योद्धयांच्या मुलीकडून त्याला जो त्रास होईल तो सांगायचीच गरज नाही. हा मुलगा आपल्या बायकोला कसा काय भेटणार, मला ही कळत नाही.

(क्रमशः)





# थोर मनाचा मालक

विश्वास नावाच्या एका व्यापाऱ्याच्या घरी लक्ष्मण नावाचा एक मुलगा काम करीत असे. कामाला लागल्या नंतर थोड्याच दिवसात त्याने आपल्या मालकाच्या मनात तो प्रामाणिक मुलगा आहे, असा विश्वास उत्पन्न केला. व्यापाऱ्याला उधारी वसूल करण्याची कामे पुष्कळ असत. त्याने ते काम लक्ष्मणला करायला सांगितले आणि स्वतः इतर कामांत निश्चिंतपणे लक्ष घालू लागला.

एकदां शेजारच्या गावच्या गोपूशेट नावाच्या व्यापाऱ्याकडून एक मोठी रकम वसूल करायचे काम होते. ते पैसे वसूल करण्याचे काम विश्वासने लक्ष्मणला सांगितले.

लक्ष्मण उजाडतांच घरून निघाला आणि दुपारच्या सुमारास त्या गावी पोंचला. गोपूशेटला भेटतांच त्याने लक्ष्मणला पांच हजार रुपये द्यावयाचे होते ते दिले. ते पैसे काळजीपूर्वक बांधून घेऊन लक्ष्मण परत आपल्या गावी निघाला.

त्या दोन्ही गावाच्या मध्ये एक लहानशी नदी होती. ती नदी पावसाळ्याशिवाय सर्व वर्षभर कोरडीच असे. कधी कधी डोंगरात अकाली पाऊस पडला की त्या नदीला एकाएकी मोठा पूर येत असे.

गुडघाभर पाण्यातून नदी पार करून लक्ष्मण पलीकडच्या काठावर जेमतेम पोंचला असेल, त्याला डोंगराच्या बाजूने मोठा पावसाचा व पुराचा आवाज ऐकू आला. त्याने त्या बाजूला वळून पाहिले आणि त्याला त्या बाजूने पुराचं पाणी मोठ्या लाटेसारखं धावत पुढे येत असलेले दिसले. लक्ष्मण धावत नदीच्या काठावरून दूर अंतरावर जाऊन उभा राहिला.

पाहतां पाहतां दूरवर पाणी पसरले आणि पुराच्या प्रवाहाबरोबर उपटून निघालेली झाडेझुडपेंही दिसली. दूर त्याला दोन माणसे पुरात गटांगळ्या खात वाहून जात असलेलीही दिसली. त्यांना पाहून मात्र लक्ष्मणला धास्तीच बसली.

गाव जवळ येऊ लागले तेव्हां त्याच्या मनांत एक निराळाच विचार आला, 'आपल्या जवळ यावेळी बरेच पैसे आहेत. आपण थोडेसे खोटे बोललो तर सर्व पैसे आपले होऊ शकतील!'



लक्ष्मणने जवळच्याच एका तळ्यात बुडी मारली आणि त्या ओल्याचिंब कपड्यानिशी सरळ दुकानावर गेला. त्याला पाहून व्यापाऱ्याने विचारले–"हे रे काय? झालं तरी काय? आणि हे ओलेचिंब कपडे?"

लक्ष्मणने घाबऱ्या आवाजात त्याच्यावर आलेल्या प्रसंगाचे तिखटमीठ लावून वर्णन केले. म्हणाला–"मालक, मी नदी पार करून येत असतां एकाएकी पूर आला. त्यात सापडलो आणि बरेच अंतर वाहूनही गेलो. कसाबसा काठाला लागलो!"

"बापरे! नशीबच बलवत्तर, म्हणून वाचलास!" विश्वास म्हणाला.

"परंतु मालक...." म्हणत तो रडके तोंड करून गप्प उभा राहिला.

व्यापाऱ्याला कळेना की काय झालं आणि नोकराकडे आश्चर्याने पहात राहिला. "मोठ्ठं नुकसान झालं, मालक! जीव वांचवायच्या प्रयत्नात पांच हजारांचे बांधून ठेवलेले पुडके हातांतून निसटले व वाहून गेले!" लक्ष्मण म्हणाला.

विश्वासचा श्वास खालचा खाली व वरचा वर राहून गेला. पांच हजार, म्हणजे फार मोठी रक्कम! जिवावरचा प्रसंग असला की कोणालाही पैशाची फिकीर कशी असणार! म्हणाला–"जाऊ दे, झालं ते झालं! घरी जाऊन ओले कपडे बदल. काळजी करू नकोस!"

लक्ष्मण घरी निघून गेला. चार दिवस लोटल्यावर ज्याने लक्ष्मणला पांच हजार दिले होते तो गोपूशेट विश्वासच्या दुकानात आला आणि म्हणाला–"मिळाले ना पैसे?"



तसे मी ओळखीच्या मुलाबरोबरच पाठविले होते म्हणा!"

त्यावेळी लक्ष्मण दुकानात नव्हता. विश्वास गोपूशेटला लक्ष्मणच्या तोंडी त्याने जे काही ऐकले होते ते सांगून म्हणाला—"तो म्हणाला त्यात काही तरी लबाडी असली पाहिजे, असे मला वाटले होते. परंतु ते क्षणभरच, कारण त्यानंतर इतरांच्या तोंडी ओढ्याला पूर आला होता हे मला कळले. ते कळले नसते तर मी त्याला त्याची मानगुटी धरून खरी गोष्ट काय ती काढून घेतली असती."

ते ऐकून गोपूशेट थक्कच झाला. लक्ष्मणला पांच हजार रुपये दिल्यानंतर तो निघाल्यावर गोपूशेट स्वतः ओढ्या पलीकडच्या गणेशपुरीला जाऊन यावे म्हणून पाठोपाठ निघाला होता. तो ओढ्या पलीकडे जाण्यासाठी ओढ्यात पाऊल टाकणार इतक्यात ओढ्याला पूर आला. त्या पूर्वीच लक्ष्मण ओढ्यापलीकडे जाऊन काठावर उभा होता. ते पाहून गोपूशेटला हायसे वाटले होते.

वस्तुस्थिति अशी असतां लक्ष्मणने आपल्या मालकाला तिखटमीठ लावून कपोलकल्पित गोष्ट सांगितली तर! विश्वासला त्याच्या नोकराने कसे फसविले हे नुसते तोंडाने सांगून मोकळे होण्याऐवजी त्याची लबाडी उघडकीला आणून देणे बरोबर होईल असा गोपूशेटने विचार केला.

त्यासाठी त्याने एक युक्ती करायचे ठरविले व विश्वासला म्हणाला—"विश्वास तु साक्षात् विश्वास आहेस. तुझ्या ऐवजी दुसरा कोणी असता तर मीच लक्ष्मणच्या हातात शंभर रुपये ठेवून त्याच्या तोंडी पांच हजार रुपये पचविले असते."

विश्वास हसून म्हणाला—"हे पहा, माझा विश्वास माझ्या नोकरावर जितका आहे, तितका विश्वास माझ्या स्नेही व्यापाऱ्यांवर व तुझ्यावर ही आहे!"

"अस्सं! तर मग मी तुझ्या नोकरापेक्षा जास्त प्रामाणिक व विश्वासपात्र आहे, हे सिद्ध करावयाचे मी ठरविले आहे. तू आज रात्री सुमारे नऊ वाजायच्या सुमारास तुमच्या गावच्या सांबाच्या देवळातल्या जांभळाच्या झाडाखाली वेष पालटून येऊन उभा रहा. मी जासवंदीच्या झुडपात लपून उभा राहतो. काय होतं ते तू पहा!" गोपूशेट म्हणाला.

विश्वासने चकित होऊन विचारले—"हे सर्व कशासाठी रे? तू काही करणार असशील तर आधीच सांगून का नाही टाकीत?"

"तसं सांगितलं तर कळणार नाही म्हणून! तू सांबाच्या देवळाजवळ ये मात्र. विसरू नकोस!" असे सांगून गोपूशेट निघून गेला.

त्या दिवशी रात्री काळोख पडू लागला तेव्हां तो लक्ष्मणच्या घरी गेला आणि त्याला हाक मारली. लक्ष्मणने दार उघडले व समोर गोपूशेटला पाहून दचकला.

गोपूशेट गोड शब्दात त्याला म्हणाला—"काय रे, तुझ्यावर केवढा प्रसंग आला त्या दिवशी! मी दिलेले सर्व पैसे पुरात वाहून गेले नाही का रे?"

लक्ष्मणच्या मनातली भीती पार नाहीशी झाली. त्याने त्याला फार वाईट वाटत असल्याचे सोंग करून म्हटले—"होय हो, शेटजी! मालकाचे पैसे, एवढे तेवढे नाहीत, बरोबर पांच हजार रुपये! मला बेताचे पोहता येत होते. पुराच्या पाण्यात थोडे हातपाय मारले आणि कसाबसा काठाला लागलो!"



गोपूशेट थोडयाशा थट्टेने हसत म्हणाले—"या सर्व गमजा माझ्याजवळ नाही चालायच्या, समजले! तुझी परीक्षा घ्यावी म्हणून मी ते बोललो होतो. ओढ्याला पूर येण्यापूर्वीच तू पलीकडच्या काठावर पोंचलेला मी स्वतःच्या डोळ्यांनी तुला पाहिला. हवं असेल तर एका दोघांना साक्षीदार म्हणूनही आणू शकेन!"

लक्ष्मणला पायापासून मस्तकापर्यंत कापरं भरल्यासारखं झालं. गोपूशेट त्याच्या-

खांद्यावर हात ठेवून म्हणाले–"मी हे सर्व तुझ्या मालकाला सांगणार नाही. त्याबद्दल त्या पांच हजारातली अर्धी रक्कम मला मिळाली पाहिजे. आहे कबूल ?"

लक्ष्मणने होकारार्थी मान हलविली आणि पैसे आणायला निघाला, तेव्हां गोपूशेट त्याला म्हणाले–"मी एका मित्राला भेटायला जातो आहे. हे पैशाचं ओझं नको. रात्री नवाच्या सुमारास सांबाच्या देवळानजीकच्या जांभळाच्या झाडाखाली मी तुझी वाट पाहातो तू तेथे येऊन पैसे आणून दे!"

लक्ष्मण रात्री नऊ वाजतां पैसे घेऊन सांबाच्या देवळात गेला. तेथे गोपूशेटने सांगितल्याप्रमाणे जांभळाच्या झाडाखाली एक माणूस बसला होता. लक्ष्मण त्याच्या जवळ जाऊन म्हणाला–"गोपूशेट, तुम्ही सांगितल्याप्रमाणे अडीच हजार आणून देतो आहे व मी वचन दिल्या प्रमाणे आलो आहे. तुम्ही सुद्धा वचन दिल्याप्रमाणे माझ्या मालकांना ही गोष्ट कळू देता कामा नये!"

ते एकल्यावर काळोखात बसलेल्या विश्वासचा स्वत:च्या कानावरच विश्वास बसेना. तो आपला राग आवरू शकला नाही व त्यानं लक्ष्मणच्या थोबाडीत अशी जोराने दिली की त्याच्या डोळ्यासमोर काजवे नाचू लागले. नंतर विश्वास म्हणाला–"काय रे, तू इतका विश्वासघात करशील असे नव्हते वाटले मला. तुला आतां अटक करविली असती, परंतु तू माझ्याकडे कित्येक वर्षे काम केले आहेस म्हणून तुला क्षमा करतो. यापुढे दुकान झाडायचे व हमालकी करायची एवढेच काम तुझे राहील!"

इतका वेळ दुरून हे सर्व पहात उभे असलेले गोपूशेट पुढे आले व पैशांचं बोचकं विश्वासच्या हातांत देत म्हणाले–"उरलेले अडीच हजार मालकांना आणून दे! इतकी कमी शिक्षा तुला भोगावी लागेल असे नव्हते वाटले मला! तुझ्या मालकाचे औदार्य पाहून मी तरी थक्कच झालो!"






[७]

[राजाने सिंहासन सोडावे असा प्रजेने घोष केला. चित्रसेनाच्या मनावर त्याचा परिणाम झाला. त्याने राजवाड्याच्या मंडपावरून खाली उडी मारून प्राणत्याग केला. प्रजेने समरसेनाच्या 'जयजयकार' केला. समरसेन नरवाहनला बरोबर घेऊन ससैन्य शत्रूवर चालून जाण्याच्याहेतूने निघाला. त्यानंतर–]

शिवदत्त मंदरदेवाला पुढे सांगत होता :

"सुमारे दोनतीनशे पायदळ सैन्याच्या पुढे अर्ध चंद्राकृती करून काही घोडेस्वार निघाले. शत्रूच्या घोडेस्वारांनी पायदळावर हल्ला चढवावयाचा झाला तर त्यांना प्रथम समरसेनाच्या घोडेस्वारांबरोबर चार हात करावे लागणार होते नाही का?" "होय तर, म्हणजे समरसेनाने तसा व्यूहच रचला होता म्हणावयांचा." मंदरदेव हसत म्हणाला.

"समरसेनाने टाकलेला हा पवित्रा शत्रूने रचलेले सर्व बेत विसकटून टाकायला पुरेसा होता. त्याचे सैन्य हळू हळू पुढे येत होते. शत्रूला अर्थातच त्याची दहशत बसली व त्याने पाय मागे घ्यायला सुरवात केली.

एकाएकी समरसेनाच्या बिनीच्या तुकडीने शिंग फुंकले आणि त्या पाठोपाठ जयजयकार सुरू झाला. त्याच्या घोडेस्वारांनी अत्यंत वेगाने हल्ला चढविला. त्याला

शत्रूच्या घोडेस्वारांनी धैर्याने तोंड दिले. त्यावेळी भाले व तलवारींचा परस्परांवर झालेला हल्ला म्हणजे सामान्य नव्हता. ती चकमक वर्णनातीत होती.

चारपांच मिनिटांतच शत्रूला पाय रोवून युद्ध करणे अशक्य झाले व ते वाट फुटेल तिकडे पळू लागले. त्याच वेळी पायदळ सैन्य शत्रूवर तुटून पडले. विजयोत्साहाने समरसेनाचे घोडेस्वार आपल्या भाल्यांनी शत्रूच्या पायदळ सैन्यावर हल्ला करायला सरसावले. कोठे पळायला सुद्धा जागा नाहीशी पाहून पायदळ सैन्य जिवावर उदार होऊन लढू लागले.

विजयलक्ष्मी समरसेनाच्या गळ्यात हार घालणार असे मला वाटू लागले या युद्धामुळे शत्रूचा विमोड होऊन राज्यात कायमची शांतता नांदू लागेल, असा विश्वास माझ्या मनात उत्पन्न होऊ लागला. तो शुभ दिवस ज्या दिवशी उगवेल त्या दिवसापसून नरवाहन मिश्राच्या कुटिल नीतीमुळे दु:खी झालेली प्रजा सुखी होईल व कुंडलिनी द्वीपात कोणालाही कष्ट किंवा त्रास होणार नाही.

मी अशा तऱ्हेने विचार करीत उभा असतां शत्रुसैन्य हाहाकार करीत वाट फुटेल तिकडे पळत असलेले दिसले. पाठ दाखवून पळून जात असलेल्या त्या शत्रुसैन्यावर आमचे घोडेस्वार भाल्यांचा वार करून त्यांना पळवीत होते व शक्य होईल तितक्यांना ठार करीत होते. इकडे आमच्या



पायदळ सैन्यातले जे घायाळ झाले होते त्यांना मलमपट्टी लावून त्यांची सेवा शुश्रूषा करण्यात आमचे सैनिक मदत करीत होते. काही सैनिक जवळच्या ओढ्यावर जाऊन आपली तहान भागवीत होते.

तेव्हां मी बुरुजावरून खाली उतरून राजधानीचे सिंहद्वार उघडण्याचा विचार केला. विजयोत्सहाने परत येणाऱ्या समरसेनाचे व त्याच्या अनुयायांचे आनंदाने स्वागत करावे असे मी ठरविले. परंतु मी बुरुजावरून जेमतेम खाली उतरलो असेन नसेन, सैन्यात जयजयकार होण्याऐवजी हाहाकार उडाल्याचा आवाज ऐकू आला.

मी क्षणभर थक्क होऊन जागच्या जागी स्तब्ध उभा राहलो. युद्धभूमीपासून थोड्याशा उंच जागेवर चारी बाजूचे सैनिक जमा होऊ लागले. हे सर्व काय चाललं आहे या विचारात मी असतां दहा घोडेस्वार किल्ल्याच्या दिशेने भरधाव येत असलेले मला दिसले.

मी तर काळजीतच पडलो. वाटलं होते तसे नसून काही तरी प्रतिकूल घडले असावे असा संशय माझ्या मनात आला. ते दहा घोडेस्वार किल्ल्याच्या दिशेने येत आहेत ते काही तरी विशेष निरोप घेऊन येत असावेत असे मला वाटले. मी घाईघाईने बुरुजावरून खाली उतरून आलो. घोड्यावर बसून बरोबरच्या अनुयायांसह किल्ल्याचे दार उघडण्यासाठी धावलो. परंतु आत शिरतांच ते दहाचे दहा घोडेस्वार



     




"नरवाहन मित्र की जय" असा जय-जयकार करू लागले.

तर मग काही तरी फितूरी झाली असली पाहिजे हे मी ओळखले. "बंडखोरांवर हल्ला करा, त्यांच्या माना उडवा!" असे ओरडत मी त्या बंडखोरांवर चालून गेलो व दोघांना लोळविले. माझ्या अनुयायांनी सुद्धा आपापल्या घोड्यांना प्रोत्साहन दिले आणि शत्रूवर तुटून पडले.

गल्लोगल्ल्यांतून नेमलेले सैनिक आणि आयुध धारण करून सज्ज असलेले नागरिक जागच्या जागी किंकर्तव्य विमूढ स्थितीत उभे राहिले. त्याच वेळी सैनिकांपैकी काही जणांनी "नरवाहन महाराजांचा जय असा!" असा जयघोष केला. आणि पुढे सरसावले.

जी प्रजा सशस्त्र होती तिच्यात खळबळ उडाल्यासारखी दिसली. त्यातली काही तरुण मंडळी "समरसेन की जय" असा जय-घोष करीत बंडखोर सैन्यावर तुटून पडली.

त्या सर्व गोंधळाला युद्ध म्हणणे सयुक्तिक होणार नाही. आयुधधारी प्रत्येक तरुणाचा दुसरा सशस्त्र सैनिक किंवा प्रजा शत्रू होता. कोणी खड्गधारी कोण्या शेजारच्याशी युद्ध करू लागला तर तो त्याचा मित्र आहे की शत्रू हे कळायलाही मार्ग नव्हता. काही जण समरसेनाचा तर काही जण नरवाहनाचा जयजयकार करीत होते. त्या गडबडीत कोणाच्या तोंडून कोणाचा जयजयकार येत होता हे स्पष्टपणे कळतच नव्हते. म्हणून शत्रू कोण व मित्र कोण हे कळणे अशक्य होते.

मी युद्ध करीतच आपल्या अनुयायांसह हळू हळू बालेकिल्ल्याच्या दारापर्यंत आलो, द्वारपालकांनी मला पाहताच दारे उघडली व मी आत पाऊल टाकताच दारे बंद करून घेतली. अशा तऱ्हेने मी त्या गोंधळलेल्या परिस्थितीतून बाहेर पडलो व बालेकिल्ल्यात आलो.

बाहेर गल्ल्याबोळातून चकमकी झडतच होत्या. सैन्यातले काही लोक समरसेनाच्या बाजूचे होते व बरेचसे नरवाहनाच्या बाजूचे. तरी त्या युद्धात कोण विजयी होत आहे, हे प्रत्यक्ष जाऊन पाहिल्याशिवाय कळणे अशक्य होते. म्हणून मी माझ्या अनुयायांपैकी एकाला चोरवाटेने बाहेर पाठविले व युद्धभूमीवर काय होत आहे, पाहून यायला सांगितले. तर आतां यापुढे राजधानीतल्या नरवाहनाच्या अनुयायांचा पुढला कार्यक्रम काय आहे हे पाहाणे आवश्यक होते. ते त्यांना विरोध करणाऱ्याला ठार करून सरळ बालेकिल्ल्याकडे येऊन तो बळकावण्याच्या विचारात असल्याचे दिसले. मी मात्र आपली सर्व शक्ती पणाला लावून आपल्या अनुयायांसह बालेकिल्ल्याचं रक्षण करायचे ठरविले. माझे मोजके अनुयायी आणि बालेकिल्ल्यातील चाळीस-पन्नास सैनिक मिळून बालेकिल्ल्याचं रक्षण करणे म्हणजे थट्टा नव्हती. अशा परिस्थितीत एकच मार्ग होता. पूर्वी हिंस्रपशूंना शिकारखान्यातून मोकळे करून बाहेरच्या प्रजेवर सोडावे असे ठरविले होते तसे करणे.

एक तास जेमतेम लोटला. बाहेरच्या रस्त्याबोळांतून युद्ध चालूच होते. मी चोरवाटेने पाठविलेला अनुयायी परतला होता. त्याने आणलेली बातमी ऐकल्यावर माझ्या हृदयाला धक्काच बसला.



शत्रूशी चालू असलेल्या युद्धात समरसेनाला बरेच लागले होते. नरवाहनाने स्वत: सेनापतित्व आपल्या हाती घेऊन तोच कुंडलिनी द्वीपाचा राजा झाला असल्याचे जाहीर केले होते.

ती बातमी जाहीर करण्यासाठी त्याचे काही अनुयायी राजधानीत शिरले होते.

"समरसेन कोठे आहे? तो शुद्धीवर आहे का, बोलण्याच्या स्थितीत आहे का?" मी बातमी आणणाऱ्या अनुयायाला विचारले.

"ते चांगले जखमी झाले आहेत. आतां आहेत की आणखी काही वेळाने नाहीत, अशी आहे त्यांची परिस्थिती. ते ओळखूनच नरवाहनाने स्वत:ला प्रथम सेनापती व









नंतर कुंडलिनीचा राजा असल्याचे जाहीर केले. सैन्यातले तुकड्यांचे नायक त्याच्याच बाजूने असल्याचे दिसले." शिवदत्ताचा अनुयायी म्हणाला.

तर आता परिस्थिती आपल्या हातातून निसटल्याचे मी स्पष्टपणे ओळखले. काही वेळाने नरवाहन स्वतः ससैन्य राजधानीवर चालून येईल. त्याला तोंड देण्याची शक्ती कोणाच्यात यावेळी तरी नाही. त्याचा माझ्यावर केवढा राग होता व तो माझा किती द्वेष करीत होता ते मला माहीत नव्हते असेही नाही. या सर्व दृष्टीने विचार करून साध्य होईल तितक्या लवकर किल्ला सोडून चोरवाटेने आपल्या अनुयायांसह निघून जाणे बरोबर होईल असा मी विचार केला.

मी आपल्या सर्व अनुयायांना एकत्र केले. त्यांना परिस्थिती समजावून सांगितली. मी सुचविलेला सल्ला सर्वांना मान्य होता.

आता कोणत्याही प्रकारची चाहूल न देता चोरवाटेने सर्वांनी बाहेर निसटणे एवढेच बाकी होते. किल्ल्यातून बाहेर पळून जायला चोरवाट आहे ही गोष्ट नरवाहनला माहीत नव्हती असे नाही. म्हणून आणखी जास्तच सावधगिरी बाळगणे आवश्यक होते.



आपल्या सर्व अनुयायांना सावध करून मी त्यांना राजवाड्यात नेण्यासाठी पुढे निघालो. मी थोडा आत गेलो असेन, बाहेरच्या दारातून ओरडा ऐकू आला. मी नुसते वळून पाहिले तर नरवाहनाच्या बाजूचे काही सैनिक दाराला लावलेले लोखंडी खिळे मोठमोठ्या ओणक्यांनी ठोकीत होते व दार तोडण्याच्या प्रयत्नात असल्याचे दिसले.

मला लगेच एक उपाय सुचला. पूर्वी केले होते तसेच करावयाचे. पिंजऱ्यात कोंडलेल्या क्रूर वाघ सिंह वगैरे जनावरांना सोडायला मी शिकारखान्याच्या अधिकाऱ्यांना आज्ञा केली. तो माझ्याकडे पाहून हसत

म्हणाला–"शिवदत्ता! तुझे शत्रू कोण आहेत हे मला माहीत नाही, परंतु ते मात्र तुझ्याहून जास्त हुशार आहेत एवढे खरे! एका तासापूर्वी जनावरांना खायला प्यायला घातलं आहे की नाही, याची पाहाणी करायला मी पिंजऱ्यांच्याजवळ गेलो होतो. परंतु पिंजऱ्यात पाहून मी आश्चर्यचकितच झालो. त्यातली अर्धी-अधिक जनावरे मेलेली होती. काही जमिनीवर तडफडत होती."

मी उलट काही उत्तर न देतां धावत पिंजऱ्यांजवळ गेलो. शिकारखान्याचा अधिकारी म्हणाला त्यात खोटे काहीच नव्हते. तर मग सिंहावाघांना विष घातले ते शिकारखान्याच्या याच अधिकाऱ्याने तर नाही, की आणखी कोणी नरवाहनाच्या अनुयायाने घातले? खरेखोटे काय याची चवकशी करायला माझ्याजवळ सवड कोठे होती? कारण माझ्याजवळ वेळ थोडाच उरला होता. म्हणून मी शिकारखान्याच्या अधिकाऱ्याच्या मुसक्या बांधून जाणेच श्रेयस्कर असा विचार करून त्याचे दोन्ही हात पाठीमागे वळवून ते बांधून ठेवले व त्याला एका खोलीत कोंडून ठेवून मी चोरवाटेच्या बाजूला धावलो.

ती चोरवाट चित्रसेन महाराजांच्या झोपायच्या खोलीतून होती. तेथून एक चिचोळी भुयारातली वाट निघून किल्ल्या-बाहेरच्या खंदकाच्या खालून जाऊन एका कोसावरच्या जंगलात एका मोठ्या झाडाच्या ढोलीतून बाहेर निघत होती.

मी आपल्या अनुयायांसह चित्रसेन महा-राजांच्या झोपायच्या खोलीत आलो तेव्हां मला त्या महाराजांच्या भौतिक देहाची आठवण झाली. त्यांचा दहन संस्कारही झाला नव्हता व त्यांचं प्रेत कोणत्या तरी दालनात पडून होते. त्यांची राज्यव्यवस्था आणि मृत्यू म्हणजे एक शोकांतिकाच होती.

मी चोरवाटेचे दार उघडून समोर पाहिले. काळोख, व दाट काळोखाशिवाय काही दिसत नव्हते. (क्रमशः)





# हेवा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तुला या मध्य रात्रीच्या वेळी इतके श्रम करीत असलेला पाहून अशा व्यक्तीचा स्वभाव दैववशात असा कां झाला असावा, असा संशय मनात येतो. हे जग म्हणजे हेवा आणि द्वेष यांचे आगर आहे. दीन स्थितीत असलेल्या गोरगरिबांची ज्यांना कीव येते, त्यांचा गौरव आदर सत्कार कोणी करीत नाही. नागेश नावाच्या अत्यंत सामान्य स्थितीतल्या माणसाला प्रथम सहाय्य करून पुढे त्याच्याशी हेवा करू लागलेल्या लोकांची कथा मी तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक!" असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.



सुमारे वीस वर्ष वयाचा नागेश फक्त अंगावरच्या कपड्यानिशी वीरपूर गावी आला. त्याला विठोबा नावाच्या एका शेतकऱ्याने सुरवातीलाच आश्रय दिला. त्याच्या शिफारशीवरून गावातल्या पोलीस पाटलाने नागेशला चार एकर जमीन खंडाने दिली.

नागेश, आपल्या शेताच्या कामाबरोबर गावातल्या, लोकांना त्याला होईल ती मदत करीत असे. अशा तऱ्हेने दोन वर्षांत त्याने स्वतःच्या मालकीची दोन एकर जमीन करून घेतली. विठोबाने नागेशची पाठ थोपटली. विठोबाजवळ दहा एकर कोरडवाहू जमीन होती.

काही काळ लोटल्यावर त्या गावच्या रघुजी पाटलाने नागेशचा स्वभाव वागणूक वगैरे पाहून विचार केला की त्याला आपला जांवई करून घ्यावे. रघुजीकडे पंचवीस एकर पाण्याखालची जमीन होती आणि दहा एकर जमिनीत फळ झाडांची बाग होती. त्याला एकुलती एक मुलगी होती. नागेशची हुशारी व कर्तबगारी रघुजीने स्वतः पाहिली होती, म्हणून त्यालाच जांवई करून घ्यायचा विचार केला.

नागेशने त्या बाबतीत विठोबाचा सल्ला घेतला. हे लग्न झालं तर नागेश आपल्याहून जास्त श्रीमंत होईल असे वाटून तो नागेशला म्हणाला–"घरजांवई होऊन जिणं हे पुरुषाला लाजिरवाणे आहे, असे आपले मला वाटते. म्हणून विचार कर, बाबा! मला तर हे लग्न मुळीच आवडणार नाही!"

नागेशने ती गोष्ट नम्रपणे रघुजीला सांगितली. रघुजी शांतपणे म्हणाला–"नागेश, माझी मुलगी लक्ष्मीच तुझ्याशी लग्न करायचे म्हणाली. तू घर जांवई होऊन रहायचं कारणच नाही. मी आपली सर्व इस्टेट तुझ्या नावी लिहून देतो. तू म्हणशील तसे आम्ही नवरा बायको तुझ्याजवळ आपले म्हातारपण काढू!"

नागेश त्या गोष्टीस कबूल झाला. त्याचं लक्ष्मीशी थाटामाटाने 'लग्न झालं. त्या दिवसापासून विठोबाने नागेशशी बोलणे सोडले. नागेशला त्याबद्दल फार वाईट वाटले व तो एके दिवशी विठोबाला भेटायला त्याच्या घरी गेला व म्हणाला–"माझ्या हातून काही चूक झाली असेल तर मला क्षमा करा! मी आज या स्थितीपर्यंत पोहाचू शकलो याला कारण सर्वस्वी तुम्हीच आहा! तुमचा हात पाठीवर नसेल तर मी एक क्षणभरही या गावात राहू शकणार नाही!"

विठोबा नागेशाचा तो नम्रपणा पाहून नरमले व म्हणाले–"तू माझे उपकार विसरला नाहीस तर, तुझी नित्य उन्नती होत राहो!" असा आशीर्वाद दिला.

त्या वर्षी वेळेवर पाऊस न पडल्यामुळे पिके नष्ट झाली. नागेशने वेळीच काळजी घेऊन आवश्यक तजवीज केल्यामुळे त्याच्या शेतातली पिके चांगली निघाली. विठोबाची शेते नष्ट झाल्या कारणाने त्याला नागेशचा हेवा वाटू लागला.

नागेशला ते कळले व तो एके दिवशी विठोबाला भेटायला त्याच्या घरी गेला.

"नागेश, तुझे हे सर्व मला मुळीच आवडलं नाही, बघ! मी स्पष्टच सांगतो! शेतीभातीत तू मोठी कर्तबगारी दाखविली आहेस. परंतु तू स्वार्थी आहेस. शेतीभातीती सर्व गुपिते मी तुला उघड समजावून सांगितली. तू मात्र मला काहीच कळू दिले नाहीस!" विठोबा थोडे रागानेच हे म्हणाले.

नागेश नम्रपणे म्हणाला–"माझ्या शेतात चांगली पिके आली, त्यात माझे मोठेपण





असे काहीच नाही. हे सर्व तुमच्या आशी-वादाचं फळ आहे. अदृष्ट अनुकूल होते, एवढेच म्हणावयाचे!"

ते उत्तर ऐकून विठोबाला बरं वाटलं व त्यांचा सर्व राग ओसरला. त्यानंतर ते नागेशशी पूर्वीसारखेच मोकळेपणी बोलू लागले. तरी त्यांना मनात वाटे की नागेशने रात्रंदिवस शेतीभातीचा विचार सोडून दुसरं काही केलं नाही तर काही दिवसांनी नागेश सर्व गावच विकत घेईल!

एकदां ते नागेशला म्हणाले–"नागेश, तू बरेच काही मिळविले आहेस, आतां रात्रंदिवस इतकी मेहनत कशाला करतोस? तू आपली दृष्टी या पुढे साहित्य व कला यांकडे वळविली पाहिजेस. तसा तू स्वतःच हुशार आहेस. तु थोडा प्रयत्न केलास तर थोडयाच दिवसांत तुझं नाव देशभर होईल."

नागेशला काव्यकवितेची फार आवड होती. त्याने काही काळ काव्यपठनाकडे व नंतर काव्य लेखनाकडे लावला. त्याने आपली कविता आपल्या गावकरी मंडळींना म्हणून दाखविली व त्यांच्याकडून शाबास-कीही मिळविली. एका विद्वानाने मात्र त्यात पुष्कळ काव्यदोष असल्याचे दाखवून त्याची थट्टाही उडविली. गावकरी मंडळीही हंसली. परंतु नागेशला मनातल्या मनात आनंदच झाला. कारण त्याला वाटले की चुकांची दुरुस्ती केली तर त्याही क्षेत्रात त्याला यश मिळेल. म्हणून तो त्या विद्वाना-कडे गेला व म्हणाला–"हे पहा, तुम्ही माझ्या कवितेची थट्टा केली म्हणून मला राग आला नाही. मी तुम्हांला तुम्ही मागाल तेवढे पैसे देतो, माझ्या चुका दाखवा. माझी भाषा व काव्य सुधारून द्या."

त्याने नागेशला प्रोत्साहन देण्याऐवजी त्याच्या उत्साहावर विरजण घालण्याचा प्रयत्न केला. म्हणाला–"काव्य हे उपजत यावे लागते. पांडित्य संपादन केल्याने काव्य येत नसते."

नागेश निरुत्साहित न होता त्याच्याकडे पुन्हां पुन्हां जाऊ लागला. त्याने भाषा चांगली शिकून घेतली व मोठमोठ्या कवींची काव्ये वाचून काव्यवैशिष्टये शिकून घेतली.

वर्षभर व्यर्थ न घालवितां त्याने एक काव्य लिहून काढले व त्याच पंडिताला नेऊन दाखविले. तो पंडित काव्य वाचून म्हणाला–"आतां तुझ्या भाषेत कोठेही चूक नाही, तेवढयाने हे काव्य होऊ शकणार नाही."

तेवढयावर मनाचे समाधान करून घेऊन नागेशने आपली कविता ग्रामस्थांना वाचून दाखविली. तेव्हां एक विचित्र गोष्ट घडली. वेष पालटून त्या देशाचा राजा त्या गावी आला होता. त्याने ग्रामस्थांबरोबर बसून ते काव्य ऐकले. त्याला ते काव्य फार आवडले. आपली ओळख प्रगटपणे सांगून राजा म्हणाला–"संस्कृत काव्यांचे भाषांतर करून काव्यें लिहिण्याचे काम कित्येक कवी करतात, परंतु एक नवा विषय घेऊन काव्य रचना ही प्रथमच मी पाहातो आहे! जर नागेश राजधानीत आला तर मी त्याचा योग्य तो सत्कार करीन."

ते ऐकून पुष्कळ लोक चकित झाले. परंतु त्या पंडिताने व विठोबाने मात्र नागेशाशी बोलायचे सुद्धा सोडले. परंतु नागेश त्यांच्या घरी जाऊन त्यांना म्हणाला–



"हे सर्व तुमच्या आशीर्वादामुळेच तर साध्य होऊ शकले." तेव्हां त्यांच्या मनाचे समाधान झाले.

नागेश राजधानीत जातेवेळी आपल्या-बरोबर त्या पंडिताला व विठोबाला घेऊन गेला. नागेशाने त्या दोघांच्या आशीर्वा-दानेच ते काव्य तो लिहू शकला असे सांगितल्यावर राजाने त्यांचाही योग्य सत्कार केला. नागेशामुळे त्यांचा सत्कार राजदरबारी झाला याबद्दल दोघेही खूष झाले व त्या दिवसापासून नागेशाचे दोष काढायचे त्यांनी सोडून दिले. त्यांच्या मनातला हेवाही नाहीसा झाला व ते नागेशाच्या सद्गुणांची मनःपूर्वक प्रशंसा करू

लागला. परंतु एके दिवशी नागेश बायकोला म्हणाला– "आतां या गावात फार दिवस आपल्याला राहता येणे शक्य नाही. दुसऱ्या गावी गेलेच पाहिजे. सर्व इस्टेट विकून टाकावी म्हणतो."

त्याची बायको आश्चर्यचकित झाली. तिच्या तोंडावाटे एकही शब्द उमटला नाही.

येथवर कथा सांगून वेताळ म्हणाला– "राजा, नागेशाचे हे वागणे विचित्र आणि निरर्थक नाही का? त्याचा आदर गावात वाढला होता नाही का? त्याला गाव सोडायचेच होते तर लोक हेवा करीत तेव्हां सोडायचे होते. आतां तो विचार त्याच्या मनात कां आला? या शंकांचे समाधान-कारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला– "नागेशासारखी प्रतिभा व कर्तृत्व फार थोड्या व्यक्तींत असते. प्रवाहाच्या दिशेने पोहोत जाऊन कोणी नदी पार करू शकेल, परंतु विरोधाला तोंड देऊन जगात नाव मिळविण्यात खरे थोरपण आहे. तसे विरोध किंवा संघर्ष रहित जीवन चालविण्यात खऱ्या प्रतिभा-वानाला आनंद वाटत नाही. विठोबा व पंडित दोघांनी त्याचे दोष दाखविले व हेवा केला, म्हणून तर नागेश जास्त उत्सा-हाने आपलं वैशिष्ट्य दाखविण्यासाठी झटला. हेवा करणारे नसताना दोष दाख-विणारे नसताना त्याला उन्नती कुठेल की काय, साहजिकच वाटले त्याने हेवा करणाऱ्यांचेच उपकार असल्याचे सांगून त्यांची मर्जी संपादन केली. गावात त्याच्याशी चढाओढ करू शकतील असे लोकही नव्हते. त्या शिवाय उन्नती होणे शक्य नाही असे त्याला वाटले असावे. म्हणून त्याने इतर कोठे जाण्याचा विचार केला असावा."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# साधूची चतुराई

एका गावी लखूशेट व रघुशेट नावाचे दोघे व्यापारी रहात होते. धंद्यात दोघांमध्ये जी सहज चढाओढ होई तिचा परिणाम परस्परांशी वैर वाढण्यात झाला.

एकदां गावाच्या तळ्याकाठच्या वडा-खाली एक साधू येऊन राहू लागला. गाव-करी त्याच्या दर्शनास जाऊ लागले व स्वतःचे सुखदुःख निवेदन करून त्या साधूचा सल्ला घेऊ लागले. साधू त्यांना मंत्रवलेले भस्म, ताईत वगैरे देत असे. त्यामुळे बऱ्याच लोकांना फायदाच झाला.

एके दिवशी संध्याकाळच्या सुमारास लखूशेट त्या साधूच्या दर्शनास गेला.

त्याला पाहून साधूने त्याला विचारले– "कायरे बाबा, तुला कसला त्रास आहे? शारीरिक त्रास आहे की मानसिक?"

लखूशेट म्हणाला– "स्वामी, मला तसला कोणताही त्रास नाही. एक दुष्ट माणूस माझ्या राशीशी लागला आहे. माझी भूक तहान उडाली आहे. मला शांतपणे झोपही लागत नाही! ती व्यक्ती म्हणजे माझ्याच सारखा रघुशेट नावाचा व्यापारी आहे दुष्ट व्यक्तीचे नुकसान व्हावे असं [illegible] आहे। केले [illegible] गैर होईल, असे म्हणता येईल का?" लखूशेटने विचारले.

साधूला लखूशेट म्हणाला त्याचा अर्थच कळला नाही. "तुला जे काही सांगायचे आहे ते सरळ व स्पष्ट सांग! बाबारे, मी तुझे गुपित कधी बोलणार नाही!"

"या गावात रघुशेट नावाचा आणखी एक व्यापारी आहे. तो भयंकर दुष्ट आहे. त्याचा सर्व तऱ्हेने नाश होईल असा एखादा मंत्र द्या!" लखूशेट म्हणाला.

संन्यासी क्षणभर स्तब्ध व अवाक राहल्यावर म्हणाला– "तू कधी इच्छा करू नये अशी एक इच्छा करीत आहेस.

परंतु दुसरा दुष्ट आहे, असे तू म्हणतो आहेस म्हणून हरकत नाही. समज, त्या रघुशेटचे एक हजार रुपयाचं नुकसान झालं तर तुझ्या मनाचं समाधान होईल का?" साधूने विचारले.

"हजार रुपयांचं नुकसान म्हणता! तेवढं नुकसान झालं तर ते मी कदाचित सहन करू शकेन एक वेळ, त्याची तर कंबरच मोडून जाईल." लखुशेट आनंदाने म्हणाला.

"तर मग आज रात्री मी एक मंत्र म्हणून एक तंत्र तयार करतो. त्यासाठी एक हजार रुपये खर्च होतील!" साधू म्हणाला.

लखूशेट लगेच धावत घरी गेला आणि एक हजार रुपये घेऊन आला. त्याने ते रुपये संन्याश्याला दिले. संन्याश्याने दुसऱ्या दिवशी उजाडताच यायला त्याला सांगितले.

रात्री एक प्रहर रात्र उलटल्यावर रघुशेट संन्याश्याच्या कडे आला. त्याने त्याचा प्रतिस्पर्धी व्यापारी लखूशेट किती दुष्ट आहे ते त्या संन्याश्याला सांगितले व त्याचे चांगलं मोठं नुकसान होईल असा एखादा मंत्रोपदेश करायला सांगितले.

"हे मंत्र फार घातक आहेत बरं का, यांचा उच्चार करताना एखादी चूक झाली की त्याचा परिणाम उलटा मंत्र म्हणणाऱ्यांच्या कपाळावरच येऊन आदळतो. म्हणून मी स्वतःच एक तंत्र तयार करून तुला देतो. लखूशेटचं नक्कीच मोठं नुकसान होईल. तो मंत्र म्हणून ते तंत्र तयार करून द्यायला एक हजार रुपयांचा खर्च होईल.

रघूशेटने एक हजार रुपये साधूला दिले. संन्याश्याने तंत्र घेऊन जायला दुसऱ्या दिवशी सूर्योदयाच्या वेळी यायला सांगितले.

दोघे व्यापारी दुसऱ्या दिवशी सूर्योदयाच्या वेळी वडाच्या पाराजवळ येऊन आश्चर्यचकित झाले. तेथे तो संन्यासी नव्हता. झाडाच्या बुंधाला एक चिट्ठी लोंबत होती. चिट्ठीत लिहिलेला मजकूर असा. "मी आणखी कोठे तरी जात आहे. तुमच्या दोघांच्या इच्छा पूर्ण झाल्या म्हणून मी तुम्हांला तंत्र द्यायची गरज नाही!"



# फायद्याचा व्यवहार

राजापूर नावाच्या गावात रामू आणि सोमू नावाचे दोन शेतकरी रहात होते. त्या दोघांच्यात खूप सलोख्याचे संबंध होते. परंतु एके दिवशी शेताच्या विभागणीवरून दोघांची भांडणे होऊन दोघे एकमेकांचे वैरी बनले. रामूने कोणत्यातरी कारणाने सोमूला ठोकून काढायचा निर्णय घेतला.

त्याच गावात दौलत नावाचा पहेलवान रहात होता. रामूने त्याच्या हातात दोनशे रुपये देऊन त्याला मारहाण करण्यास सांगितले.

त्या दिवशी संध्याकाळी शेजारच्या गावाहून परत येत असतांना रामूला दौलतने खूप मारले. रामू किंचाळत ओरडत म्हणाला–"अरे दौलत, हा बरोबरी अन्याय आहे. सोमूला मारण्याकरिता मी तुला दोनशे रुपये दिले, परंतु उलट तू मलाच मारहाण केलीस?"

दौलत मोठमोठ्याने हसत म्हणाला–"तुझा व्यवहार माझ्या बरोबर चांगला झाला नाही. सोमूनी मला त्याकरिता चारशे रुपये दिले. हे घे तुझे दोनशे रुपये." असे म्हणत, दौलत रामूच्या हातात दोनशे रुपये ठेवून निघून गेला.





# शिव्या की शाप

एका गावात एक सावकार रहात होता. तो एक नंबरचा लुच्चा होता. त्यामुळे त्याला देव दिसत नसत, परंतु भूते-खेते मात्र नेहमी दिसत असत. भुतांना पाहून चांगली माणसे घाबरत, परंतु धूर्त लोक घाबरत नसत.

त्याच गावातील एका गरीब बाईला सावकाराने कर्ज दिले. त्या बाईला सहा मुले होती. तिचा नवरा अचानक मेला. बाईला कोणतीही मिळकत नव्हती. तिने सावकाराकडे दोन वर्षांपूर्वी तीस रुपये घेऊन आपले घर गहाण ठेवले होते. दुसऱ्या वर्षी तिला आपले जुने कर्ज तर फेडता आलेच नाही, उलट आणखी पंधरा रुपये कर्ज काढावे लागले. सावकाराने त्या उधारीवर व्याज घेण्यास सुरवात केली. सर्व व्याजाची रक्कम एकूण शंभर रुपयांच्या वर झाली. त्या गरीब बाईच्या घराची किमत पण शंभर रुपयांच्या पेक्षा जास्त होती, तेव्हा त्या सावकाराच्या मनात एक दुष्ट विचार आला, त्या बाईला घर खाली करण्यास सांगून त्या घराचा ताबा घ्यावा.

त्या वेळेला एक भूत सावकाराच्या घराच्या समोरून जात होते. सावकाराने भुताला विचारले–"काय विचार आहे? गावातील कोणावर काही विपत्ती तर नाही ना आली?"

भूत हसत म्हणाले–"मला तुमच्या गावात येऊन बरेच दिवस झाले, खाण्याच्या आशेने शोधत इकडे आलो. तुम्ही कोठे जात आहांत?"

सावकाराने सांगितले मी एका गरीब बाईच्या घराचा ताबा घेण्यास जात आहे तिने दोन वर्षांपूर्वी जे कर्ज घेतले होते त्याचे व्याज. वाढत वाढत शंभराच्याहून अधिक झाले आहे.

"अरेरे! दोन वर्षे पूर्ण व्हायच्या आधीच मूळ किमतीपेक्षा व्याजच जास्त होत चालले आहे वाटते? तुम्ही मनुष्यप्राणी नेहमीच आमच्याबद्दल तक्रार करीत असता, परंतु मला आता असे वाटू लागले आहे की, आमच्यापेक्षा जास्त रक्त पिपासू लोक मानवच आहेत." भूत म्हणाले.

सावकार भुताने सांगितलेल्या गोष्टीवर नाराज तर झालाच नाही, परंतु उलट त्याला त्याचा अभिमान वाटू लागला.

गप्पा करीत करीत ते दोघे थोडे दूर गेले. तेव्हां एका झोपडीतून एक आवाज त्यांनी ऐकला. एक बाई आपल्या मुलाला शिव्या देत होती. "अरे, तुला भूत गिळून टाकील. किती वेळा तुला सांगितले की, दार चांगले घट्ट बंद कर म्हणून, बघ, आज मांजर सर्व लोणी चाटून खाऊन गेले."

"घे, तुला खायला मिळाले. ती बाई तिच्या मुलाला गिळण्याकरिता तुझ्या हातात देऊन गेली आहे." सावकार त्या भुताला म्हणाला.

भुताने हसून म्हटले–"ही तर फक्त त्या मुलाला भीती दाखविण्याकरिता म्हटलेली गोष्ट आहे! ती शिवी मनापासून दिली गेलेली नाही. ती आपल्या मुलाला खरोखरी मला द्यायला तयार नाही. मला अशा गोष्टींचा भरपूर अनुभव आहे."

थोडया दूरवर गेल्यावर एक नवरा-बायको आपापसांत भांडताना त्यांना दिसली. नवरा म्हणत होता–"तुला भूत खाऊन



टाकील." त्यावर सावकार बोलला–"ऐक, ही एक चांगली संधी आहे. एकदम दोघांना खायला मिळेल."

"ह्या तर फक्त शिव्याच आहेत, शाप नाहीत. चल आपण आपल्या वाटेने जाऊ." भुताने समजावले.

त्यानंतर ते चालत जाऊन थोड्या दूर असलेल्या त्या गरीब बाईच्या घरी पोहोचले. सावकाराने दरवाजा खडखडावला. गरीब बाईने दरवाजा उघडून बाहेर पाहिले व सावकाराला समोर पाहून म्हणाली–"सांग मुला, कसा काय आलास?"

"काकू, तशी काही खास गोष्ट नाही. परंतु तुमचे कर्ज व व्याज असे मिळून शंभर रूपयांहून जास्त झालेले आहे. तुम्ही हे घर माझ्या नावावर गहाण ठेवले आहेत. दोन वर्षे तुम्ही मला एक पैसासुद्धा दिला नाहीत. हो, तुम्ही तरी कोठून आणाल? घराची किंमत कर्जाच्या बरोबरीची झाली आहे. त्यामुळे आजच्या आज घर माझ्या ताब्यात देऊन टाका. आणि कर्जमुक्त व्हा. ही गोष्ट मी तुम्हांला सांगण्याकरिता आलो आहे." एका दमात सावकाराने त्या गरीब बाईला सांगितले.

सावकाराच्या तोंडून ती गोष्ट ऐकताच ती बाई संतप्त झाली. रागाने तिने सावकाराला शाप देण्यास सुरवात केली–"तुझे पोट जळून जाऊ दे, तुला भूत गिळून टाकू दे. अरे पंचेचाळीस रूपये कर्ज देऊन हे घर गिळंकृत करायला बघतो आहेस काय?"

"थांब आताच तुला चांगला धडा शिकवते." असे म्हणत ती घरात निघून गेली. गरीब बाईने घरात पाठ वळवली नाही तोच भुताने झटकन् सावकाराला गिळून टाकले व ते झपाझप आपल्या वाटेने निघून गेले.

गरीब बाई सावकाराला मारण्यासाठी हातात झाडू घेऊन बाहेर आली. परंतु पहाते तो काय? बाहेर कोणीच दिसत नव्हते. एवढ्यात कुठे निघून गेला? असा विचार करीत त्या गरीब बाईने घराचे दारं बंद केले.





# घमेंडीचा परिणाम

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असता बोधिसत्वानी गुणवंत नामे वीणा वादकाच्या रूपे जन्म घेतला. सोळावे वर्ष लागले, त्या वयात साऱ्या जंबुद्विपात त्याची बरोबरी करू शकणारा कोणी वीणावादक राहिला नाही. तेव्हां काशी राजाने आपल्या दरबारी त्याची नेमणूक केली.

त्यानंतर कित्येक वर्षांनी काशीचे काही व्यापारी व्यापार करण्याकरिता उज्जयिनी नगरात आले. गुणवंतच्या वीणेने काशी राज्यातील सर्व लोकांमध्ये त्याच्या वीणेची अभिरुची निर्माण झाली होती. त्यामुळे काशीच्या व्यापाऱ्यांनी उज्जयिनीच्या व्यापाऱ्यांना सांगितले–"आम्हाला वीणावादन ऐकावयाचे आहे. ह्या नगरातील प्रसिद्ध श्रेष्ठ अशा वीणावादकांना बोलावून त्यांचा कार्यक्रम आयोजित करावा. जो काही खर्च होईल तो सर्व खर्च आम्ही करू."

उज्जायिनीच्या कलाकारांमध्ये धनवंत नावाचा प्रसिद्ध वीणावादक होता. काशीच्या व्यापाऱ्यांचे मनोरंजन करण्याकरिता त्याच्या वादनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. धनवंत आपली वीणा घेऊन व्यापाऱ्यांची राहुटी जेथे होती तेथे आला. वीणेच्या तारा लावून घेऊन त्या छेडू लागला. खूप वेळ तो वाजवीत राहिला, परंतु काशीच्या व्यापाऱ्यांच्या चेहऱ्यावर काहीच आनंद दिसला नाही. नंतर त्याने काही गाणी वीणेवर वाजविली. परंतु त्या गाण्याचा परिणाम सुद्धा व्यापाऱ्यांच्यावर झाला नाही.

शेवटी धनवंतने हताश होऊन विचारले–"काय हो, मी इतका वेळ वीणावादन करीत राहिलो. परंतु आपल्या कोणाच्याच चेहऱ्यावर आनंदाचे भाव प्रकट झाले नाहीत. माझे वीणावादन पसंत पडले नाही का?" काशीच्या व्यापाऱ्यांना आश्चर्य वाटले.



त्यातील एकाने म्हटले—"अरे वा, आपण आतापर्यंत वीणा वाजवीत होतात का? आम्हांला वाटले की, आपण आपल्या वीणेच्या तारा जुळवीत आहात!"

दुसरा म्हणाला—"आम्हाला वाटले की, आपली वीणा बहुधा बिघडली असावी, तारा नीट जुळवता न आल्याने आपण त्या झंकाराने ग्रासले असाल? माफ करावे."

ह्या संभाषणाने धनवंतचा चेहरा खिन्न झाला. म्हणाला—"आपण माझ्यापेक्षा खूप मोठ्या कलाकाराचे वीणा वादन ऐकलेले असणार. त्यामुळे आपणाला माझे वीणा-वादन तितकेसे आवडले नाही. कृपा करून मला त्या कलाकाराचे नाव सांगावे."

"काय, आपण आमच्या काशी राज्यातील दरबारी गुणवंत वीणावादक याचे नाव ऐकले नाही का?" व्यापाऱ्यांनी विचारले.

"काय ते खूप मोठे विद्वान आहेत का?" धनवंतने विचारले.

"त्यांच्या वीणावादना पुढे आपण त्यांच्या कोणत्याच रांगेत बसू शकत नाही." व्यापाऱ्यांनी सांगितले.

"तरमग, आजपासून मी आता त्यांच्या बरोबरीचा कलाकार म्हणून घेईपर्यंत विश्रांती घेणार नाही. तोपर्यंत आपल्याला मी केलेल्या कार्यक्रमाचे पैसे देण्याची अजिबात जरूर नाही." असे उत्तर देऊन धनवंत त्याच दिवशी घरातून बाहेर पडून काशी नगरात गेला आणि बोधिसत्वाच्या घरी जाऊन पोहोचला.

बोधिसत्वाने धनवंतला विचारले—"मुला, तू कोण कशा करिता आलास?"

"महात्मन, मी उज्जयिनी नगरीचा रहाणारा आहे. माझे नांव धनवंत. आपल्या-कडून वीणावादन शिकायला आलो आहे. आपला माझ्यावर अनुग्रह झाला तर आपल्या तोडीचा कलाकार म्हणून मी गणला जाईन." धनवंताने त्याला उत्तर दिले.

बोधिसत्वाने त्याला वीणा शिकवायचे मान्य केले.

धनवंत रोज त्याच्या घरी वीणा शिकायला, तसाच बोधिसत्वाबरोबर राजदरबारात जाऊ लागला.

खूप वर्षे लोटली. एके दिवशी बोधिसत्वाने धनवंतला म्हटले—"मी जे काही शिकलो आहे ते सर्वच्या सर्व मी तुला शिकवले आहे. आता तू आपल्या देशात परत जाऊ शकतोस."

परंतु धनवंतच्या मनात उज्जयिनीला जाण्याचा विचार नव्हता. कारण तिथे त्याच्या विद्येचा आदर करणारा कोणीही नव्हता. वीणा वादनात जेव्हां तो निष्णात नव्हता. तेव्हां उज्जयिनीच्या रहिवाश्याना तो निपुण वाटत होता. तेव्हां कोणत्यातरी कारणाने काशी राज्यातल्या दरबारातील कलाकार व्हावं तेव्हांच त्याची प्रतिष्ठा होईल असे त्याला वाटले. आता बोधिसत्वाच्या बरोबरीने कला प्राप्त झाली आहे. बोधिसत्व म्हातारे होत आले आहेत. त्यामुळे काशीच्या दरबारात त्याचे स्थान आपल्याला मिळाले पाहिजे. असा विचार करून धनवंत बोधिसत्वाना म्हणाला—"मी उज्जयिनीला परत जाण्याचा विचार करीत नाही आपणाला माहितच आहे की आपल्या बरोबरीने मी ही कला प्राप्त केली आहे. तेव्हां आपणच मला राजदरबारातील वीणा वादकाची नोकरी देववावी."



दुसऱ्याच दिवशी बोधिसत्वाने राजाकडे ती गोष्ट सांगितली. राजाने विचार करून सांगितले—"धनवंत, आपल्याकडे पुष्कळ वर्षे शिष्य म्हणून राहिला आहे, त्याला दरबारातील एक विद्वान म्हणून ठेवून घेऊ. परंतु आपल्याला जो पगार मिळतो त्यातील अर्धा पगार त्याला दिला जाईल. जर ह्या निर्णयाला तो सहमत असेल तर त्याने राजदरबारातील ह्या पदाचा स्वीकार करावा."

बोधिसत्वाच्या तोंडून ते ऐकताच खूष न होता, धनवंतचे मन द्वेषाग्नीने भडकले. तो विचार करू लागला. मी गुणवंतपेक्षा कोणत्या गोष्टीत कमी आहे? मला त्याच्या








इतकाच पगार न देता अर्धा कां म्हणून देणार ?"

धनवंत राजाकडे गेला आणि म्हणाला– "महाराज, मी असे ऐकले की, आपण मला अर्ध्या पगारावर आपल्या दरबारा-रील जागेवर नेमत आहात. मी माझ्या गुरूच्यापेक्षा कोणत्याच विद्येत कच्चा नाही. तरी त्यांना जो पगार मिळतो तोच मला पण मिळाला पाहिजे."

राजा त्याच्या उत्तराने संतापला आणि म्हणाला–"मी तुला गुणवंतच्या शिष्याच्या रूपाने पहातो. त्याच्या तोडीचा म्हणून नाही. तेव्हां प्रत्यक्षात ते बघेन तेव्हांच कबूल करीन."

"आपणाला पाहिजे तर माझी परीक्षा घेऊन पहावी." धनवंत राजाला म्हणाला.

"ठीक! वेळ आल्यावर मी तुमच्या दोघांच्यामध्ये जुगूलबंदी ठेवतो. जर तुझे वादन गुरूच्या तोडीस तोड निघाले तर मी तुला त्यांच्या एवढा पगार देववीन. नाही तर तुला राजदरबारातून काढून टाकीन. तुला ह्या अटी मंजूर आहेत का? राजाने विचारले. धनवंतने त्या अटी मान्य केल्या.

त्यानंतर गुरु व शिष्य दोघांत अटि-तटीचा सामना सुरू झाला. ते दोघे एक दुसऱ्याला जिंकण्याच्या इर्षेने वीणा वाजवू लागले. त्यात बोधिसत्वाच्या वीणेची एक तार तुटली. परंतु ते इतर तारांच्या सहाय्याने वीणा वाजवू लागले. ते पाहून धनवंतने आपल्या वीणेची एक तार जाणून बुजून तोडली. बोधिसत्वाच्या वीणेची आणखी एक तार तुटली तेव्हां धनवंतने आपल्या वीणेची एक तार तोडली. असे होत होत बोधिसत्वानी वीणेच्या सर्व तारा तोडल्या. परंतु बोधिसत्वानी आपल्य मोडक्या वीणेवर गायला सुरवात केली. धनवंतला ते जमले नाही. दरबारी लोकांनी आनंदाने टाळ्या वाजवल्या.

धनवंतला तो अपमान सहून झाला नाही तत्क्षण तो दरबारातून बाहेर पडून निघून गेला व त्याच दिवशी तो उज्जयिनीला परत निघाला.




Fullscreen

127









# सुलताना रजिया

तुर्कस्थानातील डोंगराळ प्रदेशात एके ठिकाणी नऊ तरुण युवक खेळत होते. त्यातील एक मुलगा खूप लहान होता. त्याच वेळेला एक व्यापाऱ्यांचा तांडा तेथून जात होता. बाकीच्या मुलांनी त्यातील लहान मुलाला व्यापारी लोकांच्यातील एका व्यापाऱ्याला गुलाम म्हणून विकून टाकले.



थोड्या दिवसांनंतर त्या मुलावर दया येऊन एका माणसाने त्याला विकत घेतले. तो दुसरा तिसरा कोणी नसून घोरी मुहम्मदचा खास गुलाम होता. घोरीच्या मृत्यूनंतर तो गुलाम दिल्लीच्या गादीवर बसला. व तो कुतुबुद्दीन ऐबकच्या नावाने इतिहासात प्रसिद्ध झाला.






अशा तऱ्हेने दोन वेळेला गुलामाच्या रूपाने विकलेल्या मुलाचे नाव अल्तमश होते. लोक त्याला गुलामांचा गुलाम म्हणूनच हाका मारायचे. एकदा त्याने आपल्या मालकाला मारेकऱ्यांपासून वाचविले. त्यामुळे ऐबकच्या मनात अल्तमश विषयी प्रेम निर्माण झाले. काही वर्षांनंतर अल्तमशने ऐबकच्या मुलीशीच लग्न केले.



ऐबकच्या मृत्यूनंतर सर्व राज्यभर अराजकता पसरली. अल्तमशने गादी बळकावली. तेव्हां त्याच्याशी सामना करण्यासाठी गजनीचा राजा ताजुद्दीन आला. त्याला आपल्या सर्व बळानिशी त्याने हरविले व इतर सर्व द्रोह्यांना हारवून त्याने गादीवरचे आपले स्थान बळकट केले.

इ. सन. १२३२ च्या जवळपास अल्तमशने दिल्लीतील कुतुबमीनारचे काम पूर्ण केले. जगातील सर्व लोकांना आश्चर्यचकित करून सोडणारा असा तो एक उंच मनोरा आहे. असे समजले जाते की इस्लाम धर्मीय धर्मगुरु ख्वाजा कुतुबुद्दीन ह्याच्या थडग्यावर हा उंच मनोरा बांधला आहे.





अल्तमशने आपले मरण जवळ आल्याचे समजून सर्वांना आश्चर्यचकित करून सोडणारी एक गोष्ट केली. ती म्हणजे आपल्या मुलाच्या ऐवजी आपली मुलगी रजिया हिला राणी केले. कारण त्याच्या दृष्टीने त्याचे सर्व मुलगे गादीवर बसण्याला लायकीचे नव्हते. रजिया ही हुशार, शूर व बुद्धिमान होती. राज्यकारभार नीटपणे

परंतु अल्तमशचा ह्या निर्णय राज्यातील तेव्हांच्या लोकांना पसंत पडणारा नव्हता. कारण श्रीमंत लोक व इतर प्रमुख लोक एक बाई आपली अधिकारी हे मानायला कोणत्याही परिस्थितीत तयार नव्हते. त्यामुळे तिचा पिता मरण पावताच सर्वांनी मिळून रजियाला गादीवरून काढून टाकले.





त्या सर्वांची दृष्टी रजियाचा सावत्र भाऊ रुकउद्दीन ह्याच्यावर होती. त्यांनी त्याला दिल्लीच्या गादीवर बसविले तो एक मूर्ख व चैनी बडबड्या होता. राजा बनण्याच्या उत्साहात त्याने एका हत्तीवर बसून राज्यातील गल्लोगल्ली हिंडून सर्व जनतेला मूठ मूठ सोने चांदी वगैरे वाटून टाकले.

रुकउद्दीनची आई शातुर्कान अल्त-मशच्या बायकांपैकी एक होती. ती खूप दुष्ट होती. तिचा मुलगा विलासात गुंग होता ते पाहून सर्व राज्याचा कारभार गुपचुप आपल्या हाती घेतला. अल्तमशच्या बायकांपैकी काहींना ठार केले काहींना कैदेत घातले.





राजवंशात शातुर्कानच्या एका सवतीचा मुलगा खूप हुशार आणि शूर होता. त्याचे डोळे फोडून शातुर्कानने त्याला ठार मारले. त्यानंतर रजियाला ठार मारण्याचे बेत आंखले. हे सर्व समजून सुद्धा रजियाला कळेना की, आता ह्यावर काय उपाययोजना करावी.

शातुर्कान व रुकउद्दीनच्या अत्याचार व छळाला सर्व जनता त्रस्त झाली. सर्वांच्यांत एकच गोंधळ उडाला. त्यांना शांत करणारे सरदार सुद्धा जनतेच्या संतापाला घाबरून गप्प बसले. मग काय करणार! सर्वांनी मिळून शातुर्कानला कैद केले व तिच्या मुलाला गादीवरून खाली उतरविले. नंतर त्याला ठार मारले.





त्या परिस्थितीत जनतेला संतुष्ट करणारी रजिया शिवाय दुसरी कोणी प्रजेत नव्हती. सर्व जनता रजियाचा पिता अल्तमश विषयी जाणून होती. त्यामुळे सर्व जनतेने रजियाला गादीवर बसण्यास सांगितले. मग इतर सरदारांना सुद्धा रजियाला राणी म्हणणे मान्य करावे लागले. अशा तऱ्हेने रजिया सुल्ताना दिल्ली राज्याची राणी बनली



# यशस्वी शिडी

ताम्रपर्णि नावाचे शहर हे एक बंदरही होतें. तेथे रामदास नावाचा एक व्यापारी रहात होता. ईमानदारीने व्यापार करून त्याने धंद्यात लाखों रुपये मिळवले होते. त्याला अजय व विजय नावाचे दोघे मुलगे होते. ते जेव्हां मोठे झाले तेव्हां रामदासला समुद्रपार व्यापार करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्याच शहरातील काही व्यापारी लोक पूर्वेकडील भागात आपल्या जहाजात माल भरून नेऊन तो विकून बराच पैसा घेऊन परत आले होते.

समुद्रात बोटीतून माल नेऊन विकणे म्हणजे साधी गोष्ट नव्हती. रामदासने आपल्या दोघा मुलापैकी एकाला दर्या-पारच्या व्यापार धंद्यात काम करण्यास सांगितले. परंतु नवीन प्रदेश हिंडून पहाण्या-च्या आकांक्षेमुळे दोन्ही मुलांच्यात भांडण सुरू झाले. रामदासला कळेनासे झाले की, आता ही समस्या कशा तऱ्हेने सोडवावी. एके दिवशी रामदासने आपल्या दोघा मुलांना बोलावले व म्हणाला–"मुलांनों! समुद्रपार जायला अजून बरेच दिवस आहेत. मी तुम्हांला मागेच सांगितलें होते की जंगलाच्या वाटेवर जे देऊळ आहे त्याच्या जवळच एक घर बांधायचें आहे. त्या घराचे बांधकाम तुमच्या दोघांपैकी जो नीट काळजीपूर्वक करील त्याला मी समुद्रपार व्यापार करण्यास पाठवीन."

चिट्ठी टाकून बघितल्यावर त्याची जबाबदारी अजयवर येऊन पडली. अजय जंगलात येऊन पोहोचला. लवकरच विटा चुना व गवंडी यांची योजना झाली. त्याच परिसरातील काटे कुटे व झाडे-झुडपे कापण्या-साठी व नदीतून पाणी आणण्यासाठी मजूराची जरूर भासू लागली. जवळच्याच भिल्ल वस्तीतून मजुरांना आणण्याची



अजयने खूप प्रयत्न केला. परंतु भिल्लांनी येण्यास नकार दिला.

अजय निराश होऊन आपल्या राहुटीत परत आला. त्याला चिंताग्रस्त पाहून कुशा नावाचा एक भिल्ल त्याच्याजवळ येऊन म्हणाला—"मालक, आपल्याला काय मजूरांची गरज आहे? मी भिल्ल वस्तीतून आपल्याला मजूर आणून देतो."

अजयने आश्चर्यचकित होऊन विचारले—"काय! तू शंभर मजुरांना बोलावून आणू शकतोस कां?" कुशा "हो" म्हणून म्हणाला—"मालक, मला दर महिना शंभर रुपये पगार दिला पाहिजे. आपल्याला मंजूर आहे का?"

अजयने ते मान्य केल्यावर कुशा भिल्लाच्या वस्तीतून मजुराना बोलावून घेऊन आला. घर बांधण्याचे काम सुरू झाले.

एके दिवशी रामदास घर बांधकाम कोठवर आले, हे पहाण्याकरिता तेथे आला. त्याच वेळेला कुशा एका झाडाच्या सावलीत उभा राहून कोणाबरोबर तरी बोलत होता. रामदासने आपल्या मुलाकरवी त्याची माहिती काढून घेतली की, त्याला महिन्याला पगार किती देतोस वगैरे वगैरे, तेव्हां त्याला सर्व कळले. झाडाच्या सावलीत गप्पा छाटणाऱ्या माणसाला इतका पगार देतोस? त्याला दरमहिन्याला दहा रुपये देत जा. त्यापेक्षा जास्त देत जाऊ नकोस." रामदास मुलाला म्हणाला.

त्याच दिवशी संध्याकाळी वडील जाताच अजयने कुशाला बोलावले व म्हणाला—"ऐक, आजपासून तुला दरमहा फक्त दहा रुपयेच वेतन मिळेल. असा माझ्या वडिलांचा आदेश आहे."

दुसऱ्या दिवशी एकसुद्धा मजूर कामाला आला नाही. अजयने स्वतः जाऊन बोलावले. परंतु सर्वांनी येण्यास नकार दिला. घर बांधणाऱ्या गवंड्याने सांगितले की, पावसाचे दिवस जवळ आले आहेत त्याच्या आत घर बांधणे पूर्ण झाले नाही तर तुमचेच पुष्कळ नुकसान होईल. त्यावर अजय परत भिल्ल वस्तीत गेला. पूर्वी प्रमाणेच कुशाला पगार देण्याचे त्याने कबूल केले. मग परत दुसऱ्याच दिवशी सारे मजूर कामावर हजर झाले.

ह्या घटनेनंतर दोन आठवड्यांनी पुन्हां रामदास घर बांधकाम कोठवर आले हे पाहण्याकरिता आला. अजयने झालेली सर्व हकीकत आपल्या वडिलांना सांगितली. रामदास म्हणाला—"अशा तऱ्हेने मजूरी जास्त देत गेलास तर घर बांधण्याचा खर्च दुप्पट होत जाईल अशा परिस्थितीत तुझी किंमत कांय राहिली?"

त्यानंतर अजयने पुन्हां एकदा कुशाला बोलावणे धाडले व सांगितले, तुला दहा रुपयांहून अधिक वेतन मिळणार नाही.

दुसऱ्या दिवसांपासून परत मजूरवर्ग कामावर आला नाही गवंड्यांनी तगादा लावायला सुरवात केली. त्याने घरी येऊन सर्व गोष्ट आपल्या वडिलांना सांगितली त्याला बांधकाम जमणार नाही असे पण सांगितले. त्यानंतर रामदासने ते काम आपला धाकटा मुलगा विजय याच्यावर टाकले.

विजयने कुशाला बोलावून स्पष्ट सांगितले—"तुला दर महिना दहा रुपयांच्यापेक्षा जास्त मजुरी मिळणार नाही. हा माझ्या वडिलांचा निरोप आहे. आता राहिले माझे काम, तुझ्यावर जबाबदारी म्हणजे मजुरांची देखरेख करण्याच्या कामी मी तुला त्याचे वेगळे असे दिवसाचे तीन रुपये देईन. सर्व कामगार लोकांना बोलावून



घेऊन ये नाहीतर उद्या शहरात जाऊन मजूर कामगारांना बोलावून घेऊन येतो.

कुशा एक दोन मिनिटे विचार करीत राहिला. नंतर हसत म्हणाला–"मालक, बरं आहे, तसेच करावे आमच्यावर कृपा असू द्या."

जेव्हां घराचे काम पूर्ण होत आले तेव्हां रामदास पुन्हां घराची पहाणी करण्या करिता तेथे आला. त्याला ठाऊक होते कीं, आपला धाकटा मुलगा विजय कुशाला दहा रुपये महिना पगार देत आहे, तेव्हां आनंदाने त्याने मुलाला विचारले–"मुला, तुझा मोठा भाऊ जे काम करू शकला नाही ते काम तू साध्य करून दाखविलेस. तू ते काम कसे साध्य केलेस हे मी विचारीत नाही. ज्या गावची भाषा आपण समजू शकत नाही त्या गावाबरोबर व्यापार करणे म्हणजे साधी गोष्ट नाही. कठीण काम आहे. परंतु तू ते व्यवस्थित पार पाडून दाखवलेस. ह्यामुळे मी तुला समुद्रपार व्यापारा करिता पाठविण्याचे मनात योजले आहे...!"

ही बातमी कळताच अजयला आश्चर्यच वाटले तो आपल्या धाकट्या भावाकडे आला व त्याला म्हणाला–"भाऊ, तू कुशाला दर महिना दहा रुपयांवर कसे मान्य करविलेस?"

"दादा, काही तरी करून असेच व्यवहार करावे लागतात. ह्या कानाची गोष्ट त्या कानाला कळता उपयोगी नाही. साप मारावा पण काठी तुटता कामा नये! मी कुशाला दरमहा दहा रुपये महिना पगार ठरविला. परंतु वेगळे दिवसाचे तीन रुपये त्याला भत्ता ठरवून टाकला. वडील काही पैसे मला पॉकेट मनी म्हणून खर्चाला देत होते. त्यामुळे ही कठिण समस्या साधेपणाने सोडवली गेली." विजयने त्याला सांगितले.

ही साधीशी गोष्ट पण माझ्या डोक्यात आली नाही! अशा परिस्थितीत मी समुद्रपार व्यापार कसा करणार? तूच ह्या कामाला लायक आहेस." असे म्हणत अजयने आपल्या धाकट्या भावाची पाठ थोपटली.



# ज्ञानोदय ?

व्यंकटेशचे, मामाची मुलगी पद्मावतीशी लग्न ठरले. आईवडिलांनी मारून मुटकून त्याच्याकडून या लग्नासाठी होकार घेतला. परंतु त्याची मित्रमंडळी व नातेवाईक म्हणू लागले–"अहो त्या पद्माला काही रूप रंग? आणि वर तो भांडकुदळ! अशा मुलीशी व्यंकटेश लग्नाला तयार झाला तो मामाची इस्टेट पाहूनच की नाही!"

वास्तविक व्यंकटेशला पद्माशी लग्न करायचेच नव्हते. स्नेही मंडळींच्या या बोलण्याने तो पिसाळल्यासारखा झाला आणि तेथून पळून एक मैलावरच्या सदानंद स्वामींच्या आश्रमात जाऊन त्यांच्या शिष्यांबरोबर राहू लागला.

जेमतेम सहा महिने लोटले असतील, व्यंकटेशला आश्रमातले नियम व तेथील खाण्यापिण्याचा इतका वीट आला की तो आश्रमातून पळून घरी आला आणि पद्मावतीशी लग्नाला तयार असल्याचे त्याने आईवडिलांना सांगितले. एका आठवड्याच्या आत लग्नकार्य उरकले व व्यंकटेश पद्मावतीचा संसार सुरू झाला. त्याची मित्र मंडळी त्याची थट्टा करीत म्हणू लागली–"संसार करणे जमणार नाही म्हणून वैराग्य आल्याने साधूसंन्यासी होणारे अनेक जण पाहिले बुवा, परंतु तुझ्या सारखा निराळ्या तऱ्हेने वागणारा कोणी कधी पाहिला नाही!"

व्यंकटेश हसून त्यांचे उत्तर देत म्हणे–"त्यात आश्चर्य करण्यासारखं काय आहे? सहा महिने साधूसंन्याशांबरोबर काढल्यावर पद्मावती बरोबर संसार करण्यात स्वर्ग तुल्य सुख आहे हे कळले!"





# प्राणदाते

मध्याह्नाच्या सुमारास सागर घरून निघाला तो अलीबागच्या सरहद्दीवर पोचला. तोपर्यंत मध्यरात्र उलटून गेली होती. त्यावेळी थंडगार वारा सुटला होता. गावात सर्वत्र काळोख होता. त्याने गावात पाऊल टाकले त्यावेळी रस्त्यावर कोणी माणूस दिसत नव्हता. कोठे डोके टेकायला थोडी जागा मिळते का पहात सागर पुढे चालत होता. तेव्हां त्याला एका कवलारू घरात दिवा जळत असलेला दिसला.

सागर त्या घराच्या दिशेने निघाला उंबरठ्यात एक मुलगी उभी असलेली सागरला दिसली. त्या मध्यरात्रीच्या वेळी ती अशी कां उभी? हे त्याला थोडे आश्चर्यच वाटले. तरी बरं झालं विचारून तर पाहू या. असा विचार करून तो थोडा पुढे गेला व त्याने विचारलं–"मी परगावाहून एक वाटसरू आलेलो आहे. रात्रभर ओसरीत पडून राहू याल का जरा डोके टेकायला?"

त्या मुलीने लगेच काही उत्तर दिले नाही व सागरकडे जास्त लक्षपूर्वक पाहिले. तिच्या मनांत काही तरी संशय भीती असावी असे सागरला वाटले.

परंतु आश्चर्य, तिनेच विचारले–"मला तुम्ही थोडी मदत करू शकाल का?"

तो प्रश्न ऐकून सागर आश्चर्यचकित झालेला पाहून ती म्हणाली–"आज पहाटे माझे बाबा जंगलात गेले ते अद्याप परतले नाहीत. मला भीती वाटते आहे. त्यांना शोधायला जंगलात माझ्याबरोबर याल का?" तिने आपले दु:ख कसेबसे आवरीत विचारले.

सागरला तिची कीव आली. तो सकाळपासून चालत होता. म्हणून खूप दमला होता. तरी म्हणाला–"हो, येईन की! अवश्य येईन! चला!"

तिने चटदिशी दाराला कुलूप लावले आणि कंदील घेऊन निघाली. वाटेत तिने सागरला आपल्या विषयी सर्व थोडक्यात सांगितले.

तिचे नाव मंगल होते. वडिलांशिवाय तिला कोणी नातेवाईक नव्हते. वडील पूर्वी जंगलातून लाकडे तोडून आणीत असत. परंतु वय वाढल्यामुळे त्यांना ते काम झेपत नाहीसे झाले व काही दिवसांपासून जंगलातून रीठे किंवा असंच काही गोळा करून आणून गावात विकत असत. सामान्यपणे पहाटेच जंगलात निघून जात व संध्याकाळी घरी परत येत. आजच मध्यरात्र झाली तरी परतले नाहीत, म्हणून काळजी वाटू लागली.

नंतर ती म्हणाली–"मदतीला धावणारे शेजार पाजारचे भाग्यवानालाच मिळतात! किती विनवण्या केल्या, परंतु कोणी या मध्यरात्रीच्या वेळी थंडीत जंगलात यायला तयारच होईना."

ती तशी तीनचारदां वडिलांबरोबर जंगलात जाऊन आली होती. ते जंगलात कोठे फिरतात हे तिला माहीत होते. त्या बाजूला जाऊन तिने तीन चारदां मोठ्याने हांका मारल्या–"बाबा, अहो बाबा!"



मंगलच्या वडिलांचे नाव धोंडिबा होते. ते कळल्यावर सागरने सुद्धा दोनतीनदां हांका मारून पाहिल्या. त्या आवाजामुळे झाडावरच्या पक्ष्यांचा कलकलाट तेवढा ऐकू आला, धोंडिबाचा आवाज मुळीच ऐकू आला नाही. दोघे जंगलात पुष्कळ फिरले व शेवटी निराश होऊन उजाडण्याच्या सुमारास घरी परतले.

मंगलला दु:खावेग आवरला नाही व ती रडू लागली. सागर तिला धीर देत म्हणाला–"तुमचे बाबा कामानिमित्त तेथून आणखी कोठेतरी गेले असतील. येतील परत, घाबरू नकोस! संध्याकाळपर्यंत वाट पाहू!"



सायंकाळ होत आली तेव्हां सुमारे पन्नास वर्षे वयाचा एक माणूस येऊन मंगलला हाक मारू लागला. तो जंगलातली लाकडे तोडून त्याची मोळी गावात विकणारा सोमू होता. तो रीठ्यांनी अर्धेमुर्धे भरलेले एक पोते घेऊन आला होता. ते तो मंगलला देत म्हणाला–"हे जंगलात मिळाले. तेथून काही अंतरावर या वहाणा सापडल्या. ह्या तुझ्या बाबांच्याच की नाही ग? मला आहे थोडी आशा, समज. तरीत्या भागातून व्यंकयाला वाघ नव्हता का उचलून घेऊन गेला मागे?" असे म्हणत निघून गेला.

ते ऐकून मंगलला घेरी आली व ती तत्क्षण जमिनीवर पडली. सागरने पाणी आणून तिच्या तोंडावर शिपडले व तिचा औषधोपचार करीत तेथेच बसून राहिला. प्रहर रात्र उलटून गेल्यावर त्याचा डोळा लागला त्यावेळी बाहेर दारासमोर काहीतरी आवाज झाला आणि त्याची झोप मोडली. खाटेवर मंगल नव्हती. सागर घाईघाईने बाहेर गेला मंगलचे केस पिंजारलेले होते व ती विहिरीकडे धावत जात होती.

सागरने धावत पुढे जाऊन तिचा हात धरला, "हे काय करते आहेस, चल घरात पाहू!" तो रागाने ओरडून म्हणाला.

"जगून काय करू? आहे कोण आता उद्याच्याकडे पाहून जगू?" असे म्हणत मंगल जोराने रडू लागली.

सागर तिचे सांत्वन करीत म्हणाला– "मी आहे ना! मी आईवडिलांना सांगून तुझ्याशी लग्न करतो, झाले!"

मंगल घरात आली व पुन्हां पहिल्यासारखी खाटेवर येऊन पडली. उजाडण्याच्या सुमारास बैलाची एक गाडी येऊन उभी राहिली. मंगलने धावत जाऊन दार उघडले, तर गाडीतून उतरत असलेल्या वडिलांना पाहून अनावर आश्चर्य व आनंद झाला असल्याने ती मोठ्याने ओरडली– "बाबा!" धोंडिबा अगदी थकलेला होता. त्याला आधार देऊन एक तरुण त्याला घरात घेऊन आला. खांद्यावरच्या उपरण्याने डोळे पुशीत धोंडिबाने घडलेले सर्व वृत्त सांगितले. म्हणाला.

"मी गळून पडलेले बरेचसे रीठे गोळा करीत होतो, तेव्हां एका फांदीला खूप रीठे लागलेले दिसले. झाडावर चढून ते सर्व सहज काढता येतील असे समजून घाईघाईने झाडाजवळ गेलो आणि झाडाच्या बुंधांत एका वारुळावर पाय पडला. त्या सरशी एक साप भुस्स करून वारुळातून बाहेर आला व चावला व सरपटत निघून गेला.

"मी सापाला पाहिले होते. मी तेथल्या तेथे जमिनीवर आदळलो.

"त्यानंतर काय झालं ते धोंडिबांना माहीत नाही, मी सांगतो!" असे म्हणत धोंडिबाला घेऊन येणारा तरुण पुढे सांगू लागला.

"माझे नाव राजाराम. लहानपणीच माझे आई व बाबा वारले. मी एक पोरका आहे. आमच्या गावात कोणी माझी विचारपूस करणाराही नाही. परवां आमच्या गावात ग्रामदेवतेची जत्रा होती. माणसांची व गुराढोरांची गर्दीच गर्दी होती. मी ती सर्व पाहून घाबरूनच गेलो आणि जंगलात पळून गेलो. तेथे तुमचे बाबा एका झाडाखाली पडलेले होते व त्यांच्या तोंडातून फेस येत होता. त्यांना साप चावला असावा असे वाटून मी त्यांना खांद्यावर उचलून घेऊन शेजारच्या गावातल्या वैद्याकडे घेऊन गेलो. सुदैवाने वैद्यबुवा घरात होते व त्यांनी दिलेले औषध लागू पडले व तुमचे बाबा आज परत तुम्हांला भेटले."





"तुमचे हे उपकार जन्मोजन्मी मी विसरणार नाही. तुम्ही माझ्या बाबांना वांचविलेत. हे माझे प्राणदाते!" असे म्हणत मंगलने सागरचा परिचय दोघांना करून दिला व घडलेले वृत्त सांगितले.

बापाला व मुलीला वांचविणारे राजाराम व सागर दोघेही परस्परांचे आप्तमित्र झाले. दोघे त्या दिवशी संध्याकाळी नदी काठी फिरायला गेले असतां धोंडिबा मुलीला म्हणाला–"आजपासून राजाराम हा पोरका राहिला नाही. आपल्याबरोबरच राहील. मी तुम्हां दोघांचं लग्न करून देणार आहे!"

मंगल दचकून म्हणाली–"सागर माझ्याशी लग्न करीन म्हणाला होता, बाबा!"

धोंडिबा म्हणाला–"राजारामाने माझा जीव वांचविला, नाही का? त्याच्याशीच तुझे लग्न करून देतो, तू आमच्या बरोबरच रहा, असे सांगून त्याला मी आपल्याबरोबर घेऊन आलो आहे!"

"तर मग सागर माझा प्राणदाता नाही का, बाबा?" मंगलने विचारले.

धोंडिबा काही वेळ विचारात पडल्यावर म्हणाला–"तर मग मी सर्व तुझ्यावरच सोडून देतो. तुझं लग्न कोणाशीही झालं तरी ते मला मान्य!"

मंगलला हे कोडे कसे सोडवायचे, कळेना ती दर शुक्रवारी देवीच्या देवळात जात असे. वडील सुखरूप घरी परत आले, म्हणून त्या दिवशी शुक्रवार नव्हता तरी तिने देवळात जायचे ठरविले.

देवीचा पुजारी नित्य नियमितपणे देवीच्या दर्शनाला येणाऱ्या मंगलला पहात होता. म्हणून तो तिला स्वतःच्या मुलीसारखा मानीत असे. तिने देवीच्या पाया पडून देवीचे आभार मानल्यावर पुजारी होता तेथे जाऊन सर्व गोष्टी सविस्तर पुजाऱ्याला सांगितल्या.

पुजारी ते सर्व ऐकून म्हणाला–"मुली, ही सर्व तुझ्या भावी जीवनाशी संबंध असलेली बाब आहे. म्हणून तूच आपल्या पुढील आयुष्यासंबंधी काय ते ठरवायचे आहे!"

"मी ठरवायचे आहे हे खरे! परंतु ते बरोबर आहे की नाही, हे तुम्ही सांगितले पाहिजे! तुम्ही मला गुरुतुल्य आहा! म्हणून तुमच्या कडे आले. राजारामाने माझ्या बाबांना वांचविले, सागरने मला वांचविले. यांपैकी कोणाशीही लग्नाला मी तयार आहे पुष्कळ विचार केल्यावर मी राजारामाशी लग्न करायचे ठरविले आहे!" मंगल म्हणाली.

"म्हणजे, तुला तुझ्या जिवापेक्षा तुझ्या बाबांचे प्राण जास्त मोलाचे वाटतात, असेच ना?" पुजाऱ्याने विचारले.

"मी कोणाचा जीव किती मोलाचा याची तुलना करीत नाही. आम्ही त्या दोघांचे जन्मोजन्मी ऋणीच राहू. मला माझे बाबा नाहीत असे कळल्याबरोबर जगाचा वीट आला. माझं मन सुन्न झालं म्हणून, लहानपणापासून कोणाचे प्रेम न मिळाले असल्याने राजारामाने किती दुःखात आयुष्य काढले असेल याची मला कल्पना आहे. शिवाय माझ्या बाबांनी त्याला म्हटले की तू माझ्या मुलीशी लग्न करून घेऊन आमच्या बरोबरच रहा. असा बाबांनी राजारामाला आग्रह केला होता. सागरने मला कष्टदशेत पाहून माझ्यावर दया येऊन माझ्याशी तो लग्न करायला तयार असल्याचे सांगितले होते. मी मात्र, मी त्याच्याशी लग्न करीन असे वचन दिले नव्हते. म्हणून राजा रामाशी लग्न करणेच योग्य होईल असे मला वाटते." मंगल म्हणाली.

पुजारी मान डोलवीत स्मित करून गप्प राहिला.

मंगल घरी आली व ती आपला निर्णय वडिलांना सांगणार, इतक्यात राजाराम व सागर नदीवरून परतले. सर्व ऐकल्यावर मंदहास्य करीत सागर म्हणाला–"मंगल, तुझा निर्णय अगदी बरोबर आहे! राजारामासारखे भाग्यवान फार थोडे असतील."

धोंडिबा आणि राजाराम दोघांना मंगलच्या निर्णयापेक्षा सागर जे म्हणाला ते ऐकून जास्त आनंद झाला.



# विनायकाची चतुराई

विनायकाच्या घरची कौलिष्टके झाडण्यासाठी शिडीवर चढलेल्या मुलाने घसरून पडून पाय मोडून घेतला. तरी तो शिडी खांद्यावर घेऊन लंगडत गावाच्या पाटलाकडे गेला व त्याने फिर्याद केली की विनायकाने दिलेल्या फुसक्या शिडीवरून घसरून पडल्याने त्याचा पाय मोडला. पायाच्या औषधपाण्याच्या खर्चासाठी व नुकसान भरपाई म्हणून विनायकाकडून पैसे देववावे.

पोलीस पाटलाने विनायकाला बोलावून जाब विचारला.

विनायक किंचितही न घाबरतां म्हणाला–"हा मुलगा निष्काळजीपणामुळे खाली घसरून पडला. शिडी चांगली धक्कम होती. असे सांगून त्याने शेजारच्या झाडाला टेकून शिडी उभी करून तिच्या वर धाईधाईने चढूनही दाखविले. परंतु विनायक थोडा स्थूलकाय कारणाने शिडी मोडली.

"आतां बोल, तुझं काय म्हणणं आहे ?" पोलीस पाटलाने विनायकाला विचारले.

"माझ्या सारखा लठ्ठ माणूस चढला म्हणून शिडी मोडली ! हा मुलगा चढल्याने मोडली नाही ! अशा परिस्थितीत ही फुसकट शिडी कशी होणार हो ? दोष मुलाचाच होता !" विनायक म्हणाला.

पोलीस पाटलाने नुकसान भरपाई देण्याची गरज नाही असे सांगून त्या मुलाला त्याचाच दोष असल्याचे सांगून घरी पाठविले.





# गणेश पुराण

वातापि गणपतीच्या मूर्तीत कोरलेल्या निरनिराळ्या देवतांचं गायन ऐकून अगस्त्य त्यात तन्मय झाले व म्हणाले–"हे वातापि गणपती ! तूच स्वतःच्या मूर्तीतले शिल्प कोरून काढलंस ! इतकं सुंदर शिल्प आणखी कोणाला साध्य होईल ?"

तेव्हां मूर्तीतून गणनायक म्हणाला–"अगस्त्य महर्षी ! मी स्वतःसाठी हे शिल्प-कलेचे काम केले नाही. तुझ्या मनाचं समाधान व्हावं, तुझी इच्छा पूर्ण व्हावी या साठी केलं. यात जे कलाकौशल्य आहे हे काही काळच राहील. त्यानंतर ते अदृश्य होईल. द्वापर युगात धर्मराज युधिष्ठिर अश्वमेध यज्ञ करील त्या वेळी याच जागी आणखी एका विशाल मूर्तीची स्थापना होईल." असे सांगून धौम्य ऋषी अर्जुनाला म्हणाले–"अर्जुना ! तेच हे शिल्प आपण आज पहात आहो !" असे सांगून धौम्य ऋषी थांबले.

अर्जुनाने त्या मूर्तीला प्रदक्षिणा घातल्या व श्रद्धा व भक्तिपूर्वक ती मूर्त लक्ष देऊन पाहिली. ते महा शिल्प गणेशाचेच होते. त्या गणनायकाच्या बरोबरच ब्रह्मदेव, विष्णू व महेश या त्रिमूर्ती, जगदंबा, लक्ष्मी, पार्वती व सरस्वती आणि नवग्रहांपासून इतर सर्व देवीदेवता कोरलेल्या होत्या. गणेश मूर्तीच्या दोन्ही पायांजवळ विघ्न बांधलेले होते. मूषकराजाची शेपटी मूर्तीच्या चारी बाजूला वलयासारखी होती. त्या गणेशाची शोभा पाहून तिचे आकलन











करण्यास सहस्रावधी डोळेसुद्धा अपुरे पडतील असे वाटत होते. सर्व बाजूंनी पाहून झाल्यावर अर्जुन धौम्य ऋषींना म्हणाला– "मुनीश्वरा! अशा सुंदर गणेश मूर्तीच्या चारी बाजूला एक मोठे नगर वसले आणि त्याची भरभराट झाली. मग अशी दशा आतां कां व्हावी? वातापि नगराची गाथा ऐकावी, असे कुतूहल मनात आहे!"

धौम्य मुनी वातापि नगराची कथा सांगू लागले :

अगस्त्य ऋषींनी लोपामुद्रेच्या इच्छे-प्रमाणे काही एक वांचविण्याचा विचार मनात आणू न देतां जवळ असलेले सर्व धन वांटून टाकले आणि एक लोकसत्ताक राज्याची स्थापना केली. नंतर नागरिक कर्त्तव्यकर्माचे पालन करीत रहा असे नागरिकांना सांगून अंगावरच्या वस्त्रानिशी ते लोपामुद्रेला बरोबर घेऊन आपल्या आश्रमात परतले.

गणनायकाचे कलाकौशल्य हे प्रजेला प्रेरणा देत राहिले. त्या मूर्तीची श्रद्धा भक्तिपूर्वक आराधना करीत प्रजा चिरकाल त्या नगरात सुखासमाधानाने राहिली. कित्येक पिढ्या अशा परिस्थितीत राहिल्या. वातापि नगर हे आदर्श राज्य म्हणून जवळपासच्या राज्यांना मार्गदर्शन करीत राहिले व देशभर या शहराला प्रसिद्धी मिळाली.

अगस्त्य मुनी आपला वध करतील या भीतीने इल्वल विन्ध्य पर्वतात पळून गेला होता आणि कोणाला कळणार नाही किंवा संशयही येणार नाही अशा कानाकोपऱ्या-तल्या जागी स्वतःचा जीव मुठीत घेऊन रहात होता. त्याने वातापि नगराची भर-भराट झाल्याचे ऐकले व तेथे अगस्त्य ऋषी रहात नाही या गोष्टीची खात्री करून घेतल्यावर पुन्हा आपला धंदा सुरू करावयाचे ठरवून परमार्थ साधणाऱ्या साधुपुरुषाचे सोंग करून वातापि नगरात येऊन राहू लागला. त्यावेळची नगरातील परिस्थिति इल्वलला अनुकूल अशीच होती.

हळू हळू काल लोटत गेला तस तशी वातापि नगरातील प्रजेच्या मनात स्वार्थबुद्धी उत्पन्न होऊन वाढू लागली. प्रजेचे परस्परा-मधील मतभेद वाढत गेले. स्वार्थी व हुषार नागरिक भोळ्याभावड्या प्रजेला फसवून लुबाडू लागले.

अशा तऱ्हेने वातापि नगर पतनावस्थे-कडे झपाट्याने जाऊ लागले. इल्वलच एक प्रजेचा नेता म्हणून वावरू लागला. इंद्रजाल करून तो एक महापुरुष असल्या-सारखा वागू लागला व प्रजेच्या मनावर त्याचा ताबा कायम झाला.



नगराच्या मध्यभागी गणपतीची सुंदर मूर्त असेपर्यंत व अगस्त्य मुनींनी घालून दिलेल्या कर्त्तव्यबुद्धीचा प्रजेच्या मनावर पगडा असेपर्यंत प्रजा अगस्त्याने घालून दिलेले नीतिधर्माचे नियम मोडणार नाही, हे इल्वलने ओळखले. म्हणून त्याने तांत्रिक विद्या व मद्यपान आदि गोष्टींची चटक प्रजेला लावली. लोकसत्ताक राज्याला आवश्यक अशा नीतिनियमांचे फलक अगस्त्य ऋषींनी जागोजागी लावले होते. ते इल्वलने काढून टाकले व नवे नियम घालून दिले. चोरी, लबाडी इत्यादीत मिळणारा आनंद प्रजेच्या मनांत उत्पन्न होईल या दृष्टीने करावयाचे ते सर्व त्याने केले. शांतपणे एका जागी बसून राहणे मनुष्य लक्षण नसल्याचे प्रजेच्या मनावर बिंबविले. सुखप्राप्ती, भोगविलास व चैन हे मानव जीवनाचे ध्येय असल्याचे मनावर कोरले जाऊ लागले. नंतर काही राक्षस वेष पालटून गावात येऊन राहू लागले व इल्वलला मदत करू लागले. प्रजासेवकाचे सोंग घेऊन प्रजेचा पुढारी म्हणून इल्वल प्रसिद्ध झाला. प्रजेची आपसात भांडणे व मारामाऱ्या सुरू झाल्या. वातापि नगरात यादवीच माजली. नीतिवान व निरुपद्रवी प्रजा वातापि नगर सोडून जाऊ लागली.

इल्वल वातापि नगराच्या मध्यभागी गणपतीची मूर्त होती ती जमिनदोस्त करण्याच्या प्रयत्नाला लागला. त्याने शतघ्नी



चारी बाजूला गणपतीच्या रोखाने उभ्या केल्या. शिल्पाच्या खाली बुडाजवळ स्फोट होणारा दारुगोळा घातला. फक्त अग्नी लावायचा उरला होता. अशा वेळी अनपेक्षितपणे घडले ते असे. ठिणगी न लागतांच असा बार उडाला की त्याच्या धक्क्याने शतघ्नी इकडच्या तिकडे व तिकडच्या इकडे झाल्या आणि उलटे गोळे आपोआप उडू लागले. त्यामुळे जितके दुष्ट होते ते सर्व जागच्या जागी ठार झाले. कित्येक विकलांग झाले. त्यांत इल्वलसुद्धा एक होता. त्याचा एक पाय व एक हात गेला. तो रक्तबंबाळ होऊन लोळत असतां त्याला मूर्तीतून हे शब्द ऐकू आले.

"अरे इल्वला! या विकलांग स्थितीत म्हातारपणी कुजत रडत कुथत चिरकाल जग! हीच तुला योग्य शिक्षा आहे!" गणपतीने या शब्दात त्याला शाप दिला.

वातापि नगराचं सर्व वैभव नष्ट झाले. अद्यापि काही लोक राहतात. परंतु हे नगर एक ओसाड पडलेले पडके व जुनाट शहर राहून गेले आहे." धौम्य मुनींनी या शब्दात वातापि नगराचे पूर्ववृत्त सांगितले. अर्जुन आश्चर्यचकित होऊन गप्प राहिला. त्याला गणपतीचे ते अपूर्व कलाकौशल्य दिसले नाही.

"अर्जुना! यात आश्चर्य करण्यासारखं काहीच नाही! ते कलाकौशल्य नष्ट झाले हे मी पूर्वीच सांगितले नाही का?" असे धौम्य ऋषी म्हणत असतां जवळच्याच एका काटेरी झुडपात एक विकृत रूप असलेला म्हातारा एका हाताने व एका पायाने शरीर फरफटत ओढीत येत मोठ्याने ओरडला. ते अपूर्व कलाकौशल्य होते त्या बाजुला हात करून नमस्कार करीत तो तडफडत तत्काल मरण पावला.

अर्जुनाने त्याच्याकडे पाहून विचारले– "गुरुदेव! तोच नाही का हो इल्वल?"

धौम्य म्हणाले–"होय, दुष्ट क्रूर माणसांचा असाच शेवट होतो."

अर्जुनाने दूत पाठवून वातापि नगरास येण्याविषयी धर्मराजाकडे निरोप पाठविला.

हस्तिनापुराहून धर्मराज, भीम, नकुल, सहदेव यांच्या सह वातापि नगरी आला.

त्या दिवशी रात्री धर्मराज, गणपतीचे कलाकौशल्य अंतर्धान पावले त्या दिशेला तोंड करून बसला आणि म्हणाला–"देवा, माझ्या धाकट्या भावाने तुझे अपूर्व रूप पाहिले, मला ते भाग्य मिळणार नाही का? तुझं महाशिल्प आणखी कोणाला सापडणार? लवकरच तुझ्या मूर्तीची प्रतिष्ठा करण्याचे भाग्य मला लाभेल असे कर!" असे म्हणत डोळे मिटून गणपतीचे ध्यान धरून धर्मराजाने प्रार्थना केली.

तेव्हां त्याच्या कानावर हे शब्द पडले– "धर्मपुत्रा! देवांचा शिल्पकार विश्वकर्मा व दानवांचा शिल्पकार मयासुर दोघे मिळून ही मूर्त कोरतील. मूर्तीची प्रतिष्ठा झाल्याबरोबर तुझा यज्ञाचा घोडा जागचा हालेल आणि पुढे जाईल. तुझा अश्वमेध यज्ञ पूर्ण होईल. वातापि नगराचा पुनरुद्धार कर! तुमच्या पांडवकुलात जन्मास आलेले वंशज चंद्रवंश नामें या नगरी राज्य करतील!"

धर्मराजाने डोळे उघडतांच त्याला समोर गणपतीचे अपूर्व कलाकौशल्य दृष्टीस पडले व तत्क्षण अंतर्धान पावले.

दुसऱ्या दिवशी उजाडतांच एक गोरीपान व एक काळी कुट्ट व्यक्ती त्या



जवळच्या झाडाझुडपात एका स्फटिक शिळेला लक्षपूर्वक पहात असलेल्या दिसल्या. ते कोण हे धर्मराजाने ओळखले व त्यांना नमस्कार करून त्यांचा यथोचित सत्कार केला.

ती शिळा जमिनीतून खणून काढीत असतां एक अपूर्व सांठा सापडला. तो इल्वलने आणून पुरून ठेवलेला सोन्याचा सांठा होता. त्याच दगडाजवळ तो मरण समयी खितपत पडला होता. ते सर्व धन खर्च करून धर्मराजाने वातापि नगराचा पुनरुद्धार केला.

त्या दोघां महाशिल्पकारांच्या हस्ते गणपतीची मूर्त, महाशिल्प अदृश्य झाले











होते त्याच जागी एक विशाल देवालय आणि एक मोठा सभामंडप तयार झाला. विश्वकर्मा व मयासुर दोघांनी मिळून जो अद्भुत शिल्पाचा प्रारम्भ केला तो पुढे नवीन शिल्पकलेचा संप्रदाय म्हणून प्रसिद्ध झाला. भरतवंशीयांकडून या शिल्पकलेचे भरणपोषण होत राहल्याने त्याला भारतीय शिल्प हे नांव प्राप्त झाले आणि प्रख्याती मिळाली. काम पुरे होताच दोघे शिल्पकार जसे आले तसे अंतर्धान पावले.

देवालयात गणपतीची प्राणप्रतिष्ठा धर्मराजाच्या हातून संपताच घोडा हलला व जोराने पळू लागला. अर्जुन व भीम सैन्यानिशी त्याच्या पाठोपाठ निघाले.

धर्मराजाने वातापि नगरात अगस्त्य मुनींनी स्थापिलेली लोकसत्ताक राजवट सुरू करून ती कायम व स्थिर राहील अशी व्यवस्था केली आणि नकुल व सहदेव यांच्या सह हस्तिनापुराला गेला.

लोकसत्तेचे अर्थसूचक पर्यायवाचक नाम म्हणून व तेथील विशिष्ट पद्धत म्हणन त्या राजव्यवस्थेला अगस्त्य राज्य, नगराला अगस्त्य नगर हेच नाव काही काळ चालू राहिले. परंतु पुढे वातापि नगर याच नावाने त्या नगराची ख्याती झाली.

अर्जुनाने दिग्विजय समाप्त केला व हस्तिनापुरास परतला. अश्वमेध यज्ञ झाला. धर्मराजाने ,यज्ञभाग विशेषकरून विश्वकर्म्याला व मयासुराला अर्पण केला. शिल्पकारांचा व त्यांच्या शिल्पाचा यथायोग्य गौरव केला.

धर्मराजानंतर परीक्षिताने व त्याच्या नंतर जनमेजयाने राज्य केले. जनमेजय व त्याचे वारस वातापि नगराची राजव्यवस्था यथाप्रकारे पहात राहिले.

वातापि नगरावर राज्य करणाऱ्या चंद्रवंशीय राजांपैकी शत्रुंजय हा साम्राज्य स्थापनेची महत्वाकांक्षा असलेला एक राजा होता. त्याने वातापि नगराला आपली राजधानी करून एक विशाल साम्राज्याची स्थापना केली. त्याने प्रजेवर कराचा बोजा

वाढविला आपल्या निरंकुश राजवटीमुळे लोक त्याला दुसरा इल्वल जन्मला असे म्हणू लागले.

त्याच्या मुलांपैकी शेवटचा चळुक वर्मा हा होता. तो फार गुणी होता. अगस्त्यांनी घालून दिलेले लोकसत्ताक राज्याचे नियम त्याला मान्य होते. तो गणपतीची श्रद्धा-भक्तिपूर्वक आराधना करी. विद्या आणि कलेची त्याला आवड होती. त्याच्यात अगस्त्यांचा अंश आहे असे प्रजेला वाटे इतका तो प्रजेवर प्रेम करी.

साम्राज्यविस्तार करण्याच्या हेतूने त्याने आपल्या सर्व मुलांना बोलावून त्यांच्यावर काही जबाबदाऱ्या टाकल्या. चळुक आपल्या वडिलांना म्हणाला– "परपीडन आणि हिंसा करून मिळविलेला साम्राज्य विस्तार कसाईवृत्तीपेक्षा कसा मोठा होऊ शकेल?" असे सांगून त्याने आपल्या भावांची मने साम्राज्य विस्तरा-विरुद्ध वळविली व स्वाऱ्या करायला जाण्याचे नाकारले.

शत्रुंजय संतापला. म्हणाला–"कायरे सिंहाच्या पोटी उंदिर जन्मावा तसा तू राजवंशात चुकून जन्मलास! तुला योग्य शिक्षा मिळेल!" त्याने एक उंदिर धरून आणून त्याचे नाव चळुका असे ठेवले व त्याच्याशी चळुक वर्माचे लग्न होणार असल्याचे जाहीर केले.

चळुका उंदराचे खरे नाव कल्याण किंकिणी असे होते. इंद्राच्या शापाने ती अप्सरा उंदीर होऊन जन्मली. बोहोल्यावर चढल्यानंतर पाटावर राजकुमाराला व वधु स्थानी उंदराला पाहून पाहुणे मंडळी हंसतील व त्यामुळे चळुकवर्माची मान खाली होईल या विचाराने शत्रुंजयने तो विचित्र विवाह-समारंभ मांडला होता. परंतु चळुक वर्मा हसत म्हणाला–"उंदराला महाराजांची सून करण्याची शक्ति त्या विघ्नेश्वरात आहे. तर उंदराला एक सुंदर तरुणी कर-ण्याची शक्तीही त्याच्यात आहे, असे मी म्हटलं तर तुम्हां सर्वांना खरं वाटणार नाही. तरी माझा त्यावर विश्वास आहे!"





# गंधर्व राजकुमारी

[ ८ ]

म्हातारा म्हणाला ते ऐकून हसनला जास्तच वाईट वाटले. त्याने म्हाताऱ्याचे पाय धरले व म्हणाला–"मला माझी बायको द्या, मुले द्या! हे दान मागतो आहे मी!"

"स्वतःच स्वतःचा जीव द्यायला तयार होणारा तुझ्या सारखा मी आपल्या आयुष्यात कधी पाहिला नाही. तू जे करायला निघाला आहेस ते किती धोक्याचे आहे, याची तुला कल्पना सुद्धा नाहीसे दिसते आहे मला! तरी सुद्धा माझ्याकडून तुला जी मदत करणे शक्य आहे, ती करतो." असे म्हणत म्हाताऱ्याने आपल्या दाढीतले काही पिकलेले केस उपटले व हसनला देत म्हाणाला–"तुझ्यावर आलेल्या संकटांतून बाहेर निघणे तुला अगदी अशक्य झाले की यांपैकी एक केस पेटव, मी तरक्षण तेथे हजर होईन व तुला मदत करीन." नंतर त्याने वर मान करून टाळी वाजविली. लगेच एक भूत समोर उभे राहिले. म्हातारा हसनला म्हणाला–"तू याच्या पाठीवर बसून जा. हा तुला कर्पूर द्वीपावर पोंचवील. कर्पूर द्वीपाच्या पलीकडच्या किनाऱ्याला तू गेलास की 'वाक वाक' द्वीप ज्या समुद्रात आहे, त्या समुद्राच्या अलीकडच्या तीरावर तू पोचलास असे समज."

हसनने म्हाताऱ्याला नमस्कार केला आणि भुताच्या पाठीवर बसला. भुताने हसनला कर्पूर द्वीपावर आणून पोंचविले आणि निघून गेले. शुभ्र पांढऱ्या रंगाच्या त्या कर्पूर द्वीपाच्या मैदानात चालत असतां हसनला कापराचा वास येत होता. काही अंतर चालून गेल्यावर त्याला घुमटीसारखे काही तरी दिसले. उंच गवतामधून चालत



तो त्या घुमटीपर्यंत गेला. परंतु पायाला काहीतरी लागले व तो खाली पडला.

हसन ठेच लागून पडला तेथे एका राक्षसाचा देह होता आणि त्याला घुमटीसारखं दिसलं तो त्या राक्षसाचा कान होता. तो राक्षस त्या गवतात पडून झोपला होता. हसन त्याच्या अंगावर पडल्यामुळे त्याची झोप मोडली व तो जांभई घेत उभा राहिला. त्याचा तो देह एखाद्या उंच ताडामाडाएवढा होता. त्याने हसनला आपल्या मुठीत धरून उचलले. हसनला कांपरेच भरले व तो ओरडला–"माफ कर! जीवदान दे!"

"हा पक्षी किती गोड बोलतो आहे! मी आपल्या महाराजांना एक भेट म्हणून नेऊन देतो." तो राक्षस मनात म्हणाला. कर्पूर द्वीपाचा राजा एका खडकावर बसलेला होता. तो सुद्धा हसनकडे एकादा पक्षी असावा असे समजून पहात राहिला हसन म्हणाला–"माफ करा! जीवदान द्या!" त्या राक्षस राजाला हसनचे बोलणं पक्ष्याच्या ओरडण्यासारखं वाटलं. त्याने एक पिंजरा मागवून हसनला त्यात ठेवले व त्यातच खायला काही तरी अन्न व प्यायला पाणी ठेवून पिंजरा आपल्या घरात नेऊन टांगून ठेवला.

कित्येक दिवस लोटले. हसनला नकोजीव झाले. अशा स्थितीत त्याला म्हाताऱ्याने दिलेले दाढीचे केस आठवले. राक्षस राजकन्या त्याला पिंजऱ्या बाहेर काढून खेळवी. अशाच एका प्रसंगी तिची नजर चुकवून तो दूर गेला व त्याने एक केस पेटविला.

तत्क्षण म्हातारा समोर उभा राहिला व विचारू लागला–"काय पाहिजे हसन?"

"मला येथून आणखी कोठे तरी पोचते करा! आणखी एक दिवस येथं काढायचा झाला तर जीव राहीलसे वाटत नाही." हसन म्हणाला.

"मी तुला सांगितले नव्हते का? तू येथेच होतास म्हणून मला केस पेटवून बोलावू शकलास. त्या 'वाक् वाक्' द्वीपावर



कोणताही मंत्र किंवा तंत्र उपयोगी पडत नाही! तेथे तुला परमेश्वरच मदत करील तर करील. तू आपला हा प्रयत्न पूर्वीच सोडून द्यायला हवा होतास!" म्हातारा म्हणाला.

"मला या प्रयत्नात मरण आले तरी चालेल, त्याला मी तयारच आहे. मरण हे लिहून ठेवले असेल तेव्हांच येणार, आपल्या बायकोचा शोध कसा काय सोडू?" हसन म्हणाला.

म्हातारा हसनचा हात आपल्या हातात घेऊन म्हणाला–"तू आपले डोळे एकदांच मिटून पुन्हा उघड!" त्या प्रमाणे हसनने एकदांच डोळे मिटून उघडले तो एका समुद्राच्या किनाऱ्यावर उभा होता. म्हातारा अदृश्य झाला होता. तो उभा होता त्या किनाऱ्यावर अनेक हिरेमाणके वगैरे रत्ने होती. सर्व निरनिराळ्या रंगाची.

त्याने एकदां चहूओर नजर फिरविली मात्र समुद्र किनाऱ्यावरच्या डोंगराळ प्रदेशात विचित्र रंगाचे व विलक्षण आकृतीचे पक्षी दिसले व ते 'वाक् वाक्' असे ओरडत एकदम उडू लागले.

म्हणजे मी 'वाक् वाक्' द्वीपावर पोचलो आहे तर! असे हसनला वाटले. ते पक्षी येऊन आपल्याला समुद्रात ढकलण्याच्या आत आपण कोठे तरी लपले पाहिजे, असा विचार त्याच्या मनात आला आणि त्याला त्याच वेळी झोपडीसारखं काही तरी दिसले. तो झपाझप पाय उचलीत त्या झोपडीत गेला. बसला असेल नसेल तेवढ्यात सर्व जमीन हादरली. दूर धुळीचे लोट दिसले. त्या धुळीच्या आड त्याला एकाएकी भाल्यांची चकाकणारी टोके, शिरस्त्राणे, कवचे दिसली. त्या कोणी शूर कन्या होत्या.

त्या मोठमोठ्या घोड्यांवर बसलेल्या होत्या. त्यांच्या हातात तलवारी होत्या. वायुवेगाने येऊन त्या हसन होता त्या झोपडीच्या नजीक येऊन उभ्या राहिल्या. त्यांची नजर चुकवून पळून जायला



वाटही नव्हती. तो झोपडीच्या दारात येऊन उभा राहिला. त्याला पाहतांच सर्व घोडे जागच्या जागी थांबले. त्या वीरांगनांपैकी एक आपल्या घोड्याला, हसन होता त्या बाजूला आली. तिच्या तोंडावर शिरस्त्राण व कवच असल्या कारणाने हसन तिचे तोंड पाहू शकला नाही. ती जवळ येऊन काही म्हणण्याच्या आत हसन गुडघे टेकून तिच्या समोर उभा राहिला व म्हणाला–"देवी, मी दैवयोगाने या द्वीपावर आलो आहे. मी तुझ्या पायां-जवळ शरण मागतो आहे. बायको व मुले यांच्या शोधार्थ भटकणाऱ्या या दुर्दैवी माणसावर दया कर व अभयदान दे!"

ती घोड्यावरून उतरली. एका हाताने तिने आपल्या दासदासींना परत पाठिवले आणि जास्त लक्ष देऊन हसनकडे पाहिले. तिने आपल्या तोंडावर जे कवच होते ते काढले. तिला पाहून घाबऱ्या आवाजात तो जोराने ओरडला. त्याची कल्पना होती की वीरांगना फार सुंदर असतात. परंतु ही बाई तर कुरूप व म्हातारी होती व तिचे रूप तर भयंकरच होते.

आपल्याला पाहून हसनने डोळे घट्ट बंद केले ते भीतीने हे न कळल्यामुळे ती म्हातारी म्हणाली–"मुला, काय झालं रे, कां ओरडलास? मी तुला काय हवी ती मदत करीन. परंतु तुला कोणी पाहू नये या साठी तुला वीरांगनांचा पोशाख देते. तो अंगात घातलास म्हणजे तुझी सर्व कथा मी शांतपणे बसून ऐकेन."

असे सांगून ती गेली व थोड्याच वेळात वीरांगना घालतात तो पोशाख, कवच, किरीट व शस्त्रास्त्रांसह परत आली. तो पोशाख वगैरे धारण केल्यावर हसन त्या वीरांगनांसारखाच दिसू लागला. त्याला कोणी ओळखणेच शक्य नव्हते. म्हातारीने त्याला समुद्र किनाऱ्यावरच्या एका दगडावर बसविले आणि त्याची कथा ऐकू लागली. सर्व ऐकल्यावर तिने त्याच्या बायकोचे व मुलांची नावे विचारून घेतली. तो म्हणाली–"त्यांना तेथे काय म्हणतात मला माहीत नाही."

म्हातारीला हसन स्वतःच्या मुलासारखा वाटला व वात्सल्य भावाने ती त्याला म्हणाली–"हसन, एक आई आपल्या मुला-साठी जे काही करू शकते ते सर्व मी करीन. तुझी बायको या वीरांगनांपैकीच एक असली पाहिजे. उद्यां त्या सर्व स्नानाला येतील तेव्हां तू त्यांच्यापैकी आपल्या बायकोला ओळखू शकलास तर पुढले काम सोपे होईल!"

दुसऱ्या दिवशी तिने सांगितल्या प्रमाणे सर्व वीरांगना आपला पोशाख, शिरस्त्राण, कवच, वगैरे काढून ठेवून समुद्रावर स्नानाला आल्या. हसन वीरांगनांच्याच पोशाखात होता. त्याने त्या सर्वांना पाहिले, परंतु त्यांच्यात त्याची बायको नव्हतीच.

त्या स्नान करीत असतां हसनने ती गोष्ट म्हातारीला सांगितली. ती ऐकून म्हातारी घाबरून म्हणाली–"आतां उरल्या ती आमच्या महाराजांच्या सात मुलीच की! त्यांच्या पैकी कोणी तुझी बायको असेल तर तू व मीही आशा सोडून देणेच भाग आहे! तू शोधायाला आला आहेस ती तुझी बायको नाही, तुझा मृत्यू! तेव्हां तू आशाच सोडून दे!"

"आजी मी इतका दूर आलो तो परत जाण्यासाठीच का? तुमच्या मदतीची मला फार गरज आहे! यावेळी मी अयशस्वी होणार असे मनात आणलं तर तुमच्या शक्तीवर माझा विश्वास नाही असाच अर्थ ठरणार! ही सात बेटं तुमच्या ताब्यात रक्षणार्थ असतां तुम्हांला अशक्य असे काही असू शकेल का?" हसन म्हणाला.

"मला जो अधिकार आहे तो या बेटावर पहारा देणाऱ्या वीरांगनांपुरताच आहे. त्यांच्या पैकी तुला जी हवी असेल तिला मागून घे. तिला घेऊन जा आणि सुखाने संसार कर! ते तुला मान्य नसेल तर आपणा दोघांवर प्राणांतिक संकट ओढवलेच समज!" म्हातारी म्हणाली. (क्रमशः)





# अजिंक्यपणाचे गुपित

राजा चंद्रसेन याच्या दरबारात सर्वमित्र म्हणून एक विदूषक होता. त्याला कोणी वाक्‌चातुर्यात जिंकू शकत नव्हता. राजा त्याच्या तोंडचे चमत्कारपूर्ण वाक्‌प्रयोग ऐकून स्वतःची करमणूक करून घेई. सर्वमित्राहून वाक्‌चातुर्यात कोणी जास्त हुशार आहे का पहावे, असे राजाच्या मनात आले. त्यासाठी काय करावे, हे राजाने सर्वमित्रालाच विचारले.

सर्वमित्र म्हणाला–"प्रभो! ते काय हो तसं मोठं कठीण नाही! मला बोलण्यात जो जिंकील त्याला शंभर वराह इनाम दिले जातील असे जाहीर करावं. इनामाच्या आशेने जे येतील त्यांनी स्पर्धेला न येता जे हार मानतील त्यांना एक हजार वराह दंड द्यावा लागेल. कोणालाच इतके पैसे देणे शक्य होणार नाही, तेव्हां अशांना दहा फटके दिले जातील असे जाहीर करावे, म्हणजे झाले, असं मला वाटतं.

राजाला तो नियम फार आवडला. त्याने तो नियम देशभर जाहीरही केला. ती दवंडी ऐकून पुष्कळ लोक राजधानीत धावून आले. पहिल्या दिवशी आलेल्यांची संख्याच शंभरापर्यंत पोचली.

इतका नियम कठोर असूनही इतके लोक आले म्हणजे त्यांत काहीजण तर फार हुशार व बोलण्यात फार चतुर असले पाहिजेत. बाकीचे सर्व पैशाच्या आशेनेच मूर्खासारखे आले असले पाहिजेत, असे वाटले.

असा विचार करून सर्वमित्राने राजाला दहा दिवसांचा अवधी द्यावा, अशी विनंती केली. राजाने अवधी दिला. त्या दहा दिवसात सर्वमित्र वेष पालटून सर्वांना जाऊन एकेक करून भेटला व त्यांच्याशी बोलला. त्याने स्वतःच सर्वमित्राच्या चातुर्याचे असे वर्णन केलं की सर्व घाबरून गेले आणि सर्वांनी एकेक करून राजधानीतून पाय काढला.

त्या स्पर्धेला आलेल्यांपैकी गुणशील नावाची व्यक्ती सर्वमित्राला फार हुशार आढळली. आपण त्याला बोलण्यात कदाचित जिंकू शकणार नाही असेही सर्वमित्राला वाटू लागले. आपण एकदा जरी हारलो तरी राजा आपलं तोंडही पाहणार नाही, असे त्याला वाटले.

सर्वमित्राने त्याला आपली खरी ओळख सांगितली व म्हणाला–"जर तू या स्पर्धेत भाग घेतला नाहीस तर तुला दोनशे वराह मी देईन!" गुणशील गरीब होता. त्याने विचार केला आपण जिंकतो की नाही कोण जाणे? पदरात दोनशे वराह पडले ते घेऊन तो परतला. उरलेल्यांना सर्वमित्राने सहजी जिंकले व राजाकडून मोठे इनाम मिळविले.

काही महिने लोटल्यावर राजाने पुन्हां स्पर्धा जाहीर केली. या वेळीही गुणशील आला. सर्वमित्र दोनशे वराह देऊ लागला, तेव्हां ते पुरणार नाहीत असे त्याने सांगितले. शेवटी पाचशे वराह घेऊन गुणशील परतला. इतर सर्वांना जिंकून सर्वमित्राने राजाकडून पुन्हां मोठे इनाम मिळविले.

तिसऱ्या वेळी पुन्हा स्पर्धा व्हायचे ठरले. गुणशील उत्साहाने निघाला. तेव्हा त्याचे



वडील त्याला म्हणाले–"तू दोनदां जाऊन पैसे मिळवून आलास खरा, पण संभाळून रहा! राजाशी व्यवहार आहे, त्यात धोका असू शकतो!"

"बाबा, मी आजपर्यंत स्पर्धेत भाग घेतला असेल तर ना!" असे सांगून गुणशीलने जे घडले ते थोडक्यात सांगितले.

बाप आश्चर्यचकित होऊन म्हणाला–"वेड्या! वाक्‌पांडित्यात तू जे चातुर्य दाखवितोस ते तुला व्यवहारात दाखविता आले नाही. सर्वमित्र तुझ्या वाक्‌चातुर्याला भिऊन तुला पैसे देत आला आहे. या खेपेस तू राजासमक्ष स्पर्धेसाठी जाच. सर्वमित्र देईल त्या पैशांवर भाळून जाऊ

किरण पांडे

नकोस. स्पर्धेत भाग घेऊन राजाकडून शाबासकी मिळव!"

या खेपेस सर्वमित्राने गुणशीलला एक हजार वराह देऊ केले. गुणशीलने घेतले नाहीत. त्याच्यामुळे आपली मान खाली होणार हे सर्वमित्राने ओळखले आणि रात्रीच्या रात्री काही गुंडांना पाठवून गुणशीलच्या मुसक्या बांधून त्याला घोर जंगलात नेऊन टाकविले. गुणशील तिकडून राजधानीत पोचेपर्यंत स्पर्धा संपल्या होत्या.

त्यानंतर गुणशीलाने अनेक यत्न करून पाहिले, परंतु सर्वमित्राने त्याला एकदांही स्पर्धेत भाग घेऊ दिला नाही. दिवसेंदिवस गुणशीलाच्या अडचणी वाढतच गेल्या. तो वेष पालटून जाई आणि मूर्खपणाचे सोंग करून बोलेही, परंतु सर्वमित्र त्याला ओळखून राजा पर्यंत पोचू देत नसे.

तोंपर्यंत दहावेळा स्पर्धा झाल्या होत्या. अकराव्या वेळी स्पर्धा झाली तेव्हां गुणशील आल्याचा पत्ता ही सर्वमित्राला लागला नाही. शेवटी स्पर्धेच्या वेळी त्याला इतर स्पर्धकांबरोबर आलेला पाहून सर्वमित्राची छाती धडधडू लागली.

सुरवातीला स्पर्धकांमध्ये परस्पर स्पर्धा राजाने करविल्या. गुणशील त्या सर्वांकडे तिरप्या नजरेने पहात म्हणाला--"एकदां मी दाट अरण्यात फिरत असतां एक वाघ पांच सहा पावलांवर उभा असलेला दिसला."

"काय खरंच?" पांचही स्पर्धकांनी आश्चर्यचकित होऊन विचारले.

"पण तुम्ही विचारायला हवा तो प्रश्न हा नव्हे! तुम्ही विचारायला हवं होतं, तुम्ही कसे स्वतःला वांचविलेत? होय की नाहीं?" गुणशील म्हणाला.

नंतर गुणशील व सर्वमित्र दोघांची स्पर्धा सुरू झाली. समोरच्या माणसाने कोणता प्रश्न विचारावा, हे मात्र तू छान सांगितलेस. खरं, म्हणजे तुला कसा प्रश्न विचारावा हे माहीत आहे का?" सर्वमित्राने गुणशीलला विचारले.

"प्रश्नाची गोष्ट मी नंतर सांगतो. आत्तांच एक गोष्ट सांगून त्याला काय प्रश्न विचारायला हवा, हेही मी सांगितले. तेच तुला आणखी एकदां सांगितलं आणि प्रश्न विचारायचा झाला तर त्यात चातुर्याने तू काही सांगू शकशील का?" गुणशीलने विचारले.

"सांगून पहा, तुलाच कळेल." सर्वमित्र त्याची थट्टा करीत म्हणाला.

"एकदां मी दाट अरण्यात फिरत असतां समोर पांच पावलांवर असलेला वाघ दिसला" गुणशील म्हणाला.

"तेव्हां तू स्वतःला वांचवून कसा बाहेर पडलास?" सर्वमित्राने विचारले.

"तो प्रश्न सामान्य बुद्धि असलेल्या माणसांनी विचारावयाचा प्रश्न झाला. तुझ्या सारख्यांनी विचारावयाचाच झाला तर असा प्रश्न विचारायला हवा होता की तू त्या जंगलात गेलासच कशाला?" गुणशील म्हणाला.





राजा कौतुकाने ते संभाषण ऐकत होता. गुणशीलने सांगितल्यासारखेच सर्वमित्राने विचारले.

"कशाला म्हणून विचारतोस? या स्पर्धेत भाग घ्यायला मी येऊ नये म्हणून एकजण आडवा येत होता. म्हणून कोणाला माहीत नसलेली नवी वाट काढावी लागली." गुणशील म्हणाला.

सर्वमित्राची जणुकाही बत्तीशीच बसली. गुणशील चातुर्याने आपलं बिंग बाहेर काढीत आहे. तर आपण त्याला तसेच प्रत्युत्तर देऊन त्याला निरुत्तर केले पाहिजे! त्याला वाटले.

"तू अशी उत्तरे देशील, हे मला माहीत होते. तुला इकडे यायला आडवा येणारा सर्वमित्रच होता असेही म्हणायला तू मागे पुढे पाहणार नाहीस. तुझी ही वटवट येथे चालणार नाही. कोणी विश्वासच करणार नाही. बरं तर तू त्या वाघाच्या जबड्यातून स्वतःचं रक्षण कसं करून घेतलंस, हे तर सांगशील!" सर्वमित्र म्हणाला.

"वाघाशी दोन हात करून जिवंत परत यायला मी काही तसा शूरवीर योद्धा नाही! तो पुढे येऊ लागला तेवढ्यात तुझा मुलगा व दोघे गुंड नोकर मी इकडे न यावे, यासाठी मला आणखी एकदा मुसक्या बांधून नेण्यासाठी झुडपांतून बाहेर आले. वाघाने मला सोडले व त्यांच्यावर उडी मारली. मी ती संधी साधून पळालो आणि सरळ इकडे आलो." गुणशील म्हणाला.

मुलावर वाघाने उडी मारली हे ऐकतांच सर्वमित्र ओरडला व बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. राजाबरोबर तेथे जे कोणी होते चकित झाले. राजाने विचारल्यावर गुणशीलने सर्वमित्राची सर्व कारस्थाने उघड सांगून टाकली.

राजाने दरबार बरखास्त केला आणि पूर्वी स्पर्धे-साठी आलेल्या काही उमेदवारां-जवळ चवकशी केली तेव्हां गुणशील म्हणाला ते खरे असल्याचे कळले. राजाने सर्वमित्राला तुरुंगात टाकले आणि गुणशीलला विदूषकाच्या पदावर नेमले.






## [८]

[नरवाहन आणि समरसेन दोघे ससैन्य शत्रूवर चालून गेले. बाहेरच्या मैदानात भयंकर युद्ध झाले. विजय समरसेनाचा झाला होता. तो फार जखमी झाला होता. नरवाहनाने स्वतःला राजा म्हणून जाहीर केले. शिवदत्ताने आपल्या अनुयायांसह चोर दरवाज्याने पळून जायचे ठरविले. पुढे–]

मंदरदेव शिवदत्त म्हणाला ते ऐकून चकित झाला व त्याने विचारले–"त्या चोर दरवाज्याने तुम्ही कोणी पूर्वी कधी गेला नव्हता का?"

शिवदत्त निरुत्साहित होऊन खाली मान करून म्हणाला–"तसा प्रसंग माझ्यावर त्यापूर्वी कधीच आला नाही. परंतु त्या चोर दरवाज्याने जायचे झाले तर मशाल किंवा दिवटीच्या मदतीशिवाय जाता येणे शक्य नाही, एवढेमात्र मी ओळखले. मी ती गोष्ट घाईत पार विसरलो होतो, परंतु सुदैवाने माझे अनुयायी विसरले नव्हते व त्यांनी ती सावधगिरी बाळगली होती. त्यांनी लगेच काही दिवट्या लावल्या आणि भुयारात उतरले. मी सुद्धा उतरलो. इतक्यात माझ्या पाठीमागच्या एकाने मला हाक मारून म्हटले–"शिवदत्त सरदार! शत्रूने किल्ल्याचे दार फोडले आहे आणि शत्रू




आत शिरला आहे. त्यांचा तो आवाज येतो आहे, पहा!"

"बरं तर चोर वाटेचे दार बंद करा आधी! नरवाहन येईपर्यंत त्यांना या चोर दरवाज्याची गोष्ट कळणारच नाही. त्या अवधीत आपण सुरक्षितपणे बाहेर निघून जाऊ. काही भ्यायचे कारण नाही!"

त्या काळोख्या चोरवाटेने काही अंतर चालून गेल्यावर आमच्या वाटेवर एक लोखंडी साखळी लोंबत असलेली दिसली. मान वर करून पाहिले. तेथे भुयाराच्या वरच्या बाजूला एक दार सहजी दिसणार नाही असे लावून ठेवल्यासारखं दिसलं. साखळी थोडीशी ओढून पाहिली तर आंत फवाऱ्यासारखं पाणी आलं. तेव्हां तेथे ते दार असं झांकून कां ठेवलेले होते हे माझ्या लगेच लक्षात आलं. कोण्या शत्रूने ओळखलं की चोरवाटेने कोणी पळून गेला असावा व त्याला पकडण्यासाठी पाठलाग सुरू केला तर शत्रूला पुढे येऊ न देण्यासाठी ती साखळी ओढून सर्व चोरवाट पाण्याने भरून काढता यावी, यासाठी ती व्यवस्था करून ठेवली होती. उपाय मात्र फारच छान होता. तसं काही करण्याची गरज आहे का असा विचार करून मी भुयारात मागे वळून, दिसले तितकं दूरवर पाहिलं. माझा अंदाज बरोबर निघाला. मला काही दिवट्या हालतांना त्या बाजूला दिसल्या. म्हणजे शत्रूला आपण इकडून जात असल्याचे कळले म्हणावयाचे! तेव्हां जास्त विचार करायला वेळच नव्हता. मी ती सांखळी धरून अंगातलं बळ एकवटून जोराने ओढली. लगेच ते दार खाली आदळलं आणि त्या पाठोपाठ पाण्याचा मोठा धबधबाच भुयारात कोसळलेला ऐकू आला.

आतां यापुढे जितक्या लवकर होऊ शकेल तितक्या लवकर भुयारातून बाहेर निघून जाणे आवश्यक होते. कारण नरवाहन मैदानात निघणाऱ्या चोरवाटेच्या दारावर आपले सैनिक आणून उभे करील हेही तितकेच नक्की होते. तसे झालं तर






मी व माझे सर्व अनुयायी यांची दशा पिंजऱ्यात सांपडलेल्या उंदरांसारखी होण्याची शक्यता होती.

थोड्याच वेळाने आम्ही भुयाराच्या दुसऱ्या टोकाला येऊन पोंचलो. तेथे भुयाराच्या पायथ्यापासून दारापर्यंत जायला पायऱ्या केलेल्या होत्या. आम्ही आपली चाहूल दिल्याशिवाय मांजराच्या पावलांनी पायऱ्या चढून गेलो आणि दाराला कान लावून बाहेरून काही आवाज ऐकू येतो का पाहिले.

काही वेळ काहीच आवाज आला नाही. तेव्हां ते दार उघडून बाहेर पडण्याचं ठरविलं. बाहेर शत्रूचे भय नसल्याची खात्री झाली. म्हणून मी अंगातलं सर्व बळ एकवटून दार उघडण्याचा प्रयत्न करणार इतक्यात, मला पलीकडून घोड्यांचा हिंणहिंणण्याचा आवाज व लोकांच्या बोलण्याचा आवाज ऐकू आला.

एक जण म्हणाला—"सर्व तर सामसूमच दिसतं आहे. झाडाच्या बुंधाजवळचे दार तर चांगलं बंदच दिसत आहे!"

"असं! तर मग ते सर्व बंडखोर भुयारातल्या पाण्यात उंदरासारखे तडफडत बुडून मरण पावले असावेत" आणखी एक जण म्हणाला. नंतर काही वेळ कोणीच काही बोलल्याचे ऐकू आले नाही. आतां काय करायचं असा विचार करीत मी उभा असतां कर्कश आवाजात अधिकारवाणीने कोणीतरी गरजला—"इतका वेळ गप्पा मारीत उभे राहण्यात काय अर्थ आहे? ते बंडखोर बुडून मेले की आपण येण्याआधी या दारांतून बाहेर येऊन निसटून जंगलात पळून गेले हे आपल्याला माहीत नाही. नंतर तो शिवदत्त मेला की जिवंत राहिला तरी त्याचे डोके आणून देणाऱ्याला एक सामंत राज्य देईन असे राजा नरवाहन याने वचन दिले आहे."

"बरं पण, आतां काय करावे, म्हणतां?" त्या दोघांनी एकदम विचारले.

"जाऊन त्या झाडाच्या बुंधात जो चोर दरवाजा आहे, तो उघडून पहा. त्या दारापर्यंतची चोरवाट पाण्याने भरून गेली असेल तर त्याचं प्रेत सुद्धा आतां मिळणार नाही. तसं नसेल..."

त्याचं बोलणं संपण्यापूर्वीच दाराजवळूनच भयंकर सिहगर्जना ऐकू आली. त्या पाठोपाठ आणखी काही लहानमोठ्या गर्जना झाल्या. तेथें बोलत असलेले नरवाहनाचे सैनिक मागे फिरल्याची सूचना त्यांच्या हिणहिणणाऱ्या घोड्यांच्या आवाजावरून कळत होती. मागे जाण्यासाठी सैनिकांच्या आरोळ्यासुद्धा ऐकू येत होत्या.

"त्या झाडाच्या बुंधाजवळ कोणते तरी वाघ सिह आहेत. जिवाला धोका आहे, मागे फिरा!" एक जण ओरडला. त्या पाठोपाठ त्यांचा सरदार ओरडला—

"फक्त सिहच काय, हत्ती, अस्वले असली तरी कामे पुरी झाल्याशिवाय मागे फिरतां कामा नये! भितरे भागूबाई असतील त्यांची डोकी उडवीन. खबरदार! बजावून ठेवतो."

त्यानंतर सिहांनी त्यांच्यावर हल्ला केल्यासारख्या गर्जना आणि लोकांच्या किंकाळ्या, घोड्यांच्या आदळण्याचा आवाज आणि सर्व गोंधळ उडून गेल्याच्या सूचना बाहेरून कानावर येऊ लागल्या. मी आपल्या अनुयायांसह निसटून जायला याहून जास्त चांगली संधी कोठून मिळणार? असे मला वाटू लागले.

नरवाहनाचे सैनिक सिह वगैरे हिंस्र जनावरांना ठार केल्यानंतर लगेच भुयाराच्या दाराजवळ येऊन उभे राहतील व मग आमची कत्तल होईल हे मला कळत होते.

मी आपल्या सैनिकांना जवळ बोलावून त्यांना सर्व परिस्थिती समजावून सांगितली व आपल्यापैकी काही जण जरी जिवंत बाहेर निसटून जाऊ शकलो तरी बरे, असे समजावून सांगितले. नरवाहनाचे सैनिक हिंस्र पशूंपासून आत्मसंरक्षण करण्यात गुंतले असतां त्यांना तोंड देऊन पळून जावे लागले तरी किंवा त्यांची नजर चुकवून जाण्याचे झाले तरी याहून जास्त चांगली संधी मिळणं शक्य नाही, हे प्रत्येकाला पटले.

त्यावेळी नायक म्हणून माझ्यावर फार मोठी जबाबदारी होती. म्हणून मी थोडा कचरतही होतो. आतां मी आपल्या अनुयायांना ज्या सूचना देईन किंवा आज्ञा करीन त्यांवरच आम्हां सर्वांचे भविष्य अवलंबून होते. माझ्या बरोबर माझ्या अनुयायांच्या जीवन मरणाचा तो प्रसंग होता. तीच एक तशी अनुकूल संधी होती पळून जायला. काही मिनिटांतच आमचे भविष्य ठरणार होते.

मी आणखी थोडा देखील वेळ न घालवितां तो चोर दरवाजा उघडला. गंज खाल्लेला तो दरवाजा उघडतांना 'कर्र' 'कर्र' असा कर्णकठोर आवाज झाला. मी बाहेर पाहिले मात्र, तेथें उडून गेलेला





गोंधळ वर्णनातीतच होता. सर्वच भयंकर होते.

सिंह एक किंवा दोन नव्हते. पांच सहा तरी होते आणि घोडेस्वारांवर एकदम तुटून पडले होते. ते सैनिक सुमारे वीस-जण असावेत. ते झाडीत सापडले होते आणि सिंहांच्या हल्ल्यातून स्वत:ची सुटका-करून पळून जाणे त्यांना कठीण झाले होते. ते आपले भाले सिंहांवर फेकूही शकत नव्हते आणि सिंहांच्या हल्ल्यासमोर टिकाव धरून उभे राहणे त्यांना कठीण जात होते.

थोडयाच अंतरावर घोडयावर बसलेला त्यांचा नायक हातातली तलवार हवेत गरगर फिरवीत ओरडत होता–"घाबरू नका! वार करा! ठार करा त्यांना!" परंतु तो मात्र सिंहाच्या वाऱ्यालाही जात नव्हता. एवढंच नव्हे तर प्रसंग आला तर पाय कसा काढायचा याचाच विचार करीत होता. तो आपल्या घोडयाला मागे ओढीत होता, त्यावरुनच ते कळत होते.

मी, आपल्या अनुयायांसह भुयाराच्या दारांतून बाहेर पडलो, ही गोष्ट नरवाहनाच्या त्या सैनिकांपैकी एकानेही पाहिली नाही की त्यांच्या नायकाच्याही लक्षात आले नाही. त्यांचे लक्ष स्वत:च्या रक्षणा-साठीच एकवटलेले होतं. मी माझ्या अनु-



यायांसह झाडाझुडपांच्या आडून पाय काढीत एकेक पाऊल पुढे टाकीत काही वेळाने नरवाहनाच्या सैनिकांच्या मागच्या बाजूला पोचलो. एका बाजूने त्यांच्यावर सिंहांचा हल्ला होत होता. दुसऱ्या बाजूने आपण अकस्मात् हल्ला करून त्यांचा संहार करावा असे माझ्या मनात आलं.

माझा विचार मी आपल्या अनुयायांना कळवितांच त्यांना ते पटले. परंतु कदाचित् नरवाहनाच्या सैनिकांना सोडून सिंह आपल्यावरच तुटून तर पडणार नाहीत अशी एक शंका मनाला चाटून गेली. "परंतु आपण मरायलाच तयार झाल्यावर मरण शत्रूच्या हातून आले काय किंवा सिंहाच्या

तोंडी आले काय, दोन्ही एकच." असे मी म्हणालो.

झुडपाआड उभा राहून मी जयघोष केला—"समरसेन की जय!" आणि पाठी-मागून नरवाहनच्या सैनिकांवर तुटून पडलो. माझे अनुयायीही तितक्याच उत्साहाने शत्रूवर तुटून पडले.

सर्वात प्रथम त्यांच्या नायकाचे डोके उडाले आणि दूर एका झुडपात जाऊन पडले. माझ्या अनुयायांनी शत्रूला सापडला तसा जागच्या जागी कापून काढला. त्या गडबडीत सिहांची गोष्ट कोणाच्याही लक्षात आली नाही. शिवाय दोन तीन सिंह नरवाहनाच्या सैनिकांचे भाले खाऊन दूर तडफडत पडलेले होते. उरलेले आमचा जयजयकार व दाणगा उत्साह पाहून घाबरून पळून जाऊ लागले.

पांचसहाच मिनिटात नरवाहनाचे सर्व सैनिक आमच्या तलवारीचे वार खाऊन गारद झाले. आपल्यावर एकाएकी हल्ला करणारे कोण हे कळण्यापूर्वीच बरेच जणांचे प्राणोत्क्रमण झाले होते. तरी उरलेले दहा-बारा जण सावध झाले. त्यांच्यापैकी एक-कंठशोष होईल इतक्या जोराने ओरडला—"तो पहा शिवदत्त, बंडखोर! करा कत्तल त्याची! त्याचं डोके एक राज्य मिळवून देईल!" असा ओरडत तो माझ्यावर देहभान विसरून चालून आला.

त्या सैनिकाने दाखविलेले धैर्य व साहस पाहून त्याच्या अनुयायांत सुद्धा धैर्य व साहस आले! ते सर्व एकजुटीने माझ्यावर व माझ्या अनुयायांवर तुटून पडले. ते पाहून विजयगर्वाने निश्चित झालेल्या माझ्या अनुयायांपैकी काही जण शत्रूसमोर टिकाव धरू न शकल्यामुळे जमिनीवर आद-ळले. तितक्यात मी शत्रूच्या त्या शूर नायकाच्या घोड्याच्या मानेत तलवार खुपसली. त्या सरशी तो घोडा मागच्या पायांवर उभा राहिला आणि घोडेस्वार तोल जाऊन जमिनीवर आदळला. घोडा किंकाळत त्याच्या अंगावर धडामदिशी पडला. (क्रमशः)





# न्याय निवाडा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू मध्यरात्रीच्या वेळी कोणासाठी एवढी मेहनत करीत आहेस? हे तू कोण्या सज्जन पुरुषासाठी करीत आहेस की दुर्जन माणसासाठी, ते महत्वाचे नाही. निश्चय-पूर्वक प्रयत्न केल्यास सज्जन किंवा दुर्जन हा भेदभाव न राहता कोणालाही अपूर्व शक्ती संपादन करून घेता येते. परंतु त्या शक्तीचा प्रयोग आठ दहा जणांवर केल्यास त्यांतील न्यायान्यायाचा निवाडा कसा करावयाचा? त्याचे एक उदाहरण म्हणून तुला शंभू व गोपू या दोघां मित्रांची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

## वेताळाच्या गोष्टी



विजयपूर राज्यातल्या एका लहानशा गावी शंभू व गोंपू नावाचे दोघे मित्र रहात असत. ते दोघे मोलमजुरी करून आपला उदरनिर्वाह चालवीत. त्या दोघांपैकी शंभू हा अगदी भोळा सांबच होता. तसा तो हुशार होता. गोपू थोडा खोल, चतुर व थोडा स्वार्थीही होता.

एकदा गोपू शंभूला म्हणाला–"या अनिश्चित जीवनाचा कंटाळा येऊ लागला आहे, बुवा! आपण आपलं गाव सोडून देशातले निरनिराळे प्रांत पाहून येऊ या. कोठे तरी आपलं सर्व दारिद्र्य कायमचं नाहीसे करण्यासारखं काही तरी काम नक्कीच मिळेल."

शंभूला मित्राचा विचार पसंत पडला नाही. म्हणाला–"लोभ हा माणसाला नेहमीच पतनाकडं ओढीत नेतो. कोठे गेलं तरी आपल्याला मोल मजुरी करूनच पोट भरावं लागणार की नाही! अशा परिस्थितीत ज्या गावी जन्मलो व वाढलो ते गाव सोडून जाण्यात काय शहाणपण आहे?"

गोपूला ते पटलं नाही. तो दुसऱ्याच दिवशी आपलं गाव सोडून निघाला आणि काही दिवसांनी फिरत फिरत जंगलात एक माणूस तपश्चर्या करीत बसला होता तेथे आला.

तपश्चर्या करणारे मुनी त्यांच्याजवळ काही मागितलं तर देतात असे त्याने ऐकले होते. म्हणून त्या तपस्वी मुनीला नमस्कार करून त्याने आपल्या दारिद्र्याची गोष्ट त्यांच्यासमोर निवेदन केली आणि श्रीमंत होण्याचा काही मार्ग असेल तर दाखविण्यास विनंती केली.

मुनी त्याचे बोलणे ऐकून स्मित करून म्हणाले–"बाबा रे, कष्ट केल्याशिवाय काहीही फुकट लाभत नाही." तरी तू एकाग्रचित्त होऊन एका जागी कष्ट न मानता बसायला तयार असशील तर तुला एक मंत्र देतो. तू त्या मंत्राचा जप करीत काही काळ तपश्चर्या केलीस तर लक्ष्मी तुझ्यावर प्रसन्न होईल."

गोपू त्या गोष्टीस कबूल झाला. मुनीने त्याला मंत्रोपदेश केला.





जंगलात एका बाजूला एक मोठा डोंगर होता. गोपू त्या डोंगरावर एका जागी बसून तपश्चर्या करू लागला. त्या डोंगरावर शृंगी नावाचे एक भयंकर भूत रहात होते. त्याचे पूर्वीचे निवासस्थान विन्ध्य पर्वतावर होते. तेथे एका मुनीने घोर तपश्चर्या सुरू केली. त्याच्या तपश्चर्येची भीती वाटून शृंगी विन्ध्य पर्वत सोडून या डोंगरावर येऊन राहू लागले होते.

गोपूने तपश्चर्या सुरू करतांच शृंगीला भीती वाटू लागली. त्याला काही तरी उपाय करून हाकलून लावायचे ठरवून ते भूत गोपूजवळ जाऊन म्हणाले–"काय रे, तू या लहान वयातच तपश्चर्या करू लागलास! कारण तरी काय?"

लक्ष्मीला प्रसन्न करून धनसंपादन करण्याच्या विचाराने तपश्चर्या आरंभिली असल्याचे गोपूने सांगितले.

भूत स्मित करून म्हणाले–"यासाठी तपश्चर्या करायला हवी का? तुला हव्या त्या अद्‌भुत शक्ती मी देऊ शकेन. त्या शक्तींचा प्रयोग करून तुला वाटल तितके धन संपादन करतां येईल. त्यानंतर मात्र या डोंगराच्या बाजूला सुद्धा येऊ नकोस!"

गोपू त्या गोष्टीस कबूल झाला. भुताने त्याला क्षुद्र मंत्र देऊन अद्‌भुत शक्तींवर अधिकार होईल असे केले.

अशा तऱ्हेने क्षुद्र शक्ती प्राप्त करून गोपू लगेच आपल्या वी आला आणि





सर्व गावकऱ्यांना पिपळांच्या पारावर जमवून त्याने प्राप्त केलेल्या अद्भुत शक्तींचे तिखट-मीठ लावून वर्णन करून सांगितले.

गावकरी त्याच्या त्या अद्भुत शक्तींवर विश्वास करतात की नाही हे आश्चर्याने ती पहात असतां एक तरुण उभा राहून म्हणाला–"अरे गोपू, नुसत्या गप्पा मारू नकोस तुझ्या त्या अद्भुत शक्तींचे थोडस प्रदर्शन कर की!"

गोपू रागाचा आव आणून म्हणाला–मी गप्पा मारतो आहे का? मी तत्क्षण तुझं तोंड बंद करतो पहा! हिंमत असेल तर तू मघा म्हणालास ते पुन्हां म्हण पाहू!"

त्या तरुणाने किती प्रयत्न केला तरी त्याच्या तोंडावाटे एक शब्दही उमटला नाही. लोक आश्चर्यचकित होऊन पहात असतां गोपू थोड्या अंतरावरच्या खूप आंबे लागलेल्या एका झाडाकडे बोट दाखवून म्हणाला–"हे झाड मी एका क्षणात भस्म करून दाखवितो." असे म्हणत त्याने हात वर केला. आंब्याचे झाड लगेच जळू लागले आणि भस्म होऊन गेले.

इतका वेळ गावकऱ्यांबरोबर बसून सर्व पहात बसलेला शंभू गोपूजवळ आला व म्हणाला–"शंभू, तू अद्भुत शक्ती संपादन केल्या आहेस या गोष्टीची आम्हां सर्वांना खात्री झाली आहे. आता आज हे प्रयोग पुरेत! चल घरी जेवू या जाऊन!" असे म्हणत त्याला घरी घेऊन गेला.

बोलतांना शंभूने सर्व अद्भुत शक्ती त्याने कशा संपादन केल्या मोठ्या ऐटीत वर्णन करून सांगितले आणि पुढे त्यांचा प्रयोग धन संपादनार्थ तो कसा करणार आहे, हेही सांगितले.

शंभू ते सर्व शांतपणे ऐकत राहिला. नंतर त्याने गोपूला जेवायला वाढले आणि त्यांत थोडे विष कालविले. ते खाल्ल्यावर शंभू जमिनीवर गडबडा लोळू लागला. नंतर उठून वेड्यासारखा रस्त्यावर धावत राहिला. तो ओरडू लागला–"शंभूने त्याला विष घातले" आणि ओरडत जागच्या जागी मरून पडला.

शंभूवर खुनाचा आरोप लागला. शिपायांनी त्याला कैद करून राजा वसंतसेन याच्यासमोर उभे केले. वसंतसेन हा धर्मभीरु व न्यायपरायण राजा आहे अशी प्रजेत त्याची ख्याती होती. अशा राजाने शंभूला भर दरबारात बोलावून खुनाविषयी त्याची जबानी घेतली व त्याला कठोर शिक्षा न करता त्याला गावाचा न्यायाधिकारी नेमले व तशी आज्ञा काढली.

वेताळ येथवर कथा सांगून म्हणाला–"राजा तुला वसंतसेनाची ती वागणूक विक्षिप्तपणाची वाटत नाही का? ती न्यायविरुद्ध नाही का? कोणी खून केला असेल तर त्याला फाशीची शिक्षा करण्याचा कायदा नाही असा देश मिळणार नाही. मग ती शिक्षा न करणारा राजा सिंहासनावर बसायला अपात्रच नाही का? या शंकांचे समाधान कारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"स्थूल दृष्टीने पाहतां राजाने केले ते न्यायविरुद्धच दिसते. परंतु शंभूने प्रजेच्या हिताकडे लक्ष देऊन तो खून करण्याचे धाडस केले, राजाने ही गोष्ट ओळखली. गोपूने संपादन केलेल्या अद्भुत शक्ती क्षुद्रशक्तीच होत्या. तो धनलोभी तर होताच, दया व धर्म यांचाही शत्रू होता. त्याचा विरोध करणाऱ्याचे त्याने तोंडच बंद केले आणि एक वृक्षच जाळला. असा मनुष्य जिवंत राहिला तर तो समाजद्रोहच करणार हे ओळखूनच त्याने शंभूला विष दिले. त्यात त्याचा व्यक्तिगत स्वार्थही नव्हता. हे समजू शकण्याची शक्ती असल्यामुळेच वसंतसेन राजाने त्याचा सत्कार केला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)






# स्वार्थीपणाबद्दल शिक्षा

माणिक्यपुरी राज्यात मंथर नांवाचा पाहरेकऱ्यांचा एक प्रमुख होता. त्याच्या हाताखाली निरनिराळ्या ठिकाणी पाहारा देणारे पाहरेकरी होते. काही हेरही हेरगिरीसाठी नेमलेले होते. राज्यात अनेक जागी चोऱ्या वगैरे होऊ लागल्या होत्या. शेजारच्या राज्यातले काही हेरही हेरगिरी करण्यासाठी राजधानीत येत.

मंथर फार स्वार्थी होता. हाताखालच्या लोकांशी निर्दयपणाने वागे. त्यांच्यापैकी कोणी आपली कामगिरी उत्तमप्रकारे बजावली तर त्याचे श्रेय त्यांना मिळू न देतां स्वतःच ते घेई व त्याबद्दल राजाकडून इनामही मिळवी. परंतु त्याच्या हातून कधी काही चूक घडल्याने राज्याचे नुकसान झाले तर ती चूक हाताखालच्या लोकांवर ढकली आणि त्यांच्या विरुद्ध राजाकडे तक्रार करी.

एकदां राजधानीच्या पूर्वीकडील दाराजवळ नेमलेल्या पाहारेकऱ्यांपैकी एकाने शत्रूच्या हेराला पकडले आणि आपला प्रमुख मंथर याच्यासमोर त्याला हजर केले.

मंथरने त्या पाहारेकऱ्याची वर वर स्तुती करून त्याला शाबासकी दिली व राजाकडे जाऊन म्हणाला—"महाराज, मी रात्री पूर्वेकडच्या महाद्वाराजवळ वेष पालटून आत शिरलेल्या एका हेराला पकडले आहे. माझ्या हाताखालचे पाहरेकरी आपल्या कर्तव्याचे पालन करण्यात चुकारपणा करतात."

"ते तर मलाही दिसतंच आहे. तू दलप्रमुख आहेस आणि तुलाच हे काम करावं लागलं म्हणजे हे पाहरेकरी करताहेत तरी काय? फुकटाचा पगार खात आहेत! त्यावेळी तेथे जो पाहाऱ्यावर होता त्याला एक आठवडाभर कामावर येऊ नकोस म्हणून सांग. त्याचा एक आठवडाभराचा पगार कापून टाक आणि त्याला चांगली तंबी दे!"

नंतर राजाने मंथर आपल्या कामात कर्तव्यनिष्ठ असल्याबद्दल त्याची पाठ थोपटली आणि दरबारात त्या गोष्टीचा उल्लेख करून त्याचा सत्कारही केला. शत्रूच्या हेराला पकडून देणाऱ्या पाहरेकऱ्याच्या मनाला ती गोष्ट फार लागली.



राजाचा प्रधान रुद्रनाग हा धर्मभीरु व न्यायपरायण शासक होता. राज्याचे अधिकारी किंवा प्रजा आपले कष्टसुख निवेदन करायला सरळ प्रधानाकडे निर्भयपणे जात येत. तो पाहारेकरी प्रधानाकडे गेला व त्याने त्याच्यावर झालेल्या अन्यायाचे गाऱ्हाणे निवेदन केले.

प्रधानाच्या कानावर, मंथरच्या या स्वार्थबुद्धीविरुद्ध अनेक कागाळ्या त्या पूर्वीच आल्या होत्या. परंतु प्रत्यक्ष कोणी येऊन फिर्याद करून न्याय मागितला नव्हता. म्हणून प्रधानाला काहीच करणे शक्य नव्हते. त्याने कैदेत पडलेल्या शत्रूच्या हेराकडे आपल्या नोकराला पाठविले वास्तविक काय घडले हे विचारून यायला सांगितले.

नंतर तो पाहारेकऱ्याला म्हणाला—"तू जास्त काळजी करण्याचे कारण नाही. न्यायोचित जें करणे योग्य होईल तेच करीन. तू एका आठवड्यानंतर कामावर हजर हो. हजर झाल्यावर मी सांगतो तसे कर." असे पाहारेकऱ्याला सांगून त्याने काय करायचे ते समजावून सांगितले.

आठवडा लोटल्यावर पाहारेकरी कामावर रुजू झाला व त्याने आणखी एका हेराला पकडले आणि मंथरकडे त्याला घेऊन गेला. मंथरला फार आनंद झाला. पगार कापल्यामुळे पूर्वी जे नुकसान झाले होते त्याची भरपाई करून देतो असेही त्याने सांगितले.

राजा दरबारात बसला असतां मंथर त्या शत्रूच्या हेराला घेऊन राजाकडे गेला आणि म्हणाला—"महाराज, एक आठवडा जेमतेम लोटला असेल, शत्रूचा आणखी

श्री ना. स. सलोटे

एक हेर वेष पालटून राजधानीत शिरला आहे. दारावरचे पाहारेकरी आपली कामें, जबाबदारीने पार पाडीत नाहीत. रात्री पूर्वेकडील दारावरचे पाहारेकरी सावध आहेत की नाही, याची पाहाणी करण्यासाठी मी गेलो. त्यांनी, हा शत्रूचा हेर राजधानीचे दार पार करून आत शिरला हे पाहिलेही नाही. म्हणून मीच याला पकडून याच्या मुसक्या बांधल्या."

त्यावेळी राजाजवळच प्रधान रुद्रनाग बसलेला होता. त्याने त्या हेराला विचारले–"शत्रूच्या नागरिकाचा वेष धारण करून तू आमच्या देशातली गुपिते काढून घ्यायला आलास हा तुझा केवढा मूर्खपणा आहे, हे तुला कळलं नाहीसे दिसते आहे! म्हणून सहजी तू-सापडलास, होय ना?"

तो हेर थोडेसे स्मित करून म्हणाला–"प्रधानांनी क्षमा करावी! मी या देशाचाच नागरिक आहे. मी शेजारच्या नागरिकाचा वेष करून मी शेजारच्या राज्यात हेरगिरी करून परत आलो आहे! मी कोण हे पूर्वेकडच्या दारावरील पाहारेकऱ्यांना माहीत आहे."

ते ऐकून क्रुद्ध मुद्रेने मंथरकडे पहात म्हणाला–"हे मी काय ऐकतो आहे?"

मंथर घाबरून जाऊन थरथर कापू लागला आणि मान खाली करून गप्प उभा राहिला. प्रधान रुद्रनाग त्याला म्हणाला–"मागे एका हेराला स्वतः धरून आणले आहेस असे खोटे सांगून महाराजांकडून तू इनाम मिळविलेस. परंतु त्याला पकडले होते एका पाहारेकऱ्याने. तू आपल्या स्वार्थबुद्धीने त्याच्यावर खोटा आरोप लावलास आणि त्याला आठवडाभर कामावर हजर होऊ दिले नाहीस. तुझं ते बिंग बाहेर काढण्यासाठी हा घाट घालावा लागला होता."

मंथरने वर मान केली नाही. राजाने त्याला ताबडतोब कामावरून काढून टाकले व शत्रूच्या हेराला पकडणाऱ्या पूर्वेकडील दारावरच्या पाहारेकऱ्याला दल प्रमुखाच्या पदावर नेमले.



# बरोबर इलाज

दूरवर असलेल्या एका गावातून एक वैद्य विजयनगरात येऊन पोहोचला, त्याने आजूबाजूला कोणीही वैद्य नाही, अशा ठिकाणी आपला दवाखाना उघडला. त्याने ह्या गोष्टीची सूचना आजूबाजूच्या लोकांना जाऊन सांगितली.

एक आठवडा लोटला. परंतु एकही रोगी त्याच्याकडे इलाज करायला आला नाही. त्या गोष्टीचे वैद्याला खूप आश्चर्य वाटले. ह्याच गोष्टीचा विचार करीत असतांना एके दिवशी तो दारात जाऊन उभा राहिला. निरनिराळ्या रोगाने त्रस्त झालेले लोक त्याला दवाखान्याच्या समोर आलेले दिसले, परंतु ते बाहेरच्या बाहेर नजर टाकून परत जाऊ लागले

वैद्याने त्या लोकांना बोलावून आणले व विचारले–"तुम्ही लोक दवाखान्यापर्यंत येऊन स्वतःवर इलाज केल्याशिवायच परत कां जाऊ लागला आहांत?"

त्यातल्या एका आजारी माणसाने फुलांच्या ताटव्याकडे नजर टाकीत म्हटले–"फुलांचे हे ताटवे पाणी न घातल्यामुळे सुकत चालले आहेत. पैसे देऊन विकत घेतलेली ही रोपे आपण काळजीपूर्वक पहात नाही. अशा परिस्थितीत तुम्ही आमची अशी कोणती काळजी घेणार अशी शंका आमच्या मनांत उत्पन्न झाली. त्यामुळे आम्ही परत जाऊ लागलो.

तावडतोब वैद्याने पाणी आणून रोपांना घातले. त्या दिवसापासून तो फुलझाडाची पूर्णपणे काळजी घेऊ लागला, पाणी घालू लागला. दोन-आठवड्यांनी फुलांची झाडे हिरवीगार दिसू लागली. आजारी लोक सुद्धा एक एक करून त्याच्या दवाखान्यात उपचाराकरता येऊ लागले.





# खरा पाहुणचार

नित्यानंद नावांचा एक संन्यासी आपल्या शिष्यांबरोबर देशाटन करीत करीत एके दिवशी शिवपूर नावाच्या गावाजवळ येऊन पोहोचला. तोपर्यंत रात्र होऊन गेली होती. त्याच बरोबर वादळाची लक्षणे दिसू लागली होती. विजा चमकू लागल्या होत्या. ढगांचा गडगडाट होऊ लागला. नित्यानंद व त्याचे शिष्य धावत पळत एका धर्मशाळेत येऊन पोहोचले.

नित्यानंदाला प्रथमच माहित होते की, शिवपूर एक संपन्न गाव आहे. दहा वर्षा-पूर्वी जेव्हां तो दक्षिण यात्रा करावयास निघाला तेव्हां तो ह्या गावात आला होता. त्यावेळेस त्याचा तेथील लोकांनी उत्तम पाहुणचार ठेवला होता. त्यामुळे त्याला खात्री होती की, इतक्या रात्री सुद्धा त्याची व त्याच्या शिष्यांची चांगल्या तऱ्हेने खाण्या पिण्याची रहाण्याची बडदास्त ठेवली जाईल. त्याच विचाराने त्याने आपल्या दोन शिष्यांना आपला समाचार देण्याकरिता पाठवले.

तोपर्यंत अर्धी रात्र उलटली होती. जोरदार पाऊस पडू लागला होता. अशा परिस्थितीत त्याना खायला देण्याकरिता कोणीच तयार झाला नाही.

शिष्यांनी गावातून परत येऊन नित्या-नंदना ती गोष्ट सांगितली. त्यावर रागाने जळफळत. ओरडले–"काय हे! हे गाव इतके बिघडले आहे तर? रात्रभर उपवास करावा लागणार आपल्याला."

त्याच वेळी एक माणूस पावसात भिजत त्याच धर्मशाळेत आला. नित्यानंदाचे बोलणे ऐकून त्यांना नमस्कार करून आपला परिचय देत म्हणाला–"महाराज, माझे नाव राम-दास आहे. मी शेजार गावाहून परत जात असताना पावसात भिजल्यामुळे थोडा वेळ निवारा म्हणून ह्या धर्मशाळत आलो. मी ह्या गावचा राहाणारा आहे."

त्यावर नित्यानंद संतापून म्हणाले–"हे काय गाव आहे? तुम्ही लोक शेवटी साधूसंताचा आदर सत्कार करायला केव्हां शिकणार?"

"महाराज मी एक साधारण माणूस आहे. अशा वेळेला आपल्या सारखे साधू महाराज आले तर त्यांची रहाण्याची खाण्या-पिण्याची सोय करण्याकरिता आमच्या गावच्या बड्या लोकांची एकच झुंबड लागत असे. माझ्या सारख्या लोकांना त्यांचे दर्शन मिळणे सुद्धा अशक्य आहे. आज अशा जोरदार पावसात माझे भाग्यच उजळले म्हणायचे. मी आत्ताच घरी जातो व आपल्या सर्व लोकांकरिता जेवण्या-खाण्याची सोय करतो." रामदास म्हणाला.

नित्यानंदाने रामदासचे आतिथ्य आनं-दाने स्विकारले. पहाटे पहाटे नित्यानंदांना कळले की, जेवण तयार आहे. ते आपल्या शिष्यांबरोबर रामदासच्या घरी येऊन पोहोचले. तेथे एका छोटचा झोपडीत साध्या जेवणाची तयारी पाहून नित्यानंदाना राग आला व ते म्हणाले–"काय रे, हे साधे जेवण तयार करायला तुम्हांला इतका वेळ लागला? आता लवकर वाढायला सांग. सर्वजण भुकेले आहेत."



रामदास मोठ्या अदबीने हळू आवा-जात म्हणाला–"स्वामी, पावसामुळे सर्व वस्तू जमवून स्वयंपाक करायला थोडा उशीर झाला. कृपया आम्हांला माफ करा."

त्यानंतर जेवण वाढण्यात आले. नित्या-नंदाच्या एका शिष्याने जोराने ओरडून विचारले–"हे काय वरण आहे कां? ह्यांत मीठ कुठंय?"

दुसरा शिष्य रागावून म्हणाला–"भाजीत तर तिखटाचा पत्ताच नाही?"

तिसरा चेष्टेने म्हणाला–"आजच मला समजले की. खीर नावाचा प्रकार असाच करतात हे."

स. वि. देशमुख

अशा तऱ्हेने काहींना काही दोष काढून संन्यासी व त्याच्या शिष्यांनी कसेबसे आपले जेवण उरकले. जेव्हां नित्यानंद आपल्या शिष्यांसमवेत धर्मशाळेत निघाले तेव्हां रामदासने नित्यानंदांना हात जोडून विनंती केली. "स्वामी, आपण मला व माझ्या कुटुंबाला क्षमा करा. माझ्या बायकोने आपल्या अज्ञानामुळे स्वयंपाक करण्यास उशीर केला. सामान्य माणसाच्या सर्व इच्छा वासनांचा त्याग करून राहणारे साधू संन्यासी भूक तहान थोडावेळ तरी सहन करू शकत असतील. संन्यासी लोक खाण्या-पिण्याच्या बाबतीत चविष्ट पदार्थांची अभिलाषा धरत नसतील, अशा भ्रमात ती होती."

नित्यानंदांनी रामदासला काही उत्तर दिले नाही. गुपचूप तेथून निघून गेले.

चार महिन्यानंतर नित्यानंद दक्षिणेकडची यात्रा संपवून परत येत असतांना शिवपूरच्या त्याच धर्मशाळेत उतरले व आपल्या दोन शिष्यांना रामदासच्या घरी पाठवून जेवणास येत असल्याचे कळविण्यास व जेवण तयार ठेवण्यास विनंती करायला सांगितले.

रामदास नित्यानंदांच्याकडे जाऊन म्हणाला—"स्वामी, ह्याच्या आधी मला जो अनुभव मिळाला तो पाहून माझी चांगली खात्री झाली की, आपल्या सारख्या मोठ्या लोकांचा आदर-सत्कार करण्याची आमची लायकी नाही. त्यामुळे आपला पाहुणचार चांगल्या तऱ्हेने करू शकणार नाही, तेव्हां माफ करावे."

त्यावर नित्यानंद हसून म्हणाले—"रामदास, ह्या आधी मला जो अनुभव आला त्याच्या जोरावर मी एक अद्भुत सत्य ओळखू शकलो की साधारण माणसांकडून जे आतिथ्य साधू संन्याशांना मिळते ते काही लग्नकार्याचा आमंत्रणासारखे औपचारिक नसून मनापासून असते."

साधूच्या तोंडून ती गोष्ट ऐकून रामदास खूप आनंदित झाला व नित्यानंदांना व त्याच्या सर्व शिष्यांना आपल्या घरी आणून त्याने त्यांचा चांगला पाहुणचार करविला.





# याचना

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असता बोधिसत्वांनी गावातल्या विजयगुप्त नांवाच्या एका ब्राह्मण कुटुंबात जन्म घेतला. त्याचे वडील खूप गरीब होते. ते आपल्या एक एकर जमिनीत शेतीभाती करून कशीबशी उपजीविका चालवीत असत.

विजयगुप्त जेव्हां मोठा झाला. तेव्हां त्याने आपल्या आईवडिलांना सुखी ठेवण्याचे ठरविले. त्याने कोणत्याही परिस्थितीत शिक्षण संपादन करून राजदरबारात नोकरी मिळवायचा निश्चय केला. त्या परिस्थितीत सुद्धा तो आपल्या वडिलांना शेतात मदत करी. परंतु एक एकर जमिनीत कितीसे धान्य मिळणार, हा सर्व विचार करून विजयगुप्त आपल्या वडिलांना म्हणाला—"बाबा, मी तक्षशिला येथे जाऊन काही विद्या संपादन करावी म्हणतो." वडिलांनी त्याला परवानगी दिली.

विजयगुप्त तक्षशिला येथे येऊन पोहोचला. तेथे एका गुरूची सेवा-सुश्रूषा करून त्याने विद्या संपादन केली व आपल्या गावी परत आला. तेव्हां त्याचे वडील दोन बैलांना घेऊन सकाळपासून संध्याकाळपर्यंत शेतात राबत असलेले त्याला दिसले. ते पाहून विजयगुप्तने विचार केला की आता एक क्षणभर सुद्धा वेळ वाया न जाऊ देता दुसऱ्या दिवशीच काशीला निघाला व तेथे त्याने राजदरबारात नोकरी मिळविली.

त्यानंतर थोड्या दिवसांनी विजयगुप्तच्या वडिलांच्या दोन बैलांपैकी एक बैल मेला. कित्येक वर्षे तो बैल त्यांच्या कुटुंबाची सेवा करीत आला होता. त्यामुळ विजयगुप्तच्या वडिलांना आपला एक हातच तुटला असे वाटले. त्या परिस्थितीत त्यांनी विचार केला की मुलगा राजदरबारात नोकरी करीत आहे. राजाला सांगून तो

आपल्याला एक बैल देववील. ते काशीला गेले व आपल्या मुलाला भेटले.

सर्व गोष्टी ऐकून घेऊन विजयगुप्त आपल्या वडिलांना म्हणाला–"बाबा, तुम्ही व आई आता म्हातारे झाला आहात. कशाला त्रास करून घेता? तुम्ही दोघं माझ्याजवळ येऊन रहा व आराम करून आपले दिवस घालवा.

परंतु त्यांच्या वडिलांना ते मान्य झाले नाही. ते हट्ट करून म्हणाले–"मला जन्मभूमीला सोडून जाणे पसंत नाही. माझे मरण आपल्या जन्मभूमीतच झाले पाहिजे. तू एक बैल मिळवून देऊ शकलास तर शेतीभाती करून मी माझे आयुष्य मजेत घालवू शकेन. तेथे मला जे स्वास्थ मिळते ते मला इथे मिळू शकणार नाही!"

विजयगुप्त थोड्याच दिवसांपासून राजदरबारात नोकरीला लागला होता. तेव्हां त्याच्याकडे बैल खरेदी करण्याइतके धन नव्हते. त्याचबरोबर राजाकडे मागणे सुद्धा बरोबर दिसणार नव्हते. कारण राजाला मागणे सुद्धा बरोबर दिसणार नव्हते. कारण राजाला मनातून वाटले की नुकताच काही दिवसापूर्वी हा नोकरीला लागला आहे आणि लगेच आपल्या समोर हात पसरून मागतो आहे. हा विचार करून विजयगुप्त आपल्या वडिलांना म्हणाला–"बाबा, जर का मी राजाकडे एक बैल मागितला तर ते तुला बैल कशाला पाहिजे? आणि दुसरे मी राजदरबारात नोकरी करणारा राजाकडे मागणे चांगले दिसणार नाही. तेव्हां आपणच जाऊन त्यांना विनंती करा की आपल्याला एक बैल त्यानी द्यावा माझी खात्री आहे की ते आपल्याला एक बैल देतील."

परंतु विजयगुप्तच्या वडिलांना ती गोष्ट काही आवडली नाही. तो आपल्या मुलाला अधिकार वाणीने म्हणाला–"मुला, मी एक शेतकरी आहे, नांगर सोडून दुसरे काही मला माहित नाही. कुठे राजा? आणि कुठला दरबार? आणि कुठे मी? दरबारात ठेवून माझ्या तोंडून शब्द बाहेर पडणार नाहीत. राजाबरोबर कशा तऱ्हेने बोलावे. कशा तऱ्हेने वागावे हे सर्व मला माहीत नाही. तेव्हां तूच माझे काम कसे तरी करून दे."

"तर मग मी एक उपाय सांगतो: मी एक श्लोक लिहून देतो तो एक दोन दिवसांत पाठ करून राजदरबारात जाऊन आपण तो राजाला ऐकवा. तेव्हां तुमचे काम नक्की होईल! असे सांगून विजयगुप्तने आपल्या वडिलांच्यात धैर्य आणले. त्यानंतर त्याने श्लोक लिहून देऊन तो आपल्या वडिलांच्याकडून पाठ करवून घेतला.

द्वे मे गोणा, महाराज,
येहि खेत्तं कसामसे;
तेसु एको मतोदेव,
दुतियं देहि खत्तिय ।।





याचा अर्थ असा आहे–"महाराज माझ्याजवळ दोन बैल होते. त्यांच्या मदतीने मी माझी शेतीची कामे चालवीत होतो. प्रभो, त्यातील एक बैल मेला. तेव्हां महाराज, मला दुसरा बैल द्यावा."

म्हाताऱ्या बापाने मोठ्या कष्टाने तो श्लोक पाठ केला. एके दिवशी विजयगुप्त आपल्या वडिलांना घेऊन राजदरबारात आला. आपल्या मुलाने सांगितल्या प्रमाणे म्हाताऱ्याने राजा व मंत्र्यांना नमस्कार केला व हात जोडून विनयपूर्वक उभा राहिला.

"तू कोण आहेस? काय पाहिजे आहे?" राजाने विचारले. म्हाताऱ्याने तावडतोब पाठ केलेला श्लोक म्हणून दाखविला. परंतु घाबरल्यामुळे त्या श्लोकात थोडासा फेरबदल झाला.

द्वे मे गोणा, महाराज,
येहि खेतं कसामसे;
तेसु एको मतोदेव,
दुतियं गण्ह खतिय ।"

हा श्लोक ऐकून सर्व दरबारी लोक हसू लागले. विजयगुप्तने लाजेने आपली मान खाली घातली कारण त्याच्या वडिलांनी घाबरून जाऊन मला दुसरा बैल देववा सांगण्याऐवजी असे सांगितले–"माझ्या दुसऱ्या बैलाला, घेऊन टाका."

ह्यावर राजाने हसून विचारले–"तुम्ही आपल्या बैलाला मला देण्याकरिता का आपल्या घरातून एवढे दूरवर आलांत?"

"महाराज, पाहिजे तर आपण त्या बैलाला घेऊन टाका, कारण काय, तर त्यामुळे एवढा सारा गोंधळ निर्माण झाला आहे." असे सांगून म्हाताऱ्याने राजाला सर्व गोष्ट ऐकविली. विजयगुप्तच्या चांगुलपणाची स्तुती करीत राजा खुष झाला. कारण त्याच्या दरबारात जे लोक होते ते सर्व लहानसहान गोष्टी घेऊन राजाकडे येऊन याचना करणारे होते, परंतु विजयगुप्त असा नव्हता. त्यावर खुष होऊन राजाने आठ बैलाच्या जोडयांना खूप सजवून त्या विजयगुप्तच्या वडिलांना दान केल्या.





# सुलताना रजिया

दिल्लीची राणी सुलताना रजिया ही शौर्य, पराक्रम व न्याय देण्यात परिपूर्ण होती. ती स्वतःच्या चरित्राच्या बाबतीत दुसऱ्या कोणत्याही लोकांची पर्वा करणारी नव्हती. ती पुरुषी पोषाख घालत असे. घोडेस्वारी तर तिला प्राणप्रिय होती.

रजिया एकदा घोडयावर बसून जात असतांना एकदा एका मोठ्या संकटात सापडून खाली पडणार होती. तिला याकूत नावाच्या अरबी घोडेस्वाराच्या प्रमुखाने वाचविले. त्यामुळे रजियाला त्याच्या विषयी प्रेम वाटू लागले. याकूत खूप हुषार व धूर्त होता.





हळू हळू रजियाचे याकूतवर प्रेम बसू लागले. ते दोघे नेहमी राजमहालात व बगिच्यात भेटत असत. त्यांच्या भेटीगाठी दरबारातील काही सरदारांना पसंत नव्हत्या त्यामुळे सरदारांना तिचा खूप राग येऊ लागला.



रजियाच्या दरबारात जे तुर्की सरदार होते. ते शक्तीत जास्त बलवान व दरबारात अधिकार प्राप्त करणारे असे होते. ते अरबी याकूतवर मनापासून द्वेष करू लागले. त्या लोकांनी ठरविले की, रजियाला दिल्लीच्या गादीवरून काढून टाकून अशा एखाद्या माणसास बसवावे की त्याच्या इशारा सर्वांनी मानला पाहिजे.

सरदारांच्या गुप्त कटाचा शोध काढून रजियाच्या दासीने रजियाला सर्व सांगितले. तिने कोणतेही अयोग्य वर्तन केलेले नाही. त्यामुळे ती त्या सरदा-रांना भिणार नाही.





रजिया गप्प बसणारी नव्हती. तिने सर्व सरदारांना बोलावून घेतले व म्हणाली–"दिल्लीची राणी होऊन मी माझी जबाबदारी चांगली ओळखते. मला कोणाशी मैत्री करायची व कोणाशी वैर करायचे हे तुम्ही सांग-ण्याची गरज नाही." परंतु ईर्ष्याग्नीने जळणाऱ्या सरदारांना रजिया म्हणाली ते आवडले नाही.



एक दिवस अचानक तुर्की सरदारांनी याकूतच्या घराला वेढा घातला. याकूतने आपली तलवार उपसून आत्मरक्षणाकरिता त्यांच्यावर हल्ला केला. परंतु सरदारांनी एकजुटीने त्याच्यावर हल्ला करून त्याला ठार केले. ह्या तऱ्हेने रजियाचा प्रेमी निर्दोषी असून सुद्धा मारला गेला.

त्यानंतर सरदारानी रजियाला किल्ल्या-तील एका खोलीत बंद करून ठेवले व तुर्की सैनिकांना तिच्यावर पहारा देण्यास ठेवले.






रजियाने कैदेत असतांना तुर्की सरदार अल्तूनिया याला एक चिठ्ठी पाठविली व अल्तूनियाशी गुप्त रूपाने भेट घेतली. त्यावेळेस रजियाच्या सौंदर्यावर भाळून अल्तूनियाने आपले प्राण गेले तरी चालतील पण रजियाला कैदेतून मोकळे करण्याची शपथ घेतली.

त्यानंतर अल्टूमियाने एका छोट्या सैन्यानिशी रजियाच्या कैदखान्यावर चाल केली व तिच्यावर पहारा देणाऱ्या सर्व सरदारांना पळवून लावले. ह्यामूळे रजियाने अल्टूमियाशी लग्न केले. मध्यंतरी रजियाच्या सावत्र भावाने दिल्लीची सत्ता बळकावली होती.





अल्टूमियाने पुन्हा रजियाला दिल्लीची राणी करण्याचा निश्चय केला तो रजियाला घेऊन थोड्या सैन्यानिशी दिल्लीवर चाल करण्यास निघाला. ही बातमी मिळताच तुर्की सरदारांनी मोठ्या हिमतीने मोठे सैन्य गोळा केले.

थोड्या दिवसांनी दोघांमध्ये भयंकर लढाई झाली. रजियाने व अल्टूमियाने लढाईत आपले साहस व शौर्य दाखविले. परंतु शक्तिशाली शत्रूचा विजय झाला. तुर्की सरदारांनी रजिया व अल्टूमियाला आपले बंदी केले व दोघांना ठार केले. अशा तऱ्हेने जगाच्या इतिहासातील सुप्रसिद्ध रजिया सुलतानाचे आयुष्य संपुष्टात आले.



# धाडसाची गुप्तता

गंगापुरात चार मित्र रहात होते. त्यातील सदाशिव खूप भितरा होता. रात्रीच्या वेळी घरातून बाहेर पडण्यास तो घाबरत असे.

एके दिवशी सदाशिवचे सर्व मित्र त्याची टिंगल करू लागले–"तुझ्या सारखा भितरा माणूस जगात दूसरा कोणी नसेल. जर का तुझ्या हिंमतीची कोणी परीक्षा घ्यायची ठरविली तर मात्र तुझा भितरेपणा बाहेर येईल."

"जर कां नावापुरताच माझ्यावर डाव टाकलात. तर मी काही मान्य करणार नाही पण जर चांगल्या रकमेने माझ्यावर डाव टाकलात तर मी माझ्या हिमतीचे प्रदर्शन नक्की करून दाखवीन सदाशिवने अट घातली."

"अस्सं ? तर मग आम्ही सर्वजण शंभर रुपयांची पैज लावतो. रात्रीच्या वेळी जर तु एकटाच स्मशानात जाऊन आलास तर आम्ही तुला शंभर रुपये देऊ. नाहीतर तू आम्हाला शंभर रुपये दिले पाहिजेस." मित्रांनी पैज लावली.

सदाशिवने ती पैज मान्य केली. अर्ध्या रात्री तो स्मशानात जाऊन परत आला आणि शंभर रुपये देण्याची मित्रांकडे विनंती केली.

मित्रांनी शंभर रूपये सदाशिवच्या हातात देत विचारले–"संध्याकाळ झाली की घराबाहेर न पडणारा तू भितरा, अशा मध्यरात्री एकटा स्मशानात जाऊन कसा आलास."

"ही पैज काही पांच दहा रुपयांची नाही चांगली पूर्ण शंभररुपयांची आहे. मला पहिल्यापासूनच माहीत होते की, माझी परीक्षा पहाण्याकरिता मी स्मशानात जाऊन परत येतो कां नाही हे बघायला तुम्ही तिघेजण नक्कीच थोड्या वेळाने माझ्या पाठोपाठ तेथे याल." सदाशिवने उत्तर दिले.





# दोनकवी

गोपाळशास्त्री एक प्रसिद्ध कवी होता. त्याने आपल्या कवितेच्या संदर्भात अनेक पारितोषिक मिळविली. त्यामुळे त्याचा गर्व पण हळूहळू वाढू लागला.

सोमुशास्त्रीपण एक चांगला कवी होता. परंतु परिस्थितीमुळे त्याला तेवढी प्रासिद्धी मिळाली नाही. तसे ते दोघेही एकाच गावात रहाणारे होते.

गोपालशास्त्री नेहमी सोमूशास्त्रीला सांगत असे–"तुझ्या कवितेमध्ये काहीतरी कमी आहे, जर तू त्यात सुधारणा करु शकलास तर माझ्यासारखा लोकप्रिय कवी होऊ शकशील."

सोमूशास्त्रीला गोपाळशास्त्रीचे बोलणे आवडत नव्हते. त्याला वाटे की परिस्थिती त्याला अनुकूल नाही. म्हणून आपल्या कवितेला लोकप्रियता मिळत नाही, तसे आपणही कोणत्याही बाबतीत गोपाळशास्त्रीपेक्षा कमी नाही. एकदा विष्णुपूरच्या जमिनदाराने दसरा उत्सवात एक छोटे कवि संमेलन करण्याचा विचार केला. व गोपाळशास्त्रींना त्याचे अध्यक्ष होण्याची विनंती केली.

ही गोष्ट कळताच कित्येक लहान मोठे कवी पारितोषिक मिळविण्याच्या आशेने गोपाळशास्त्रीच्या आश्रयाला येऊन राहिले. सोमुशास्त्री त्याला भेटण्यासही आला नाही त्याला विश्वास होता. की, गोपाळशास्त्रीची भेट न घेता सुद्धा तो कवि संमेलनाला जरूर आमंत्रण देईल.

परंतु गोपाळशास्त्रीने सोमुशास्त्रीला निमंत्रण पाठवले नाही. या उलट ह्याने जे सोमुशास्त्रीच्या आश्रयाला जाऊन राहिले होते, त्यांना सुद्धा निमंत्रण पाठवले. त्यामुळे सोमुशास्त्रीला राग आला.

गोपाळशास्त्रीने कवि संमेलनाहून परत येऊन सोमूशास्त्रीला तेथील सर्व वृत्तांत सांगितला. विष्णुपूरच्या जमिनदाराच्या हातून अनेक लहानमोठ्या कवींना लहान मोठी पारितोषिक मिळाली व फक्त गोपाळशास्त्रींना एक हजार रुपये रोख इनाम मिळाले त्याचबरोबर त्याच्या कवीतेविषयी स्तुतीपर मोठे भाषणपण देण्यात आले.

शेवटी गोपाळशास्त्री आपलीच स्तुती करीत म्हणाले–"माझ्या आयुष्यात अशी गोष्ट घडली आहे की, ती कधीही विसरता येणार नाही." कोणताही कवी, ह्याहून जास्त कशाची अपेक्षा करणार.

प्रथमच सोमूशास्त्रीचा त्याच्यावर राग होता. आता आणखीच जास्त वाढला. तरी पण आपला राग कष्टाने आवरत आवाज न वाढविता सोमुशास्त्री म्हणाला–"तुम्ही कधी तरी अमरपुरीच्या जमिनदाराला भेटला आहात का?"

"नाही. पण हे सांग की त्याच्यात असे कोणते विशेष गुण आहेत?" गोपाळशास्त्रीने विचारले.

"असे ऐकले आहे की, कवितेची वैशिष्टये जाणून त्यांचे मोजमाप ते करतात. त्याने कित्येक कवींच्या कविता वाचून जरूर आनंद मिळविला असेल. त्यांचा सत्कारसुद्धा केला असेल. परंतु आजपर्यंत त्यांनी स्वत: कोणत्याही कवींची स्तुती कधीही केलेली नाही. जर कां, ते तुमच्या कवितेची स्तुती करून कोणतेही वाक्य बोलतील तर मी मान्य करीन की तुम्ही खरोखरी एक श्रेष्ठ कवी आहांत."



संजीव रेगे

सोमुशास्त्रीने पैज लावली. गोपाळशास्त्री रागाने म्हणाले–"असे वाटते आहे की, तुम्ही माझ्या विरुद्ध जरूर कोणतातरी कट रचून आला आहांत?"

"तुम्ही पैज लावण्याची तयारी केली म्हणून मीही तुमच्याबरोबर पैज लावतो, अमरपुरीच्या जमिनदाराने तुमची कविता ऐकून तुमची स्तुती करीत काही म्हटले तर मी तुम्हांला एक हजार रुपये देईन आणि जर बोलले नाहीत तर तुम्ही मला हजार रुपये दिले पाहिजेत. सोमुशास्त्री म्हणाले.

"आजपर्यंत मी माझ्या आयुष्यात 'पराजय' हा शब्द कधी मानला नाही मी, उद्याच सकाळी अमरपुरीला निघून जाईन." गोपाळशास्त्री संतापाने म्हणाला.

"ठीक आहे, ही गोष्ट सुद्धा तुमच्या आयुष्यात कधीही विसरली जाणार नाही हे नक्की होईल." सोमूशास्त्री म्हणाला.

दोन दिवसांनंतर गोपाळशास्त्री सोमूशास्त्रींना भेटायला आले. म्हणाले–"अरे, बघ तरी, मी एक हजार रुपये जिंकले. अमरपुरीच्या जमिनदाराने माझ्या कवितेची स्तुती करीत आपल्या हाताने हे प्रशस्तिपत्रक मला लिहून दिले आहे." असे म्हणत गोपाळशास्त्र्यांनी सोमुशास्त्रींच्या हातात एक कागद दिला.

"मी हे त्यांचे हस्ताक्षर नाही असे म्हणत नाहीं माझी पैज एवढीच होती की, जमीनदाराने स्वतःच्या तोंडाने तुझ्या कवितेची स्तुती करावी, परंतु असे झाले नाहीं नां? त्यामुळे तू हारलास आता एक हजार रुपये मला दे."

गोपाळशास्त्री उदास होत म्हणाले– "जर का मला पूर्वीच माहित असते की जमीनदार मुके आहेत तर मी ही पैज लावलीच नसती. झाले ते झाले, पैजेची रक्कम मी उद्या मागवून तुला देतो."

सोमुशास्त्री आपले हसणे दाबून धरीत म्हणाले–"पाहिलेस नां? तू एक महिनापण झाला नाही, तोंच आयुष्यात विसर पडणार नाही, आशा दोन गोष्टी पाहिल्यास."





# भुतें-वडावरची विहिरीतली

सासरी गेलेली मुलगी एक आठवडा लोटण्याच्या आतच परतलेली पाहून अनुताईंनी आश्चर्यचकित होऊन मुलीला विचारले–"हे काय ग राधा! पत्र नाही, निरोप नाही आणि अशी अवेळी एकाएकी कशी काय परत आलीस?"

राधा भाड्याच्या गाडीतून उतरतां उतरतांच ओक्साबोक्शी रडत म्हणाली– "मला लगेच एक हजार रुपये पाहिजेत. नवा पलंग, खुर्च्या, टेबलं विकत घेऊन त्या रुक्मिणीच्या पोटात गोळा उभा राहील असे करावयाचे आहे!"

अनुताईंना डोक्यावर वीज पडल्यासारखं झालं! एका आठवड्यापूर्वीच तर संक्रांतीला जांवई व मुलगी येऊन सण करून गेली होती. रेशमी जरीची धोतर जोडी व पैठणी देऊन पाठविलं होतं त्यांना! आतां पुन्हां एक हजार रुपये पाहिजे म्हणत आहेत, तर आणायचे कोठून?

मनात उडालेली खळबळ मनातच दाबून त्या म्हणाल्या–"ये, पहिल्याने हातपाय धुवून जेवून घे, नंतर सावकाश सर्व बोलू!"

राधा इतक्या घाईघाईने सासरहून परत येऊन आईजवळ एक हजार रुपये मागायला गेली त्याला तसंच कारण झालं. राधा राही त्या घराला लागूनच्या बिऱ्हाडात 'खूप सुंदर' म्हणून चार चौघी शेजारणींच्या तोंडून ऐकलेली रुक्मिणी नावाची एक गृहिणी रहात होती. ती गोरी पान होती. घरात पलंग, खुर्च्या, ड्रेसिंग टेबल वगैरे सामान होतं. आणि ती घरही कसे स्वच्छ आरशासारखं ठेवी.

परंतु राधा माहेरून सासरी गेली त्याच्या आधी काही दिवसांपूर्वीच रुक्मिणीने

श्री श्री न. ढोबळ



नवऱ्याबरोबर संसारात पाऊल टाकले होते. गोरीपान तर होतीच. तिचे काळेभोर केस लांबसडक होते. तिने माहेरून आणलेले सर्व खुर्च्या टेबल वगैरे नवे कोरे होते. शेजारपाजारच्या बायका रुक्मिणीचे सौंदर्य व तिच्या घरची टापटीप वर्णन करून राधाला सांगत. त्या प्रत्यक्ष म्हणत नसल्या तरी त्यांच्या बोलण्याच्या पद्धतीवरून रुक्मिणीचे सौंदर्य सूर्यासारखं तर राधा एखाद्या दिवटी सारखी होती.

राधाच्या मनात रुक्मिणी विरुद्ध मत्सर रागनी भडकला. रुक्मिणी तिच्याशी एक-दोनदां बोलायला गेली तर तिला ते न आवडल्यासारखा आविर्भाव करून राधा पाठ फिरवून निघून गेली. तिने नवीन पलंग, ड्रेसिंग टेबल वगैरे घेण्याची इच्छा पतीजवळ व्यक्त केली तेव्हां त्याने आपल्या-कडे आहे ते पुरे नाही का, म्हणून ती गोष्ट टाळली. राधा मनातल्या मनात जळफळली आणि त्या रागात माहेरी निघून गेली.

अनुताईंनी मुलीला जेवायला वाढत असतां सर्व गोष्टी विचारून घेतल्या आणि तिची समजूत घालण्याच्या हेतूने म्हणाल्या— "मुली, वाघाला पाहून त्याचं सोंग करणाऱ्या कोल्ह्यासारखं का आपण करायचं? तिच्याशी ही चढाओढ आणि मत्सर कशाला?"

"मी कोल्हा नाही बरं का! या सगळ्या गोष्टींची गरज नाही. तू मला एक हजार रुपये दे, मी आपल्या वाटेने निघून जाईन!" राधा उद्धटपणाने म्हणाली.

"आपल्या परसात बदामाचं झाड आहे. त्याला पैसे लागतात वाटतं? तू काय समजून आलीस माझ्याकडे पैसे मागायला? माझ्याजवळ एक फुटकी कवडी ही नाहीं; तुझे बाबाही घरी नाहीत. असले तरी तू मागितल्याबरोबर थैली काढून ओतायला त्यांच्यात तरी एवढी शक्ती कोठे आहे?" अनुताईंनी कठोरगोड शब्दात आपली बाजू मांडली.

राधा तशीच पानावरून उठली आणि हात धुवून सासरी जायला निघाली.

"सूर्यास्त व्हायला फार वेळ लागणार नाही आणि तू जाते आहेस त्या वाटेवर जंगल आहे. तू आपल्या गावी पोचे पर्यंत अर्धी रात्र उलटून जाईल. म्हणून तू सकाळी उठून जा!" या शब्दांत अनुताईंनी मुलीला समजावून सांगण्याचा खूप प्रयत्न करून पाहिला.

परंतु राधाने आईच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले आणि भाड्याची गाडी ठरवून निघाली काळोख पडू लागला. त्यावेळी जंगलाची वाट सुरू झाली होती. काही अंतर गेल्यावर राधा घाबरून गेली आणि बाहेरच्या काळोखाकडे व जंगलाकडे पहात गाडी-वानाला म्हणाली—"या जंगलात कोठे जुनी पडकी विहीर आणि उंबराचं झाड आहे, म्हणे. तेथे भुतं दिवसासुद्धा धिंगाणा घालीत असतात, म्हणे! तू जरा गाडी जोराने चालवतोस का?"

गाडीवान म्हणाला—"बाई, ती भुतं आपल्यासारख्या साध्या भोळ्या माण-सांच्या वाटेस मुळीच जात नाहीत. लोभी, चिक्कू आणि मत्सर मनात असणाऱ्या माणसांना मात्र सोडीत नाहीत. तुम्ही डोळे मिटून गाडीत स्वस्थ झोपा कशा! तुम्ही उठ.ल तेव्हां गाडी तुमच्या घरासमोर उभी झालेली तुम्हांला दिसेल."

राधाने लुगडे उशाशी घेतले आणि डोळे मिटून गाडीत सोईची जागा करून घेऊन झोपली. काही वेळाने गाडीला जोराचा हिसका बसला व गाडी थांबली





राधा दचकून उठून बसली. घोडा वाकडा तिकडा चालत होता आणि त्याच्या तोंडातून फेस येत होता. तो एकदम जमिनीवर पडला.

गाडीवानाने खाली उतरून घोड्याच्या पाठीवर हात फिरवून पाहिले व म्हणाला– "बाई! या घोड्याला एकाएकी काय झालं कळत नाही. तुम्ही हळूहळू चालू लागा, मी शेजारच्या गावात कोठेतरी जाऊन वैद्याला बोलावून आणतो.

राधा भीतभीतच निघाली. ती थोडे अंतर चालून गेली असेल, तिला एक मोठे वडाचे झाड दिसले. त्याच्या खाली एक विहीर दिसली. झाडाच्या फांदीवर एक भूत होते. विहिरीच्या काठावर आणखी एक भूत होते. दोघांचे मोठमोठ्याने भांडण चालू होते.

"मी उंचावर राहातो. किलबिल करीत पक्षी वरच बसतात व उडतात. थंडगार वारावरच तर आम्हांला मिळतो. म्हणून मीच मोठा!" झाडावरचं भूत म्हणाले.

"मी जमिनीला धरून असतो. मोठमोठ्या झाडांनासुद्धा जमिनीचाच तर आधार असतो. त्यांना अन्नपाणी लागतं ते जमिनीतूनच तर मिळतं. म्हणून मीच मोठा!" विहिरीतीलं भूत म्हणाले.

"वेळ घालवायला वरच यावं लागतं!" वडावरचं भूत म्हणालं.

"शहाणाच आहेस! जमिनीवरच तर विश्रांती मिळते!" विहिरीतलं भूत म्हणालं.

इतक्यात धापा टाकीत 'आईग' 'बाबारे' 'रामारे' असं म्हणत चालत येत असलेली राधा त्यांना दिसली.

"ती पहा कोणी तरी मुलगी येते आहे. आपल्यात कोण मोठा, आपण तिला विचारू या!" असा विचार करून दोघां भुतांनी राधाला हाक मारली.

निसटून जायला वाटच नव्हती, म्हणून काही फायद्याचं असलं तर पहावे, असा विचार करून राधा त्यांच्या जवळ गेली.



भुतांनी त्यांचे भांडण ज्या गोष्टी करितां चाललं होतं ते सांगून तिला विचारले–"आतां तूच सांग, आमच्या पैकी खरोखरी मोठं कोण?"

राधाला भुतांपासून काही नुकसान होणार नाही, याची खात्री होताच ती म्हणाली–"मोठेपण हे कोण कोठे राहतो यावर अवलंबून नसतं, शक्तिसामर्थ्यावर अवलंबून असतं,–म्हणजे, कोण किती पैसे देऊ शकतो, यावरून ठरतं!"

झाडावरच्या भुताने फांद्या हलविल्या. 'खण् खण्' करून सोन्याची नाणी खाली पडली. विहिरीतील सोन्याची नाणी वर फेंकली. तिने दोघांनी दिलेली नाणी आपली पिशवी भरून गोळा केली. नंतर म्हणाली– "सोन्याची नाणी उत्पन्न करण्यात तुम्ही दोघे समसमान आहां! म्हणून आणखी एक परीक्षा घेणे आवश्यक आहे. आमच्या घराशेजारी एक जोडपं राहातं आहे. नवरा, बायकोला जनावरासारखा वागवतो आहे. ती गोरीपान आहे व तिची वेणी लांब काळीभोर आहे. पुरुषांना बायकी काळी आणि केस पांढरे असले तरच आवडते. म्हणून तिचा रंग गोऱ्या ऐवजी काळा आणि केस काळे करील त्यावरून लहान कोण आणि मोठा कोण हे ठरवायला सोपे जाईल!" रुक्मिणीचे ते विकृत रूप पहायला मिळाले तर तिची मान खाली होईल, हा दुष्ट हेतू राधाच्या मनात होता.



दोन्ही भुते म्हणाली–"हत् तिच्या! हे काम आम्ही एका क्षणार्धात करून दाखवितो!"

परंतु राधा निघून गेल्यावर त्यांच्या मनात एक शंका आली की ती आपल्या शेजारणीविषयी म्हणाली खरी, पण ते शेजार कोणत्या बाजूचे? उजव्या बाजूचं की डाव्या, हे तिने सांगितलंच नाही. तेव्हां त्यांच्याशी इतकी प्रेमाने जी बोलली तिचंच हित कां करू नये असा विचार करून त्यांनी तिला काळी केली व तिचे केस पांढरे केले.

मध्यरात्री कोणीतरी दार ठोठावलं म्हणून राधाच्या नवऱ्याने दार उघडलं आणि तिला पाहून घाबरून ओरडला.

तिने विचारलं–"अहो, असे घाबरलात कां? मी राधा!"

"तू राधा आहेस की एखादं भूत? काळीकुट्ट आणि सर्व केस पांढरे शुभ्र...!" म्हणत नवरा दार बंद करू लागला.

रुक्मिणीऐवजी भुतांनी आपल्याला कुरूपिणी केलं वाटतं, ओळखून राधा मोठ्याने ओरडून बेशुद्ध होऊन जमिनीवर पडली.

"कां हो बाई अशा ओरडलात? वाईट स्वप्न पडलं का?" म्हणत कोणीतरी खांद्याला हात लावला तेव्हां राधाने डोळे उघडून पाहिले.

त्यावेळी भाड्याची गाडी जंगलातली वाट ओलांडून गावात पोचली होती. तिला खांदा हलवून विचारणारा तो गाडीवानच होता. आपल्याकडे आश्चर्यचकित होऊन पाहणाऱ्या त्या गाडीवानाला पाहून राधाने विचार केला, म्हणजे आतापर्यंत घडलं ते सर्व स्वप्नच होतं तर! असं स्वप्न पडण्याचं कारण राधाच्या मनात रुक्मिणी विषयी भडकलेला मत्सराग्नीच होता, हे तिने ओळखले.

तिने घरी पोचताच शेजारच्या विऱ्हाडी गेली व प्रेमाने रुक्मिणीला हाक मारून म्हणाली–"आजपर्यंत मी सांगितले नाही, पण अक्का, तू खरोखरच फार सुंदर आहेस बघ! मला मोठी बहीण नाही, तुझ्या मुळे ती उणीव उरली नाही, मोठी बहीण मिळाली!"

मागे आपल्याकडे पाहून तोंड फिरवून घेणाऱ्या शेजारणीने इतक्या प्रेमाने यावेळी आपल्याला 'अक्का!" म्हणून हाक मारावं, याबद्दल रुक्मिणीला फार आनंद झाला. म्हणाली–"तुला अक्का नसल्याची उणीव माझ्यामुळे नाहीशी झाली तर मला लहान बहीण नसल्याची उणीव तुझ्यामुळे भासत नाहीशी झाली. मी सैंपाक वगैरे उरकून तुझ्याकडे येते हं!"





# गुणवती

फार पूर्वी कांचीपुरम् येथे शक्तिसार नावाचा एक वैश्य तरुण युवक रहात असे. वाडवडिलांपासून चालत आलेला व्यापार धंदा करून त्याने लक्षावधी रुपये मिळविले. वीस वर्षे उलटल्यावर त्याने लग्न करून घ्यायचा विचार केला.

बायकोच्या सद्गुणांवरच संसारसुख अवलंबून असते असे थोरामोठ्यांच्या कडून त्याने ऐकले होते. म्हणून सद्गुणी मुलीला शोधून तिच्याशी लग्न करायचे त्याने ठरविले. स्वतःच चांगल्या मुलीची निवड करायचे ठरवून तो देशाटनाला निघाला.

शक्तिसारला हस्तसामुद्रिक चांगलं माहीत होते. म्हणून त्या निमित्ताने त्याने अनेक मुलींचे हात पाहिले. त्याला जी मुलगी चांगली म्हणून वाटे तिची तो एक छोटीशी परीक्षा घेत असे.

त्या प्रवासात तो नेहमी आपल्याबरोबर दोन शेर भात म्हणजे साळी ठेवीत असे. ते भात तो त्याला जी मुलगी पसंत पडे तिला देऊन सांगे–"मुली, हे भात घेऊन मला एक वेळ सैंपाक करून वाढशील का?" ते ऐकून काही मुली त्याच्याकडे तो वेडा तर नाही अशा तऱ्हेने पहात व पदराआड तोंड ठेवून हसत व विचारीत–"हे हो कसं जमेल?" परंतु एकीनेही त्याने सांगितल्या-प्रमाणे त्याला सैंपाक करून वाढायचं कबूल केलं नाही.

अशा तऱ्हेने मुली पहात जात असतां एके दिवशी कावेरी नदीच्या काठावर एका झोपडीत त्याला गुणवती नांवाची मुलगी व तिची आजी भेटल्या. त्या अगदी गरीब होत्या.

शक्तिसारने गुणवतीचा हात पाहिला व तिच्यात चांगले गुण असल्याचे पाहून घेऊन

म्हणाला—"मुली, माझ्याजवळ दोन शेर भात आहे. ते घेऊन मला एक वेळचा सैंपाक करून वाढशील का?" त्याने इतरांना म्हटले होते तसाच प्रश्न गुणवतीला विचारला.

गुणवती ते ऐकून हसली तर नाहीच, तिच्या तोंडावर आश्चर्यही उमटल्याचं दिसलं नाही. तिने, तो म्हणाला तसा सैंपाक करून वाढण्याचं कबूल केले.

तिने भात भिजविलं व ते वाळविलं व पाखडून कण्या काढल्या. त्या कण्या तिने आजीला दिल्या व म्हणाली—"या कण्या सोन्याचं काम करणाऱ्यांना विकून त्या पैशाची तशी अगदी कच्ची किंवा अगदी न वाळलेली लाकडं आणि आवळकाठी घेऊन ये."

म्हातारीने तसं केले. गुणवतीने तांदूळ शिजल्यावर पेज काढली. पेजेत तिने थोडं मीठ घातलं आणि आवळकाठी वाटून चटणीसारखी केली व म्हणाली—"या चटणीबरोबर ही पेज पिऊन घ्या. त्यानंतर थोडी विश्रांती घ्या. स्नान करून आलात की जेवायला वाढते."

भात शिजल्यावर गुणवतीने काही लाकडं विझविली आणि त्याचे कोळसे काढून आजीला देत म्हणाली—"हे कोळसे कोणाला तरी देऊन थोडी पालेभाजी व ताक मागून घेऊन ये!"

आजीने आणलेली भाजी शिजवून जेवणाची वेळ होऊन जायच्या आधीच गुणवतीने पाहुण्याला आंघोळ करून यायला सांगितले.

शक्तिसार आंघोळ करून आला व ताकभाजीबरोबर पोटभर जेवला. गुणवतीचे चातुर्य पाहून त्याला फार आनंद झाला. त्याने तिला आपली खरी ओळख व तिच्याकडे येण्याचे कारण वगैरे सांगून त्याच्याशी ती लग्नाला तयार आहे का, विचारले. गुणवतीने होकार दिला, तो तिला तिच्या आजीबरोबर आपल्या गावी घेऊन गेला व त्याने तिच्याशी लग्न करून घेऊन सुखाने पुढील आयुष्य घालविले.






शत्रुंजयने चलुकवर्माला त्या उंदराबरोबर दूर एका लहानशा घरात रहायला पाठविले व म्हणाला—"तू आमच्या बरोबर राहायला योग्य नाहीस तुझ्या उंदीर वाहन असलेल्या गणपतीच्या भक्तीला योग्य अशी त्या वाहनाच्या जातीचीच तुला गृहिणी करून दिली आहे. तुझी गृहिणी 'असूर्य-पश्या' म्हणजे सूर्याचीही जिच्यावर नजर पडणार नाही अशा अंतःपुरात रहावी या साठी तुझ्या घरात उंदराची बिळे आहेत!" या शब्दांत त्याने हेटाळणी केली.

चलुकवर्मा बाप म्हणाला ते ऐकून घेऊन शांत स्वरात म्हणाला—"वडिलांनी मुलांची लग्ने लावून देणे ही खरोखरच मोठी गोष्ट म्हणावयाची, नाही का? ज्याच्याशी जिचा संबंध व्हायचा असतो, हे म्हणे पूर्वीच लिहून ठेवलेले" असते! आपल्या हातात काहीच नसते! सर्व त्या विघ्नहर्त्या गण-नायकाची इच्छाच असते, नाही का!"

चलुक उत्तमोत्तम ग्रंथांचे अध्ययन करीत असतां चुलुका जवळ राहून ऐकत असे. चलुक गणेशाची पूजा करी तेव्हां आपल्या तोंडाने त्याला फुले देई. चलुकचें पोट भरून जेवण झाल्यावर तो देई तेच चुलुका खात असे. असा बराच काळ लोटला आणि गणेश चतुर्थी आली.

सर्व आपापल्या घरांना रंगरंगोटी करू लागले आणि धान्ये कांडू लागले. चुलुकाने रात्रीच्या रात्री सर्व उंदरांना बोलाविले. उंदरांनी रंगात शेपट्या भिजवून सर्व भिंती



रंगवून काढल्या. आपल्या दातांनी भाता-वरची टरफले सोलून स्वच्छ तांदूळ तयार करून दिले.

गणेश चतुर्थीच्या दिवशी उजाडताच चलुकच्या सर्व वहिनी सोन्याच्या घागरी घेऊन नदीवरून पाणी घेऊन आल्या. त्यांना पाहून चलुकला स्वत:ची बायको पाणी आणू शकणार नाही याबद्दल वाईट वाटले.

चुलुका लगेच एका घागरीत शिरली व ती घणंगळत नदीकाठा पर्यंतघेऊन गेली. नंतर बाहेर येऊन तिने नदीकडे पाहिले, डोंगरा एवढया घागरी भरभरून जणूकाही ती ओतीत वहात होती. तिला निराशा वाटली व ती मनात म्हणाली—"मी घागर तर घेऊन आले, परंतु ती पाण्यात कशी बुडवणार? आणि ती उचलून कशी घेऊन जाणार? मी किती अविवेकी आहे? किती निरुपयोगी हे जीवन? नको हा जीव! कशाला जगायचे?" असे मनात म्हणत शेजारच्या एका दगडावर कपाळ आपटू लागली, तेव्हां विघ्नहर्ता गणनायक प्रगट होऊन तिच्या पाठीवर हळुवारपणे हात फिरवू लागला. लगेच पापमुक्त होऊन तिचं मूषक रूप गेले व देवकन्या कल्याण किंकणीचे रूप तिला प्राप्त झाले. ती गणपतीच्या पायां पडली व अनेक प्रकारे तिने त्याचे स्तवन केले. गणपतीने तिला आशीर्वाद दिला आणि अंतर्धान पावला.

कल्याण किंकणी घागर डोक्यावर घेऊन चालू लागली तर रस्त्यावरचे लोक चित्रा-सारखे उभे राहून तिच्याकडे पाहू लागले—"ही कोण स्वर्गसुंदरी बुवा? कोणाच्या घरी चालली आहे!"

चलुकवर्माच्या सर्व वहिनींनी कल्याण-किंकणीला आपल्या सर्वात धाकटया दिराच्या घरात जातांना पाहिले व परस्प-रांकडे चकित मुद्रेने पाहू लागल्या.

शत्रुंजय आपल्या आज्ञानामुळे स्वत:च लाजला व चलुकवर्माला त्याच्या बायको-बरोबर राजवाडयात घेऊन आला.



चलुकवर्माचे सर्व मोठे भाऊ आपल्या वडिलांना पुन: पुन्हा विचारू लागले—"आमचे लग्न अशाच एका उंदराशी कां नाही करून दिलेत, बाबा? आम्हांलाही अप्सरांना लाजविणारं सौंदर्य असलेली बायको नसती का मिळाली?"

अशा मूर्ख मुलांसाठीच का मी एवढे मोठे साम्राज्य संपादन केले? अशी एक विरक्ती शत्रुंजयच्या मनात उत्पन्न झाली व तो राज्यकारभार सोडून तपश्चर्या करण्या-साठी जंगलात निघून गेला.

चलुकवर्माचे सर्व मोठे भाऊ परस्परांचा द्वेष करून व परस्परांशी युद्ध करून मरण पावले. चलुकवर्मा 'नको नको' म्हणत असतां त्यालाच प्रजेने आपला राजा केले.

चलुकवर्माने आपली राणी कल्याण किंकिणीच्या नावे कल्याणी नावाचे मोठे नगर निर्मिले. त्याला कल्याण किंकिणीच्या पोटी चार मुलगे झाले. ते पुढे चालुक्य या नावे प्रसिद्ध झाले अशा तऱ्हेने चालुक्य राजवंशाची स्थापना करणाऱ्या चलुकवर्मा याच्या कारकीर्दीत वातापि नगर हे अनेक देवालये असलेले, मोठमोठे प्राकार व तट असलेले सुंदर शहर म्हणून प्रसिद्ध झाले. विविध कलांचे केंद्रस्थान म्हणून विद्वान व पंडित लोकांचे मोठे निवासस्थान आणि पृथ्वीवरची इंद्रपुरी म्हणून प्रसिद्धीस पात्र



ठरले. नगराची अधिदेवता म्हणून गणपतीची पूजा होत राहली. येथीलउत्कृष्ट शिल्पकला आणि सुंदर सभामंडप पहायला दूर दूरचे राजे रजवाडे आणि सामान्य प्रजा येऊ लागली.

चालुक्य वंशीयांनी चारी दिशांना आपले राज्य वाढविले आणि त्यांच्या राज्यात प्रजा सुखी झाली. चालुक्य वंशीय यांच्या शाखा व उपशाखा देश भर पसरल्या आणि चारी दिशांना त्यांचे राज्य विस्तीर्ण होत गेले. वातापि नगरात राज्य करणारे वातापि चालुक्य या नामे, कल्याणी नगरात राज्य करणारे कल्याणीचे चालुक्य या नामे, वेंगी येथे राज्य करणारे वेंगीचे चालुक्य नामे, पूर्वीचे चालुक्य, पश्चिमेकडील चालुक्य



नामे, सौराष्ट्र चालुक्य नामे प्रसिद्ध झाले. काही काळ लोटल्यावर वातापि नगराला बादामी हे नावही प्राप्त झाले.

### विघ्नहर्त्याच्या गोड गोष्टी

वातापि गणपति या नावे गणपती, क्षेत्र म्हणून वातापि नगर देशभर प्रसिद्ध झाले, त्या काळची ही गोष्ट आहे. पावन मिश्र नावाचे एक विद्वान पंडित वातापि गणपतीच्या देवालयातल्या मंडपात मुलांना गणपतीच्या कथा नित्य सांगत असत. लहान थोर सर्व मंडळी त्या कथा ऐकून आनंदाने रहात असत.

सभा मंडपाच्या भीतींवर गणपतीच्या चरित्रातील उत्तमोत्तम गाथांवर आधारित चित्रे काढलेली होती. त्या चित्रांपैकी एक चित्र दाखवून एका मुलाने गुरुवर्यांना त्या चित्राची कथा सांगायला विनंती केली.

तेव्हां पावन मिश्राने ती कथा सांगायला सुरवात केली.

एका गावी सत्यशर्मा व लोभगुप्त नावाचे दोघेजण शेजारी रहात असत. लोभगुप्ताचं खरं नाव लाभगुप्त असे होते. परंतु तो स्वभावाने इतका लोभी होता की गावकऱ्यांनी त्याला लोभगुप्त या नावानेच हाक मारायला सुरवात केली.

सत्यशर्मा व लोभगुप्त दोघे दररोज शंकराच्या देवळात दर्शनाला जात असत. सत्यशर्मा गर्भगृहात जाण्याच्या वाटेवर गणेशमूर्तीला नमस्कार करून गणपति स्तोत्र म्हणे आणि नंतर सांबाचे दर्शन घेऊन परते.

लोभगुप्त गर्भगृहात प्रवेश करतांच शंकराला सांकडे घाली, कोटी रुपयांचा लाभ करून दे.

एकदां सत्यशर्मा दर्शन करून परत जात असतां आणि लोभगुप्त येत असतां नंदी गणपतीला म्हणाला—"विघ्नहर्त्या! तुझा भक्त सत्यशर्मा याला पुष्कळ पैशांची गरज आहे. त्याला काही देणं योग्य होईल!"

"होय रे नंदी! आज संध्याकाळी त्याच्याकडे एक हजार वराह पोचते करतो." विघ्नहर्ता गणनायक म्हणाला.





दगडाच्या मूर्ती परस्परांशी बोलत असलेल्या ऐकून चकित होऊन लोभगुप्त लगेच उठला आणि सत्यशर्माच्या घरी जाऊन म्हणाला—"शर्मा, तुला पैशाची फार गरज आहे, म्हणे! पांचशे वराह देतो, घे." असे सांगून पांचशे रुपये देऊ लागला.

सत्यशर्मा त्याला म्हणाला—"अहो सावकार! कालच तुम्ही नाही का म्हणालात की व्याजासकट तुम्ही दिलेले कर्ज फेडलं नाही तर मी घर रिकामं करून तुम्हाला दिलं पाहिजे म्हणून? मग आणखी हे पांचशे कसे काय फेडायचे?"

लोभगुप्त म्हणाला—"तुझ्या मनात ती शंका आहे का? तू हे पांचशे घे आणि आज संध्याकाळी तुला जी रक्कम मिळेल ती सर्व मला दे म्हणजे झालं!"

सत्यशर्मा काय उत्तर द्यावं म्हणून घुटमळत असतां त्याची बायको म्हणाली—"पहिल्याने ती रक्कम तर घ्या! तिकडे होणारी व्याही मंडळी बराच वेळ झाली वाट पहात बसली आहेत.

सत्यशर्माच्या मुलीचे लग्न नुकतेच ठरलं होते. नवरदेवाच्या आईवडिलांनी पांचशे वराह किमतीचे दागिने मुलीच्या अंगावर घातले पाहिजेत असा हट्ट धरला होता.

सत्यशर्मा लोभगुप्ताला म्हणाला—"सायंकाळी मला जी रक्कम मिळेल ती द्यायला मला कोणत्याही प्रकारे हरकत नाही. परंतु मिळण्याची चिन्हे मुळीच नाहीत..." असे म्हणत मागे पुढे करीत असतां लोभगुप्त म्हणाला—"ते सर्व सोड! आपण शेजारी, मी आतां देतो आहे, तू नंतर दे! एवढ्यासाठी इतके आढेवढे घेण्याची गरज नाही." असे म्हणत त्याने पांचशे वराहांचं बोचकं सत्यशर्माच्या हातात ठेवलं.

सत्यशर्मा सत्यप्रतिज्ञ असल्याची लोभशर्माला खात्री होती.

संध्याकाळ व्हायची वेळ झाली, परंतु सत्यशर्माला कोठून व कसे किती वराह मिळणार आहेत याची कल्पनाही नव्हती. लोभगुप्त घाबरून देवळात गेला आणि



गणपतीची सोंड धरून ओढीत म्हणाला– "कायरे विघ्नहर्त्या! सत्यशर्माला एक हजार वराह दे की जाऊन!" असं तो म्हणत असतां त्याचा हात सोंडेच्या सांधींत अडकला आणि काढण्याचा यत्न केला तरी निघेना, उलट जास्तच घट्ट अडकला.

हात दुखू लागल्यामुळे लोभगुप्त कण्हू लागल्यावर विघ्नहर्त्याची मूर्त म्हणाली– "तू सत्यशर्माला एक हजार वराह जितक्या लवकर देवविशील तितक्या लवकर तुझी सुटका होईल."

लोभगुप्त दुसऱ्या हाताने कपाळ फोडीत ओरडला–"देवा! हा अन्याय आहे! पांचशे मी पहिल्यानेच दिले आहेत ना!"

"अस्सं! म्हणजे पांचशे देऊन एक हजार काढण्याचा तुझा विचार होता तर! फुकटात पांचशे वराह मिळविण्यासाठी, होय ना? या पापाचं प्रायश्चित्त म्हणून तू या पांचशे वराहांव्यतिरिक्त सत्यशर्माला पांचशे वराह दे आणि त्याच्या मुलीचे लग्न तू स्वतःच्या घरचे समजून त्याला लागणारा सर्व खर्च दे!" असा गंभीर स्वर मूर्तीतून 'लोभगुप्ताला ऐकू आला.

लोभगुप्ताने आपल्या घरच्या लोकांना बोलाविले आणि सत्यशर्माला बाकीचे पांचशे वराह देवविले. नंतर कर्ज फिटल्याचे सांगून सत्यशर्माच्या मुलीचे लग्न करून देण्याचे वचन दिले. एवढे झाल्यावर त्याचा हात सुटला.

लोभी माणसाला चांगली शिक्षा झाली, म्हणून गांव भर चर्चा झाली.

लोभगुप्तने सत्यशर्माच्या मुलीचे लग्न स्वतःच्या मुलीच्या लग्नासारखे थाटा-माटाने करून दिले. तेव्हांपासून लोभ-गुप्तने आपली लोभीवृत्ती सोडली आणि अन्यायाने संपादिलेली मिळकत धर्मकार्या-साठी खर्च केली. तो विघ्नहर्त्या गणपतीचा कृपापात्र झाला आणि सदाचारी म्हणून प्रसिद्ध झाला.

ही गोष्ट सांगून पावन मिश्रने गण-पतीचा प्रसाद आणून सर्व मुलांना वाटला.

मुलांनी प्रसाद तोंडात टाकला आणि हसत खेळत घरी निघून गेली.

आणखी एकेदिवशी सायंकाळी एका मुलीने आणखी एक चित्र दाखवून त्याची गोष्ट सांगायला विनंती केली. पावन मिश्र गोष्ट सांगू लागले.

कल्याणी नगरी कलहकंठीनांवाची एक श्रीमंत बाई रहात असे. सुनेने माहेरून सोन्याचे पुष्कळ दागिने आणले नाहीत, म्हणून ती सुनेला वेळीअवेळी टोचून बोले आणि शेवटी तिला निर्दयपणे तिने माहेरी पाठवून दिले.

कलहकंठी हे तिला नाव मिळाले असूनही त्या श्रीमंत कलहकंठी सासूची सून सौदामिनी दुःखाचा डोंगर डोक्यावर घेऊन आपल्या माहेरी निघाली. परंतु वाट चुकून ती एका जंगलात गेली. भुकेने तिचा जीव कासावीस झाला आणि बेशुद्ध होऊन ती एका कवठाच्या झाडाखाली पडली.

आपण माहेरी गेलो तरी फायदा नाही. कारण तिच्या लग्नासाठीच तिच्या वडिलांनी फार मोठे कर्ज करून ठेवले होते. मग आणखी दागिने कोठून आणणार? म्हणून त्या अरण्यातच मरण आलेले पत्करले. असा विचार ती मनात करीत असतां झाडावरून एक कवठ गळून पडले आणि गणंगळतती पडली होती तेथेपर्यंत तिचा हात पोचेल अशा जागी येऊन थांबले. ते घेऊन सौदामिनी उठून बसली असतां जमीन हादरली आणि एक हत्ती अंगावर धावून येत असलेला दिसला.

सौदामिनीच्या मनात लहानपणापासूनच गणपतीवर फार भक्ती होती. गणपतीचे मनात स्मरण करून हत्तीच्या पायाखाली स्वतःला देऊन आत्महत्येला ती तयार झाली. ती हत्तीला सामोरी गेली, परंतु तो एकदम जागच्या जागी थांबला.

हत्तीने सौदामिनीच्या हातातले कवठ सोंडेने घेतले व तोंडात घालून आशीर्वाद देत असल्यासारखी सोंड डोक्यावर ठेवून तिचा हात पकडला व तिला सरळ एका मोठ्या गुहेत घेऊन गेला.





# गंधर्व राजकुमारी

[ ९ ]

वीरांगनांची अधिकारिणी जी म्हातारी होती ती म्हणाली ते ऐकून हसन मोठमोठ्याने रडू लागला. त्याचा दुःखी चेहरा पाहून म्हातारी कळवळून म्हणाली– "मग मी तरी काय करू? तुला या बेटावर उतरू दिलं याबद्दलच माझ्या झिंजा ओढल्या जातील. तू मागशील तेवढे धन देते, घेऊन जा. ते तुला आयुष्य भर पुरेल, बादशाहासारखा सुखोपभोग भोगीत आनंदाने आयुष्य घालव."

हसन तिचे पाय धरून म्हणाला–"माझे प्रयत्न यशस्वी झालेच पाहिजेत. नशीब माझ्या पाठीशी आहे. म्हणून कष्ट सहन करावे लागले तरी मी येथवर पोहोचू शकलो. प्रयत्न सोडून देण्यापेक्षा मरण पत्करले."

हसन आपला हट्ट सोडणार नाही, हे म्हातारीने ओळखले. म्हणाली–"जे व्हायचं असेल ते होईल. तुझ्याबरोबर मी आपला जीवही द्यायला तयार आहे. 'वाक् वाक्' बेटे एकूण सात आहेत. गंधर्व चक्रवर्तीच्या सात कन्यांच्या हातांत ती एकेक आहेत. आपण आहोत ते बेट थोरल्या राजकुमारीचं आहे. तिचे नाव नूरउल हुदा असे आहे. तिला तुझ्या विषयी सर्व सांगून तिला तुझ्यासाठी काही करुणा होईल असे करून मी येते." असे सांगून म्हातारी निघून गेली.

नूरुल हुदाने म्हातारीला पाहून आसनावरून उठली व तिला आदरपूर्वक एक आसन दाखवून विचारले–"काही विशेष चांगली बातमी आणली आहेस वाटतं? किंवा काही मागायला आली आहेस?"

"माझे आई, महाराणी! आज एक विचित्र गोष्ट घडली. एक तरुण मुलगा कसा आला देव जाणे, आपल्या बेटाच्या



तीरावर येऊन पडला आहे. तो रडत होता. मी चवकशी केली. भाग्याचा फेर त्याला या बेटावर ओढून घेऊन आला. तो आपल्या बायकोला शोधीत इकडे आला म्हणे. त्याने आपल्या बायकोचे खूप वर्णन केले. त्या वर्णनावरून तू किंवा तुझ्या बहिणींपैकी कोणीतरी एक असावी असे मला वाटले. तो मानवच असला तरी कमालीचा सुंदर आहे." म्हातारी म्हणाली.

नूरुल हुदा ऐकतांच संतापली. म्हणाली—"थेरडे! पापिष्टे! आपल्या बेटावर तू एका पुरुषाला पाऊल कसे ठेवू दिलेस? मी तुझं रक्त पिऊन तुझी हाडं मोडून खाते! मी त्याला एकदां पाहाते. अटक करून घेऊन ये त्याला. त्याने आपल्या बेटावर उतरून ते अपवित्र केले आहे."

ती म्हातारी तोंडातल्या तोंडात बडबडली—"हा पोरगा माझाच जीव घ्यायला निघाला की!" आणि थरथर कापत हसन होता तेथे आली आणि म्हणाली—"जिवंत प्रेता! नीघ लवकर! आमच्या राणीसरकार तुला पाहणार आहेत म्हणे!" हसन त्या म्हातारीबरोबर निघाला.

ती दोघं आली तेव्हां नूरुल हुदाने तोंडावर बुरखा घेतला होता. हसनने तिला लवून सलाम केला. नंतर त्याने तिची स्तुती करून काही कविता म्हटल्या. गंधर्व चक्रवर्तीची कन्या सर्व ऐकून घेतल्यावर म्हातारीला "विचार त्याला" या अर्थी खूण करीत असल्यासारखी दिसली. म्हातारी हसनकडे वळून म्हणाली—"महाराणी सरकार तुझं नाव, तुझ्या बायकोचे नाव व तुझ्या मुलांची नावे विचारीत आहेत!"

हसन गंधर्व चक्रवर्तीच्या कन्येकडे वळून म्हणाला—"महाराणी, मी हसन नावाचा फुटक्या नशिबाचा एक तरुण आहे. मी इराक देशातील बगदाद शहराचा राहणारा आहे. मला माझ्या बायकोचे नाव माहीत नाही. आम्ही आमच्या मुलींची नावे अनुक्रमे नासिर व मन्सूर अशी ठेवली होती."



"तुझी बायको तुला का सोडून गेली?" विचारतां हसनने त्याला ते माहीत नसल्याचे सांगितले व म्हणाला—"परंतु तिने स्वच्छेने मला सोडले असेल असे मात्र मला वाटत नाही. ती निघाली ती बगदाद येथील खलीफांच्या राजवाड्यातून आणि उडून जाण्यासाठी तिने पक्ष्यांची वस्त्रे वापरली होती. निघतांना माझ्या आईला तिने ती वाक् वाक् द्वीपांत शोधलं तर सापडेन," असेही सांगितल्याचे हसनने गंधर्व चक्रवर्तीच्या राजकन्येला सांगितले.



इतका वेळ गप्प राहिलेली नूरुल हुदा म्हणाली—"तुझ्या बायकोचे तुझ्यावर प्रेम नसते तर तिने ती राहाते ती जागा सांगितली नसती. तुझ्यावर तिचे प्रेम असेल तर ती तुला सोडून गेली नसती."

त्याच्या बायकोचे त्याच्यावर किती गाढ प्रेम होते याची अनेक उदाहरणे देऊन, तिच्या मनात उडण्याची तीव्र आवड होती व तो मोह ती सोडू न शकल्यामुळे ती उडून गेली असे अनेक प्रमाणे देऊन हसनने सांगितले.

म्हातारीने सुद्धा थोडेसे साहस करून गंधर्व राजकन्येचे पाय धरले व म्हणाली—"राजकन्ये, मी तुला अंगाखांद्यावर खेळवून लहानाची मोठी केले. म्हणून मी सांगते तिकडे जरा लक्ष दे. या बिचाऱ्या दुर्दैवी तरुणाला शिक्षा करण्याचा विचार मनातून काढून टाक. तो अनेक हालअपेष्टा सहन करून देवाच्या कृपेनेच येथवर पोहोचू शकला आहे. आपण याला आपला एक पाहुणा मानणेच योग्य होईल. याने ज्या थोड्या चुका केल्या असतील त्या सर्व बायकोवरच्या प्रेमापोटीच केल्या आहेत. त्याबद्दल त्याला क्षमा कर. हा उत्तम आशुकवी आहे. तू तोंडावरचा बुरखा बाजूला सार. पहा तर तुझे रूप पाहून तो किती सुंदर कविता करतो त्या!"

हसन कशा कविता करतो हे ऐकण्याचं कुतूहल वाढल्यामुळे नूरुल हुदाने आपल्या तोंडावरचा बुरखा बाजूला सारला. हसनने



तिचे तोंड पाहिले मात्र तो 'ओ हो हो!' असे म्हणत बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला.

गंधर्व राजकन्येला पाहताच हसन बेशुद्ध पडलेला पाहाल्यावर म्हातारीने त्याचा औषधोपचार करून त्याला शुद्धीवर येताच कारण विचारले. हसन स्वतःला आवरू न शकल्याने दुःखी स्वरात म्हणाला—"ही राजकन्या हुबेहूब माझ्या बायकोसारखी आहे. परंतु माझी बायको मात्र ही नव्हे!" ते ऐकून गंधर्व राजकन्या मोठ्याने हसली व म्हणाली—"तुझ्या म्हणण्याप्रमाणे तुझी बायको आणि मी दोघांच्या रूपात बरेच साम्य आहे. फरकही आहेच. तर साम्य काय आणि फरक काय? आणि तो कशात?"

"महाराणी, तुमच्यात व माझ्या बायकोच्यात कोणत्याही अवयवांत मुळीच फरक नाही. तरी दोघीत फरक मात्र आहे. ते मी ओळखू शकतो, वर्णन करून सांगू शकत नाही." हसन म्हणाला, यावरून गंधर्व राजकन्येला दोन गोष्टी स्पष्ट कळल्या—त्या पुरुषाचं मन आपल्यावर आकर्षित होणं शक्य नाही आणि त्याची बायको आपल्या इतर सहा बहिणींपैकी एकजण असली पाहिजे. तिला हसनचा भयंकर राग आला आणि त्याची बायको असलेल्या तिच्या बहिणीचा फार हेवा वाटला. आपल्या सहा बहिणींपैकी याची बायको कोण हे कळल्या नंतर तिला आणि याला काहीतरी कठोर शिक्षा करण्याचंही तिने मनात ठरविले.

ती म्हातारीकडे वळून म्हणाली—"तू आतां येथून जा आणि माझ्या सहा ही बहिणींना बोलावून घेऊन ये. मी त्यांना भेटायला बोलाविले आहे म्हणून सांग आणि बरोबर बोलावून घेऊन ये. या तरुणाविषयी चकार शब्द बोलू नकोस, समजलं!"

त्या म्हातारीला तिच्या मालकिणीच्या मनातल्या हेतू काय आहे, कळले नाही. म्हणून ती घाईघाईने एकेका बेटावर गेली आणि एकेका गंधर्व राजकन्येला बरोबर घेऊन शेवटी गंधर्व राजाच्या सर्वांत धाकट्या राजकन्येकडे गेली. ही राजकन्याच हसनची बायको होती. तिच्यावर गंधर्व राजाचे अपार प्रेम होते. म्हणून तो तिच्याकडेच रहात असे. आपल्या सर्वात धाकट्या मुलीला ती जाऊ लागली तेव्हां त्याने नकार दिला. त्याला काहीतरी अपशकुन झाल्याचे सांगून तो आपल्या धाकट्या मुलीला 'नको जाऊस' म्हणाला.

"अक्काने मला मेजवानीसाठी बोलावून सर्व तयारी केली असतां गेले नाही तर कसं हो, बाबा? मी भेटून दोन वर्षे झाली आहेत. आतां मी 'नाही' म्हटलं तर तिला राग नाही का येणार? मला कसली भीती किंवा भय? एकदां मी कित्येक दिवस भेटले नाही म्हणून तुम्ही फार काळजीत पडलांत. पण मी परत आले नाही का? तशीच मी या खेपेसही नक्की येईन. शिवाय मी तशी दूर कोठेही जात नाही. आपल्या बेटांपैकी एकावर जाते आहे ना!" हसनची बायको आपल्या वडिलांना म्हणाली.

आपल्या अक्काकडे फक्त काही दिवस राहून परत येण्याचे वचन दिल्यावर तिला तिच्या बापाने जायला परवानगी दिली. म्हातारी सहा बहिणींना बरोबर घेऊन नूरुल हुदाकडे जाण्यासाठी निघाली. बहिणी यायच्या आधी नूरुल हुदाने ठेवणीतले कपडे काढून नटून दागिने वगैरे घातले व तयार झाली व सिंहासनावर बसून राहिली. तिच्या समोर हसन दीन वदनाने उभा होता. त्याच्या चारी बाजूला वीरांगना तलवारी उपसून तयार उभ्या होत्या.

म्हातारीने पुढे येऊन नूरुलहुदाला तिच्या बहिणी आल्या असल्याचं सांगितल्यावर तिने एकेकीला बोलावून घेऊन यायला म्हातारीला सांगितले. त्यातली थोरली आली. नूरुलहुदाने तिला हाक मारून प्रेमाने तिला जवळ बसविले आणि हसनला विचारलं—"मानवा, ही आहे का रे तुझी बायको?"

हसन म्हणाला—"ही एक अपरूप सुंदरी आहे. तरी हिच्यात व माझ्या बायकोत बरेच अंतर आहे. मी ते शब्दात वर्णन करून सांगू शकणार नाही.

(पुढील अंकात संपूर्ण)





# उत्तम श्रोता

अमरगिरीचा राजा केशववर्मा हा संगीताचा मर्मज्ञ चाहाता होता. दरवर्षी नवरात्रीच्या उत्सव प्रसंगी तो मोठमोठ्या गवैयांना बोलावून त्यांच्या बैठकी ठेवीत असे. त्या बैठकीत जो सर्वोत्तम गवैया ठरे त्याचा मोठा सत्कार करून त्याला मोठे पारितोषिक ही राजा देत असे. हे कित्येकवर्षांपासून चालू होते.

एका वर्षी नारायणभारती नावाचे एक गायक परदेशातून नवरात्री उत्सवात भाग घ्यायला आले, राजा केशववर्मा याला त्या वर्षी आलेल्या सर्व विद्वान संगीताचार्यांमध्ये नारायणभारतीचेच गायन जास्त आवडले. त्याने त्यांना अनमोल पारितोषिक देऊन म्हटले–"तुम्ही फार चांगले गाईलात, तुमचं गायन ऐकत असतां मी तर देहभानच विसरून गेलो होतो. मी तसे म्हटले तर तुम्हांला खरे वाटणार नाही!"

नारायण भारती राजाचे आभार मानून म्हणाला–"महाराज, या राजसभेत इतके लोक आहेत, परंतु गाणे म्हणत असतां सर्व वेळ एक शंका माझ्या मनात वारंवार येत होती."

"कोणती शंका ती?" राजाने विचारले.

"माझं गाणं चालू असतां आपण देहभान विसरलो, म्हणालात. परंतु श्रोत्यांपैकी आपणशिवाय एकालाही माझं गाणं आवडलं असे आढळलं नाही मला. मी गात आहे ही गोष्ट तर काही लोकांच्या ध्यानीमनीही नव्हती व ते आपसात कुजबुज करीत होते, हे मला दिसलं." नारायण भारती म्हणाले.

राजाला चांगलं माहीत होतं की त्याच्या प्रजेत व दरबारात त्याच्या शिवाय कोणाला ही गाण्याची एवढी आवड नाही, हे चांगलं माहीत होतं. त्यामुळे त्याचा उत्साह भंगही फार होई. आतां नारायण भारती म्हणाले ते ऐकून त्याला फार वाईट वाटले.



ललित कलांत, विशेष करून संगीतकले विषयी प्रजेच्या मनांत आवड कशी उत्पन्न करावयाची? या विषयी राजाने बराच विचार करून दुसऱ्या वर्षी नवरात्रीच्या उत्सव प्रसंगी काही वेळ आधी राजाने एक दवंडी पिटविली की येत्या नवरात्री उत्सवांत गाण्याच्या ज्या बैठकी होतील त्यात गायनाची सर्वांत जास्त आवड असलेल्या सर्वोत्तम श्रोत्यास एक हजार रुपये बक्षीस दिले जाईल.

आपल्या प्रधानाला संगीत कलेची तेवढी आवड नसेल असे समजून राजाने प्रधानाचा सल्ला घेतल्या शिवायच ती दवंडी पिटविली होती.

प्रधानाला दवंडीची गोष्ट त्याच्या नोकरांकडून कळली. त्यानंतर राजाला तो भेटायला गेला. म्हणाला–"महाराज, आपण सर्वोत्तम श्रोत्याला जाहीर केलेल्या बक्षिसाची गोष्ट मी आत्तां आत्तांच ऐकली. एक हजार रुपये म्हणजे तेवढी मोठी रक्कम नाही. शिवाय सहस्त्रावधी लोक गाण्याच्या बैठकीला येणार. त्यांच्यातून सर्वोत्तम श्रोत्याची निवड करणे तेवढे सोपे नाही." असे मला वाटते.

"किती कष्टसाध्य असले तरी हरकत नाही. या बक्षिसाच्या लोभाने आपल्या प्रजेच्या मनांत संगीताची आवड तरी उत्पन्न होईल. तेवढे झाले तरी पुरे!" राजाने आपले मत दिले.

उत्सवाचा दिवस उजाडला. या वर्षी नारायण भारती आले नाहीत, परंतु त्यांच्या बरोबरीचे अनेक गायक आले होते.

राजासमोर एक प्रसिद्ध गायकाची बैठक असल्याचे ऐकून राजवाड्याच्या कलाभवनासमोरच्या पटांगणात श्रोत्यांची फार मोठी गर्दी जमा झाली. गायकाने गायन सुरु केल्यानंतर एकदोन मिनिटांनी हजर असलेल्या प्रत्येकाने मान डोलवायला

श्री वा. न. जकाते

सुरवात केली आणि टाळ्या वाजवून गाणे फार आवडल्याचे प्रदर्शन केले.

ते पाहून राजाला प्रथम आश्चर्य व त्यानंतर अत्यंत राग आला. त्याने जाहीर केलेल्या एक हजार रुपयांच्या पारितोषिकाच्या लोभाने प्रत्येकजण उत्तमश्रोता असल्याचे नाटक करतो आहे तर असे त्याला वाटले. हे असेच चालू राहिले तर रसाभास होईल.

राजाने शेजारीच बसलेल्या प्रधानाला त्या परिस्थितीत काम करणे उचित होईल या गोष्टीचा सल्ला विचारला. प्रधान त्याला तो प्रश्न कसा सोडवावयाचा त्याला माहीत असल्याचे सांगून हजर असलेल्या सर्व श्रोत्यांना संबोधन करून म्हणाला– "महाराजांना दरवर्षी उत्तम गायकाची कशी निवड करावयाची हे चांगले माहीत आहेच. उत्तम श्रोत्याची कशी निवड करा-करावयाची हेंही चांगले माहीत आहे. म्हणून गायकांची बैठक चालू असे पर्यंत कोणी श्रोत्याने हर्षध्वनी करणे किंवा मान डोलावणे असलं काही करू नये. त्या शिवाय इतरत्र तऱ्हेने जे वागतील त्यांची डोकी उडविली जातील."

त्यानंतर गायकाच्या गाण्याला साद देण्यासाठी श्रोत्यांनी मान डोलावणे पार बंदच केले. परंतु त्यां पैकी फक्त एकचजण मान डोलावीत राहिला.

प्रधानाने त्याच्याकडे रागाने पहात विचारले–"तुला तुझ्या मानेवर राहिलेले डोके नको आहे का?"

तेव्हां तो जरासुद्धा न भितां म्हणाला– गोड संगीत ऐकत असतां तन्मय होऊन गेल्यावर मान डोलली नाही तर ती राहिली काय किंवा छाटली गेली काय एकच."

प्रधान राजाकडे वळून म्हणाला– "महाराज, या वर्षी संगीताची आवड असलेला खरा उत्तम श्रोता मिळाला आहे!"

राजाच्या बरोबर गायकाने सुद्धां त्या श्रोत्याकडे पाहिलं आणि स्मित करून आपला आनंद व्यक्त केला.





# वसूल व्हायचे कर्ज

गणूशेट सावकारीचा धंदा करीत असे. त्याच्या एकुलत्या एका मुलाचे नाव होतं हरिशेट. त्याला पंचवीसावे वर्ष लागतांच त्याच्यावर सावकारीचा धंदा टाकावा असा गणूशेटने विचार केला.

एके दिवशी त्याने ज्या ज्या लोकांना कर्जे दिली होती त्यांची नावे व त्यांना दिलेल्या कर्जाच्या रकमा मुलाला दाखविल्या व कोणी किती पैसे फेडले आणि आणखी किती येणं आहे सर्व गोष्टी सविस्तर सांगितल्या–"अरे, होय, हे बघ आपण लगेच चंद्रपूरला गेले पाहिजे."

इतक्या घाईघाईने बाबा चंद्रपूरला कां? निघत आहेत हरिशेटला कळेना. त्याने तसे वडिलांना विचारलेही. तेव्हां गणूशेट म्हणाले–"अरे चंद्रपूरलाच नव्हे आपण रामपूरला सुद्धा गेलं पाहिजे. आपण परत गावी येईपर्यंत आपण कां जात आहों, तेथे मी काय बोललो विषयी तू मध्ये काही विचारू नकोस. मला राग येईल."

दोघे चंद्रपूरला पोंचल्या बरोबर गणूशेट रामजी नावाच्या एका शेतकऱ्याच्या घरी गेले. रामजीने त्यांना विचारले–"कसं काय शेटजी! असे एकदम कसे काय येणं झालं?"

"तसं काही विशेष नाही रामजी! मी रामपूरला जात होतो, वाटेत इकडे आलो. जातच होतो तर वाटेत तुम्हांला भेटून तुमची रक्कम केव्हां किती देतां विचारून जावं, आत्तांपर्यंत तुम्ही दर महिन्याला हप्ते भरायचे कबूल केलेली रक्कम चार हजार रुपयांची रक्कम सोडून तुमच्यावर आणखी पांच हजारांचे कर्ज आहे. बाकीची रक्कम सुद्धा लवकर फेडणं बरं होईल!"

गणूशेट म्हणाले ते ऐकून रामजी संतापून म्हणाले–"शेटजी, तुमचं वय वाढलेलं आहे

त्या बरोबर तुमचं डोकं सुद्धां मंद पडत चालल्यासारखं दिसतं आहे! मी आजपर्यंत कबूल केल्याप्रमाणे दर महिन्याला हजार प्रमाणे चार हजार फेडले आहेत. आतां माझ्यावर उरलेले कर्ज फक्त तीन हजारच आहे. आणखी कोणाचं कर्ज माझ्या डोक्या-वर टाकायचा विचार आहे की काय?"

"बरोबर म्हणालात!" असं म्हणत चुटकी वाजवून गणूशेट पुढे म्हणाले–"अरे हो, ते दगडूला दिलेले कर्ज! मी चुकून तुमच्यावरचं कर्ज म्हणालो!"

त्यानंतर बाप व मुलगा रामपूरला गेले. व भीमराव नावाच्या शेतकऱ्याला भेटून म्हणाले–"भीमराव, तुम्ही आतांपर्यंत फेड-लेली रक्कम फक्त दोन हजार रुपयेच. चार हजाराची रक्कम केव्हां देणार म्हणतां?"

भीमराव थोडासा भीतभीतच म्हणाला–"शेटजी, मी फेडलेली रक्कम दोन हजार नाही. तीन हजार! आतां तुम्हांला मी व्याजासकट द्यायची रक्कम आहे तीन हजार पांचशे रुपये! या महिन्यात सर्व रक्कम एकदम द्यायची म्हणतो आहे मी!"

लगेच गणूशेट म्हणाला–"भीमराव मी चुकून गणोजीकडून यावयाची रक्कम तुम्हांला सांगितली. तुमचा हिशोब तर तुम्ही म्हणालात तसाच आहे हो!" असे सांगून माझ्या बरोबर घरी परतले.

हरिशेटने वडिलांना विचारले–"आप-ल्याला कोणाकडून किती रक्कम यायची आहे हिशोबाच्या वहीत पाहल्याशिवाय एकचुटकी मारून सांगणारे तुम्ही एकाकडून वसूल व्हायची रक्कम दुसऱ्यावर कशी काय घातलीत, आणि हा गोंधळ कां केलात?"

गणूशेट हसत म्हणाला–"खरं सांगू का, त्या रामजीकडून आणि भीमरावाकडून आपल्याला मिळावयाची रक्कम किती आहे ह्याचे कर्जरोखे व हिशोब कोठे गेले नकळे. म्हणून त्यांच्या तोंडून त्यांनी फेडलेली रक्कम आणि त्यांच्या कडून आपल्याला परत यायची रक्कम मी वदवून घेतली? म्हणून तू लवकर एका नव्या वहीत त्या रकमा लिहून ठेव."






[९]

[शिवदत्त भुयाराच्या चोरवाटेने पळू लागला तेव्हां त्या वाटेच्या दुसऱ्या टोकाला नरवाहनच्या सैनिकांनी त्याला घेरले. त्या चकमकीत शिवदत्ताचे काही अनुयायी प्राणास मुकले. परंतु शिवदत्ताने त्यांच्या सरदाराशी द्वंद्वयुद्ध करून त्याला ठार केले. शत्रुसैनिक घाबरून जाऊन पळायला कोठे वाट आहे का, पाहू लागले पुढे...]

मंदरदेव शिवदत्तला मध्येच थांबवून म्हणाला–"शिवदत्त, सुरवातीपासूनच नशिबाने तुम्हांला मदत केली, नाही तर या सर्व अडचणीतून निसटून बाहेर निघणे तुम्हांला शक्य झाले नसते, असे मला वाटते."

ते ऐकून शिवदत्त स्मित करून म्हणाला–"त्यात काही शंकाच नाही. मला कधी स्वप्नातही असे वाटले नव्हते की शत्रूचे इतके सैनिक चोरवाटेच्या दुसऱ्या टोकाला आम्हांला अडविण्यासाठी जाऊन उभे राहिले असतील. परंतु नशिबाने जेव्हां शत्रूच्या सरदाराचा बळी माझ्या तलवारीने घेतला, तेव्हां घाबरून गेलेल्या शत्रूच्या सैनिकांचा फडशा उडवायला मला फार वेळ लागला नाही. तरी दोघेतिघे आमची नजर चुकवून झाडीच्या आडून निसटून गेल्याची गोष्ट मला नंतर कळली. एक जखमी झालेला घोडा जमिनीवर



तडफडत पडला होता. एक सैनिक घोडयाच्या पायांखाली येऊन बराच घायाळ झाला होता. मी त्याला खालून बाहेर काढवले. तो आपले शेवटचे क्षणच मोजत होता. त्याला पाणी आणवून पाजले. समरसेनच्या संबंधी जास्त सविस्तर माहिती मला त्याच्या कडूनच मिळणें शक्य होतें.

तहान भागवल्यावर शत्रुसैनिक जेव्हां थोडा शुध्दीवर आला तेव्हां त्याला मी समरसेनाविषयी विचारले—"समरसेन जिवंत आहे की नाही?"

असह्य वेदना सहन करीत असतां त्या सैनिकाने करुण मुद्रेने माझ्याकडे पाहिले व म्हणाला—"समरसेन चार पांच तासांपूर्वीच निकराचे युद्ध करून मरण पावले. आतां या बेटाचे राजे नरवाहन मिश्र आहेत."

"तरमग मी असे मानू का समरसेन या लढाईत युद्ध करतां-करतां घायाळ होऊन धारातीर्थी पडले?" मी विचारले.

"होय ते खरे आहे!" असे म्हणत असतांच त्याने शेवटचा श्वास घेऊन डोळे मिटले.

"म्हणजे मुख्य सेनापती समरसेन आतां या जगात नाहींत तर!" या कल्पनेने माझा धीर खचल्यासारखे झाले. ते एक शूर सेनापती होते व त्यांना वीरगती मिळाली. "सर्वशक्तिमान परमेश्वर त्यांच्या आत्म्यास शांती देवो!" मी परमेश्वरा जवळ प्रार्थना केली.

कुंडलिनी देवीच्या कृपेने मी वांचलो. आतां पुढे मी काम करायचे? माझ्या अनुयायांपैकी सहाजण त्या चकमकीत प्राणांस मुकले होते. तेव्हां मी जास्त वेळ न घालवितां आपल्या अनुयायांसह निसटून गेलो नाही, तर नरवाहन मिश्राचे आणखी सैनिक येण्याची शक्यता होती.

मी आपल्या सर्व अनुयायांना एकत्र करून त्यांना सार्‍या परिस्थितीची कल्पना करून दिली. सर्वजण मी म्हणालो त्या गोष्टीस तयार झाले. आज नाही तर पुन्हां केव्हां तरी ते बेट सोडून आम्हांला जावेच लागणार याविषयी सर्वांचे एक मतच होते. कारण समरसेनांनंतर त्या बेटावर नरवाहन मिश्राशी दोन हात करणारा दुसरा कोणी उरलाच नव्हता.

असा सर्व विचार करून मी आपल्या सर्व मृत अनुयायांना मूठमाती दिली व आपल्या उरलेल्या अनुयायां सह जंगलाच्या दिशेने निघालो. एक दोन कोस निघून गेल्यावर आम्हांला भिल्लांची एक वस्ती दिसली, आमचे पोशाख व शस्त्रास्त्रे पाहून ते सज्ज होऊन आमच्यावर धावून आले आणि आम्हां सर्वांना चारी बाजूने घेरा घालून उभे राहिले.



"आम्ही तुमचे शत्रू नाही. या वस्तीतील तुमचा पुढारी कोण, मला हे प्रथम सांगा. त्याच्याशी मला थोडे बोलायचे आहे!" मी विचारले.

पांचदहा मिनिटांनी एक वृद्ध भिल्ल आमच्या जवळ आला. "कोण तुम्ही आणि इकडे येण्याचे काय कारण?" त्याने आम्हांला विचारले.

मी आपल्या अनुयायांकडे बोटाने संकेत करून म्हटले—"आम्ही तुमचे शत्रू नाही, आम्ही कोण काय हे सवडीने सविस्तर सांगतो. तरी त्या आधी मी म्हणतो ते शांतपणे ऐकून घ्या. आम्ही सर्व तहानेलेले आहों. कालपासून आम्ही काही खाल्लेलेही नाही. तुम्ही आमच्या सर्वांच्या खाण्यापिण्याची काही व्यवस्था करु शकाल काय?"

म्हातार्‍या भिल्लाने मी म्हटलेले ऐकतांच इतर भिल्लांकडे पाहिले. दुसर्‍या क्षणाला एकेक माझ्या भिल्ल अनुयायांपैकी एकेकाला आपल्या बरोबर घेऊन गेला. मी त्या जंगली लोकांच्या अतिथि सत्काराला पाहून थक्क झालो. तो वृद्ध भिल्ल माझ्याकडे पाहून हसत म्हणाला—"तुम्ही माझ्या घरी चला. तुमच्या खाण्या-पिण्याची सर्व व्यवस्था मी करतो."

"मी म्हाताऱ्या बरोबर त्याच्या घरी गेलो. अर्ध्या तासात मला जेवायला वाढले." माझे जेवणखाण होईपर्यंत तो वृद्ध माझ्याशी काहीच बोलला नाहीं, परंतु माझी दृष्टी सतत त्याच्या डोळ्यांवर होती. त्याची कडक नजर माझ्या प्रत्येक हाल चालीवर होती. तो बारीक आवाजात म्हणाला–"आम्ही भिल्ल जातीचे. हे अरण्यच आमचं सारं वैभव आहे. आमच्या पूर्वजांनी व माझ्या पिढीच्या लोकांनी कोणत्याही राजासमोर आजपर्यंत मान तुकविली नाही."

मी मौनपणे मान हलविली. त्या म्हाताऱ्याला जे काही सांगावयाचे होते ते त्याने सांगितले पण मला कळले नाही.

तरी तो बोलतच होता–"देशात आज जो भयंकर फेरबदल होत आहे त्याच्या वार्ता आमच्या कानावर नित्य येतच आहेत. तुमच्या पैकी काही जणांनी आमच्या जातीच्या तरुणांना लोभ दाखवून आपल्या बाजूला ओढून घ्यायचा प्रयत्न सुद्धा केला आहे. भिल्लांचा सरदार या नात्याने मी ते प्रयत्न निष्फळ करीत आलो. आतां मला हे सांगा की हा सैनिक पोशाख धारण करून तुम्ही आमच्या या प्रदेशात येण्याचे कारण काय?"

भिल्लांचा वृद्ध सरदार आमच्यावर संशयित नजर कां ठेवीत होता तेव्हां कोठें माझ्या लक्षात आले. मी विचार केला की त्याला सर्व राजकीय परिस्थिती नीट समजावून सांगणे जास्त योग्य होईल.



त्यानंतर मी भिल्लांच्या सरदाराला सर्व गोष्टी नीट समजावून सांगितल्या आणि मंत्रद्वीपात समरसेनाची कशी ओळख झाली आणि त्यानंतर कुंडलिनी द्वीपात कसे कसे फेरबदल होत राहिले आणि शेवटी नरवाहन मिश्रने आमच्याशी कसा विश्वासघात केला, सविस्तर सांगितले. ते सर्व ऐकून भिल्लांचा सरदार माझ्या डोळ्यात आपली खोल नजर घालून म्हणाला–"याचा अर्थ असा झाला की या देशावर ज्याचा अधिकार आहे त्याचे तुम्ही शत्रू आहां!"

मी "हो!" म्हणालो.

वृद्ध सरदार खाली मान करून विचार केल्यावर म्हणाला–"म्हणजे तुम्ही या जंगलात राहून संधी साधून नरवाहनशी गनिमी काव्याने युद्ध करीत राहणार?"

"तो विचार आमच्या मनात मुळीच नाही!" मी लगेच उत्तरलो.

माझे उत्तर ऐकून भिल्ल सरदाराला बरें वाटले असावे. तो उठून माझ्या जवळ आला व माझे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन म्हणाला–"मी प्रश्न करून तुमचे मन दुखविले असेन तर मला माफ करा. तुम्हांला हे बेट सोडून कोठे जावयाचे असेल तर आम्ही तुम्हांला आवश्यक सर्व मदत देऊ. मला तुम्हां सर्वांना एक विनंती करावयाची आहे की हा प्रदेश बिलकुल शांत आहे. म्हणून तुम्ही कृपा करून आमच्या या शांत वाता-
















वरणात वादळ आणण्याचा प्रयत्न करू नका. तुम्ही या जंगलात राहून चालू सरकारच्या विरुद्ध बंडाळी करून ते उलटून पाडायचा प्रयत्न केल्यास त्या-मुळे हा जंगली प्रदेश वादळात सांपडून नष्टभ्रष्ट होईल."

मी त्या दिवशी रात्री आपल्या सर्व अनुयायांना एकत्र करून त्यांना वस्तुस्थिती समजावून सांगितली. सर्वांनी ही गोष्ट मान्य केली की काही काळ नरवाहन मिश्रच्या नजरेस न पडतां त्या जंगलात रहावयाचे व संधी पाहून ते बेट सोडून निघून जायचे, परंतु त्या दिवशीच रात्री एक अनपेक्षित घटना घडली.

भिल्लांच्या वस्तीच्या बाहेर झाडांखाली मी व माझे अनुयायी झोपण्याच्या तयारीत होतो. आम्ही होतो तेथून थोडयाच अंतरावर काही भिल्ल तरुण रानटी जनावरापासून आमचं रक्षण करण्-याच्या हेतूने मोठा जाळ करून त्याच्या चारी बाजूला झोपले. ठीक मध्यरात्रीच्या सुमारास डफांचा आवाज आणि एका जागी जंगलाला आग लागल्याचा उजेड दिसला.

आम्हांला आश्रय देणारी भिल्लांची वस्ती जागी झाली. वस्तीच्या वृद्ध सरदाराने आपल्या अनुयायांना आज्ञा



केली की ढालतरवार घेऊन सर्वांनी वस्तीच्या चारी बाजूला पाहारा द्यावा. काही तरुणांच्या हातात मशाल देऊन वृद्ध सरदाराने डफांचा आवाज येत होता त्या दिशेला त्यांना पाठविले.

"ही काय भानगड आहे?" मी वृद्ध सरदाराला विचारले.

"वृद्ध सरदार काही वेळ मान खाली करून गप्प बसून राहल्यावर गंभीर स्वरात म्हणाला–" काहीही असू शकेल. कदाचित हत्तींचा कळप वस्तीवर चालून येऊन ती सर्व उधळून लावणार असेल. किंवा कोणती तरी दुसरी रानटी जात आमच्यावर चालून येऊन आमची गुरे व इतर संपत्ती

लुटण्याच्या विचारात असेल. परंतु मला स्वतःला हे सर्व आश्चर्यच वाटत आहे." असे म्हणत वृद्ध सरदाराने जळत असलेल्या जंगलाकडे बोट दाखविले.

"हा सर्व आमच्या शोधार्थ नरवाहन मिश्रने पाठविलेल्या लोकांचा प्रयत्न तर नाही?" वीज चमकावी तसा एक विचार माझ्या मनाला चाटून गेला.

इतक्यात चारपाच भिल्ल तरुण आम्ही होतो त्या बाजूला धावत पळत आले. तेथे आपल्या सरदाराला पाहून म्हणाले– "सरदार, आपल्या वस्तीवर सैनिकांनी हल्ला केला आहे व जाळपोळ सुरू केली आहे. त्यांच्याच पैकी काहीजण विना कारण जंगलाला आग लावीत आहेत."

"असं पूर्वी कधी घडलं नव्हतं. त्यांना हव तरी काय आहे?" भिल्ल सरदाराने विचारले.

इतक्यात नरवाहन मिश्राच्या एका सैनिकाच्या मुसक्या बांधून दोन भिल्ल तरुण आम्ही होतो तेथे आले.

"सरदार, याला विचारा काय ते! हा सर्व सांगेल तुम्हांला. हा म्हणतो की जंगलाचा हा प्रदेश त्याचा पुढारी सुबाहू याचा आहे." असे म्हणत दोघा तरुणांनी त्यांच्या काठ्यांची टोके त्यासैनिकाच्या अंगाला लावून त्याला ढकलले.

भिल्लांच्या सरद्दाराने माझ्याकडे एकदां पाहिले व त्या बंदी सैनिकाला विचारले– "माझे अनुयायी म्हणतात ते खरे आहे का रे? मला हे सांग, तुझा सरदार कोणी सुबाहू त्याला जंगलाचा हा तुकडा कोणी दिला, कळू दे तरी?"

"आमच्या सरदाराने युद्धात नरवाहन महाराजांना मदत केली होती. त्याबद्दल महाराजांनी हे जंगल इनाम म्हणून आमच्या सरदाराला दिले आहे. या जंगलात राहणारे सर्व पशुपक्षी आणि माणसांच्या वस्त्या आमच्या सरदाराच्या आहेत. आमच्या सरदाराच्या आज्ञेने हा प्रदेश हाती करून घेण्यासाठी आम्ही येथे आलो आहो." सैनिक म्हणाला. (क्रमशः)



# रोगाचे निदान

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा, तुझ्यासारखे निश्चयी या जगात फार थोडे आहेत असे मला वाटते. स्वतःचा स्वार्थ असेल तर तो सिद्ध करून घ्यायला जेवढा उत्साह असतो, तेवढाच इतरांना मदत करण्यातही असला पाहिजे. परंतु ज्यांचं हित करावं ते फार दिवस ते आठवतातच आणि उपकारकर्त्यांचा आदर करतीलच असेही नाही. अशाच एका परोपकारी व्यक्तीच्या मनची कुचंबणा झाली होती. त्याची गोष्ट मी तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

सोमेश्वर नावाच्या एका मोठ्या गावात हनुमंतराव नावाचे गृहस्थ रहात. त्यांना



वारसाहक्काने फार मोठी इस्टेट मिळाली होती. त्यांना तीन मुले होती. सुखाचा संसार होता. स्वतःच्या संसाराची जबाबदारी संभाळून चारचौघां गरीब गरजूंना मदत करण्याची हनुमंतरावांना संवयच पडून गेली होती.

तसं हनुमंतरावांना काम काहीच नसे. शेतीभातीची व इतर कामे पहायला गडी होते. घरातली सैंपाकाची वगैरे सर्व कामे बायको पहात असे. त्यांना नेहमी काही न काही तरी आजार असल्या कारणाने बाहेरच्या ओट्यावर बसून रस्त्यावरून येणाऱ्या जाणाऱ्यांची चवकशी करीत. हनुमंतरावांचं घर गावाच्या मध्य भागातच होतं. म्हणून रस्त्यावर नेहमीच वरदळ असे. ओट्यावर आरामखुर्ची टाकून ते बसत आणि रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्यांशी दोन गोष्टी बोलल्याशिवाय त्यांना पुढे जाऊ देत नसत. ज्यांना फुरसत असे ते ओट्यावर बसून बोलत. काही रस्त्यावर उभे राहूनच बोलत व काही जातां जातां उत्तर देऊन निघून जात.

एके दिवशी हनुमंतरावांनी चंदूला हाक मारली. तो कोठे तरी घाईघाईने जात होता. म्हणून हनुमंतरावांनी त्याला हाक मारली ती ऐकू आली नाही. त्याने हनुमंतरावांकडून मागे पंचवीस रुपये कर्जाऊ घेतले होते. सहा महिने लोटले होते, परंतु त्याने एक रुपयाही परत केला नव्हता. कधी भेटला तर नम्रपणे नमस्कार मात्र करी. परंतु त्या दिवशी तो हाक मारूनही एक शब्द बोलला नाही.

"माणसं कृतघ्नच! केलेले उपकार असेच विसरतात." हनुमंतराव मनातल्या मनात म्हणाले.

त्यानंतर काही वेळाने रस्त्याच्या अगदी टोकाला एक घोड्याची गाडी उभी राहिली. हनुमंतरावांना ती दिसली. गाडीतून उतरणाऱ्यांना हनुमंतरावांनी दुरूनही ओळखलं. ती मंडळी म्हणजे लक्ष्मी आणि तिचा नवरा नारायण दोघं होती.

लक्ष्मी व नारायणाचं लग्न जमवून आणलं ते हनुमंतरावांनीच. नारायणाच्या आईवडिलांनी हुंडा आणखी जास्त हवा असे म्हटले तेव्हां हनुमंतरावांनी मध्यस्थी करून लक्ष्मीच्या गुणांचं वर्णन करून ते स्थळ हातचं जाऊ दिलं नव्हतं.

लक्ष्मी सासरी जाऊ लागली तेव्हां हनुमंतरावांकडे येऊन म्हणाली होती—"काका, तुमचे उपकार मी जन्मोजन्मी विसरणार नाही."

रस्ता वळण घेऊन जाई त्या वळणावरच त्यांचं घर होते. नवराबायको बोलत समोरून जाऊ लागले तेव्हां हनुमंतराव त्यांना हाक मारून म्हणाले—"काय ग, लक्ष्मी, गावाहून आलात वाटतं?"

लक्ष्मीने हनुमंतरावांना पाहिलं नव्हतं. त्यांनी हाक मारली तीही तिला ऐकू आली नव्हती. नवऱ्याबरोबर पुढे निघून गेली. म्हणून हनुमंतरावांना ते बोचलं. "मदत केलेली माणसं विसरतात, हेच खरं!" हनुमंतराव मनात म्हणाले.

आणखी काही वेळाने रस्त्याने शाळेतले मास्तर जातांना दिसले. मास्तरांना हनुमंतरावांमुळेच त्या गावात रहायला व मास्तरकी करायला जागा मिळाली. कमरेच्या धोतरानिशी मास्तर त्या गावी आले होते. हनुमंतरावांनी त्यांना आपल्या घरीच उतरवून घेतले होते आणि एक लहानशी ओटीवरची शाळा त्यांना काढून दिली होती. आतां मास्तरांचं स्वतःचं





घरही झालं होतं. त्यासाठी सुद्धा हनुमंतरावांनी थोडा हातभार लावला होता.

"थांबा हो, मास्तर थोडे, कसली गर्दी आहे?" हनुमंतरावांनी विचारले.

मास्तर थोडे थबकले आणि "सणलवकरच आहे नाही का? तीच गर्दी! पुन्हा केव्हांतरी येऊन भेटतो!" असे सांगून निघून गेले.

"माझ्याबरोबर काही वेळ बसून बोलायला कोणाला वेळ नाही, प्रत्येकाला गर्दी! मी बोलावलं तर थोडा लहान थोराचा विचार नको होता का, करायला?" असं मनात हनुमंतराव गुणगुणत असतां, त्याच वाटेने जाणारे रघुशेट थांबून "नमस्कार, हनुमंतराव!" म्हणाले.

शेजारच्या गावी दिवाळं निघाल्यावर रघुशेट या गावी आले होते. हनुमंतरावांनी त्यांना द्रव्यसहाय्य केले आणि रघुशेटचा व्यापार सुरू झाला. भाग्य सामोरे आले आणि दुकान छान चालू लागले.

"बस रे, रघुशेट! गावाची काय खबरबात?" हनुमंतरावांनी विचारले.

"बसून राहणं तुमच्यासारख्या भाग्यशाली माणसांनाच शक्य आहे हो! काम केल्याशिवाय पोट कसं चालायचं? दिसलात, म्हणून चवकशी केली, एवढेच!" म्हणत रघुशेटने पाय काढला.

"याला माझे पैसे हवे आहेत. दोन मिनिटे बसून बोलायला वेळ नाही!" हनुमंतराव मनात म्हणाले.

अशा तऱ्हेने येणारे जाणारे त्यांना पाहूनही निसटून जात. ती गोष्ट हनुमंतराव मनाला फार लावून घेत आणि त्याच विचाराने ते दिवसेदिवस खंगत चालले. वैद्याने येऊन प्रकृती तपासून पाहिली व काही आजार नसल्याचे सांगितले.

बायकोने कितीदां विचारलं, परंतु हनुमंतराव असे थकल्यासारखे कां झाले हे त्यांनी तिला सांगितलं नाही व तिलाही कळलं नाही. तिने शेजारच्या गावी तिचा थोरला भाऊ नारायणराव रहात होता त्याला कळविले. तो चवकशीला धावला.





"दादा, पाहिलंस का रे, काही दिवसांपासून हे कसे थकल्यासारखे झाले आहेत. आजार काय आहे, वैद्याला सुद्धा कळला नाही." या शब्दात हनुमंतरावांच्या बायकोने आपल्या दादाला मनातलं दुःख सांगून मन थोडे हलकं करून घेतले.

नारारायणराव एक हुशार माणूस होता त्याने मेहुण्याला अनेक प्रश्न विचारून पाहिले. परंतु आजाराचे कारण उमगलं नाही. त्याने हनुमंतरावांची दिनचर्या सर्व विचारून घेतली. हनुमंतराव रस्त्यालगतच्या ओट्यावर बसून राहल्यामुळेच असे खंगत चालले असावेत असे त्याला वाटले.

दुसऱ्या दिवशी नारायणराव ओट्यावर हनुमंतरावांबरोबर बसून गप्पा मारीत बसला. हनुमंतराव रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्याविषयी मेहुण्याला सांगून कोणाकोणाला त्यांनी किती व कशी कशी मदत केली व तो आतां त्यांच्याकडे लक्ष सुद्धा देत नाही, हे सविस्तर सांगू लागले. त्या गोष्टीचं त्यांना फार वाईट वाटत असल्याचं ही नारायणरावांनी ओळखलं.

नारायणराव सर्व शांतपणे ऐकून घेऊन म्हणाला—"तात्या, तुम्ही म्हणालात ते सर्व खरं आहे हो! तुमच्याकडे इतर लक्ष देत नाहीत, याचे कारण तुम्हांला माहीत आहे का? या जगात आजारी आळशी माणसाला कोणी विचारीत नाही. तुम्ही इतरांना जी पैशाची मदत केलीत ते पैसे तुम्ही स्वतःच्या मेहनतीने मिळविलेले नव्हते. वारसाहक्काने ते तुम्हांला मिळाले होते. तुम्हांला पैशाची किंमत वाटत नाही. म्हणून तुम्ही सढळ हातांनी इतरांना मदत करतां आहां, असं वाटणारे सुद्धां कित्येकजण असतील. म्हणून थोडे काम करायची संवय करा, मला वाटतं!" नारायणराव म्हणाला.

हनुमंतरावांना मेहुण्याचा सल्ला आवडला असावा. त्या दिवसापासून ते आपली कामे इतरांवर न टाकतां स्वतः करू लागले.

दररोज शेतावर जाऊं लागले. सकाळी उठल्यापासून रात्री झोपायची वेळ होईपर्यंत कामात गुंतलेले असत.

काही काळ लोटल्यावर हनुमंतरावांची तब्येत चांगली सुधारली. गावात त्यांचा आदर वाढत असल्याचेही त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, हनुमंतरावांकडून सहाय्य घेतलेल्या लोकांविषयी माझ्या मनात दोनएक शंका आहेत. त्यांच्या आळशीपण विषयी त्या लोकांना इतका तिटकारा कां वाटावा? हनुमंतरावांच्या चांगुलपणाला आठवून त्यांनी त्यांचा आदर केला असता तर त्या लोकांचं काय बिघडत होतं? या शंकांचं समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिलं नाहीस तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला—"हनुमंतरावांविषयी ग्रामस्थांच्या मनात सर्वदा एकच भावना होती. त्यांचा चांगुलपणा, दानशीलता याविषयी त्यांच्या मनात आदर भावच होता. ती गोष्ट ते हनुमंतराव, त्यांना हाक मारून बोलत तेव्हां व्यक्तही करीत. परंतु हनुमंतराव पारावरच्या मारुतीसारखे सर्वकाळ ओटयावर बसून बसल्याबसल्या काहीतरी विचार करून मानसिक रोगाने आजारी पडले अगदी रिकामटेकडेपणाने बसणाऱ्या माणसाचे मन आजारी पडले तर त्यात आश्चर्य करण्याची गरज नाही. रिकाम्या मनाला मित्रसुद्धा शत्रू वाटतात. ती गोष्ट माहीत असल्यामुळेच त्यांच्या मेहुण्याने त्याचे ओटयावरचे आसन हलविले आणि त्यांना शेतावरच्या व इतर कामात गुंतविले. अशा तऱ्हेने हनुमंतराव स्वतःच स्वतःवर ओढून घेतलेल्या मानसिक आजारातून मुक्त झाले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर नाहीसा झाला आणि झाडावर जाऊन पुन्हां लोंबकळू लागला.

(कल्पित)





# परोपदेशे पांडित्य

रामू व श्यामू शेजारी शेजारी राहणारे शेतकरी होते. शेतीच्या कामातच नव्हे तर इतर सर्व लहान मोठ्या कामांतही ते परस्परांना मदत करीत. त्यांची मैत्री इतर ग्रामस्थांना एक उदाहरणच होते.

एके दिवशी अकस्मात् दोघे परस्परांना शिव्या देऊ लागले आणि परस्परांच्या शेंडया धरून मारामारी करू लागलेले पाहून गावकऱ्यांना आश्चर्यच वाटले. गंमत पहायला आलेल्या सर्वांनी त्या दोघांना शांत करण्यासाठी किती प्रयत्न करून पाहिले. परंतु रामू व श्यामूची शिवीगाळ थांबली नाही. तेथे जमलेल्या गांवकऱ्यांना काय करावे, सुचेना. इतक्यात लांबलचक दाढी असलेला शांत गंभीर चेहऱ्याचा एक वृद्ध माणूस तेथे आला.

त्या वृद्ध माणसाला पाहतांच रामू व श्याम शांत झाले आणि त्या म्हाताऱ्याला त्यांनी नम्रपणे नमस्कार केला. त्यावेळी तो वृद्धमाणूस त्यांच्याकडे अर्धवट उघडया डोळयांनी पहात होता. दोघांनी त्यांच्या भांडणाचे कारण सांगितले.

त्या वृद्ध माणसाने खुणेने दोघांना गप्प रहायला सांगितले. नंतर रामू व श्यामूलाच नव्हे तर इतर लोकांना उद्देशून तो म्हणाला—"माणसाने मुळात परस्परांवर रागावणेच मोठी चूक! भांडणात परस्परांनी शिवीगाळ करणे त्याहून जास्त भयंकर चूक! भांडणाचं कारण कोणी मला सांगण्याची गरजच नाही. कोणत्याही परिस्थितीत कोणी किती राग आला तरी तो प्रगट करणे सुद्धां मानवलक्षण होत नाही!"

त्या वृद्ध माणसाच्या तोंडून ते ऐकून रामू व श्यामूच नव्हे तर इतर सर्व लोक आश्चर्यचकित झाले. चार पांच मिनिटं तेथे स्तब्धता होती. इतक्यात गर्दीतून एक

तरुण पुढे येऊन त्या वृद्ध माणसासमोर उभा राहून म्हणाला—"अहो आजोबा, माणसाला राग न येणे कधीच शक्य नाही.

तो वृद्ध खदखदां हंसला आणि आपल्या लांब दाढीवर हात फिरवीत म्हणाला—"कां नाही? मी आपलीच गोष्ट सांगतों. कोणीही कधी मला राग आणू शकणार नाही. मानवच काय, देव किंवा दानव कोणीही!"

त्या वृद्ध माणसाशी उमेदपणे बोलणाऱ्या-वर डोळे वटारून पाहून एकेक जण त्या वृद्ध व्यक्तीला नमस्कार करून तेथून निघून गेला. तो तरुण वृद्ध व्यक्तीजवळ येऊन म्हणाला—"आजोबा!"

"काय रे बाबा?" वृद्ध माणसाने स्मित करून विचारले.

"आजोबा!" तो तरुण तेवढेच म्हणून थांबला.

"बोल बाळा, काय हवं ते बोल!" वृद्ध माणसाने थोड्या गंभीर स्वरात विचारले.

"आजोबा!" एवढेच म्हणून तो तरुण थांबला.

"बोल ना, तुला काय म्हणावयाचे असेल ते!" वृद्ध माणूस नजर थोडी क्रुद्ध करून म्हणाला.

"आजोबा!" तो तरुण थोडादेखील विचलित न होता म्हणाला.

"काय रे मूर्खा! तुला वेडबीड तर लागले नाही!" वृद्ध माणसाने संतापून विचारले.

"आजोबा!" तरुणाने पुन्हां शांत स्वरात म्हटले.

"वात्रट पोरा! मी तुझी चामडी लोळवीन!" असे म्हणत तो वृद्ध त्या तरुणाला मारायला धावला.

तरुण हंसत म्हणाला—"कोणत्याही परिस्थितीत माणसाने राग येऊ देता कामा नये!"

वृद्ध मान खाली घालून काही एक बोलल्याशिवाय तेथून निघून गेला.





# घरापेक्षा देऊळच बरें!

नारायणच्या आईवडिलांनी त्याला फार लाडात वाढविले आणि तो वयात आल्यावर त्याचे लग्न करून दिले. त्याची बायको तो म्हणेल ते त्याच्या इच्छेप्रमाणे करी. त्यांना तीन मुलगे झाले. तिघेही गोरेगोमटे आणि होतकरू होते. परंतु घरातली सर्व माणस एका गोष्टीमुळे नाखूष होती. नारायण कधी देवळात देव दर्शनाला जात नसे.

नारायण तोंडाने कधी म्हणाला नाही कीं देव नाहीं! म्हणजे देवाच्या अस्तित्वा-विषयी त्याने कधी शंका व्यक्त केली नाही. परंतु देवळात दर्शनाला किंवा पुजेला तो कधी गेला नाही. त्याच्या आई-वडिलांनी सुद्धां अनेकदां त्याला समजावून सांगण्याचा प्रयत्न करून पाहिला. ते म्हणत—"बाळ, रिकामा वेळ असेल तेव्हां देवदर्शनाला जाऊन यावे!" परंतु नारायण ते या कानाने ऐकून त्या कानाने सोडून देई. बायकोने सुद्धा निरनिराळ्या तऱ्हेने समजावून सांगितले, पण व्यर्थ! मुलांनी सुद्धा आग्रह केला, परंतु नारायणने त्यांचे ही ऐकलं नाही. एखाद्या सणाच्या दिवशी घरातली सर्व मंडळी देवदर्शनाला जात, पण नारायण एकटा घराची राखण करायला म्हणून सांगून घरीच राही.

एकदा नारायणचा मुलगा आजारी पडला. औषधोपचार करूनही गुण पडला नाही, तेव्हां नारायणच्या बायकोने देवाला सांकडे घालून नवस केला की तो बरा झाला तर सर्व कुटुंबीय येऊन अभिषेक करतील आणि गंमत अशी की त्याच दिवशी रात्री मुलाची प्रकृती सुधारू लागली. मुलगा चांगला बरा झाल्यावर नारायणच्या बायकोने नवऱ्याला, तिने केलेल्या नवसाची गोष्ट सांगितली.

"वसुंधरा"



नारायणने कोरडे उत्तर दिले–"तुम्ही सर्व देवळात जा. मी घराची राखण करायला घरी राहातो."

त्याची बायको त्याला विनवण्या करीत रडक्या स्वरात म्हणाली–"यावेळी तरी माझं ऐका. देव रागावेल. मी नवस केला आहे की घरची सर्व लहानथोर मंडळी अभिषेकाला हजर राहतील.

"मला देऊळ व देवळाच्या आजूबाजूची जागा पाहूनच चीड येते." नारायण चिडक्या स्वरात म्हणाला.

सर्वांनी समजावून पाहिलं, परंतु निरुपयोग. शेवटी नारायणचे वडील सुनेला म्हणाले–"सूनबाई! राहू दे, तो कोणाचं ऐकणार नाही. परंतु अशा माणसाला देवळात कसं आणावयाचं हे त्या देवाला चांगलं कळतं!"

त्यानंतर नारायणला घरी एकटा सोडून सर्व मंडळी देवळात गेली. त्यानंतर थोडया वेळाने सीताराम नावाचा एक माणूस घरी एकटया नारायणला पाहून नारायणला म्हणाला–"सर्व मंडळी कोठे गेली आहेत? तू एकटाच घरात आहेस?"

नारायणने सर्वजण देवळात गेले असल्याचे सांगितले. तेव्हां सीतारामने विचारले–"मग तू कां नाही गेलास बाबा?" नारायण त्याचे उत्तर देणार इतक्यात सीताराम म्हणाला–"बरं ते सोड! याहून एक मोठे पुण्यकार्य मी तुला सुचवितो." असे सांगून सीताराम जमिनीवर अंथरलेल्या चटईवर बसला. आपल्या पिशवीतून एक ग्रंथ काढून वाचू लागला. म्हणाला–"हे पुस्तक म्हणजे भगवद्गीता आहे! यात अठरा अध्याय आहेत. मी पुस्तक पाहिल्याशिवाय म्हणत जातो. तू पुस्तकात पहात रहा." नाइलाजाने नारायणने गीता उघडली. ती गीता म्हणजे सटीक होती. मोठं जाडजूड पुस्तक होते. त्यात सीताराम प्रत्येक श्लोक सुस्वर आळवून आळवून म्हणत होता. सीताराम असाच वाचत राहिला, तर पुस्तक संपायला दोन दिवसही





पुरणार नाहीत, असे नारायणला वाटले. थोडया वेळाने सीतारामाने नारायण नुसती पानं उलटीत असल्याचे आणि तो म्हणत असलेल्या श्लोकाकडे नारायणाचे लक्ष नसल्याचे ओळखले. तेव्हां नारायणला दटावून म्हणाला–"तुझं पुस्तकाकडे लक्षच नाहीसे दिसते आहे! तुझं लक्ष आहे की नाही हे पाहण्यासाठी मी जाणून बुजून चूक केली होती, तरी तू मला माझी चूक दाखविली नाहीस."

"मामा, आज माझे डोळे दुखत आहेत. मला अक्षरं चांगली दिसतही नाहीत!" नारायणने बतावणी केली.

"अस्सं! मग तू ते पाहिल्यानेच कां नाही सांगितलेस? मला डोळयाच्या आजाराची चांगली माहिती आहे. मी औषध घालतो." असे म्हणत सीताराम नारायणला घेऊन परसात गेला. दोनतीन निरनिराळया झाडांचा पाला काढून तळहातांवर चोळून त्यांचा रस काढला व म्हणाला–"तू क्षणभर हलल्याडुलल्याशिवाय एका जागेवर बसून रहा. मी हा रस तुझ्या डोळयात घालतो."

नारायण घाबरला की तो रस पिळल्याने डोळे कायमच जाणार तर नाहीत! म्हणून उघड म्हणाला–"मामा, आजच सकाळी गावातल्या वैद्यबुवांनी एक औषध माझ्या डोळयात घातले आहे. म्हणून आणखी एक औषध घातल्याचा दुष्परिणाम तर काही होणार नाही ना? मला भीती वाटते!"

अरे बाबा, मग ते तू मला आधीच कां नाही सांगितलेस! तू अगदीच विसरभोळा दिसतो आहेस की! या लहान वयात हे बरं नाही, विसरभोळेपणा जायला माझ्याकडे एक रामबाण औषध आहे! मी काढतो हुडकून ते झाड!" म्हणत सीताराम आणखी एका झाडाच्या शोधार्थ परसात हिंडू लागला.

ते पाहून नारायणाची छाती धडधड करू लागली. त्याने प्रसंग बदलण्याच्या हेतून

म्हटले—"मामा, देवासंबंधी तुम्हांला काय वाटतं?"

"मला म्हणशील तर देवाच्या अस्तित्वावर माझा दृढ विश्वास आहे. परंतु काही लोकांना वाटतं की देव फक्त देवळात असतो. माझ्या मते तो सर्वव्यापी आहे! म्हणून मी देवाची पूजा कोठेही करतो, देवळात नाही!" सीताराम म्हणाला.

तेव्हां नारायण जास्त जिज्ञासापूर्वक विचारू लागला—"मग मामा, तुम्ही देवळात कधी पाऊल टाकीत नाही का?"

"मी चुकूनसुद्धा देवळात जात नाही." सीताराम म्हणाला.

तेव्हां नारायण एका श्वासात बायकोने केलेल्या नवसाची गोष्ट सांगून म्हणाला—"मामा, देवळात आमची घरची सर्व मंडळी माझी वाट पहात बसली असतील! आम्ही सर्व परत येईपर्यंत तुम्ही घरात राहाल तर मी तुमचा आयुष्यभर ऋणी होईन!" असे सांगून सीतारामाच्या उत्तराची वाट पहायलाही न थांबतां नारायण देवळाकडे पळाला.

नारायण देवळात पोचला तोपर्यंत अभिषेकाला सुरवातही झाली नव्हती. काही कारणामुळे पुजाऱ्याला देवळात यायला उशीर झाला होता. म्हणून नारायणला आलेला पाहून सर्वांना आश्चर्याबरोबर आनंदही झाला.

"मी तरी काय करू? मला आजतरी घरापेक्षां देऊळच बरं वाटलं." असं सांगून नारायणने घडलेलं सर्व वृत्त सांगितले.

त्यानंतर मोठ्या श्रद्धा व भक्तिपूर्वक आपल्या कुटुंबियांसह नारायण अभिषेकाला बसला. घरी परतल्यावर नारायणचे वडील सीतारामाला म्हणाले—"सीताराम, तू यापुढे दर सणासुदीला आमच्याकडे येत जा. तुझ्यामुळे माझ्या मुलाला देवदर्शन तरी घडेल!"

सीतारामाला ते कोडे उलगडले नाही, म्हणून तो आश्चर्यचकित होऊन नारायण व त्याच्या वडिलांकडे पहात उभा राहिला.





# चहाडखोर

काशी येथे ब्रह्मदत्त राज्य करीत असतां बोधिसत्वांनी मगध देशाच्या एका गावात माघ नामे एका क्षत्रिय कुटुंबात अवतार धारण केला. खेडेगावातील उलाढाल्यासंबंधी विचार विनिमय करण्यासाठी सुमारे पन्नास प्रमुख गावकरी दररोज वडाच्या पारावर एकत्र जमत असत. वास्तविक त्या गावातील बरेचसे लोक बरं वाईटाचा विचारच करीत नसत. म्हणून ते नेहमी चोरी दरोडे आणि वाटमारी करण्यातच भूषण मानीत असत. कोणी त्यांना पकडलेच तर गावच्या पाटलाला लांच देऊन आपली सुटका करून घेत.

पारावरची जागा तशी स्वच्छ नव्हतीच, घाणेरडीच जास्त होती. नेहमी कचरा पाचोळा पडलेला असे. ते पाहून माघने स्वतःला बसण्यासाठी थोडीशी जागा धुऊन पुसून स्वच्छ केली, परंतु त्या जागेवर एक गावकरी येऊन बसला. म्हणून माघने आणखी थोडी जागा आपल्यापुरती साफ करून घेतली. ती जागाही आणखी एकाने बळकावली.

होता होतां माघने थोडी थोडी करून सर्व पारच स्वच्छ करून टाकला. तो कोणावर रागावला नाही की चिडला नाही. त्यानंतर त्याने त्या जागी एक मांडवही टाकला. त्यामुळे सर्व गावकऱ्यांना तेथे बसायला सोयीचे झाले.

थोड्याच दिवसात गावातल्या सर्व गावकऱ्यांचे लक्ष माघकडे गेले व त्यांच्या मनावर माघच्या सौजन्याची छाप बसली. सर्व माघच्या मार्गदर्शनाखाली गावातली सर्व लोकोपयोगी कामे करू लागले. सर्वांनी मिळून गावातल्या उत्सवासाठी एक मोठा मांडव घातला. पिण्यासाठी थंड पाण्याची तजवीजही त्यांनी केली.



हळूहळू गावकऱ्यांच्या मनावर माघच्या पंचशील सिद्धांताचा पगडा बसू लागला. ते सर्व मिळून रस्त्यावरचे खांचखळगे बुजवू लागले व रस्त्यांची साफसफाई करू लागले. रस्त्याने जाणाऱ्या गाड्यांना अडथळा होऊ नये यासाठी रस्त्यावर येणाऱ्या झाडांच्या फांद्या तोडून फेकून देऊ लागले. जागोजागी शेतीसाठी पाणीपुरवठा व्हावा म्हणून बांध घालून तलाव बांधू लागले. चिखलातून वाटा जात तेथें जाण्यायेण्यासाठी बांध घालून ठेवू लागले. या सर्व कामात माघच त्यांचे मार्गदर्शन करी.

त्या गावाचा एक पाटील होता. गावातल्या दारुड्या, जुगारी, खुनी वगैरे लोकांकडून त्याला चांगली मिळकत होती. कोणी गोडीगुलाबीने पैसे दिले नाहीत तर त्यांना कोणत्या तरी गुन्ह्यात अडकवून त्यांच्यावर दंड लावी. परंतु माघच्या हाती गावाचे नेतृत्व आले तेव्हांपासून पाटीलबुवांची प्राप्ती कमी झाली.

म्हणून गावाच्या पाटलाने राजाकडे जाऊन निवेदन केले–"महाराज, आपल्या गावात सर्वत्र अराजक पसरलं आहे. माघ नावाच्या एका तरुणाने गावातल्या सर्व तरुणांना काही काही सांगून त्यांच्या हातात लाठ्या कुऱ्हाडी, कुदळी आणि पहारी देऊन गावात गस्त घालायला सुरवात केली आहे. जिकडे जावे तिकडे हेच लोक दिसतात. गावकऱ्यांना स्वतःच्या जिवाची धास्ती बसली आहे. आपल्या कानावर ही गोष्ट घालणे आपले कर्तव्य समजून मी हे धाडस केले आहे. याउपर आपली मर्जी!"

राजाने त्या गावाची परिस्थिति पाहून जरूर तर बंडखोरांना धरून आणण्यासाठी पाटलाच्या बरोबर काही शिपायांना पाठविले. शिपाई गावाच्या वेशीजवळ पोचले असतील त्यावेळी त्यांना माघ आपल्या अनुयायांसह दिसला. सर्वांच्या हातात पाहारी, फावडी, कुदळी, कुऱ्हाडी, विळे-कोयते वगैरे हत्यारे होती.





शिपायांनी चवकशी वगैरे करण्याच्या भानगडीत न पडतां सर्वांना अटक केली आणि राजासमोर नेऊन उभे केले. राजाने प्रत्येकाच्या हातात एक न एक हत्यार पाहिले. सर्व हत्यारे शेतीच्या कामाला लागणारीच होती. तरी राजाला वाटले की या हत्यारांचा वापर हे लोक गावातल्या लोकांना दहशत बसावी म्हणून करीत असणार. पाटलाने तक्रार केली ती खरी असावी असे राजाला वाटले, म्हणून राजाने काही चवकशी वगैरे केल्याशिवायच हुकूम सोडला की "या सर्वांना हत्तीच्या पायांखाली देऊन मृत्युदंड द्यावा."

माघ व त्याच्या सर्व अनुयायांना हत्तीच्या पायाखाली तुडविण्यासाठी उभे करण्यात आले व एका मस्तवाल हत्तीला त्यांच्या अंगावर सोडण्यात आले, परंतु तो हत्ती त्यांच्या अंगावर गेलाच नाही. काही अंतर चालून गेल्यावर जागच्या जागी थबकला. त्यानंतर आणखी एक हत्ती आणण्यात आला. तो हत्ती माघ व त्याच्या अनुयायांना पाहून पळूनच गेला.

ती गोष्ट राजाला कळविण्यात आली. परंतु राजाला वाटले की माघ व त्याच्या अनुयायांच्या गळ्यात किंवा हातांत मंत्रवलेले ताबीज गंडे बांधलेले असावेत. म्हणून राजाने सर्वांची झडती घेऊन त्यांचे गंडे ताबीज वगैरे काढून टाकण्यास व त्यानंतर हत्तीला त्यांच्या अंगावर सोडण्यास सांगितले.

सर्वांची झडती घेण्यात आली. परंतु त्यांच्या अंगावर गंडे ताबीज यांपैकी काहीच नसल्याचे कळले. तेव्हां राजाने त्यां सर्व तरुणांना आपल्या समोर हजर करण्यास सांगितले.

राजाने माघ व त्याच्या अनुयायांना विचारले–"हत्ती तुमच्या अंगावर यायला कां भितो आहे? तुम्ही कोणत्या मंत्राचा जप करीत होतां? तुम्हांला मंत्रातंत्राची माहिती आहे का?"

माघ पुढे येऊन म्हणाला–"महाराज, आपण विचारलेले बरोबर आहे. आम्हांला एक मंत्र चांगला माहीत आहे. त्याहून मोठा मंत्र जगात दुसरा नाही."

"तो मंत्र कोणता?" राजाने विचारले·

आमच्यापैकी एकही व्यक्ती हिंसा करीत नाही. दुसऱ्याकडून बळजबरीने आम्ही एकही वस्तू घेत नाही. आम्ही खोटे बोलत नाही. प्राण्यांवर आम्ही दया करतो दान देतो. रस्ते व तलाव बांधतो. धर्मशाळा बांधतो, विहिरी खणतो. अहिंसा व सेवा हाच आमचा मंत्र आहे, तीच आमची शक्ती पण आहे." माघ म्हणाला.

ते उत्तर ऐकून राजा चकित झाला. तो म्हणाला–"पण मी ऐकतो की तुम्ही वाटमारी करतां. प्रजेला धमकावून त्यांच्याकडून पैसे उकळतां. हे सर्व खोटे आहे का?"

"महाराज, आपण कोणाच्या तरी तोंडी खोटी तक्रार ऐकून विश्वास केलात व खऱ्या गोष्टीची चवकशी केली नाही. म्हणून आपला असा गैरसमज झाला." माघ म्हणाला.

"तुमच्या हातात हत्यारे पाहून आम्हांला चवकशी करण्याची गरज भासली नाही." राजा म्हणाला.

"महाराज, या हत्यारांचा उपयोग वाटेत येणारी झाडेझुडपे तोडण्यासाठी होतो. तलाव खणण्यासाठी, धर्मशाळा बांधण्यासाठी इतर हत्यारांचा उपयोग होतो." माघ म्हणाला.

त्यानंतर राजाने चवकशी करविली आणि खरी परिस्थिती जाणून घेतली. शेवटी पाटलाने लावलेला आरोप खोटा आहे. त्याचा चहाडखोरपणा व लाचखाऊपणा उघडकीला आला. राजाने पाटलाने जमविलेले पैसे सरकारी खजिन्यात जमा-करविले व ती रक्कम माघला देऊन गावाची व्यवस्था पाहण्याचे कामही त्याला व त्याच्या अनुयायांना सोपविले. शिवाय राजाने आपले ते दोन्ही हत्ती माघला त्याच्या कामासाठी दिले.



# गुलामाचे भाग्य



इ. स. १२१०-१२३६ या काळात दिल्लीवर सुलतान अल्तमश याचे राज्य होते. एकदा एका सौदागराने सुलतानाला शंभर गुलाम आणून दाखविले. सुलतानाने नव्व्याण्णव गुलामांना विकत घेतले व उलूगखान नावाच्या गुलामाला नकार दिला.

गरीब गुलामाने सुलतानाचे पाय धरून विचारले–"जहांपनाह आपण या सर्वांना कोणासाठी विकत घेतले?" सुलतान म्हणाला–"माझ्यासाठी!" त्यावर उलूगखान म्हणाला–"तरमग मला अल्लाच्या नावावर विकत घ्या." सुलतानाने स्मित करून त्यालाही विकत घेतले.





एकदां सुलतानाच्या भेटीला एक ज्योतिषी आला. त्याने सुलतानाच्या हस्तरेखा पाहून भविष्य वर्तविले की त्याच्या नंतर दिल्लीच्या गादीवर एक गुलाम येईल. ते ऐकून अल्तमश मुळीच चकित झाला नाही. म्हणाला–"ठीक! माझ्या मुलांपैकी एकही या गादीच्या लायकीचा नाही. गुलामाहून ज्यास्त हुशारही नाही. मी तरी कधी काळी गुलामच होतो!"



तरी सुलतानाचा त्या ज्योतिष्याच्या भविष्यावर विश्वास नव्हताच. परंतु त्याच्या बेगमांच्या मनात खळबळ उडून गेली. कारण प्रत्येकीला तिचाच मुलगा सुलतानाचा वारस म्हणून गादीवर यावा असे वाटे. म्हणून सर्व बेगमांनी मिळून सुलतान होण्यालायक कोण गुलाम आहे याची माहिती काढून त्याचा काटा काढण्याचे ठरविले.

अल्तमशच्या बेगमांनी सुलतानाच्या पाठीस लागून पुन्हा एकदा त्या ज्योतिष्याला बोलावून घेतले. सुलतानाने आपल्या सर्व गुलामांना बोलावून त्यांच्या हस्तरेखा पहायला ज्योतिष्याला सांगितले. गुलाम पुष्कळच होते. त्या सर्वांच्या हस्तरेखा पहायला ज्योतिष्याला बराच वेळ लागला.





सर्व गुलामांबरोबर उभा असलेल्या उलूगखानाला तहान लागली. तो कोणाला कळू न देता सर्वांची नजर चुकवून गुपचुप निघून गेला. परंतु तो तहान भागवून परतला तोपर्यंत ज्योतिषी व सुलतान आपली कामे आटोपून निघून गेले होते. इतर गुलामांनी उलूगखानाची थट्टा केली की तोच सुलतान होणार.

काही वर्षे लोटली. उलूगखान आपली जबाबदारी उत्तम प्रकारे इमाने इतबारे बजावी आणि त्याने सुलतान अल्तमशची मर्जी संपादन केली. सुलतानाने त्याला आपला एक सरदार म्हणून नेमले. अशा तऱ्हेने अल्तमशच्या चाळीस सरदारांपैकी उलूगखान एक झाला.





अल्तमशने आपल्या मृत्युसमयी आपली मुलगी रजिया हिला आपला वारस नेमले. परंतु रजिया सुलतानाचा लवकरच खून झाला. तेव्हां रजियाचा भाऊ नासिरुद्दीन याने गादी बळकावली परंतु तो नालायकच होता. तरी उलूगखानाने आपली मुलगी देऊन त्याला आपला जावई करून घेतले. त्याने सर्व शासन सूत्रे आपल्या हातात करून घेतली.

त्यानंतर नासिरुद्दीन एकाएकी आजारी पडून वारला. त्याला मूलबाळ नव्हते. तेव्हां उलूगखान ग्यासुद्दीन बल्बन नावे दिल्लीचा सुलतान झाला. अशा तऱ्हेने ज्योतिष्याचे भविष्य खरे ठरले.















बल्बन एक योग्य शासक होता. प्रजा त्याचा आदर करी. सुलतानाने क्रूर व भयंकर अशा वाटमाऱ्यांचा पाडलाग करून त्यांचा नायनाट केला. बंगालचा सुभेदार तुगरिल खान याने बंड केले. तेव्हां बल्बनने त्याच्यावर स्वारी करून त्याला ठार केले

बल्बनचा थोरला मुलगा मुहम्मदखान सुलतानाचा सुभेदार होता. तो राज्या-च्या सरहद्दीचे रक्षण करीत असे. इ. स. १२७९ सुप्रसिद्ध मंगोल जातीचा पुढारी चंगीजखानाने जेव्हां स्वारी केली तेव्हां मुहम्मदखानाने त्याचा पराभव केला. १२८५ मध्ये चंगीज-खानाने पुन्हा स्वारी केली. त्या युद्धात मुहम्मदखान मारला गेला.





आपल्या थोरल्या मुलाचा वध झाल्याने बल्बनला अपार दुःख झाले. त्याच दुःखात वयाच्या ८० व्या वर्षी १२८७ मध्ये बल्बन मरण पावला त्याच्या नंतर गादीसाठी कैखुसरो व कैकोबाद यांचे भांडण झाले. शत्रूने दोघांचा वध केला. अशातऱ्हेने गुलामवंशाची कार-कीर्द संपली.



# कामापुरते मामा

सुजाताचे सासरे रघुनाथराव स्वभावाने थोडे उदारच. गावातला कोणीही माणूस त्यांच्याकडे मदतीसाठी आला की तो रिकाम्या हाताने कधीही परतला नाही.

सासऱ्याचे हे औदार्य सुजाताला मुळीच आवडत नसे. ती सुधाकरला म्हणाली– "मामंजी जो कोणी हात पसरील त्याला उधार देतात. हे असंच चालू राहिलं तर चार सहा महिन्यात दिवाळं निघेल."

"आमचे बाबा खरोखरीच गरजू असेल त्यालाच पांच-पंचवीस रुपये देतात. माणसात एवढी दया किंवा कीव गरिबावर असलीच पाहिजे!" सुधाकरने वडिलांच्या तर्फे वकिली केली.

"दयेच्या नावावर स्वतःचे कुटुंब नष्ट झालं तर त्याला मी सुज्ञपणा म्हणणार नाही. त्यापेक्षां मामंजींना आपला वांटा देऊन टाकायला सांगावं! मग स्वतःच्या मिळकतीतलं वाटेल ते त्यांना देऊ देत." सुजाताने सांगून टाकलं.

सुधाकरने बायकोला सर्व समजावून सांगण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु ती आपला हट्ट सोडीना आणि घरांत नेहमी वितंडवाद चालू राहिला.

रघुनाथरावांच्या नजरेआड ती गोष्ट राहिली नाही. काहीतरी कारणावर मुलाचं व सुनेचं भांडण चालू असल्याचं त्यांनी ओळखलं. एके दिवशी त्यांनी सुधाकरला बोलावून भांडणाचं कारण विचारलं. सुधाकरने घडलं ते सांगितलं.

रघुनाथराव रागावले नाहीत. त्यांनी आपल्या दहा एकर जमिनीतली अर्धी सुधा-करच्या नावे लिहून दिली आणि नवरा-बायको निराळी राहू लागली.

एका महिन्याने सुधाकरचा शंकर नावाचा एक मित्र आला आणि म्हणाला–



"सुधाकर, पाहिलंस, तुझे बाबा तुझ्यामुळे कसे बदलून गेले आहेत ते! मला फार गरज होती, म्हणून मी त्यांच्याकडे दहाच रुपये मागायला गेलो होतो. मला त्यांनी साफ नकार देत सांगून टाकलं की दहा काय एकही रुपया देणे शक्य नाही! त्याच बरोबर डोळ्यात पाणी आणून म्हणाले. त्यांच्यात दया म्हणून जी थोडी होती ती मुलामुळे नाहीशी झाली.

ते ऐकून सुधाकरला फार वाईट वाटले. लगेच सुजाता त्याला घरात बोलावून घेऊन म्हणाली—"तुमच्या वडिलांचे इतक्या दिवसांनी डोळे उघडले! तुमचे हे मित्र तुमच्याजवळ मागतील, त्यांना सांगून टाका, तुमच्या जवळ एक फुटकी कवडी देखील नाही. आपण असे करू लागलो तर हातात करवंटी येईल!"

"या वयात वडिलांचे डोळे उघडविण्याचे सर्व श्रेय तुलाच आहे. तुझ्या शहाणपणाचं कौतुक करावं तेवढं थोडंच आहे!" सुधाकर चेष्टेने म्हणाला. त्यानंतर शंकर काही एक न बोलतां निघून गेला.

दुसऱ्याच दिवशी सुजाताचे वडील गंगाधरराव मुलीला भेटायला आले. बोलता बोलता म्हणाले—"मुली, आपल्या कल्पने-प्रमाणे तुझ्या धाकट्या बहिणीचे लग्न होईलसे दिसत नाही. हुंड्याला दोन हजारांची तूट पडत आहे! मी पुष्कळ प्रयत्न करून पाहिला, पण कोणी कर्ज द्यायला तयार नाही."

सुजाता आपल्या वडिलांना धीर देत म्हणाली—"मी तुमच्या जांवयांकडून दोन हजार घेऊन उद्यां येते, आईला भेटायला? बहिणीला भेटायची फार इच्छा आहे."

त्या दिवशी रात्री सुजाता सर्व वृत्त नवऱ्याला सांगून "दोन हजार रुपयांची काहीतरी तजवीज करा." म्हणाली. तेव्हां सुधाकर रागाने म्हणाला—"इतक्या लव-कर तुम्यात हा बदल? तूच नाही का मला शिकविलंस की पैशाअडक्याच्या बाबतीत नातीगोती पहायची नसतात.





तुझ्या म्हणण्याप्रमाणे बाबांपासून भांडून निराळं बिऱ्हाड केलं. तुझ्या वडिलांसाठी दोन हजार तर मला राहूच दे, दोन रुपयेसुद्धां काढून देणे, शक्य नाही."

नवरा हट्टाला पेटला असल्याचे ओळखून दुसऱ्याच दिवशीं ती माहेरी निघून गेली व वडिलांना सुरवातीपासून सर्व सांगून टाकलं. व म्हणाले—"गंगाधरराव, हं! तरमग असं आहे तर! तुझा नवरासुद्धा तुझ्या सासऱ्याचाच मुलगा!"

बाप म्हणाला त्याचा खरा अर्थ न कळल्यामुळे सुजाता आश्चर्यचकित होऊन वडिलांकडे पाहू लागली.

तेव्हां गंगाधरराव म्हणाले—"तुला राग येण्याचं कारण नाही की मी तुझ्या नवऱ्याला काही नावे ठेवली. तुझे सासरे वाटे होण्या पूर्वी किती उदार होते! त्यावेळी मी त्यांच्याजवळ तुझ्या बहिणीसंबंधी बोलून म्हटले होते की लग्नाच्या वेळी मला काही पैशांची गरज पडेल. तेव्हां ते म्हणाले होते—"त्यात काय हो? हवे तेव्हां येऊन मागून घेऊन जा. परंतु आतां..." असे म्हणत गंगाधरराव गप्प राहिले. सुजाता काही तरी सुचल्यासारखं त्यांच्याकडे पहात त्यांना म्हणाली—"बाबा, मामंजींकडून मागितले तर चालेल ना?"

"पोरी, मी तेंच तुला सांगणार होतों. एका महिन्यापूर्वी मी तुमच्या गांवी आलो होतो तेव्हां मी पैशांची गोष्ट काढली होती. तेव्हां ते रागावून म्हणाले होते—



"रुपये आणि पैसे, आतां माझ्याकडे नाहीत. तुझे सासरे इतके उदार व दयाळू आणि असे कसे बदलले मलाच कळत नाही. काही तरी मूर्खपणा करून तुझ्याच नवऱ्याने काही म्हटलं असावं म्हणून त्यांचे हृदय दगडाचं झालं आहे!" गंगाधरराव म्हणाले.

तेव्हां सुजाता पश्चात्ताप करून म्हणाली– "बाबा, ती माझीच चूक होती. ती मी ओकून टाकली तर माझं मन थोडं हलकं होईल. मला त्यावेळी असे वाटू लागलं होतं की मामंजींचं हे औदार्य लोक व्यवहाराविरुद्ध आहे. मीच हट्ट करून वाटे करून घ्यायला सांगितलं. त्यावेळी आपलं असं नुकसान होईल असं नव्हतं वाटलं मला!"

ते ऐकून गंगाधरराव संतापले व म्हणाले–"थोरामोठ्यांनी सांगून ठेवलं आहे ते उगीच नाही. माणूस स्वार्थी आहे. स्वतःच्या स्वार्थसिद्धीसाठी तो नातीगोती लावीत सुटतो. त्याला कामापुरता मामा हवा असतो. एकच व्यक्ती काही लोकांबरोबर तर मोठ्या औदार्याने वागतो व काही जणांबरोबर कठोरपणाने, असं तुला कां वाटलं? वास्तविक तुलाच जगाचा अनुभव नाही व लोकव्यवहार काय हे तुला माहीत नाही. मी व तुझ्या सासऱ्याने मिळून परस्पर सल्ला करूनच सुधारकरकडे त्याचा मित्र शंकर याला पाठविले होते, शंकर म्हणाला ते ऐकून तू खूष झाली होतीस, नाही का? परंतु कर्ज न मिळाल्यामुळे तुझ्या बहिणीचं लग्न होत नसल्याचं कळल्यावर तुला वाईट वाटले तुझ्या सासऱ्याने मला मी मागितले तेवढे पैसे पूर्वीच दिले आहेत. निदान यापुढे तरी असा मूर्खपणा करायचा सोडून दे!"

सुजाता डोळ्यात पाणी आणून म्हणाली– "बाबा, माझं डोकं आतांच ठिकाणावर आलं आहे. घरी गेल्याबरोबर मी मामंजींचे पाय धरून त्यांची माफी मागते आणि पुन्हां एकत्र रहायला त्यांचं मन वळवून घेते."

"मुली, हे कसं शहाण्यासारखं बोललीस." गंगाधररावांना आनंद झाला होता.



# साधना

विजयनगर येथे एक जव्हेरी होता. त्याला चित्रगुप्त नावाचा एक मुलगा होता. मुलगा वयात आल्यावर जव्हेऱ्याने त्याचे लग्न करून द्यायचे ठरविले. त्याने गावातल्या व बाहेरच्या स्थळांची चवकशी सुरू केली आणि तीन स्थळे निवडली. तिन्ही मुली नक्षत्रांसारख्या होत्या.

चित्रगुप्ताने वडिलांबरोबर जाऊन मुली पाहिल्या. तिघी सुंदर होत्या. परंतु चित्रगुप्ताची नजर त्या तिघींपैकी एकीच्या धाकट्या बहिणीवर पडली. तिचे नाव भानुमती होते. भानुमती थोरल्या बहिणी इतकी सुंदर नव्हती. परंतु ती वीणावादनात निपुण होती. कविताही करी व वैद्यकचिकित्सा करण्यातही तिने प्राविण्य संपादन केले होते.

चित्रगुप्ताने भानुमतीबरोबर विवाह करण्याची इच्छा असल्याचे वडिलांना सांगितले. जव्हेऱ्याने चकित होऊन त्याला विचारले–"मुला, भानुमती तर दिसायला बेताचीच आहे, नाही का?"

चित्रगुप्त क्षणभर संकोच करून बोलला नाही, थोड्या वेळाने म्हणाला–"बाबा, तुम्हांला राग येणार नसेल तर सांगतो, सौंदर्य हे माणसाला उपजत प्राप्त होते. त्यासाठी बुद्धिमत्ता किंवा साधना दोन्हींची गरज नसते. परंतु भानुमतीने साधना करून वीणावादन व वैद्यकशास्त्र शिकून घेतले आहे. ती कविता सुद्धा करते. वया बरोबर सौंदर्य कमी होतं. परंतु विद्या व कला वाढतात."

मुलगा म्हणाला ते जव्हेऱ्याला पटलं आणि त्याने मुलाचे लग्न भानुमतीशी करून दिले.





# माळ्यावर जायची शिडी

आपल्या रहात्या गावींच चांगलं स्थळ मिळालं आणि लग्न सभारंभ उरकला, म्हणून रघूला अपार आनंद झाला. फुकटचा खर्च वांचला व लग्न उरकले. त्याच्याच ऑफिसात काम करणारा एक माणूस होता, त्याचं सासुरवाड गावापासून बरंच दूर होतं. म्हणून सणावारी सासुरवाडी जाऊन यायला बराच खर्च होई आणि वेळही फार लागे. म्हणून त्याचा चेहरा नेहमी असमाधानी दिसे. जणुकाही कर्जाच्या ओझ्या खाली त्याची कंबर मोडली होती. त्याचे नाव गणपति होते.

रघूच्या बायकोचे नाव अनुराधा. रघूने लहानसे बिन्हाड भाड्याने घेतले होते. त्याला कधी सासुरवाडी जावे लागले की आठ आणे गाडीभाडे देऊन जाऊन येई

एकदा शेजारी गणपती व रघूची वाटेत भेट झाली. गणपती रघूला म्हणाला—" मी तुमचा शेजारी आहे. मी तुमच्या घरी येऊन भेटायला हवं होतं. पण कामच तसं पडलं, म्हणून वाटेतच भेटलो. मला तुमच्या जवळ काही पैसे मागावे लागत आहेत. मला शंभर रुपयांची गरज आहे!"

"अण्णा, तुम्हांला माहीतच आहे की मी नुकतंच बिन्हाड मांडून संसारात पाऊल टाकलं आहे. खर्च फार होतो. मी इतके पैसे कोठून आणू?" रघू म्हणाला. त्याला या गोष्टीचे आश्चर्य वाटत होते की आतां आतां कोठे ओळख झाली आणि हा कर्ज कसा काय मागतो? तसा गणपतीचा पगार रघूपेक्षां फार जास्तच होता. शिवाय तो राहतो ते त्याचे घर होते. त्याला मूलबाळही नव्हते. मग या गृहस्थाला कोणाकडे कर्ज मागण्याची गरजच कां भासावी?

रघूने तसे गणपतीला विचारलेही. तेव्हां गणपती लांब निश्वास सोडून म्हणाला—

श्री ग. ना. राजहंस

"मित्रा, खरं सांगू? कोणी शहाण्याने आपल्याच गावातल्या मुलीशी लग्न करू घेऊ नये. माझी बायको मीठ मसाल्यापासून तर साखरतुपापर्यंत आपल्या माहेरी नेऊन देते. तुमचं सासुरवाड याच गावात आहे, म्हणे! थोडे सावधच रहा!"

ते ऐकून रघूला डोक्यावर वीज पडल्यासारखं वाटलं. आजपर्यंत त्याला वाटत होतं की नवाच संसार मांडला आहे, म्हणून थोडा जास्तच खर्च होणार. त्याची बायको दररोज काहीतरी माहेरी पाठविते, हे कधी त्याच्या लक्षातच आले नाही.

तोच विचार मनात घोळत होता आणि रघू घरी पोचला, त्यावेळी त्याची बायको नारळाची चटणी वाटीत होती. थोड्या वेळाने बायको काही कामा निमित्त परसात गेली. ती तंधी साधून रघूने चटणीच्या वाडग्यावरच झांकण काढून पाहिलं. त्यात एका नारळाची चटणी नव्हती. दुसऱ्या दिवशी त्याने एक सुरण आणून दिला. परंतु भाजी सुरणाचा कांदा होता त्या मानाने फारच थोडी होती. त्या घटकेपासून रघूच्या मनात बायको काय काय कारस्थाने करते याविषयी शंका उत्पन्न झाली संशय यायला आणखी एक कारणही तसेच झाले. त्याचा मेहुणा दिवसातून दोनतीनदां येऊन बहिणीला भेटून जात असलेला आढळला. याचा अर्थ



अनुराधा आपल्या भावाच्या हाती मनाला येईल ते माहेरी पाठविते. तो संशय मनात येतांच बायको काय काय पाठविते हे बारीक नजर ठेवून पहायचे, असे त्याने मनाशी ठरविले. बायकोची वेळ प्रसंग पाहून चांगली कान उघाडणही करायचे त्याने ठरविले.

एके दिवशी रघूने बायकोला, त्याला परगावी जायचं असल्याचं सांगितलं. अनुराधा सैंपाक करायला गेली.

"बरं मी निघालो हं! तू दार आतून बंद करून घे!" असे सांगून रघू माजघराच्या माळ्यावर चढून बसला. तेथे लोणच्यांच्या बरण्या ठेवलेल्या होत्या. अनुराधाने विचार केला की नवरा बाहेर



निघून गेला असावा तिने बाहेरच्या दाराला आतून कडी लावून घेतली आणि सैंपाक-घरात कामाला निघून गेली. त्या घाईत माळ्याला लावून ठेवलेल्या शिडीला तिचा पाय लागला व ती पडतां पडतां वांचली. तिने शिडीला शिव्या हासडल्या आणि शिडी काढून बाजूला ठेवून दिली.

थोड्या वेळाने दारावर कोणीतरी थाप दिल्याचा आवाज आला. रघूला वाटले, मेहुणा काहीतरी घेऊन जायला आला असावा. अनुराधाने दार उघडले आणि म्हणाली—"तू जाऊन भाड्याची गाडी घेऊन ये!" नंतर पुन्हां सैंपाकघरात निघून गेली. चुलीवरून भाताचे भांडे उतरले, पेटीतून पैसे काढून घेतले व कनवटीला खोचून बाहेर येऊन दाराला कडी लावून कुलूप लावून घेतले आणि निघून गेली.

"बरोबर! मला शंका होती ती खरी ठरली! धाकटा भाऊ येतांच पैसे काढून घेऊन पसार!" असे मनांतल्या मनात म्हणत रघू माळ्यावर बसल्या बसल्या दांत ओठ चावू लागला.

काही वेळाने मुंग्यांनी रघूवर स्वारीच केली. त्याला अगदी असह्यच झाले तेव्हां त्याने माळ्यावरून खाली उडी मारण्याचेच ठरविले. परंतु माळा फार उंचावर होता म्हणून उडी मारली तर हातपाय मोडण्याची शक्यता होती.

आतां काय करायचे याच विचारात तो असतां बाहेरचा दरवाजा उघडल्याचा आवाज आला. त्याला जिवात जीव आल्या सारखे झाले. परंतु आत शिरणारा कोणी चोर होता. तो नकली किल्लीने कुलूप काढून आत शिरला. आत आल्यावर त्याने दिवा लावला आणि पैसाअडका कोठे आहे, पाहू लागला.

तिकडे रघू माळ्यावर उकिडवा बसला होता व त्याचं डोकं धाब्याला लागत असल्या कारणाने त्याची मान दुखत होती. शिवाय मुंग्याही चावत होत्या. त्या परि-स्थितीत त्याला चोरच सखामित्र वाटला.



त्यानें धाडस करून विचारले—"अहो दादा, पलीकडे भिंतीला टेकून ठेवलेली शिडी माळ्याला लावता का? येथे माझा जीव गुदमरून गेला आहे."

चोर दचकला. परंतु लगेच त्याला वाटले की माळ्यावर बसलेली व्यक्तीपण चोरच असावी. नंतर माळ्याकडे पहात म्हणाला—"अरे पोरा, तुझ्यासारखे अर्धेमुर्धे चोरच आमच्यासारख्या अट्टल चोरांना संकटात ढकलतात. तुला लपायला या माळ्याशिवाय दुसरी जागा सांपडली नाही का? ये, उतर खाली!" असे म्हणत रघूला दम देत चोराने माळ्याला शिडी लावली.

रघू असा विचार करून खाली आला की जीव वांचला, 'सिर सलामत तर पगडी पचास!' चोर जवळ येऊन त्याला समजावून सांगण्याच्या स्वरात म्हणाला—"तू आपला वांटा मागू लागलास तर तुझे हातपाय तोडून टाकीन. मी तुला माळ्या-वरून उतरायला मदत केली त्याबद्दल तू या घरातील माल बांधायला मला मदत कर."

सर्व घर चाळून पाहिले, परंतु चोराच्या हाती एक छदाम लागला नाही. तो रागाने म्हणाला—"आज कोणाचं तोंड उजाडतांच पाहिलं, नकळे! या दरिद्र माणसाच्या घरात यायला बुद्धी झाली!"

ते ऐकून रघू मनातल्या मनात जळफळला. तरी त्याला एका गोष्टीचा आनंद झाला की त्याच्या बायकोने





घरातली सर्वं चीजवस्त उचलून बाहेर नेली होती.

चोराने तरी सर्व घर पुन्हा चाळून काढण्याचे ठरविले. शेवटी त्याने विचार केला की चोरी करण्यासारखं काही मिळालं नाही तर निदान खाण्यापिण्यालायक तरी काही सांपडेल! परंतु घरात कोठेही काही खाण्यालायक मिळालं नाही. स्वैंपाकघरांत थोडा भात तेवढा दिसला.

"डाळ भाजीशिवाय हे लोक नुसता भात कसा काय खातात?" असं म्हणत चोर चिडून पुन्हां बडबडला–"या घरात कुलुपाशिवाय कामाची दुसरी एकही वस्तू दिसत नाही. कुलूपच घेऊन जाईन."

"अगदी बरोबर! परंतु माळ्यावर बरण्या आहेत लोणच्याच्या, एक जरी काढून आणलीस तरी तोंडी लावणे होईल भाता-बरोबर!" रघूने सुचविले.

चोराला ते पटलं व तो शिडीवर चढून माळ्यावर गेला. रघूने शिडी काढून घेतली व म्हणाला–"अरे मूर्खा! मी चोरबीर नाही, या घराचा मालक आहे! थांब, तुला आतां अटक करवितो!"

इतक्यात पुन्हां दारावर थाप ऐकू आली. रघूने दार उघडले. अनुराधा धापा टाकीत आत येऊन म्हणाली–"म्हणजे तुम्ही पर-गावी गेलां नव्हता का? तुम्ही कुलूप कसे काढलंत? आज जीवावरचं संकट टळलं, माहीत आहे का?"

रघूला काहीच उमगलं नाही. अनुराधा म्हणाली–"आपण गेल्यावर थोड्या वेळाने कोणी येऊन सांगितलं की तुम्ही ज्या गाडीतून गेलां होतां ती उलटली आणि तुम्हांला बरंच लागलं आहे! म्हणून बरेचसे रुपये घेऊन भाड्याची गाडी करून निघाले. गाडीवाला आणि हा चोर दोघे भागीदार आहेत हो! वाटेत त्याने मला सुरी दाखवून सर्व रुपये हिसकावून घेतले. बरं झालं की माझ्या माहेरची सर्व मंडळी लग्नासाठी गेली होती. जातांना माझी धाकटी बहीण माझे सर्व दागिने घालून गेली होती. नाहीतर तेदेखील या चोरांच्या हातात पडले असते. तुम्ही सुखरूप परत आलात! हीच आनंदाची केवढी बातमी आहे!"

तेव्हां रघूला आठवले की दोनच दिवसा-पूर्वी त्याच्या सासुरवाडची माणसं घराला कुलूप लावून शेजारच्या गावी गेली होती. त्याच्यावर एवढे प्रेम करणाऱ्या बायकोवर निष्कारण संशय घेतल्याबद्दल रघूला पश्चात्ताप झाला. त्याने आपलं सर्व नाटक उघडपणे सांगून टाकले.

तेव्हां अनुराधा स्मित करून म्हणाली–"मी चटणी करतांना ती कशी झाली आहे, हे चाखून पाहाते. असं पहातां पाहतां अर्धी अधिक चटणी संपून जाते. तसंच भाजीला फोडणी देऊन शिजत असतांच अर्धीअधिक मीच खाते. माझी आई मला सांगत असे, सासरी असे करू नकोस ग बाळे!"

हे सर्व माळ्यावर बसलेला चोर ऐकत होता. त्याला राहवलं नाही. तो म्हणाला–"ताई, अशा लहान सहान संवयी मनावर ताबा ठेवून सोडणे बरे असते. अशाच तऱ्हेने बायकांविषयी पुरुषांच्या मनांत काही शंकाकुशंका असतील तर स्पष्ट विचारून घेणे जास्त चांगले. अशी नाटकं केल्याने जीव धोक्यात पडण्याची शक्यता असते. शिडी माळ्याला चिकटून असेल तर कोणी ही त्यावर चढून जाईल. तशीच नवरा-बायको परस्परावर प्रेम व विश्वास ठेवून राहतील तर मुलं सुखी होतील."

अनुराधाने चोराला माळ्यावर पाहिल्या बरोबर किंचाळली. रघूला चोर म्हणाला त्यात सत्याचा अंश बराच असल्यासारखं वाटलं. तो बायकोला समजावून सांगू लागला–"हा कोणी तरी हुशार आणि लोक व्यवहार कुशल चोर दिसतो आहे! म्हणून तू भिण्याचं कारण नाही!"

त्यानंतर रघूने माळ्याला टेकून शिडी उभी केली व म्हणाला–"मित्रा, तू माझे डोळे उघडलेस. तू चोर असलास तरी आमचा पाहुणा आहेस! म्हणून आमच्या पंक्तीला बसून खाऊनपिऊन जा. लोणच्याची बरणी एक काढून आण."



# साधूचा सौदा

एका डोंगरावर काही साधुबैराग्याचा मठ होता. त्या बाजूला एक तरुण मुलगा आंबे विकायला गेला. त्याला वाटले की बैरागी कदाचित् आंबे घेतील. म्हणून तो डोंगर चढून गेला आणि एका तरुण साधूला त्याने जवळ जाऊन विचारले–"साधुबुवा, आंबे आणले आहेत विकायला. वर्षातून एकदाच आंबे मिळतात. मग घेतां का काही आंबे ?"

तो तरुण साधू दयाळू होता, त्या बरोबर भोळाभाबडाही होता. आंबे विकणाऱ्या तरुणाकडे सहानुभूतीने पहात म्हणाला–"बाबा रे, आज नकोत हं !"

तरुण निराश होऊन डोंगरावरून खाली उतरून आला. तेव्हां त्या तरुण साधूने त्या तरुणाला टेकडीवरून हाक मारून वर यायला सांगितले.

आंबे विकणाऱ्याला वाटलं की साधूला आंबे हवे आहेत वाटतं ! तो धांपा टाकीत टेकडीवर चढून गेला.

त्या तरुण साधूने पहिल्यापेक्षा जास्त सहानुभूती व दयेचा आव आणून म्हटले–"आज तर आंबे नकोतच, उद्यां सुद्धां आम्हां कोणाला नकोत. मी आजच एवढ्यासाठी सांगून ठेवतो आहे की उद्यां तू विनाकारण डोंगर चढून येण्याची धडपड करशील !





# गणेश पुराण

गुहेच्या दारावर झांकण म्हणून ठेवलेला मोठा दगड गजराजाने आपल्या सोंडेने एखाद्या खड्यासारखा उचलून बाजूला टाकला, आणि गुहेत शिरला. त्यानंतर थोड्याच वेळाने रत्नाभूषणांची गाठोडी आपल्या सोंडेने उचलून घेऊन आला. त्याने ती रत्नाभूषणे सौदामिनी समोर टाकली. चंद्राहार व आणि माळा तिच्या गळ्यात घातल्या. त्यानंतर आपली सोंड तिच्या पाठीवर, बाप मुलीच्या पाठी-वर प्रेमाने हात फिरवितो तशी फिरविली. सर्व दागिने घालून बाकी उरलेले दागिने घरी घेऊन जायला हत्तीने सौदामिनीला सुचविले. सौदामिनी दागिने घालून तयार झाल्यावर हत्तीने तिला जंगलापलीकडे कल्याणी नगराजवळ पोंचविले. सोन्याच्या दागिन्यांनी मढलेल्या आपल्या सुनेला पाहून कलहकंठी चकित झाली. नंतर स्वतःला सावरून तिने दागिने कसे मिळाले हे सौदामिनीच्या तोंडी काढून घेऊन मनातल्या मनात गुणगुणली–"अस्सं! म्हणजे हत्तीला कवठाचं फळ इतकं आवडतं का ?" मग ती लगेच बाजारात गेली व एक पिशवी भरून कवठे विकत घेऊन आली.

दागिने भरून आणायला कलहकंठी एक पिशवी बरोबर खांद्यावर घेऊन निघाली. तिच्या एका हातात कवठे भरलेली पिशवी होती. जंगलात पाऊल टाकल्यावर तिने सर्व प्रदेश चाळून काढला. परंतु तिला कोठेही कवठाचे झाड आढळले नाही. शेवटी



एका चिंचेच्या झाडाखाली ती बसली. तिने पिशवीतून खायला एक कवठ काढले. ते हातात घेऊन ती आपला कंठ मोकळा करून घेऊन भजन म्हणू लागली.

येरे हत्ती, इकडे ये,
कवठ आणिले, खाऊन घे,
आण दागिने, सोन्याचे,
पुरवि लाड, मन्मनाचे,
येरे हत्ती, इकडे ये,
सुवर्णभूषणे, मजला दे ।।

कलहकंठी बराच वेळ आळवून आळवून गात राहिली, परंतु हत्ती आला नाही. एक आवाज ऐकू आला. आकाश दुमदुमू लागले कलहकंठीला वाटले की तो हत्तीचाच चीत्कार असावा. तिने मान वर करून उभी राहून दूरवर पाहिले, एक वाघ उड्या मारीत येत होता.

आपल्या खांद्यावरची पिशवी न फेंकतां ती घाबरून पळू लागली आणि खाली पडली. ती पडली ती गुहेसमोरच पडली. नशिबाचे आभार मानून आनंदाने तिने गुहेत प्रवेश केला. गुहेत दागिन्यांचे ढीगच्या ढीग पडलेले पाहून ती वेड्यासारखी दागिने घालीत गेली. दागिन्यांनी पिशवी भरून घेतली. ती उचलून गुहेच्या दारापर्यंत कशी बशी आली. परंतु तिच्या दुर्दैवाने गुहेचे दार बंद झाले होते. समोर तिला एक ब्रह्म राक्षसीण लाल डोळे करून उभी असलेली दिसली. ती हसत होती. तिचे ते हंसणे भयंकरच होते.

ती राक्षसीण मोठ्याने ओरडली–"ए कलहकंठी, तू आपल्या सुनेला त्रास देणारी सासू आहेस तर मी सासूला गिळंकृत करणारी सून आहे. मी सांगते ते ऐक!" असे म्हणत त्या ब्रह्मराक्षसिणीने आपला जन्म वृत्तांत सांगायला सुरवात केली.

"मी पूर्वी एक फार सुंदर स्त्री होते. आईवडिलांनी माझे नाव कलहंसी ठेविले. परंतु सासरी गेल्यावर मी आपल्या वाचाळ पणामुळे त्या पेठेत कलहदुंदुभी म्हणून प्रसिद्ध झाले.



कलहकंठी तू जितकी क्रूर आहेस, तितकीच माझी सासू साधू स्वभावाची आहे.

कलहकंठी व कलहदुंदुभीची गोष्ट :

"मी सासरी गेल्यानंतर एका वर्षाच्या आत माझे यजमान घर सोडून देशाटनाला निघाले. मी दागिन्यांवर जीव देई. सोन्यासारखी पिकं काढणारी शेते विकून मी सोन्याचे दागिने करविले. माझ्या सासूने मला नाकातल्या मुकल्यापासून कंबरपट्ट्यापर्यंत सर्व दागिने दिले.



अशा चांगल्या साधू स्वभावाच्या सासूला मी एक वेळ सुखाने खाऊ दिलं नाही. कामाला लावून मी तिच्याकडून घरातली सर्व लहान मोठी कामे करवून घेऊ लागले.

शेवटी माझे सासूसासरे माझ्या अशा वागण्याला कंटाळून गेले. वातापि नगरी जाऊन त्यांनी गणपतीचे दर्शन घेतल्यावर तेथेच आपला देह ठेवायचाही ठरविले. सासूच्या हातात एक लहानसे गाठोडे पाहून मी ते हिसकावून घेतले. त्या धक्क्याने माझी सासू जमिनीवर पडली आणि तिने कायमचे डोळे मिटले.

माझे सासरे सोशीक स्वभावाचे त्यांनी ते स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले असूनही एक चकार शब्द काढला नाही. तरी त्या दिवशी संध्याकाळी अत्यंत दुःखाने संतापून ते म्हणाले–"हे पापिष्टी! तू माझी सून आहेस, नाहीतर मी तुला तत्काळ शाप दिला असता. आम्ही दोघं असा विचार करून सर्व कष्ट सहन करीत आलो की आमचा एकुलता एक मुलगा कधी तरी परत येईलच आणि तू त्याच्याबरोबर सुखाने संसार करशील. आता माझं तुझ्याजवळ एकच मागणं आहे की पुढे कधी काळी माझा मुलगा परतला तर निदान त्याला तरी सुखी ठेव." असे सांगून माझ्या सासऱ्याने अत्यंत दुःखावेगाने शेवटचा श्वास घेतला आणि आपल्या साध्वी स्त्री बरोबर जणुकाही सहगमनच केले. ते थोर निष्ठावान व तपस्वी पुरुष होते.



त्याच वेळी तेथे एक संन्यासी आला तो माझ्या सासूसासऱ्यांच्या देहावर पडून रडू लागला. त्या संन्याश्याने माझ्याकडे संतप्त-नजरेने पाहिले व म्हणाला–"तू एक ब्रह्म-राक्षसी होऊनच जन्माला यायला पाहिजे होतीस." त्यानंतर त्या वृद्ध जोडप्याचा अन्त्येष्टी विधी उरकून तो संन्यासी तेथून निघून गेला. तो संन्यासी दुसरा तिसरा कोणी नव्हता. माझ्या रूपावर भाळून माझ्याशी लग्न करणारा माझा पतीच होता." अशा तऱ्हेने आपली जन्मकथा सांगून ती राक्षसी थोडा वेळ थांबली. नंतर पुढील कथा सांगू लागली–"दागिन्यांचा मोह आणि लोभ असल्या कारणाने मी आणखी एक पाऊल पुढे टाकून काही चोरांना व लुटेऱ्याना आश्रय दिला. मी दरोडेखोरांची राणी म्हणून ओळखू जाऊ लागले. याच गुहेच दरोडेखोर दागिने आणून जमा करीत. त्या सर्व संपत्तीची मालकी मिळावी यासाठी मी सर्व दरोडेखोरांना विष घालून अन्न वाढले. मरणापूर्वी सूड घेण्याच्या हेतूने त्यांनी मला या गुहेतच ठेवले आणि गुहेच्या दारावर एक मोठी धोंड आणून ठेवली.

कलहकंठी मी याच गुहेत हे दागिने व वैभव पहात उपाशी व तहानेली राहून शेवटी तडफडून मेले. आणि आता एक ब्रह्म राक्षसीण होऊन येथे राहते आहे. गुहेत प्रवेश करणाऱ्या हत्तीने मला सांगितले की तुझे डोळे उघडल्यावर मी या पिशाचिनीच्या जीवितातून मुक्त होईन."

हत्तीने तुझ्या सुनेला जे दागिने दिले होते ते सर्व खऱ्या सोन्याचे होते. परंतु तू जे अंगावर घातले आहेस ते खऱ्या-सोन्याचे आहेत की नकली, हे जरा नीट पाहून घे." ब्रह्मराक्षसीण म्हणाली.

मध्यंतरी पिशवीचे तोंड उघडले व तिच्यातून सापविंचू बाहेर येऊन गुहेत चालू लागले. आपल्या अंगावर साप व विंचू चालत असलेले पाहून कलहकंठी किंकाळी फोडून ओरडू लागली. ब्रह्म-



राक्षसी आपल्या आक्राळ विक्राळ तोंडानें हसू लागली. म्हणाली–"तू आपल्या सुनेवर अत्याचार करणारी कलहकंठी आहेस. मी सासूसासऱ्यांना सूनवास देणारी कलहदुंदुभी आहे. आपल्या सारख्या लोभी बायकांमुळेच सर्व नारी जातीला कलंक लागला आहे. उत्तम स्वभावच्या आपल्या सुनेबरोबर तू चांगली वागलीस तर तुझं काही वाईट होणार नाही. नाहीतर या गुहेत माझ्यासारखी ब्रह्मराक्षसीण होऊन या गुहेत तुला रहावे लागेल, आता तुझी पाळी आहे. कलहकंठी कान उघडे ठेवून ऐकत आहेस ना?" कलहदुंदुभीने विचारले.

तेव्हां कलहकंठीने आपले कान धरले. राक्षसिणीच्या पायां पडून म्हणाली–"माझे डोके ठिकाणावर आलं आहे. मी सुनेबरोबर नीट वागेन. मला मुक्त करून या जंगलापलीकडे पोचती कर!"

ब्रह्मराक्षसिणीने कलहकंठीला जंगलापलीकडे कल्याणी नगराच्या वेशीवर पोंचविले आणि तिला बजावून सांगितले–"ऐक! तू दिलेले वचन भंग केलेस तर तूही माझ्यासारखी ब्रह्मराक्षसीण होऊन या गुहेत येऊन कायमची राहशील. खबरदार, बजावून ठेवते!" असे सांगून ती जागच्या जागी जळून भस्म झाली.

कलहकंठी धावत घरी गेली आणि सौदामिनीसमोर गुडघे टेकून म्हणाली–"मुली सौदामिनी! तू मला माफ कर, मुलाला व सुनेला पोपट व मैनेसारखी सुखाने रहात असलेली पाहून जो आनंद होतो, त्याच्यासमोर जगातले सर्व वैभव फुकट!"

सौदामिनीला वाटले की गणपतीच्या कृपेनेच सासूच्या स्वभावात हा बदल झाला. तिला अत्यानंद झाला.

त्यानंतर पुढे कलहकंठी पुन्हा कलकंठी या नावेच ओळखू जाऊ लागली.

पावनमिश्राने आपली गोष्ट येथवर संपवून विचारले–"मुलांनो, तो हत्ती कोण होता बरं?" तेव्हां मुलंच नव्हेत तर मोठी माणसंही उत्साहाने म्हणाली–"गणपती, आपला वातापि गणपती!" असे म्हणत व प्रसाद घेऊन सर्व आपापल्या घरी निघून गेली.



पावनमिश्र दररोज देवळाच्या भिंतीवर काढलेलीं किंवा कोरलेली चित्र दाखवून त्यांची आख्याने सांगत असे. अशातऱ्हेने आबालवृद्धांच्या मनात गणपतीवरची श्रद्धा व भक्ती वाढू लागली.

एके दिवशी एका संगीतप्रेमी व्यक्तीने एका भिंतीवरचे चित्र दाखविले. त्या चित्रात एक गायक तंबुरा घेऊन गाणे म्हणत होता आणि गणपती निरनिराळे हावभाव करून नृत्य करीत होता. त्या संगीतप्रेमीव्यक्तीने त्या चित्राची कथा सांगावयास विनंती केली.

पावनमिश्र कथा सांगू लागले–"वतापि नगर सर्व कलांचे आगर होते. तेथे कवी, पंडित, गायक आणि इतर कलात प्रवीण लोक रहात असत.

गजानन पंडित हा त्या नगरातला सर्वात श्रेष्ठ पंडित होता. त्याला विविध कलांची पण चांगली माहिती होती. त्याचा कंठस्वर गोड होता व त्यात एका तऱ्हेची भुलवून सोडणारी शक्ती होती. तो वातापि गणपतीची स्तुती करून अनेक भक्तिगीते



लिहून म्हणे. त्याचा नातू बाल गणेश भट डोलत ताल देई.

गजानन पंडित गोड आवाजात 'धिमिकिट धिमिकिट तांडव नृत्य करी गजानन' नावाचे गीत निरनिराळ्या रागात गुंफून म्हणे. तेव्हां नृत्य गणपती इंद्रधनुष्याच्या सातही रंगात आपले रूप बदलून नाचे आणि श्रोता व दर्शकांना मुग्ध करी.

गणपती हंसध्वजी रागात पांढऱ्या शुभ्र राजहंसासारखा मायामालव रागात (भैरव रागात) प्रातःकाळच्या रविबिंबासारखा भैरवी रागात, लाल कमळासारखा हिंदोळ रागात, निळ्या आकाशासारखा नीलांबरी रागात निळ्या कुमुदासारखा










आनंद भैरवी रागात, पांढऱ्या कुमुदावर चकाकणाऱ्या पौर्णिमेच्या चांदणीसारखा दिसत होता.

तसा गजानन पंडितांना मानमरातब व सत्कार करवून घेण्याचा नाद नव्हता. तरी त्यांना दरवर्षी गणेशाची सुवर्णमूर्ति देऊन त्यांचा सत्कार करण्यात येई. त्या मूर्तींनी त्यांचे सर्व घर भरून गेले होते.

देशातले थोर पंडित व विद्वान गजानन पंडिताचा आदर करीत आणि त्याला गुरु मानून त्यांना मान देत. परंतु वातापि नगराचे काही विद्वान गजानन पंडिताचा हेवा करू लागले. त्यांचा नायक स्वरकेसरी होता. स्वरकेसरी सर्वदा आपल्या विद्वत्तेचे प्रदर्शन करण्यासाठी हावरटपणा करीत असे. तो गाऊ लागे त्या बरोबर सिंहगर्जन झाल्यासारखे किंवा वाघाने डरकाळी फोडल्यासारखे वाटे. तो गाऊ लागला की मृदंग वाजवणारा घाबरून जाई. परंतु गजानन पंडिताच्या मनात विद्वत्तेचे प्रदर्शन करण्याची इच्छा कधी उपजली नाही.

तो गणपतीवरच्या श्रद्धा व भक्तीमुळेच गाई. तो तन्मय होऊन गात असे आणि गातां गातां त्याचा कंठावरोध होई. अशा वेळी गजानन पंडिताची थट्टा उडवायला स्वरकेसरी व इतर पंडितांना खूप फावे.

ते म्हणत की गजानन पंडिताला शास्त्राचे ज्ञान थोडे देखील नाही. त्याचं संगीत म्हणजे संयोगाने संगीत म्हटले जाऊ लागले आहे. अशा शब्दात ते मनाचे समाधान करून घेत. परंतु गजाननाला त्या गोष्टींची कधी फिकीर नसे. आपल्या हृदयात वसवलेल्या गणेशाच्या मूर्तीचे स्मरण करून तन्मय होऊन तो एकांतात बसून आपल्या इष्ट दैवताशी बोलेही. त्याच्या गाण्यात एक तऱ्हेची अवर्णनीय अशी शक्ती होती. तिच्या मुळे श्रोता मंत्रमुग्ध झाल्यासारखे स्वर्गीय सुखाचा अनुभव करीत.

त्या वर्षी कोणत्याही परिस्थिती स्वर्ण मूर्त गजानन पंडितच्या घरी पोहोचता कामा नये असा विचार करून स्वरकेसरीने एक डाव टाकला.





# गंधर्व राजकुमारी

[ १० ]

नूरुलहुदाने याचप्रमाणे आपल्या बहिणींना एकेक करून आत बोलावून हसनला दाखविले व विचारले—"हीच का तुझी बायको?" अशा पांच जणी झाल्या. सर्वांविषयी हसनने पहिल्यासारखीच उत्तरे दिली. आतां फक्त हसनची बायको तेवढीच उरली होती. तिला घेऊन यायला नूरुलहुदाने म्हातारीला आज्ञा केली. गंधर्व राजाची सर्वांत धाकटी मुलगी आत आली. तिला पाहतांच हसन एकदां मोठ्याने ओरडला आणि बेशुद्ध होऊन पडला. तिने सुद्धा त्याला ओळखले व थोरल्या बहिणीच्या सिंहासनासमोर बेशुद्ध होऊन पडली.

नूरुलहुदा आतां मात्र आपला हेवा व ईर्ष्या आवरू शकली नाही. ओरडली—"त्या माणसाला उचलून नेऊन शहराबाहेर फेंका!" अशी तिने वीरांगनांना आज्ञा केली. त्यांनी हसनला उचलून समुद्रकिनाऱ्यावर फेकले नूरुल हुदा तिला म्हणाली—"निर्लज्ज, बेशरम! पापिष्टी! त्या माणसाशी तुझा काय ग संबंध? बाबांना कळल्याशिवाय तू त्याची बायको होऊन त्यानंतर त्याला सोडून देऊन इकडे आलीस आणि दुसरे पाप केलेस. तू आपल्या कुळाला लावलेला हा कलंक तुझ्या रक्तानेच माखला जाईल." असे म्हणत ती दासींना म्हणाली या पापिणीला एका खांबाला बांधा तिला रक्तवाहू लागेपर्यंत फोडून काढा!" नंतर तिने आपल्या वडिलांना एक पत्र लिहिले. त्यात तिने त्यांच्या मुलीने केलेल्या अपराधाचे सविस्तर वर्णन लिहून तिला द्यावयाची शिक्षा लिहून कळवायलाही लिहिले. ते पत्र देऊन तिने वडिलांकडे एका दूताला पाठविले.



ते पत्र वाचतांच गंधर्व राजाच्या डोळ्यासमोर अंधेरी आल्यासारखे झाले. तरी त्या पत्राचे उत्तर लिहिले ते असे—"तुझ्या धाकट्या बहिणीने जे पाप केले आहे त्याला योग्य शिक्षा किंवा दंड जो द्यावा तो थोडाच आहे. तिला मृत्यु दंड कसा द्यावयाचा हे तूच ठरव."

हसनला शुद्ध आली तेव्हां तो समुद्र किनाऱ्यावर पडलेला होता. त्याला आता आशा उरलीच नव्हती. तो वेड्यासारखा उठून वाट फुटेल तिकडे चालू लागला.

तो तशा स्थितीत चालत जात असतां त्याला एका जागी दोन मुली सुमारे बारा वर्षे वयाच्या दिसल्या. त्या एका टोपीसाठी भांडत होत्या. ती कातड्याची टोपी होती. तिच्यावर काहीतरी लिहिलेले होते आणि काहीतरी चित्रकोरलेले होते. त्याने त्या मुलीजवळ जाऊन विचारले—"मुलींनो, कशासाठी भांडतां आहां ग?"

ह्यासाठी त्या भांडत होत्या. एक म्हणत होती मला मिळाली आणि दुसरी म्हणत होती मला मिळाली. "मी तुमचं भांडण मिटवितो. मी एक दगड फेंकतो. तुमच्या पैकी जी कोणी पळत जाऊन तो दगड आणील त्याची ती टोपी आहे कबूल?" त्याने त्यांना विचारले. त्या गोष्टीस दोघी कबूल झाल्या.

हसनने एक दगड उचलला व तो जोराने फेंकला. दोघी मुली तो आणायला धावल्या. त्या परत येईपर्यंत हसन डोक्याला ती टोपी घालून तेथेच उभा राहिला. लौकरच दोघी मुली परत आल्या. एकीच्या हातात दगड होता. "हा पहा, मी जिंकले. तू कोठे आहेस?" ती मुलगी म्हणाली. दोघी त्याला शोधता आहेत, हे पाहून हसनला आश्चर्य वाटले. त्या आंधळ्या तर नाहीतच. मग त्या अशा काय शोधतां आहेत? मी इथेच तर आहे, नाही का?" हसनला वाटलं न तो त्यांना म्हणाला—"हा काय, मी इथेच तर आहे!" आवाज ऐकू आला त्या दिशेला मुलींनी पाहिले. परंतु त्यांना



काहीच दिसलं नाही, तेव्हां त्या घाबरल्या व रडू लागल्या. हसन त्यांचा हात धरून म्हणाला—"अशा रडतां कां?" ते ऐकून तर त्या जास्तच घाबरल्या व पळून गेल्या.

"ओ हो, हो हो! ही मंत्रवलेली टोपी दिसते आहे तर! ही डोक्याला घातली तर घालणारा अदृश्य होतो वाटतं!" हसनला वाटलं तर मग गुप्तपणे जाऊन आपल्या बायकोला भेटतां येईल. त्याला इतका आनंद झाला की तो नाचूच लागला. तो लगेच गावात जायला निघाला आणि गावात जाऊन त्या म्हातारीला शोधू लागला. ती एका खोलीत मुसक्या बांधलेल्या परिस्थितीत पडलेली होती. तो अदृश्य आहे की नाही ह्याची खात्री करून घेण्यासाठी त्याने त्या खोलीत ठेवलेल्या बरण्यांपैकी एक उचलली आणि मोठा आवाज होईल इतक्या जोराने जमिनीवर आदळली. म्हातारीने इकडे तिकडे पाहिले व कोणी दिसले नाही तेव्हां मोठ्यानं ओरडली—"बापरे भूत, कोण तू?"

"मी भूत नाही, मी हसन! तुला सोडविण्यासाठी आलो आहे!" असे म्हणत त्याने डोक्यावरची टोपी काढली.

"ओ हो! हसन का तू? तू किती दुर्दैवी आहेस रे? आमची राणी तुला जिवंत सोडल्याबद्दल पश्चात्ताप करते आहे.



तिने तुला पकडून आणायला शिपायांना पाठविले आहे! म्हणून तू येथे व्यर्थ वेळ न दवडतां पळून जा कसा!" म्हातारी म्हणाली. तिने त्याच्या बायकोला जी शिक्षा मिळणार होती तिचे वर्णन करून ही त्याला सांगितले.

ही टोपी पहा, ही मंत्रवलेली टोपी आहे. ही डोक्याला असली की मी कोठे ही जाऊ शकेन. मी कोणालाही दिसणार नाही."

ते ऐकून म्हातारीला अत्यानंद झाला. "तर मग मला सोडव. तुझ्या बायकोला कैद करून ठेवलं आहे ती जागा दाखविते. ती म्हणाली. हसनने तिला बंधन मुक्त



केले. टोपी डोक्याला घालून तिचा हात धरला. ती सुद्धा बरोबर अदृश्य झाली. ती त्याला एका अंधार कोठडीजवळ घेऊन गेली. त्याच खोलीत हसनच्या बायकोला बांधून ठेवले होते. आत्तां आपला छळ होऊन आपला वध होणार या भीतीने ती विव्हळत पडली होती. आपण तिला अकस्मात दिसलो तर ती घाबरून जाऊ नये असा विचार करून ही, तिला त्या दैन्य स्थितीत पाहून हसन स्वतःला आवरू शकला नाही. त्याने डोक्यावरची टोपी काढली आणि तिला घट्ट मिठी मारली. तिने नवऱ्याला ओळखले व ती एकदम बेशुद्धच झाली.

हसनने तिची बंधने तोडली आणि म्हातारीच्या मदतीने तिला शुद्धीवर आणायचा प्रयत्न सुरू केला. तिने हळू हळू डोळे उघडले व म्हणाली–"तू आकाशांतून उतरलास, की जमिनीतून वर आलास, मला माहीत नाही. मला माझा भोग भोगायला सोडून देऊन तू लौकर निघून जा येथून! प्रारब्ध असेल त्यांतून कोणी सुटतो का? माझी अक्का माझा वध करणार आहे. ते तुला पाहवणार नाही!"

"अग वेडे, तुला मी बगदादला घेऊन जायला आलो आहे!" हसन म्हणाला.

तिचा विश्वासच बसेना. "या वेडेपणातही तुझा धाडसीपणा सुटला नाही!" ती म्हणाली.

"तुला आणि या म्हातारीला या घरांत सोडून मी जाणार नाही. ही टोपी पहा!" असे सांगून त्या मंत्रवलेल्या टोपीतली मंत्र शक्ती त्याने तिला दाखविली. हसनची बायको आनंदातिरेकाने व पश्चात्तापाने विव्हळ होऊन रडत म्हणाली–"तुझ्या या सर्व कष्टांचे मूळ कारण मी बगदाद सोडून निघाले हेच तर आहे. मी जी चूक केली ती माझी मलाच माहीत आहे. म्हणून मला आतां दोष देऊ नकोस. मीं आपली चूक कबूल करते."

"नाही, तुझी चूक नव्हतीच. मी तुला एकटीला सोडून बगदादहून निघालो ही माझीच चूक. आतां असली चूक माझ्या हातून कधी घडणार नाही." हसन म्हणाला.

त्याने ती टोपी घातली व एका हाताने बायकोला व दुसऱ्या हाताने त्या म्हातारीला धरल्याबरोबर तिघेही अदृश्य झाली. अशा तऱ्हेने ती तिघं कोणाच्याही नजरेस पडल्याशिवाय राजधानीच्या बाहेर पडून हसनच्या बायकोने आपल्या मुलींना जेथे लपवून ठेवले होते त्या जागी आली. नासिर व मन्सूर दोघांना पाहतांच हसनचं हृदय उचंबळून आलं.

म्हातारीने दोघां मुलींना आपल्या खांद्यावर उचलून घेतले. नंतर हसनची बायको पंखवाले पक्ष्यांचे पोशाख चोरून घेऊन आली. तिघां मोठ्यांनी ते पोशाख धारण केले आणि तिघं त्या भयंकर बेटावरून कायमची निघून गेली.

ती सर्व एकत्र बगदाद शहरातल्या हसनच्या घराच्या धाब्यावर उतरली. तेथून जिना उतरून सर्व हसनची आई होती तिथे आली. ती एकतर फार म्हातारीच होती. त्यात रडूनरडून तिचे डोळे दुखू लागले होते. तिला त्यामुळे कमी दिसत होते. बिचारी ती म्हातारी अगदी शेवटच्या दशेला येऊन पोचली होती. हसनने तिच्या खोलीच्या दाराची कडी वाजविली व म्हणाला–"अम्मा! दार उघड, गोड बातमी आणली आहे!" मुलाचा आवाज ऐकून त्या कष्ट दशेतही ती उडी मारल्यासारखी उठली व तिने दार उघडले. तिने प्रथम मुलीला, नंतर सुनेला आणि नातींना व शेवटी म्हातारीला पाहून आनंदातिकाने ती बेशुद्ध होऊन पडली.

हसनने आपल्या आईचा सर्व औषधोपचार केला व तिला शुद्धीवर आणले. त्याच्या बायकोने, तिने केलेल्या चुकीबद्दल माफी मागितली. हसनने त्याच्यावर आलेल्या सर्व प्रसंगांचे वर्णन करून सांगितले. त्यानंतर सुखाने त्यांचे सर्वांचे दिवस जाऊ लागले. (संपूर्ण)





# हुशार चोर

एके दिवशी रात्री तीन चोर, त्यांनी त्या दिवशी गावातून चोरून आणलेलं धन-पैसे दागिने वगैरे घेऊन जंगलात एका जुन्या पडक्या देवळाजवळ आले आणि त्यांनी त्या देवळातल्या मूर्तीच्या मागे तो चोरीचा माल लपवून ठेवला. नंतर निश्चिंत होऊन तिथे देवळाच्या सभामंडपात बसून गप्पा मारू लागले.

बोलतां बोलतां त्या तिघांपैकी मोठ्या चोराच्या मनात एक विचित्र विचार आला, तो इतर दोघांना म्हणाला—"मी सांगतो ते लक्षपूर्वक ऐका, बरं का! आतां आपण जो माल चोरून आणला आहे तो आपसात वाटून घेतला तर आपल्या पैकी एकाचंही दारिद्र्य जाणार नाही. तसं न करतो आपल्यापैकी एकानेच सर्व धन घेतलं तर त्याला ही भयंकर धोक्याची वृत्ती कायमची सोडून सुखाने आयुष्य घालवता येईल."

ती गोष्ट दोघांनाही पटली व दोघांनीही होकारार्थी माना हलविल्या.

परंतु चोरून आणलेले सर्व धन कोणी घ्यायचं ठरविणं म्हणजे एक मोठी समस्याच समोर आली.

मोठ्या चोराने काही वेळ विचार करून म्हटले—"ही समस्या सोडवायला मला एक उपाय सुचला आहे. उद्या सकाळी उजाडण्या-पूर्वी ज्याला स्वप्नात या धनाच्या सहाय्याने तो कोट्याधीश झाल्याचं दिसेल त्याला हे सर्व धन देऊन टाकायचं."

दुसऱ्या दोघांनी त्या गोष्टीसही होकार दिला. त्यानंतर तिथे झोपायला म्हणून जमिनीवर आडवे झाले. परंतु कोणालाच झोप लागेना. काही वेळाने मोठ्या चोराने सकाळी उठल्यावर त्याला कसे स्वप्न पडले. ते सांगायचे योजून निश्चितपणे झोपला. दुसरा चोरसुद्धा काय स्वप्न पडले, हे मनात जुळवून डोळे मिटून पडला. तिसरा चोर निराळ्याच प्रकारे विचार करू लागला, इतर दोघे चांगले घोरू लागल्या-वर त्याने मूर्तीच्या मागे ठेवलेले धन दागिने वगैरेंचे बोचके उचलले आणि जवळच एका वडाच्या झाडाच्या ढोलीत ठेऊन येऊन झोपला.



उजाडल्यावर तिघे चोर उठले. धाकट्या दोघांनी विचारल्यावर मोठ्या चोराने त्याला पडलेले स्वप्न रंगवून या शब्दात सांगितले. म्हणाला—"मी, आपण सर्वांनी मिळून चोरून आणलेले पैसे घेऊन मी पूर्वी कधीं न पाहिलेल्या राज्यात गेलो तेथे पिके फार छान आली होती. राज्यात सुकाळ होता. परंतु चवकशी केल्यावर मला कळले की त्या राज्यात चोरांचा सुळसुळाट फार जास्तच होता. म्हणून मी सर्व धन एका सुरक्षित जागी ठेवून देऊन व्यापार करून उदरनिर्वाह करण्याचे ठरविले. परंतु माझ्या दुर्दैवाने त्याच दिवशी रात्री सर्व धन चोरीला गेले.

मला अपार दुःख झाले. मी लगेच जाऊन त्या देशाच्या राजाकडे फिर्याद नोंदवली. राजा फार काळजीत पडला व म्हणाला—"बाबारे, तू कोणी परदेशी दिसतो आहेस. आमच्या राज्यात एकाहून एक अट्टल चोर आहेत. त्या चोरांना धरून देणाऱ्याला मी आपली मुलगी देऊन त्याला आपले अर्धे राज्य सुद्धा देईन असे दवंडी पिटून जाहीर केले आहे. परंतु आजपर्यंत कोणी चोरांना धरून देण्यात यशस्वी झाला नाही."

"राजकुमारी लग्न आणि अर्धे राज्य मिळण्याची गोष्ट ऐकून मला द्विगुणित उत्साह चढला. मी राजाला म्हणालो—"महाराज, तुम्ही दुःखी होण्याचे कारण नाही. मी त्या सर्व अट्टल चोरांना धरून अटक करून तुमच्या समोर हजर करतो."

"चोरांना धरायचं काम चोरानेच करावं! पण मी तस म्हटले नाही बरं का?

श्री बाबुराव न. पुराणिक



हो, सांगायची गोष्ट म्हणजे मी थोड्याच दिवसात राज्यातल्या सर्व चोरांना धरून राजासमोर हजर केले. त्याने वचन दिल्याप्रमाणे माझे लग्न राजकन्येशी करून देऊन मला आपले अर्धे राज्य ही दिले. म्हणून आपण लपवून ठेवलेल्या धनाच्या आधारे मी कोट्याधीशच काय, एका देशाचा राजाच झालो."

दुसरा चोर म्हणाला—"हरकत नाही, तुला एक चांगलेच स्वप्न पडले म्हणायाचे." असे सांगून त्याने त्याला पडलेले स्वप्न सांगायला सुरवात केली.

"मी पैसे व दागिने घेऊन पूर्वेच्या दिशेने व्यापार करण्यासाठी जहाजात बसून निघालो. परंतु वाटेत एक मोठे वादळ आले आणि त्यात आमचे जहाज एका खडकावर आदळून फुटले. परंतु मी आपल्या पैशांचे व दागिन्यांचे बोचके घेऊन पोहोत कसा बसा नागलोकात पोचलो. तेथे हिरे व माणिक्ये पाहून माझे डोळे दिपूनच गेले. परंतु आश्चर्य असे की नागलोकातल्या लोकांनी माझ्या जवळच्या दागिन्यांची कलाकुसरी पाहिली व आश्चर्य चकित झाले. नागलोकाची युवराणी नागदेवी हिने माझ्या जवळचे सर्व दागिने मागितले.

त्यावेळी माझ्या डोक्यात 'चर्र' असे झाले. कारण मी काही दागिने नागदेवीला न देतां तिच्या मैत्रिणींना इनाम म्हणून दिले होते. नागदेवीने आपल्या मैत्रिणींना तिच्याहून चांगले चांगले दागिने घातलेले पाहिले व तिला त्यांचा हेवा वाटून ती मला येऊन म्हणाली—"तू मागशील ते मी देईन, तुझ्याकडचे उरलेले सर्व दागिने मला देऊन टाक."

मी त्या वाक्याचीच वाट पहात होतो. तिच्या तोंडातून तेवढे वाक्य बाहेर पडतांच मी म्हणालो—"नागदेवी, मी जन्मलो वाढलो ती मातृभूमी सोडून, इतके कष्ट सहन करून आलो तो तुझ्याशी विवाह करण्याच्या हेतूने. तर मग हे सर्व दागिने तुझेच आहेत!" असे म्हणत मी सर्व दागिने तिला देऊन टाकले. म्हटल्याप्रमाणे नागदेवीने लगेच माझ्याशी विवाह करून घेतला. अशा तऱ्हेने आपण लपवून ठेवलेल्या धनाच्या सहाय्याने मी नागदेशीच्या युवराणीशी विवाह केला आणि नागदेशाचा राजा झालो.

पहिल्या दोघा चोरांनी त्यांना पडलेली स्वप्ने तिखट मीठ लावून सांगितली ती तिसऱ्या चोराने ऐकल्यावर रडके तोंड करून त्याला पडलेले स्वप्न सांगू लागला. म्हणाला—"हे पहा, तुमच्या दोघांना पडलेल्या स्वप्नाशी तुलना केल्यास मला स्वप्नच पडलं नाही असं म्हणायला हरकत नाही! लपवून ठेवलेलं धन व दागिने घेऊन मी व्यापार करून कोट्याधीश झालोंच. शिवाय आणखी एका कोट्याधीशाच्या मुलीशी लग्न केले. परंतु आमचा संसार सुखाने चालू असतां कसला तरी आवाज झाला आणि माझे स्वप्न मोडले आणि मी डोळे उघडले.

कोणी चौघेजण तोंडावर बुरखा घेऊन आपण मूर्ती मागे लपवून ठेवलेले धन उचलून घेऊन देवळाबाहेर जाऊ लागले. मी लगेच मोठ्या दादाला हलवून ओरडलो—"चोर चोर!" परंतु मोठा दादा डोळे न उघडतांच म्हणाला—"माझ्या राज्यात चोर? त्यांना मी केव्हांच परलोकी पाठविले आहे. "असे म्हणत कुशी बदलून पुन्हा घोरू लागला.

नंतर मी धाकट्या दादाला उठविले आणि परिस्थिती समजावून सांगितली.



त्याने डोळेच उघडले नाहीत व म्हणाला–"नागदेवी, मी राजा असतां या नागलोकांत चोर येतीलच कसे? अहाहा!" मध्यंतरी ते बुरखेवाले चोर जंगलात पळू लागले होते."

ते ऐकतांच दोघे मोठे चोर घाबऱ्या-घाबऱ्या उठून मूर्ती मागे जाऊन धनाचं बोचकं तेथंच आहे की नाही पाहू लागले पण ते तेथं नव्हते.

ते परत येऊन तिसऱ्या चोराला दरडावून म्हणाले–"खरं काय ते बोल. चोर आले, तू आम्हांला उठवायचा प्रयत्न केलास, हे सर्व सपशेल खोटं!"

तिसरा चोर थोडा देखील जागचा न हालतां म्हणाला–"यात खोटं काय आहे? आपलं दुर्दैव असं की ते चोर आले तेव्हां तुम्ही दोघे राज्यकारभार करण्यात गुरफटला होतात!"

ते उत्तर ऐकून दोघे मोठे चोर संतापले व म्हणाले–"अरे, खरं सांगतो, आम्ही तसं काही स्वप्न पाहिलंच नव्हतं झोपायच्या आधी स्वप्नाची जुळवा जुळवी करून ठेवली होती, आतां तरी खरं कायते सांग. ते पैसे व दागिने कोठे लपवून ठेवले आहेस?"

आतां मात्र तिसरा चोर मोठ्याने हंसून म्हणाला–"म्हणजे तुम्हांला कोणत ही स्वप्न पडलं नव्हतं तर! बरं झालं! तर मग आपण विचार केला होता तसं स्वप्न मी एकट्यानेच पाहिले व ते मोठे होते. म्हणून सर्व धन मलाच मिळाले पाहिजे!" असे सांगून त्याने वडाच्या ढोलीत ठेवलेले बोचके आणले आणि त्यांच्या समोर ठेवले.

दोघे मोठे चोर धाकट्या तिसऱ्या चोराची हुशारी पाहून थक्क झाले. आपण दोघे मोठे होतो तरी धाकट्या चोराला फंसवायचा बेत केला होता त्यांनी सर्व धन धाकट्या चोराला देऊ केले व म्हणाले–"अरे छोटू, तू आज पासून चोरी करायची सोडून दे आणि कोठे तरी जाऊन या धनाच्या भांडवलावर मोठा व्यापार कर. एखाद्या चांगल्याशा मुलीशी लग्न करून सुखाने पुढील आयुष्य घालव!"






[१०]

[युद्धात घायाळ होऊन समरसेनला वीरगती मिळाल्याचे कळल्यावर शिवदत्त आपल्या अनुयायांसह जंगलात पळून गेला. तेथे त्याला एका जंगली वृद्धनायकाने आश्रय दिला. त्या दिवशी रात्री त्या रानटी वस्तीवर सैन्याने हल्ला केला. त्यांच्यापैकी एका सैनिकाला त्यांनी कैद केल्यावर सुबाहू नावाच्या सैनिकाने बऱ्याच गोष्टी सांगितल्या. पुढे–]

"मंदरदेवा! त्या शत्रूच्या सैनिकाने जे काही सांगितले ते ऐकून मला व रानटी लोकांच्या वृद्ध नायकाला दोघांनाही आश्चर्यचकित करून सोडले. परिस्थिती काही तरी निराळेच रूप घेत आहे असे मला वाटले." शिवदत्त म्हणाला.

मंदरदेव मान डोलवीत म्हणाला–"ही नवी परिस्थिती निर्मिल्याचे ऐकून मला सुद्धा आश्चर्यच वाटत आहे. पुढे काय झालं सांगा."

"माझ्या बरोबर त्या भिल्ल नायकाला सुद्धा पुढील प्रसंगाची कल्पना आली असावी असे मला वाटले. तो माझ्याकडे वळून म्हणाला–"या जंगलात आमचा कोणाशीही काही संबंध नसूनही, आम्ही स्वतंत्रपणे आपले आयुष्य घालवीत असतां, आमच्या या वस्तीपर्यंत तुमच्या राज्या-



तल्या भानगडी आणि भांडणे घेऊन पोंचली आहेत म्हणावयाची. हा सैनिक म्हणतो आहे त्या सुबाहूने तुमच्या त्या नरवाहनाला कितीही मदत केली असेल, परंतु त्याला आमच्या या वस्तीवर आपला अधिकार सांगायची काय गरज? असं त्याने दात-ओठ चावून म्हटले.

"बाबारे, हल्लीच्या काळात बळी तो कान पिळी अशी स्थिती आहे! तुम्हां भिल्लां मध्ये ऐक्य असेल तर काही उपयोग होईल. त्यासाठी माझ्याकडून तुम्हांला हवी असेल ती मदत द्यायला मी तयार आहे." शिवदत्त म्हणाला. थोड्याच वेळात त्या वस्तीत शस्त्र धारण करण्याची शक्ती असणारे सर्व पुरुष आपल्या नायकाच्या आज्ञेप्रमाणे तयार झाले आणि जंगलाला आग लावण्याचा प्रकार ज्या बाजूने चालू होता त्या बाजूला निघाले. मी सुद्धा अनुयायांसह त्यांच्या पाठोपाठ निघालो. त्यांच्या स्वातंत्र्य रक्षणासाठी हे कसा पराक्रम दाखवितात व त्याग करु शकतात हे पहायला मिळेल व यांच्या मदतीने आपण नरवाहनच्या विरुद्ध उठाव करू शकतो का याचा अंदाज ही लागू शकेल हा विचार माझ्या मनात होता.

आम्ही काही अंतर चालून गेल्यावर आम्हांला तलवारी व कट्यारी असलेले नरवाहनचे काही सैनिक एका भिल्ल वस्ती-वर चालून आलेले आम्हांला दिसले. ते हाताला लागेल ती वस्तू नष्ट करीत होते आणि सापडेल त्या भिल्लाला धरुन त्याचे हात बांधीत होते. ते त्यांना धरुन घेऊन ही जात होते. बहुतेक त्यांना आपले गुलाम करून घेऊन त्यांच्याकडून वाटेल ती कामे करवून घेण्याचा त्यांचा हेतू असावा किंवा त्यांना विकून पैसे मिळ-विण्याचा हेतू असावा.

इतक्यात भिल्ल नायकाच्या आज्ञेने जयघोष करीत सर्व भिल्ल नरवाहन मिश्रच्या सैनिकांवर एकाएकी तुटून पडले. आपल्याशी युद्ध करायला कोणी इकडे नसणार असे समजून आलेले सैनिक अक-



स्मात् झालेल्या भर हल्ल्यामुळे घाबरले. भिल्लांनी जो सापडेल त्या सैनिकाला आपल्या भाल्याने भोसकले आणि पकडून घेऊन जात असलेल्या भिल्लाला सोडवून जयजयकार करु लागले.

या चकमकीत मला माझ्या अनुयायांसह भाग घ्यायला संधीच मिळाली नाही. त्याची गरजच भासली नाही. भिल्लांचं धैर्य व साहस पाहून तर मी आश्चर्यचकितच झालो. थोडेसे सैनिक शिक्षण व शिक्षा यांची माहिती यांना दिली तर यांच्या मदतीने नरवाहनने बळकावलेल्या कुंडलिनी बेटाला मुक्ती मिळू शकेल असे मला वाटले.

"तो जळत असलेला जंगलाचा प्रदेश असाच सोडून द्यावयाचा का? ती आग पसरत या बाजूला सुद्धा येऊ शकेल नाही का?" मी वृद्ध भिल्ल नायकाला म्हटले.

त्याने त्या जळत असलेल्या आगीकडे पाहिले व म्हणाला–"ती आग विझविणे आपल्या मानवजातीस शक्य नाही. आग लावणे मात्र फार सोपे आहे. बरं तर एक गोष्ट विचारतो, तुमचा तो नरवाहन राजा आमचे हे जंगल वाटेल त्याला देऊन टाकतो आहे कां स्वतः बळकावणार आहे, हे कसं काय हो समजायचं? आम्ही सर्व रानटी जातीच्या लोकांनी एक होऊन या गोष्टीस विरोध केला तर? तो आमचा सर्वांचा




सर्वनाश करण्याचा प्रयत्न करील का?"

मी त्या भिल्लनायकाच्या तोंडी तशा प्रश्नाची अपेक्षाच करीत होतो. मी त्याला नरवाहन मिश्राची कूटनीती आणि त्याला मदत करणारे आणखी काही द्रोही यांची सर्व माहिती सांगितली. त्याला मदत करणाऱ्यांच्या समोर चाटायला काही फेंकले नाही व त्यांना खुष केले नाही तर तेच त्याच्याविरुद्ध उलटून त्याचा सर्वनाश नाही कां करणार? म्हणून असं काही केल्या-शिवाय त्याचे काम चालणारच नाही तुम्हांला या संकटातून सुटका करून घ्या-यची असेल तर तुम्ही सर्वांनी एकजुटीने

त्याचा विरोध केला पाहिजे. आधित्य दुसरा उपायच नाही."

मी म्हटलं ते सर्व ऐकून भिल्लांचा तो नायक काहीवेळ विचार करीत राहिला आणि तेथे जमलेल्या भिल्लांकडे वळून म्हणाला—"तुम्ही सर्वांनी जाऊन हा निरोप जंगलातील सर्व वस्त्यांत पोचता केला पाहिजे. उद्या बरोबर दुपारी सूर्य डोक्यावर येईल त्या वेळी लांडग्यांच्या वस्तीत सर्व वस्तींच्या प्रमुखांनी एकत्र जमावयाचं आहे. त्यांनी आपापल्या अनुयायांना बरोबर घेऊन येणे बरोबर होईल."

फार वेळ दवडू न देता, आयुध धारण करण्याची शक्ती असलेला प्रत्येक भिल्ल-तरुण निरनिराळ्या दिशांना ओरडत धावले. मी भिल्लनायकाच्या बरोबर लांडग्यांची वस्ती नांवाच्या जागेकडे निघालो.

आम्ही त्या वस्तीत येऊन पोचलो तोंपर्यंत चांगले उजाडले होते. जवळपास इतक्या वस्त्या असतां त्या भिल्ल नायकाने भिल्ल प्रमुखांच्या सभेसाठी इतक्या दूरच्या वस्तीचीच निवड कां केली हे मला त्या वस्तीत आल्यावरच चांगले कळले.

ही लांडग्याची वस्ती भिल्लांच्या इतर वस्त्यांसारखी नव्हती. त्या वस्तीच्या चारी बाजूला मातीची उंच भिंत होती आणि जागोजागी उंच बुरुजही होते. त्या वस्तीतल्या उंच झाडांवर मांची बांधलेली होती. त्यावरून बाण सोडतां येत होते. वस्तीच्या मधोमध एक उंच सागवानाचे



झाड होते, त्यावर चढल्यास चारही बाजूचा सुमारे तीन चार कोसाचा प्रदेश छान दिसत होता. हे त्या वस्तीचे विशेष होते. शत्रू येत असल्याचे दिसल्यास आगाऊ सूचना मिळे व शत्रूला तोंड द्यायला सर्व तयारी करणे शक्य होई.

दिवस वाढत गेला तसतसे निरनिराळ्या रानटी वस्त्यांतील प्रमुख आपल्या अनुयायांसह जमू लागले. त्या प्रमुखात काही फारच वृद्ध होते तर काही चांगले तरुणच होते. सर्वांच्या तोंडावर भय आणि कुतूहल स्पष्ट दिसत होते.

ठीक दुपारी सूर्य डोक्यावर आला. सभा सुरु व्हायची सूचना म्हणून मोठमोठी रण-वाद्ये वाजू लागली. एका मोठ्या वडाच्या झाडाखाली वाघाची व हरणाची कातडी अंथरण्यात आली. त्यांवर भिल्ल प्रमुख एकेक करून येऊन बसू लागले. मी ज्या भिल्लनायका बरोबर आलो होतो, त्याला वडाच्या पारावरचे उच्च आसन देण्यात आले. मला माझ्या अनुयायासह बसायला सांगण्यात आले.

निरनिराळी फळफळावळ, मांस व ताडी-माडी तिथे जमलेल्या सर्वांना वाढण्यात आली. सर्वांचे पोटभर खाणेपिणे आटोपल्यावर भिल्लनायक उच्च स्वरात सर्वांना बोलावण्याचे कारण सांगू लागला. म्हणाला—"परिस्थिती पार बदलून गेल्यासारखी दिसत आहे. या कुंडलिनी द्वीपात आज-पर्यंत कित्येक राजवटी बदलल्या, परंतु या














जंगलात राहणाऱ्या आपल्या लोकांना कोणत्याही प्रकारचा त्रास झाला नाही. पिढ्यान् पिढ्या या जंगलात आपण रहात आलो आणि ही वनसंपदा आपण उपभोगीत आलो त्यावर अवलंबून स्वच्छंदपणे व निर्भयपणे आपण रहात आलो. परंतु आत्तां बदलेल्या राजवटीत आपणांवर संकट आले आहे काल रात्री घडलेला भयंकर प्रकार तुम्ही सर्वांनी ऐकलाच असेल." असे म्हणत वृद्ध भिल्ल नायक थांबला.

त्यानंतर तेथे जमलेल्या प्रमुखांनी उठून आपापले अनुभव वर्णन करून सांगितले. ते म्हणाले नरवाहनाने त्याला अनुकूल असलेल्या सरदारांना बक्षीस म्हणून जंगलातला सर्व प्रदेश वाटून दिला होता. मग पुढे काय करायचे? हा प्रश्न सर्वांच्याच समोर राक्षसासारखा उभा होता. काहीतरी केलं पाहिजे हे प्रत्येकाला वाटत होते, परंतु काय करायला हवे, हे कोणालाही सुचले नव्हते. "हे जंगल आमचे आहे!" उपभोगण्याचा हक्क ही आमचाच आहे!" असे सर्वांचेच म्हणणे होते.

सर्व म्हणाले ते शांतपणे ऐकून घेतल्यावर वृद्ध भिल्ल नायक म्हणाला—"पण तो हक्क रहावा यासाठी काय करायचे?..." त्याने स्पष्ट शब्दात सर्वांना विचारले.

तेथे जमलेले प्रमुख परस्परांच्या तोंडाकडे या अर्थी पाहू लागले की 'पुढे काय करायचे?' काहीवेळ सर्व गप्प राहिल्यावर एक तरुण भिल्ल उभा राहून म्हणाला—"त्यानी आपल्यावर एकाएकी हल्ला करून बळजबरीने जंगल आपल्या ताब्यात करून घ्यायचे ठरविले आहे. तेव्हां आपणही सर्व शक्तीनिशी त्यांचा विरोध करून त्यांचा पराभव केला पाहिजे."

ते ऐकून तेथे जमलेल्या सभेतून सर्व दिशांना "होय, होय!" असा आवाज व त्याचा प्रतिध्वनी ऐकू आला. त्या प्रतिसादाची अपेक्षा करीत बसलेला वृद्ध भिल्ल नायक आनंदाने मान डोलवून म्हणाला—"सर्व प्रमुखांनी आपापल्या अनुयायांना या कामासाठी ताबडतोब एकत्र करायला लागलं पाहिजे. शत्रू एका मागून एक वस्ती बळकावण्याचा प्रयत्न करील. त्याला तशी संधी मिळतां कामा नये. सर्वांनी एक जुटीने शत्रूला तोंड देऊन हा प्रश्न तडीस लावला पाहिजे. मिळो किंवा पराभव होवो, हा निश्चय कायम आहे!"

त्या सभेला हजर असलेल्या सर्वांना तो म्हणाला ते पसंत पडले. होकारार्थी सर्वांनी टाळ्या वाजविल्या. तेव्हां वृद्ध नायक म्हणाला—"परंतु मी तुमच्या सर्वांच्या अनुज्ञेने त्या पूर्वी एक काम करायचं ठरविलं आहे. आतां कुंडलिनी द्वीपाचे राज्य नरवाहन नांवाच्या एका राजाने हस्तगत करून घेतलं आहे. त्याने अशा तऱ्हेने जंगलावर आपला अधिकार सांगून आपल्या सरदारांना ते वाटून दिलं आहे. ते न्याय्य नाही हे मी त्याला कळविणार आहे. तो त्याचे काय उत्तर देतो हे आपण पाहू या!"

तो प्रयत्न करून पहायला सर्वांनी होकारार्थी आपली मान हलविली आणि ती सभा संपली. दुसऱ्या दिवशी सायंकाळ व्हायच्या आधी सर्व प्रमुखांनी आपापल्या अनुयायांसह लांडग्यांच्या वस्तीत जमायचं ठरलं. जंगलाच्या हद्दीजवळच्या भागातल्या वस्त्या रिकाम्या करून बायकापोरांना खोल अरण्यातल्या भागात पोचते करावे असेही



ठरले. सर्व लोक निघून गेल्यावर वृद्ध भिल्ल नायकाने मला जवळ बोलावून घेतले व विचारले—"तुम्हांला काय वाटते? सर्व वस्त्यांचे प्रमुख आले होते त्यांना तुम्ही पाहिलेच आहे. हे लोक त्या सैनिकांच्या समोर टिकाव धरून उभे राहू शकतील का?"

"ते आतां नाही सांगता येणार. त्या नरवाहनाचे सैनिक शस्त्रविद्येत चांगले निष्णात आहेत. शिवाय त्यांना मदतीला घोडेस्वार आहेत. ते अकस्मात् हल्ला करून दुसऱ्या क्षणाला नाहीसे होऊ शकतील आतां तुमचे लोक पहा, ते तर सर्व पायदळ सैन्यासारखेच आहेत. युद्ध जिंकायचं म्हणजे फक्त धैर्य व साहस पुरेसे नसते. तेव्हां

तुम्ही लहानसे घोडेस्वारांचे एक दल उभे करू शकाल का?" मी विचारले.

भिल्ल नायकाने नकारार्थी ओठ हलविले व म्हणाला–"ते इतक्या लौकर साध्य होणार नाही. आमच्यापैकी काही तरुण मंडळी रानटी घोडयांना धरून त्यांच्या पाठीवर काही न घालता गमतीखातर स्वारी करतात खोगीर लगाम वगैरे करण्याची माहिती असणारे कारागीर आमच्यात नाहीत. तरी तशीच गरज पडली तर लहानसं अश्वदल उभे करतां येईल."

"तरमग तसे घोडेस्वारांचे दल उभे कराच. त्याची गरज फार आहे!" असा मी त्याला सल्ला दिला. त्यानंतर वृद्ध भिल्लनायकाने एका तरुणाला बोलावून हरणाच्या एका कातडयावर एका धारदार सुरीने काही लिहिले व म्हणाला–"हे नरवाहन महाराजांना नेऊन दे! तू निर्भय-पणे या जंगलातून मैदानात जा. कोणत्याही सैनिकाला दाखविलेस की तो तुला आपल्या महाराजांकडे घेऊन जाईल आणि तू मात्र हातात एकही शस्त्र धारण न करितां गेल पाहिजेस!" त्याने त्याला आज्ञाच केली.

त्या वृद्ध नायकाने पाठविलेल्या पत्राचा कितपत उपयोग होतो हे पाहण्याची उत्सुकता माझ्या मनात होती. एक गोष्ट मात्र माझ्या लक्षात आली. त्या पत्राचा तसा मोठा उपयोग होईल, या गोष्टीची वृद्ध नायकाला सुद्धा विशेष आशा असल्याचं मला दिसलं नाही.

त्या दिवशीची रात्र आम्ही सर्व लांड-ग्यांच्या वस्तीतच काढली. जंगल जळत असल्याचे कळल.चांगलं उजाडल्यावर आम्ही उठलो त्याच्या आधीच म्हातारा भिल्ल नायक व त्याचे अनुयायी उठून सागवानाचं जे मोठे झाड होतं त्याच्या खाली जमा झाले होते. आम्ही पोचलो तेव्हां झाडावर चढलेला एक तरुण मैदानात दूरवर पाहून मोठ्याने ओरडून सांगत होता, तो पहा, आपण पाठवलेला माणूस येतो आहे. परंतु हे काय? गाढवावर बसलेला आहे!" असे आश्चर्याने म्हणाला. (क्रमश:)



# साथीदार

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा, तुझी आस्था आणि श्रम पाहून तुझी वाखाणणी केल्याशिवाय मला राहवत नाही. परंतु एकटयाने कोणतेही कार्य करावयाचे झाले तर त्यात यशप्राप्ती होत नाही, स्वत:चे गुण अपुरे पडतात. काही कामे अशीही असतात की ती पुरी व्हायला साथीदारांची गरज भासते. उदाहरणार्थ मी लवंग देशाच्या महासार नामक एका वैद्याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

लवंग देशात मूलिकावन नावाचे एक मोठे जंगल होते. त्यात नाना प्रकारची औषधी वनस्पती व कंदमुळे फळे मिळत.



त्या जंगलाच्या वनस्पतीमुळेच तो देश सुखी व संपन्न होता असे लोक म्हणत. परंतु एक वर्षी त्या देशात दुष्काळ पडला. पाऊस पडल्यामुळे मूलिकावन वाळून जाऊ लागले. खेडयांतून राहणारे लोक झाडे कापून लाकूडफाटा घेऊन जात. त्यामुळे जंगल विरळ होऊ लागले. झाडी नसल्यामुळे पाऊसही कमी पडू लागला.

तज्ज्ञांनी सांगितल्यावरून राजाने एक कायदा केला. त्या कायद्यान्वये राजाच्या परवानगीशिवाय कोणालाही जंगलात पाऊल टाकायला परवानगी नव्हती.

राजधानीत महासार नांवाचा एक वैद्य होता. लहान वयातच त्याने शरीरशास्त्र व चिकित्सा शास्त्राचा अभ्यास करून एक उत्तम वैद्य म्हणून नावलौकिक संपादन केला. परंतु त्यामुळेच गावातील इतर वैद्य त्याचा मत्सर करू लागले. या वैद्याचा कांटा कसा बाजूला सारता येईल या गोष्टीचा ते सर्व विचार करीत होते. त्याच सुमारास राजाज्ञेने जंगलात पाऊल टाकणे कायद्याविरुद्ध काम होते व त्याबद्दल मोठी शिक्षा होण्याची शक्यता होती. महासारचे सर्व वैद्यशास्त्र जंगलांतील वनस्पतीवरच तर चाले. निरनिराळ्या रोगांवर रामबाण औषध म्हणून त्याने अनेक वनस्पतींचा शोध लावला होता.

महासार सर्व वैद्यांना भेटला आणि परिस्थिती समजावून सांगितली. त्याने सुचविले की महाराजांना भेटून औषधी वनस्पती पुरती राजाकडून परवानगी घ्यावी. परंतु कोणताही वैद्य त्या गोष्टीस कबूल झाला नाही.

शेवटी महासारने स्वतःच महाराजांना भेटायचे ठरविले. परंतु त्याच्या वडिलांनी त्याला समजावून सांगितले की कार्यसिद्धी हवी असेल तर कधी एकट्याने कामाला लागू नये. योग्य साथीदार बरोबर असेल तर कार्यसिद्धी अवश्य होते. अशा योग्य व्यक्तीची निवड करण्यातच तुझी योग्यता सिद्ध होईल."

महासार म्हणाला– बाबा, तुम्ही म्हणता आहां, ते मीही मान्य करतो. परंतु योग्य व्यक्तीची निवड मला करतां येणार नाही. आपणच योग्य व्यक्तीचे नाव सुचवावे. मी त्याला बरोबर घेऊन महाराजांना भेटेन."

तेव्हां महासारच्या वडिलांनी त्याला कुशंकचे नाव सुचविले. कुशंक हा लवंग देशाच्या राजाचा सावत्र भाऊ होता. तो स्वभावाने दुष्ट आणि क्रूर होता. सावत्र आई जिवंत होती, म्हणून राजघराण्याची प्रतिष्ठा कायम रहावी यासाठी राजा-कुशंकच्या दुर्वर्तनाकडे दुर्लक्ष करीत असे. ही गोष्ट सर्वांना माहीत होती. कुशंकला एका भयंकर आजारांतून महासारने वांचविले होते. म्हणून राजा कुशंकने सांगितले तर नक्कीच यश मिळेल.

महासार कुशंकला बरोबर घेऊन जाऊन राजाला भेटला. सावत्र भावाला पाहतांच राजाच्या कपाळाला आंठ्या पडल्या. कुशंकने महाराजांना महासारची ओळख करून देत निवेदन केले–" महाराज, हा एक फार मोठा वैद्य आहे. याला औषधी वनस्पतींची चांगली माहिती आहे. म्हणून याला औषधी वनस्पती पुरती मूलिकावनात प्रवेश करण्याची परवानगी देण्याची कृपा करावी. राजाने लगेच महासारला अनुमती पत्र लिहून दिले. महासारने घरी आल्यावर



वडिलांनी उत्तम सल्ला दिल्याबद्दल त्यांची वाखाणणी केली. ती बातमी कळल्यावर राजधानीतल्या वैद्यांना अत्यंत आश्चर्य-वाटले. त्यांनी महासारचा कांटा कायमचा काढून टाकण्यासाठीं एक कारस्थान रचले. त्यांनी एक निनावी खोटे पत्र राजाकडे पाठविले की राज्याच्या सरहद्दीवर एका गावी संसर्गजन्य असा भयंकर रोग झपाट्याने पसरत आहे. त्याचा इलाज करण्याची शक्ती एकट्या महासारच्या अंगात आहे. म्हणून त्याला तेथे तत्काळ जाण्यास सांगण्यात यावे. राजाने विशेष चवकशी वगैरे न करतां महासारला तेथे जाण्यास आज्ञा-पत्र पाठविले.



त्या वेळी राजधानीतील पुष्कळ श्रीमंत व दरबारी-वजनदार मंडळी महासारकडून आपला इलाज करवीत होती. त्यांचा जीव धोक्यात टाकून राजाच्या हुकमाप्रमाणे सरहद्दीवरच्या गावी जाण्याची इच्छा महासारच्या मनात नव्हती. शिवाय ते गावातल्या वैद्यांचे त्याच्या विरुद्ध केलेले कारस्थान असल्याची त्याला खात्री होती. त्याने महाराजांना भेटायचे ठरविले.

तेव्हां त्याच्या वडिलांनी त्याला जवळ बोलावून सल्ला दिला की त्याने या वेळी कुशंकला बरोबर नेऊ नये. कारण कुशंकवर राजाची गैरमर्जी आहे. म्हणून त्याच्या ऐवजी दरबारी विदूषकाला बरोबर न्यावे.

महासारने वडिलांच्या सल्ल्याप्रमाणे केले. विदूषक राजाला म्हणाला—"महाराज, आपल्या आज्ञेप्रमाणे महासार त्या सरहद्दीवरच्या गावी जात आहे. त्याच्या बरोबर मी व राजधानीतील काही प्रमुख नागरिकही जात आहो त्याच्या बरोबर जाण्याची अनुज्ञा देण्याची कृपा करावी.

महासार बरोबर त्या गावी निघालेल्या नागरिकांची नावे ऐकून राजा चकित झाला. त्याने विदूषकाला तिकडे सर्वांनी जाण्याचे कारण विचारले. विदूषक म्हणाला—"महाराज ते सर्व आजारी आहेत आणि महासारच त्यांचा इलाज करीत आहे. ते ऐकून राजाने आपले आज्ञापत्र मागे घेवविले आणि दुसऱ्या एका नामवंत वैद्याला त्या गावी पाठविण्यास राजवैद्यास सांगितले.

एकदां राजधानीत सत्वसार नावाचा एक मोठा वैद्य आला. त्याला वैद्यकशास्त्र चांगले माहीत असल्याची प्रसिद्धी होती. तो आपल्या पट्टशिष्यांना व वैद्यक शास्त्रीला काही गुपिते सांगतो असेही ऐकिवात होते. तो वैद्य भयंकर तापट होता. तो जर का कोणावर रागावला तर त्याला जवळ येऊ देत नसे. शिष्य करून घेणे तर अशक्यच!

गावातील कित्येक वैद्य त्या रागीट वैद्याला भेटायला गेले आणि त्याच्या शिव्या खाऊन परतले. या वेळी महासारच्या





वडिलांनी महासारला चित्रलेखा नावाच्या राजनर्तकीला बरोबर नेण्यास सांगितले. एकदां राजनर्तकीच्या पायाला गळू झाले होते. तेव्हां राजवैद्यांनी तिचा पाय सडला असल्याचे सांगून तो कापून टाकावा लागेल असे सांगितले होते. पायच कापून टाकला तर ती नृत्य काय करणार व तिचा धंदा कसा चालणार असा विचार करून राजनर्तकी महासारचा सल्ला घ्यायला आली, महासारने शस्त्रचिकित्से शिवायच राजनर्तकीचा पाय बरा करून दिला.

त्या गोष्टीची राजनर्तकीला आठवण करून देऊन महासारने सत्वसारचे शिष्यत्व ग्रहण करण्यासाठी मदत करण्यास विनंती केली. तिने होकर दिला. तिचे सौंदर्य पाहून सत्वसार गारच पडला.

राजनर्तकी सत्वसारांना प्रणाम करून म्हणाली—"वैद्यराज आपण या युगातील धन्वंतरी असल्याचे मी ऐकले. आपल्या हाताला गुण चांगला आहे व आपण वैद्यकशास्त्र धुरंधर आहां! परंतु आपलं सौंदर्य देवांना सुद्धां लाजविणारं आहे ह्याची मला कल्पनाही नव्हती, मी आपणांसमोर नृत्य करून आपली करमणूक करतां येईल या आशेने आले आहे.

नंतर महासारची ओळख करून देत ती म्हणाली—"आपल्या वैद्यकशास्त्रातील नैपुण्या बरोबर आपल्या शांत स्वभावाविषयी पण मी फार ऐकले आहे. माझ्या या मित्राला आपण एक शिष्य म्हणून स्वीकाराल ही एक माझी विनंती आहे."

तेव्हां सत्वसारने अत्यंत आनंदाने महासारला आपले शिष्य म्हणून मान्य केले व तीन चार दिवसातच वैद्यकशास्त्राची सर्व गुपिते त्याला सांगून टाकली.

तो आपल्या वडिलांना म्हणाला—"बाबा, तुम्ही अनेकदां मला लग्न करून घेण्याविषयी आग्रह केला होतां. पण मी टाळीत आलो. परंतु आतां मात्र मी स्वत:च लग्नाला तयार असल्याचे आपणाला सांगत आहे."

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "राजा, महासारच्या वडिलांनी आपल्या मुलाला वेळोवेळी जो सल्ला दिला तो विचित्र व अदूरदर्शीपणाचा होता, नाही का? एकदां त्यांनी राजाच्या सावत्र भावाला बरोबर घेऊन राजाला भेटायला सांगितले. राजाला तर सावत्र भावाच्या नावाचाच तिटकारा होता. दुसऱ्यावेळी विदूषकाला बरोबर घेऊन जायला सांगितले. या तिन्ही वेळी उलटाच परिणाम होण्याची शक्यता होती. तसं झालं नाही ही गोष्ट निराळी. या पाठीमागे महासारचे नशीब होतं की आणखी काही होतं? या शंकांचं समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिलं नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य उत्तर देत म्हणाला–"महासारच्या वडिलांना लौकिकज्ञान चांगले होते. म्हणून त्यांना निरनिराळ्या पातळीवर राहणाऱ्या लोकांच्या स्वभावाची चांगली माहिती होती. राजा ज्या सावत्रभावाचे तोंड पुन्हा पाहायला ही तयार नव्हता त्याला बरोबर न्यायचा सल्ला देऊन राजाकडून महासारला पाहिजे होते तसे अनुमती पत्र मिळवितां आले, विदूषकाच्या बाबतीत ही तीच गोष्ट घडली, राज्य व्यवस्थेच्या कामात सतत गुरफटून राहणाऱ्या राजाला हंसविण्याचे काम एक विदूषकच करीत असे. तोच त्याचा खरा मित्र असतो. सत्वसारसारख्या तापट माणसाला वळवून घ्यायला चित्रलेखेला बरोबर नेण्याचा सल्ला देण्यात महासारच्या वडिलांनी आपल्या लौकिक ज्ञानाचाच उपयोग केला होता. या सर्व अनुभवांच्या आधारे महासारला वाटू लागले की आयुष्यात नेहमी यश मिळवायचं असेल तर एक साथीदार असला पाहिजे. स्वतःच्या बायकोव्यतिरिक्त उत्तम साथीदार आणखी कोण होऊ शकेल?"

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# विक्षिप्तपणाबद्दल शिक्षा

एक यात्रेकरू जंगलाच्या वाटेने जात असतां काळोख पडू लागला. पुढे जाणे शक्य नव्हते. परंतु त्याच्या सुदैवाने त्याला एक झोपडे जवळच दिसले तो त्या झोपडीत शिरला. झोपडीत एक मध्यम वयाचा माणूस सैंपाक करीत होता. कोपऱ्यात एक मांजर पेंगत बसले होते.

त्या यात्रेकरुने त्या माणसाला विचारले– "मी एक यात्रेकरू आहे. आजची रात्र येथे आपल्या झोपडीत काढायला काही हरकत आहे का? आपले उपकार मी आयुष्यभर विसरणार नाही."

"तुला आजची रात्र येथे काढायला मुळीच हरकत नाही. मी जेवायला ही वाढीन. परंतु माझा एक प्रघात आहे. माझ्या घरी जो कोणी पाहुणा म्हणून येतो त्याला मी तीनचार प्रश्न विचारतो. त्याचे उत्तर पाहुण्याने द्यायचे असते. ते उत्तर बरोबर नसेल तर मी एक थोबाडीत देतो." तो गृहस्थ म्हणाला.

त्याची ती अट यात्रेकरुने मान्य केली. "तर मग दार ओढून घे आणि चुलीजवळ शेकायला येऊन बस. थोड्या वेळाने सैंपाक तयार होईल." तो गृहस्थ म्हणाला.

सैंपाक झाल्यावर त्याने दोघांना वाढून घेतले. पोटभर जेवून घेतले. जेवणखाण ओटोपल्यावर दोघे बोलत बसले. त्या गृहस्थाने मांजराकडे बोट दाखवून यात्रेकरूला विचारले–"तिला काय म्हणतात?"

हा गृहस्थ विक्षिप्तासारखा हा काय प्रश्न विचारतो आहे असा विचार करून तो यात्रेकरू मनातल्या मनात थोडा हसला व म्हणाला–"ती मांजर आहे!".

"नाही, ती स्वच्छता आहे! समजलें!" असे म्हणत त्या गृहस्थाने आपल्या पाहुण्याच्या थोबाडीत एक भडकावली. त्या

गृहस्थाच्या त्या विक्षिप्तपणाबद्दल यात्रेकरुला आश्चर्य वाटले.

त्या गृहस्थाने त्यानंतर पाणी भरलेल्या मडक्याकडे बोट दाखवून विचारले–"त्यांत काय आहे?"

"का, पाणी!" यात्रेकरू म्हणाला.

"नाही, यांत चांगुलपणा आहे!" असे म्हणत त्या गृहस्थाने आपल्या पाहुण्याच्या थोबाडीत पुन्हा एक भडकावली.

थोड्या वेळाने त्या गृहस्थाने आपल्या पाहुण्याला विचारले–"त्या चुलीत काय आहे?"

"विस्तव!" यात्रेकरू म्हणाला.

"नाही, सुख आहे!" असे म्हणत त्या गृहस्थाने गालफडात तिसरी भडकावली.

अगदी शेवटी त्या गृहस्थाने छप्पराकडे बोट दाखवून विचारले–"त्याला काय म्हणतात?"

"छप्पर!" यात्रेकरूने उत्तर दिले.

"नाही, त्याला उंची म्हणतात!" असे म्हणत त्या गृहस्थाने आपल्या पाहुण्याच्या तोंडात शेवटची भडकावली.

थोड्या वेळाने यात्रेकरू उठून उभा राहिला आणि म्हणाला–"मला आत उकडत आहे. उघड्या हवेत मी थोडा वेळ जातो" असे सांगून तो बाहेर गेला.

त्याच वेळी मांजर सुद्धा बाहेर गेले. यात्रेकरूने मांजराला धरून त्याच्या शेपटीला एक चिंधी बांधून ती पेटविली आणि मांजराला छतावर सोडले. नंतर झोपडीत जाऊन त्या गृहस्थाला म्हणाला–"अहो, तुमची ती स्वच्छता सुखासह उंचीवर गेली आहे. चांगुलपणाने तिला थांबवा!"

त्या गृहस्थाला त्याचा अर्थ कळला नाही. तो चिडून म्हणाला–"हे सर्व निरर्थक काय बोलतो आहेस?"

"अरे शहाण्या! तुझ्या झोपडीला आग लागली आहे. पाणी टाकून विझव! तुझा पाहुणचार मी चांगला भोगला! मी येतो तर!" असे सांगून त्या यात्रेकरूने त्या गृहस्थाचे थोबाड फोडले आणि व्याजासकट सर्व कर्ज वसूल करून आपल्या वाटेने निघून गेला.





# खरी पत

उत्कल राज्यात राहणारा उमाकान्त नावाचा एक व्यापारी ते राज्य सोडून विजयपूर संस्थानातील सीतापूर या गावी फार दिवसांपासून रेशमी कापडाचा व्यापार करीत असे.

त्या गावात राजेश्वर आणि रंगनाथ नावाचे दोन शेतकरी रहात होते. आपल्या गावात आपणच मोठे आहो, हे म्हणविण्यासाठी ते गांवकऱ्यांची आपसात भांडणे लावीत. म्हणून त्यांना मान देणाऱ्या गावकऱ्यांचे दोन गट झाले. उमाकांत एक तर परकीय होता आणि व्यापारासाठी त्या गावी येऊन राहिला होता. म्हणून तो कोणत्याही गटात जात नसे व तटस्थपणे रहात असे. म्हणून दोन्ही गटातील माणसं परस्परांशी द्वेष करीत असली तरी त्यांच्यासमोर काही प्रश्न उपस्थित झाला की ते उमाकांतचा सल्ला घ्यायला येत.

गावात एक फार जुने पडके सांबाचे देऊळ होते संस्थानिक जमिनदार वारल्यावर त्याचा मुलगा जमिनदार झाला. त्याने त्या देवळाचा जीर्णोद्धार करून त्या देवळाच्या खर्चासाठी थोडी जमीन लिहून द्यायचे ठरविले.

नव्या जमिनदाराने सीतापूरच्या गावकऱ्यांना आपला मानस कळविला आणि देवळाचा विश्वस्त म्हणून कोणत्या योग्य व्यक्तीला नेमावे याविषयी त्यांचा विचार कळवायला विनंती केली. राजेश्वर व रंगनाथ दोघांच्या गटातील लोकांनी पुष्कळ विचार केला व या बाबतीत गटबाजी न करतां एका योग्य व्यक्तीची निवड करण्याचा बराच उहापोह केला. परंतु त्यांच्यापैकी कोणाला विश्वस्त नेमावे हे ठरवू शकले नाहीत. एक महिना लोटला तरी जमिनदाराकडे सीतापूरहून काही उत्तर आले नाही.












त्याने आपल्या अधिकाऱ्यांकरवी गावातील परिस्थितीची चवकशी करवून घेतली. या खेपेस त्याने आपल्या दिवाणांनाच पाठविले. त्याने जमिनदारांचा निरोप म्हणून ग्रामस्थांना जे सांगितले ते असे होते.

"तुमच्या गावी रहात असलेला उमाकांत नावाचा परकीय व्यापारी हा सर्वांचा मित्र असल्याचे आम्हांला कळले आहे. म्हणून देवळाचा विश्वस्त म्हणून तो राहिला तर कोणाचीही काही हरकत नसावी असे वाटून त्यालाच विश्वस्त म्हणून नेमीत आहो!"

ते ऐकून गावकऱ्यांनी होकारही दिला नाही किंवा नकारही दिला नाही. सर्व मौन राहिले.

आता उमाकान्तला बोलावेच लागले. तो दिवाण साहेबांना म्हणाला—"मालक, मी आपणांजवळ विनयपूर्वक निवेदन करीत आहे ते जमिनदार साहेबांना माझ्या वतीने माफी मागून पोचते करण्याची कृपा करावी. देवळाच्या विश्वस्ता सारख्या पदाला मी योग्य नाही."

दिवाणसाहेब निघून गेले. पती घरी परतण्यापूर्वी शेजाऱ्यांकडून सर्व माहिती मिळाली असल्यामुळे उमाकांतची बायको त्याला घरात पाऊल टाकतांच म्हणाली—"तुम्ही जे केलेत ते शहाण्या लोकांसारखे केलेत असे वाटते का तुम्हांला? तुम्हांला गावात जो मान आहे तो कळल्यावरच नाही का जमिनदाराने तुम्हांला ते पद देऊ केले? परदेशातले राहणारे असून मिळालेला मान तुम्ही स्वतःच्या हाताने बाजूला लोटलात आणि मोकळे झाला?"

उमाकांत शांतपणे म्हणाला—"अग वेडे! भांडणे व मारामारी करण्यात आकंठ बुडून गेलल्या गावकऱ्यांमध्ये तटस्थ राहणाऱ्या माझ्या सारख्याला एक निराळेच स्थान सहजी लाभते. परंतु त्यामुळे आपण मोठे झालो हे मानणे सुद्धा चूकच! मला खरोखरी मोठेपण असते तर जमिनदाराने विश्वास्ताची निवड करून द्यायला कळविले तेव्हांच सर्वांनी एकमताने माझी निवड केली नसती का? राजेश्वर व रंगनाथ दोघांची इच्छा ते पद मिळावे म्हणून होती. म्हणून ते कोणताच निर्णय घेऊन उत्तर देऊ शकले नाहीत." त्यानां प्रत्येकाला ते पद आपल्याला मिळावे असे वाटत होते.

त्यानंतर दोन महिन्यात देवळाची दुरुस्ती होऊन जीर्णोद्धाराचे काम संपले. औपचारिक प्रवेशाचा समारंभ एका शुभदिनी ठेवून स्वतः जमिनदार त्या उत्सवाला सीतापूरला आला. गावकऱ्यांना एकत्र जमवून जमिनदार म्हणाला—"गावात मोठा कोण यासाठी तुमचं आपसांत भांडण व चढाओढ चालू असल्याचं मी मध्यंतरी ऐकलं. देवळाचा विश्वस्त म्हणजे गावातला मोठा माणूस नव्हे, तो देवाचा प्रथम सेवक होतो. अशी कोणी व्यक्ती तुम्ही एकमताने निवडणे तुम्हांला शक्य नाही का?"

ते ऐकून राजेश्वर व रंगनाथ दोघांची खात्री झाली की देवळाचा विश्वस्त होईल तो गावातला मोठा पुढारी होत नाही. लगेच दोघे परस्परांचं वैर विसरून जमिनदाराला म्हणाले—"आमची पत व मोठेपणा गावातल्या अर्ध्या अर्ध्या ग्रामस्थांपर्यंतच आहे. परंतु उमाकान्तला सर्वच गावकरी मान देतात. तेव्हां त्याला देवळाचा विश्वस्त नेमावं, त्याला आमचे सर्वांचे अनुमोदन आहे."

जमिनदाराने लगेच उमाकान्तला देवळाचा विश्वस्त म्हणून नेमल्याचे जाहीर केले.

ते कळल्यावर उमाकान्तची बायको तो घरी येतांच म्हणाली—"त्या दिवशी तुम्ही जमिनदाराच्या इच्छेविरुद्ध नकार दिलात आज कसे काय तुम्ही मान्य केलेत?"

उमाकान्त म्हणाला—"त्या दिवशी एकट्या जमिनदार साहेबांनी मला विश्वस्त नेमले होते. परंतु आज हाडवैरी राजेश्वर आणि रंगनाथ दोघांनी मलाच विश्वस्त नेमायला सांगितलं. हीच खरी पत व मान!"



# वटवटया

ती र्थयात्रेला निघालेले लोक एका अनोळखी गावाच्या धर्मशाळेत उतरले. वटवटया म्हणून प्रसिद्ध असलेल्या गोपूने दिसेल त्याला थांबवून नाही नाहीत्या चवकशा सुरू केल्या.

हे सर्व दूर एका ओटयावर बसून रघू पहात व ऐकत होता आणि या वटवटयाचं तोंड कसं बंद करायचं या विचारात होता. गोपु त्याला पाहून जवळ जाऊन विचारू लागला–"कोणचं हो गाव तुमचं ? तुम्हांला कोठेतरी पाहील्या सारखं वाटत !"

रघू लगेच म्हणाला–"आमचं गाव विजयनगर आमच्या वडिलांचं गाव, राजमहेंद्री, आमच्या आजोबांचे, म्हणजे आईच्या वडिलांचं विजयवाडा. आमचे पूर्वज मुळात कर्नाटकातून आले होते म्हणे. चवदाव्या शतकात कोंडवीड येथे वेमारेड्डी यांचे राज्य होते. त्यांच्या पदरी प्रधान म्हणून काम करणारे पद्मनंद हे आमच्याच वंशातले. त्या वंशातले लोक विभागले जाऊन अनेक देशांचे राजकर्ते झाले, असेही सांगतात. सूर्यवंशात जन्मलेला रामचंद्र जेव्हां लंका जिंकायला निघाला..." असे बोलत मोठे पुराणच रघू सांगू लागला.

बडबडया गोपू थक्कच होऊन गेला. म्हणाला–"अहो, इतकं वर्णन पुरे हो. येतो मी !" असं म्हणत त्याने उपरणं झाडून खांद्यावर टाकले आणि धर्मशाळेच्या बाहेर निघून सांबाच्या देवळाकडे निघाला.

धर्मशाळेत उतरलेले तीर्थयात्री वाचलो या अर्थी रघूकडे आनंदाने पाहू लागले.





# गुरूची विद्या गुरूस फळली!

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असता त्याच्याकडे पिंगळ नावाचा एक राज-पुरोहित होता. त्याच्या देहाचा रंग पिंगट होता. त्याच्या डोक्याला टक्कल पडलेले होते. व तोंडाचे बोळके झालेले होते. त्यावेळेला बोधिसत्व नवकारिय नावाने पिंगळजवळ विद्याभ्यास करीत होता.

राजपुरोहित पिंगळ याला एक मेहुणा होता. त्याचा रंग सुद्धां पिंगट होता. त्याच्या डोक्यालाही टक्कल पडलेले होते. व तोंडाचे बोळके झालेले होते. तो सुद्धां पिंगळच्यासारखाच प्रतिभावान होता. ते दोघे मेहुणे स्वतःहाला दुसऱ्यापेक्षा मोठा मानत आलेले होते. ह्याच कारणाने दोघांचे परस्परांशी फार वितुष्ट होते. पिंगळने आपल्या मेहुण्याची मान कित्येक वेळा खाली करण्याचा प्रयत्न केला. परंतु तो यशस्वी झाला नाही.

शेवटी पिंगळने आपल्या मेहुण्याचा कांटाच काढून टाकण्याची योजना आंखली. त्याने राजाकडे जाऊन निवेदन केले "महाराज, आपली काशी नगरी सर्व भारतात श्रेष्ठ आहे. आपण सर्व राजांच्या-मध्ये थोर आहांत असे असता आपल्या किल्ल्याच्या तटाच्या निर्मिती मध्ये दोष असणे चिंतेची गोष्ट होय. आपल्या किल्ल्याच्या दक्षिणद्वारामध्ये काहीतरी चूक राहून गेलेली आहे. ती आपल्या देशाला अशुभ आहे. त्यामुळे आपल्या देशाची अपकीर्ती सुद्धां होण्याची शक्यता आहे. तरी तो दोष घालविण्यासाठी लवकरात लवकर उपाय योजना केली पाहिजे."

"ह्या करिता आम्हांला काय करावे लागेल ?" राजाने पिंगळला विचारले.

"ते दार प्रथम पाडून टाकावे लागेल. त्यानंतर चांगले शुभ असे लाकूड आणून एक



दार बनवावे लागेल. नंतर राज्यातील एका ब्राह्मणाचा बळी देऊन शुभ मुहुर्तावर नवीन द्वार उभे करावे लागेल." पिंगळने सुचविले.

राजाने पिंगळच्या सुचनेला मान्यता दिली. राजाची आज्ञा घेऊन पिंगळने दक्षिणेकडचे दार काढून टाकविले व त्या जागी बसवायला नवीन दार तयार करविण्यात आले.

त्यानंतर पिंगळ राजाकडे गेला आणि विनयपूर्वक म्हणाला–"महाराज, नवीन दार तयार झाले आहे. त्याच्या मुहूर्तमेढी साठी उद्याचा दिवस उत्तम आहे, तेव्हां आवश्यक असलेला बळी देऊन ते दार स्थापन करण्याची अनुमती द्यावी."

बळी देण्याकरिता कोणकोणत्या गोष्टींची जरूरी आहे? काय करावे लागेल?" राजाने विचारले.

"महाराज, पिंगट रंग डोक्याला टक्कल सर्व दात पडलेल्या अशा ब्राह्मणाचा बळी द्यावा लागेल. ह्या दाराचे रक्षण करणाऱ्या शक्तीच्या मनाची तृप्ती व्हावी यासाठी अशा तऱ्हेच्या ब्राह्मणाचे रक्त व मांस अर्पण करणे आवश्यक आहे. नंतर तेथेच त्या ब्राह्मणाला पुरून त्याच्यावर ते दार उभे केले पाहिजे." पिंगळ म्हणाला.

"ठीक आहे! अशाच ब्राह्मणाचा शोध काढून त्याला मागवून घेऊन ते दार उभे करवून घ्या." राजाने संमती दिली.

ते ऐकून पिंगळला स्वर्ग दोन बोटे उरल्या सारखे झाले. वैऱ्याला मारण्याकरिता राजाने आपल्याला चांगली संधी दिली आहे. त्याला अतिशय आनंद झाला तो घरी येऊन आपल्या बायकोला म्हणाला–"एक उद्या तुझ्या भावाचे आयुष्य संपलेले असेल. बघत रहा. मी उद्या एका नवीन दाराच्या समारंभाला जाणार आहे तेथे एक बळी देणार आहे असे म्हणत त्याने फुशारक्या मारायला सुरवात केली.

"माझ्या भावाचाच बळी कां म्हणून द्यायचा? ह्याला राजा कसा कबूल झाला?" पिंगळच्या बायकोने विचारले.



"मी राजाला तसे थोडेच सांगितले? मी अमुक एक माणसाचा बळी देणार आहे म्हणून सांगितले नाही. मी फक्त असे सांगितले की, पिंगट रंगाचा बोळक्या तोंडाचा ब्राह्मण पाहिजे म्हणून ते राजाने मान्य केले. मी राजाला उद्याच सांगतो की, बळी द्यावयास हाच ब्राह्मण योग्य आहे. माझ्या म्हणण्याला कोण नकार देईल?" पिंगळ म्हणाला.

त्यानंतर पिंगळच्या बरोबर त्याच्या बायकोने वाद घातला नाही तिने गुप्तपणे जाऊन आपल्या भावाला सारा वृत्तांत सांगितला व प्राण वाचविण्याकरिता सकाळी उठून गाव सोडायला सांगितले.

जेव्हां पिंगळच्या मेहुण्याला आपल्याला मारण्याकरिता योजलेली युक्ती समजली तेव्हां त्याने गावातील त्याच्या सारख्या दिसणाऱ्या आणखी दोघांना घेऊन पहाटेच गाव सोडले.

दुसऱ्या दिवशी सकाळी पिंगळने राजाकडे जाऊन सांगितले–"महाराज, बळी द्यावयास लागणारा एक ब्राह्मण अशा अशा ठिकाणी आहे. त्याला आणून घ्यावे."

राजाने पिंगळने सांगितलेल्या माणसास आणण्याकरिता शिपाई पाठवले. परंतु शिपायांनी येऊन तशा प्रकारचा कोणीही माणूस तेथे नसल्याचे राजाला सांगितले व



तसा तऱ्हेचा माणूस पहाटेच हे गाव सोडून गेल्याचे सांगितले.

नोकरांकडून ते ऐकल्यावर राजाने विचारले–"आता काय करायचे? अशा तऱ्हेचा ब्राह्मण कोठून तरी शोधून आणला पाहिजे.

त्यावर मंत्र्याने आपली योजना सांगितली–"महाराज ही मोठी कठीण बाब नाही? आपल्या पुरोहितात तशा तऱ्हेची सारी लक्षणे आहेत. त्यानाच बळी द्यावा."

"तसेच करता येईल परंतु त्याच्यानंतर मला पुरोहित म्हणून कोणी योग्य असा माणूस पाहिजे नां? तशा योग्यतेचा कोणी माणूस आहे कां? ही गोष्ट सुद्धा पुरो-

हिताला बळी द्यावयाच्या आधी योजली पाहिजे!" राजाने आपला विचार सांगितला.

आपल्या पुरोहितापाशी तक्कारिय नावाचा एक ब्राह्मण शिष्य आहे. तो आपल्या गुरूपेक्षा सुद्धा हुषार व चतुर आहे. त्याला आपण आपल्या पुरोहिताच्या जागी नेमावे." मंत्र्याने आपली सूचना राजाला निवेदन केली.

दुसऱ्या क्षणीच राजाने तक्कारियाला बोलावणे पाठवले आणि म्हणाला–"तुला आजपासून माझा पुरोहित म्हणून नेमले आहे. तू ह्या पिंगळचा शास्त्रशुद्ध तऱ्हेने बळी देऊन त्याला तेथे पुरावे व त्याच्या थडग्यावर ते प्रवेशद्वार उभे करावे."

त्यानंतर तक्कारिय दक्षिण दाराजवळ गेला. तेथे पिंगळलाच यज्ञाचा बळी देण्याच्या पद्धतीप्रमाणे सजवून बांधून आणले होते. त्याला दक्षिण दाराकडे जेथे खड्डा खणला होता. तेथे नेण्यात आले तेथे गुरू व शिष्य दोघेही पोहोचले. त्यावेळेस पिंगळ छाती बडवून घेत रडत रडत आपल्या शिष्याला म्हणाला–अरे, कोण्या दुसऱ्याकरिता खणलेल्या खड्ड्यात मलाच पुरण्यात येत आहे!"

"गुरूदेव, जो मनुष्य वाईट नेहमी चिंतितो त्याला केव्हां तरी असेच स्वतः खणलेल्या खड्ड्यात मरावे लागते. तेव्हां आपण काळजी करू नये. मी राजाकडे जाऊन असे सांगून येईन की, मध्यरात्रीपर्यंत कोणताही चांगला मुहूर्त नाही. त्यानंतर तुमचे प्राण कोणती तरी युक्ती करून वाचवीन तक्कारियने गुरूला सांगितले.

त्याने सांगितल्या प्रमाणे बळी देण्याकरिता अर्ध्यारात्रीनंतरचा मुहूर्त ठेवला आणि त्याच रात्री पिंगळला देश सोडून दूर निघून जाण्यासाठी ही सांगितले. त्याचप्रमाणे पिंगळ तो देश सोडून अर्ध्यारात्री निघून गेला. त्याच्या जागी एका मेलेल्या बकरीला पुरून टाकले व सकाळ व्हायच्या आत तेथे नवीन दाराची स्थापना करण्यात आली.





## राज्याची हाव

जलालुद्दीन खिलजी नावाच्या सेनापतीने दिल्लीची गादी बळकावली त्याच सुमारास गुलाम वंशाच्या सुलतानांची कारकीर्द पण संपली. तेव्हां जलालुद्दीन सत्तर वर्षाचा होता. ही चुकीची अफवा आहे की, बल्बनचा नातु कैकोबाद ह्याचा खून ह्यानेच करविला होता. जलालुद्दीन १२९० साली गादीवर बसला.

त्याला दोन मुलगे होते. तरी त्याचे त्याचा भाचा अल्लाउद्दीन ह्याच्यावर खूप प्रेम होते. त्याने आपल्या मुलीबरोबर भाच्याचा विवाह करून दिला. व त्याला आपला जांवई केले. त्याला आपल्या कारा प्रदेशाचा एक शासक म्हणून सुभेदार पदावर नेमले. अल्लाउद्दीन सुलतानाच्यावर खूप प्रेम व श्रद्धा असल्याचे नाटक करीत असे.





अल्लाउद्दीनला राज्याची खूप हाव होती. त्याने सुलतान जलालुद्दीनला विचारल्याशिवायच संपन्न असलेल्या देवगिरी राज्यावर चाल केली. (ह्यानंतर हा किल्ला दौलताबाद नावाने ओळखला जाऊ लागला.) देवगिरीचा राजा रामदेव ह्याने आपला पराजय मान्य करून अल्लाउद्दीनला खूप सोने मौल्यवान मोती व रत्ने देऊन त्याच



आपल्या परवानगीशिवाय अल्लाउद्दीनने केलेला हल्ला जलालुद्दीनला अजिबात आवडला नाही. त्याला खूप वाईट वाटले व संताप आला पण चलाख अल्लाउद्दीनने त्याला मिळालेल्या संपत्तीची सर्व माहिती सुलतानाला सांगून टाकली त्यावर म्हाताऱ्या सुलतानाचा राग शांत झाला. ती संपत्ती सर्व आपल्या खजिन्यात आणण्याच्या विचारात तो गुंग झाला.

अल्लाउद्दीनने जी संपत्ती आणली होती, ती आणण्याकरिता जलालुद्दीन काराला जावयास निघाला. तो जेव्हां नदीतुन नावेने जावयास निघाला तेव्हां त्याची फौज नदीच्या दोन्ही बाजूनी त्याच्या बरोबर होती. मंत्र्याने त्याला सुचविले की, अल्लाउद्दीन जर चालून आला तर त्याच्या बरोबर सैन्य असावे, परंतु जलालुद्दीनने त्याचे काही ऐकले नाही.






जलालुद्दीन जेव्हां काराला पोहोचला, तेव्हां अल्लाउद्दीन कडून पाठवलेला गुप्तहेर सुलतानाला भेटला. आणि म्हणाला–"जहांपनाह, अल्लाउद्दीन घाबरला आहे की, आपण त्याच्यावर खूप रागावला आहात आणि सैन्यानिशि त्याच्यावर चालून येत आहात आत्महत्ये शिवाय दुसरा उपाय नाही असा विचार करीत आहे. आपण एकटेच भेटायला गेलात तर त्याला त्याचे प्राण परत मिळाल्यासारखे वाटेल."

त्यावर सर्व सैन्य नदीकिनाऱ्यावरच थांबवून थोड्याश्या अंगरक्षकांसमवेत तो सुलतानाला भेटावयास निघाला. तेव्हां अल्लाउद्दीनचा एक भाऊ म्हणाला–"सुलतान,आपल्याला इतक्या अंगरक्षकांच्या बरोबर आलेले पाहूनच अल्लाउद्दीन थरथर कांपत आहे." त्यावर सुलतानाने त्या अंगरक्षकांना सुद्धा परत जाण्याचा आदेश दिला.





त्यानंतर म्हातारा सुलतान अल्लाउद्दीनच्या भावसोबत नदीपार करून त्याला भेटायला गेला. तेथे असलेले सैन्य पाहून त्याला खूप आश्चर्य वाटले. अल्लाउद्दीनच्या भावाने सुलतानाला सांगितले हे सर्व आपल्या सलामीसाठी उभे आहे." अल्लाउद्दीच्या भावाने त्यांना बसायला एक उंच आसन दाखविले.

थोड्यावेळाने अल्लाउद्दीन आला. त्याने सुलतानाच्या पायावर डोके ठेऊन नमस्कार केला. सुलतानाने मोठ्या प्रेमाने त्याच्या डोक्यावरुन हात फिरवला. तीच संधी साधून दुसऱ्याक्षणी त्याने आपल्या बलिष्ठ हाताने त्याचे दोन्ही पाय घट्ट धरले. तेवढ्यात त्याच्या शिपायानी सुलतानाच्या पोटात सुरा खुपसला व त्याला ठार केले.





त्यानंतर अल्लाउद्दीनने जलालुद्दीनच्या मुलांना व त्याच्या प्रिय मित्रांना एक एक करून ठार केले. आणि १२९६ मध्ये दिल्लीच्या गादीवर बसला. नंतर आपल्या देशावर आक्रमण करावयास जे मंगोलियन आले त्याने पिटाळून लावले. व आपल्या राज्याचा विस्तार वाढविला. ह्यापूर्वी दिल्लीवर जेवढे म्हणून सुलतान राज्य करून गेले त्यात अल्लाउद्दीन सारखा बलवान कोणी नव्हता.

अल्लाउद्दीन आपल्या सर्व दरबारी लोकांवर शंका करीत असे. एकदा तो आपल्या सल्लागारां समवेत दारू पीत बसला होता अर्धीरात्र उलटली एका प्रमुख अधिकाऱ्याने सुचविले की आता येथे जास्तवेळ थांबणे इष्ट होणार नाही. येथून गेलेले बरे अल्लाउद्दीनने विचार केला की, ह्यापाठीमागे काही-तरी गुपीत आहे त्याने अधिकाऱ्यासकट सर्व लोकांना मारून टाकले.







दुसऱ्या दिवशी सकाळी जेव्हां त्याची निशा उतरली तेव्हां त्याला खूप वाईट वाटले त्याची चूक लक्षात आली ह्यानंतर त्याने सर्व दारूचे गुत्ते बंद करून टाकविले व दारुबंदी जारी केली. सैन्यानीशी सर्व दारूच्या गुत्यावर हल्ला केला. त्यानर आग लावून ते

# भोजन भट्ट

एका जमिनदाराने आपल्या आईच्या श्राद्ध समयी एक मोठे संतर्पण करायचे ठरविले आणि दवंडी पिटविली की सर्वांनी त्या प्रसंगी जेवायला हजर रहावे. त्या प्रमाणे लोक आले ही पुष्कळच.

वाढपी जेवायला वाढीत असतां तेथे दांडकी घेऊन जमिनदाराचे नोकर आले आणि म्हणाले–"कोणी पानावर वाढलेला पदार्थ पुन्हा वाढा म्हणून म्हणतां कामा नये. तसं कोणी मागेल त्याला प्रत्येकी वीस फटके द्यावेत अशी जमिनदार साहेबांची आज्ञा आहे."

वरण, भाजी, आमटी, खीर वगैरे पदार्थांपैकी एखादा पदार्थ कितीं आवडला तरी दांडक्याच्या भीतीने कोणीही कोणताही पदार्थ वाढा म्हणून वाढप्याला म्हटलं नाही. तरी जेवणारात रामभट नावाचे एक भटजी होते. त्यांनी विचार केला, पुढे काय होईल ते होवो, समोर वाढलेला पदार्थ आवडला तर मागून खाऊन घ्यावा. म्हणून रामभटाने खीर वाढणाऱ्या वाढप्याला आणखी खीर वाढायला मागितले.

वाढपी काही बोलला नाही व त्याने रामभटाला खीर वाढली. जेवण झाल्यावर नोकरांनी त्याला जमिनदारासमोर उभे केले आणि त्यांनी पुन्हा खीर मागितल्याचे सांगितले.

जमिनदाराला परमानंद झाला. तो रामभटाला म्हणाला–"गुरुजी, एका वर्षापूर्वी आमच्या मातोश्री काशी यात्रेला गेल्या होत्या. त्या गंगेत स्नानाला उतरल्या व नदीच्या ओघात वाहून गेल्या आणि दूर निर्जन स्थानी कोठेतरी किनाऱ्याला लागल्या. त्या उपाशी तडफडून जागच्या जागी स्वर्गवासी झाल्या त्यांच्या आत्म्याला शांती मिळावी यासाठी एखाद्या भोजनभट्टाला पोट-भर जेवायला वाढा असे आमच्या गुरुजींनी सांगितलं होतं. तसे भोजनभट्ट तुम्ही लाभलात !"





# नशीब बलवत्तर

रामपूर नावाच्या गावाच्या वेशीवर एक फार जुनाट व पडके अंबिकेचे देऊळ होते. देवीच्या देवळात कित्येक वर्षं कोणी पुजेला किंवा दर्शनाला सुद्धा गेला नसल्याने देवळाच्या गर्भगृहातला भाग केरकचऱ्याने व कोळिष्टकांनी घाण झाला होता. देवीच्या मूर्तीवर भिंतीवर आणि फर्शीवर धूळ सांचली होती. देवळाच्या छपरावर गवत रानटी झाडे उगवली होती. जवळपासचा भाग निर्मनुष्य होता.

महादेव भटजी ज्या गावात रहात त्या गावकऱ्यांशी नित्य भांडणं होत, म्हणून आपल गाव सोडून बायको व दोघां लहान मुलांबरोबर उपजीविकेच्या शोधार्थ महादेव भटजी रामपूरच्या वेशीवर आले. त्यांना अंबिकेचं जुनाट व पडके देऊळ दिसलं.

ते देऊळ पाहतांच महादेव भटजींच्या मनात एक कल्पना आली. ते बायकोला म्हणाले—"पाहिलेस का ग, कोणत्यातरी देवीला वाळीत टाकून दिल्यासारखे दिसते आहे, या गावांतले लोक इकडे फिरकत सुद्धा नाहीत. आपण हे देऊळ स्वच्छ झाडून काढू या आणि या देवळातच कायम राहू या. देवीचा अनुग्रह आपल्यावर झाल्याशिवाय राहणार नाही!"

महादेव भटजींच्या बायकोने त्या गोष्टीस आनंदाने होकार दिला. महादेव भटजींनी बायको व मुलांची मदत घेऊन एक आठवडाभर विश्रांती घेतल्याशिवाय देऊळ स्वच्छ झाडून पुसून काढले. नंतर देवीला नवी वस्त्रे परिधान करविली व जमली तेवढी आभूषणे घालून तिला सजविले. नंतर एके दिवशी गंजून गेलेली घंटा घासून पुसून खूप जोराने बराच वेळ वाजविली.

अंबिकेच्या देवळात एक पुजारी येऊन राहू लागला आहे व देऊळ स्वच्छ झाले आहे हे कळल्यावर गावकरी व भक्तमंडळी देवीच्या दर्शनाला येऊ लागली. देवीसमोर नारळ व फळफळावळ आणि तांदूळ वगैरे आणून ठेवू लागली. काही लोक पैसेसुद्धा देवीसमोर ठेवीत. महादेव भटजींची उपजीविका यामुळे चांगली चालू लागली.

चारपांच महिने लोटले. सुरवातीला नाविन्य म्हणून येऊ लागलेल्या भक्तांची संख्या कमी होऊ लागली. महादेवभटजींची पुन्हा उपासमार होऊ लागली. ते एके दिवशी रात्री बायकोला म्हणाले—"आपण रामपूर सोडून दुसऱ्या एखाद्या गावी जाऊ या का?" नंतर रात्री बोलतां बोलतां नवराबायको झोपी गेली.



रात्री महादेवभटजींना देवीने स्वप्नात दर्शन दिले. भटजी गुडघे टेकून देवीला नमस्कार करून म्हणाले—"माते! माझ्या हातून काही अपराध घडला असेल तर क्षमा कर! मी आपल्या पोटा पाण्यासाठीच का होईना, मी तुझ्या या पडक्या देवळाचा मला करतां आला तेवढा जीर्णोद्धार केला. परंतु आतां पुन्हां आमची उपास मार होऊ लागली आहे. म्हणून हे गाव सोडून जाण्याचा विचारात आम्ही आहो! तुला ते मान्य नसेल तर मी येथेच राहीन!"

ते ऐकून देवी मदहास्य करून म्हणाली—"तू माझ्या देवळाला इतके चांगले रूप आणून दिलेस याबद्दल मला किती आनंद होत आहे. मी तुझ्यावर अनुग्रह करण्यासाठीच तर आले आहे. हे देऊळ उद्यां सूर्योदयाच्या सुमारास ढासळून खाली पडेल. तू लगेच माझ्या मूर्तीच्या पायांखाली खणून पहा, हे देवालय चांगल्या स्थितीत असतांना माझ्या अंगावर जे दागदागिने होते ते पुरून ठेवलेले आहेत, ते घेऊन तू आणखी कोठेतरी निघून जा आणि सुखाने पुढील आयुष्य घालव." असे सांगून देवी अंतर्धान पावली.

महादेव भटजींची झोप मोडली. त्यांनी बायकोला उठवून त्यांना पडलेले स्वप्न बायकोला सांगितले. दोघांनी मूर्तीच्या

सौ. ग. स. सर्वटे

पायांखाली खणून पाहिले तेव्हां अंबिका मातेने सांगितल्याप्रमाणे पुष्कळ दागदागिने सापडले. त्यांनी त्यांचे एक बोचके छान बांधून घेतले व दोघां मुलांनाबरोबर घेऊन बाहेर पडले. त्याच वेळी सूर्योदय होत होता.

इतक्यात तेथे तीन चोर समोरून येतांना त्यांना दिसले. त्यांनी महादेव भटजींना सुरा दाखविला व म्हणाले–"तुझ्या हातातले ते बोचकं व इतर भांडीकुंडी मुकाट्याने मला दे!"

किती दिवसांनी देवीचा अनुग्रह झाला आणि देवीने दिलेली भेट शेवटी चोरांच्या हातात जात असलेली पाहून महादेव भटजींना फार फार वाईट वाटले. आपल्या नशिबांत सुख नाही असे मनाचे सांत्वन करून घेऊन दागिन्यांचे गाठोडे ते चोरांना देऊ लागले तेवढ्यात त्यांच्या बायकोने ते बोचके ओढून घेतले व देवळात फेकून दिले. त्या सरशी बोचके सुटले व फाटले व सर्व दागिने जमिनीवर पसरले. खाली पसरलेले सोने चकाकत होते.

ते दागिने पाहून चोरांचे डोळे आनंदाने त्यांवरच खिळले. एका उडीत ते देवळात गेले.. त्या वेळीच सूर्याची किरणे देवळावर पडू लागली होती. दुसऱ्या क्षणाला देऊळ मोठा आवाज करून कोसळले. तिथे चोर दगडाखाली चेंगरून मेले.

महादेव भटजी अंबिका मातेचा तो महिमा पाहून आश्चर्यचकित झाले. त्यांनी दगड बाजूला सारले आणि देवीचे सर्व दागिने एका फडक्यात बांधून बायकोच्या हातात देत म्हणाले–"त्या देवीच्या प्रेरणेनेच तुला ते दागिने देवळात फेकून द्यायची बुद्धी झाली? नाहीतर देवीची ही देणगी पुन्हा प्राप्त नसती झाली."

नंतर महादेव भटजींनी व त्यांच्या बायकोने अंबिकेला श्रद्धा भक्तिपूर्वक नमस्कार केला व दोघे मुलांना घेऊन दुसऱ्या गावी निघून गेली.





# धुतांचा लपंडाव

**जं**गलाला लागून शृंगपूर नावाचे एक छोटेसे गाव होते. लखुजी हा तिथला राहणारा एक शेतकरी होता. एके काळी लखुजीचे पूर्वज चांगले श्रीमंत होते. परंतु शेतकीत जात प्राप्ती नाही असे पाहून लखुजीच्या वडिलांनी व्यापार वृत्ती घेतली. परंतु त्यांतही पुष्कळ नुकसान सोसावे लागल्याने मरण समयी मुलाला मागे फक्त एक एकर जमीन तेवढी मिळाली.

वडील वारल्यावर थोड्याच दिवसांनी त्याची आईसुद्धा निवर्तली. तेव्हां लखुजीचा सर्व भार त्याच्या आजीने स्वत:वर घेतला. आजीने शेतात चांगली मेहनत केल्यास चांगले पीक निघेल सांगितले. परंतु लखुजी तिकडे लक्षच दिले नाही. उलट तो उडाणटप्पूपणाच जास्त करू लागला.

त्याच्या आजीला वाटले की या मुलाचे लग्न करून द्यावे, म्हणजे हा सरळ मार्गावर येईल. म्हणून ती योग्य स्थळाची चवकशी करू लागली. ते कळतांच लखुजीच्या डोक्यात एक विचार आला.

लखुजीच्या घरा शेजारी रामजी पाटील नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याची मुलगी जानकी लखुजीबरोबर शाळेत शिकत असे. तिची आई वारली होती, म्हणून घरकामाची जबाबदारी जानकीवरच येऊन पडली होती. ती घरकामात फार हुशार निघाली. लखुजीने, लग्न करायचे तर तिच्याशीच, असे मनाशी ठरविले.

नंतर लखुजी रामजी पाटलाकडे गेला त्याने रामजीच्या मुलीला मागणी घातली. तेव्हां रामजी त्याच्यावर रागावला व म्हणाला–"तुझ्यासारख्या आळशी उडाणटप्पूला आपली मुलगी कोण देईल रे? बापाने जी जमीन मागे तुझ्यासाठी ठेवली आहे, ती सांभाळ म्हणजे पुरे!"

श्री शा. ना. गिरासे

सैपाकघरात काम करताना बाप लखु-जीला म्हणाला ते जानकीने सर्व ऐकले. लखुजी घरीं आला, पण त्याला झोप आली नाही. त्याला आयुष्याचा वीट आला आणि जंगलात जाऊन कोणत्यातरी हिंस्र प्राण्याच्या तोंडी स्वतःला देऊन त्याने आत्महत्या करण्याचे ठरविले. तो घरून निघाला तो सरळ जंगलात गेला.

काळोखात तो बराच खोल जंगलात गेला. परंतु त्याला कोठे वाघ, सिंह, लांडगा किंवा साधा कोल्हासुद्धा दिसला नाही. परंतु एका झाडीत कोणीतरी लपंडाव खेळत असल्यासारखं दिसलं. लखुजीचे पायच गारठले. तरी धीर करून तो एका झाडाआड जाऊन उभा राहिला.

एक भयंकर आकृतीची भुतीण आपल्या भूत मुलाचे डोळे बंद करून मोठ्याने ओरडली "सुट्टचो!" भुतिणीने आपल्या मुलाच्या डोळ्यावरचे हात काढून घेतले व तो इतर मुलांना हुडकू लागला.

तो झाडाआडून लपत मुलांना शोधत लखुजी उभा होता तेथे आला. लखुजीला पाहून तो ओरडला.

लगेच लपलेली भुतांची पोरे धावत आली आणि त्यांनी लखुजीला धरले. लखुजी इतका घाबरला की बेशुद्ध होऊन आपण पडतो की काय असे त्याला वाटले.

भुतिणीने लखुजीकडे आश्चर्यचकित होऊन पाहिले आणि मुलांना दूर जाऊन खेळायला सांगितले. नंतर लखुजीला



म्हणाली—"ही रात्रीची वेळ अशा वेळी जंगलात पाऊल टाकायची हिंमत तुला कशी काय झाली? तू खरे काय ते बोल-लास तर मी तुला सोडीन, खोटे बोललास तर आयुष्यभर माझी मुलं गाढवासारखी तुला वागवितील.

भुतीण म्हणाली ते ऐकून लखुजीची हिंमत वाढली. त्याने तिला तो किती गरीब आहे हे सांगितले आणि हेसुद्धा सांगितले की जानकीला तो मागणी घालायला तिच्या बापाकडे गेला तेव्हां तिच्या बापाने त्याचा अपमान कसा केला, पुढे आपली गरीबीमुळे कशी कुचंबणा होते आहे हे सांगून म्हणाला—"जर मी श्रीमंत असतो तर रामनाथने माझा अपमान करण्याचं धाडस केलं असतं का? जानकीशी माझं लग्न होणे शक्यच नसेल तर मी जगलो काय आणि मेलो काय, एकच! मी जिवाची आशा सोडूनच जंगलात आलो आहे!"

"अस्सं! असं आहे होय? तू कोणाच्या तोंडी सांगून पाठविले असतेस तर मी तुझ्याकडे हंडे भरभरून सोने नसते का पाठविले?" असे म्हणत भुतिणीने एका झाडाच्या ढोलीतून एक चामड्याची पिशवी काढली. त्या पिशवीत मुठी भरभरून मोहरा भरल्या आणि ती पिशवी लखुजीच्या हातात देत ती म्हणाली—"तू खरं बोलत आहेस असे मी मानते. तू हे सोने घेऊन जाऊन तुला पसंत पडलेल्या मुलीशी खुशाल लग्न करून घे!"





लखुजीने वांकून भुतिणीला नमस्कार केला आणि आपल्या घराच्या वाटेने निघाला. तो आपल्या गावी पोचला तेव्हां चांगले उजाडले होते.

लखुजी सरळ रामजीच्या घरी गेला आणि चामड्याची पिशवी त्याला दाखवून म्हणाला–"तुम्ही माझ्या आळशीपणाची चेष्टा केली होतीत. हे घ्या, पिशवी भरून सोने घेऊन आलो आहे. तुम्ही पिशवी उघडून पाहिलीत तर डोळे दिपून जातील. मला वाटते की जानकीबरोबर माझे लग्न करून द्यायला तुम्हांला हरकत नसावी."

रामजीने थक्क होऊन चामड्याची पिशवी उघडून पाहिली. त्या पाठोपाठ 'भुस्स' असा आवाज करून पिशवीतील हवा बाहेर निघून गेली आणि पिशवी रिकामी झाली.

"पाहिलंस, या पिशवीत वाऱ्याशिवाय काही नाही." असे म्हणत रामजीने पिशवी दूर फेकून दिली.

लखुजी आश्चर्यचकित झाला. त्याने पिशवीत हात घालून पाहिले. आत सोन्याची नाणी नव्हती. "ही जादूच दिसत आहे. या पिशवीत त्या भुतिणीने मोहरा भरलेल्या मी स्वतः डोळ्यांनी पाहिल्या होत्या." असे तो रडक्या आवाजात म्हणाला.

"अरे, शहाण्या! खोटंच बोलायचं झालं तरी ते विश्वास करण्यालायक तरी हवं. चालता हो, मला पुष्कळ कामे आहेत." रामजी रागाने म्हणाला.

जानकी दाराच्या आड उभी राहून सर्व पहात व ऐकत होती. लखुजी डोके खाजवीत म्हणाला–"भुतीण झाली म्हणून अशी फसवेगिरी! आजच रात्री जातो तिचा समाचार घ्यायला. तिच्या झिज्या धरून तिला बदडून काढतो." असे म्हणत तो आपल्या घरी निघून गेला.

त्या दिवशी रात्री लखुजीने जंगलात जाऊन पाहिले भुते कालच्यासारखी लपंडाव खेळत होती. लखुजी भुतिणीजवळ गेला व दरडावून तिला म्हणाला–"तू तर पक्की लबाड आहेस की ग! सोने सांगून पिशवीत वारा भरून दिला होतास का?"

भुतीण आपलं हसू आवरून म्हणाली–"तुला लपंडावाचा खेळ येतो का? एकाचे डोळे बंद करून ते उघडण्यापूर्वी इतरांनी समोरून नाहीसे व्हायचे असते. मी तुझ्याशी लपंडाव खेळले होते. तू निराश होऊन आत्महत्या करायला निघाला होतास. तुझा तो उत्साह कमी करण्यासाठी मी तुला हे लुटुपुटूचं सोनं दिलं होतं. माणूस आत्महत्या करून स्वतःचं आयुष्य घालवून बसतो. आमच्या सारखी भुतं होऊन राहण्याशिवाय त्याला काही साध्य होत नाही. आता घरी जाऊन अल्पशा जमिनीत मेहनत करून पीक काढ. थोडी जमीन खंडाने कर. शेतीच्या धंद्यात फायद्याच फायदा असतो. कोणतीही स्त्री नवऱ्याला फुकटचा तुकडा मोडू देत नाही. मेहनत करणाऱ्या नवऱ्याबद्दलच तिच्या मनांत आदर असतो. आळशी नवरा असेल तर त्याला बायकोकडून कधीच मान मिळणार नाही."

भुतिणीने जणू त्याच्या थोबाडीतच मारल्यासारखे लखुजीला वाटले. त्याला त्याच्या आळशीपणाबद्दल व उडाणटप्पूपणाबद्दल लाज वाटली. त्याच्या मनात ज्ञानोदय करणाऱ्या भुतिणीला तो नमस्कार करायला निघाला. पण ती तेथे होती कोठे?

लखुजी तेथून घरी आला तेव्हां जानकीने दार उघडून त्याला विचारले–"ओहो, तू पैशांची भीक मागायला या मध्य रात्रीच्या वेळी भुतांकडे गेला होतास का?"

लखुजी दचकला. म्हणाला–"हे सर्व माझ्या पूर्व आयुष्यात होत होते. आजपासून मी मेहनत करून शेतातून पीक काढायचे ठरविले आहे."

जानकी काही म्हणणार, त्याच वेळी रामजी पाटील घरातून बाहेर आला आणि म्हणाला–"अरे वेड्या, तुला ही अक्कल या पूर्वीच आली असती तर मी स्वतःच तुझ्या आजीला भेटून माझ्या मुलीला पदरात घ्यायला विनंती केली नसती का?"

रामजी म्हणाला ते ऐकून लखुजीबरोबर जानकीलासुद्धा फार आनंद झाला.





# बिनव्याजी कर्ज

धर्मपूर येथे सोनूशेट नावाचा सावकार होता. तो गरजूंना कर्ज देऊन त्यांच्या-कडून व्याज वसूल करी. त्याला आस-पासच्या पांच पंचवीस गावातील लोक ओळखत. तो व्याज जरा जास्तच घेई. कर्जदाराला पिळून काढी म्हणून अनेक कुटुंबे धुळीला मिळाली.

एकदा लोकनाथ नावाचा एक माणूस सोनूशेटकडे कर्ज मागायला आला. त्याला त्याच्या मुलीच्या लग्नासाठी एक हजार रुपये कर्जाऊ हवे होते. लोकनाथ धर्मपूर-चाच राहणारा होता. म्हणून सोनूशेटला त्याच्या जमीनजुमल्याविषयी चांगली माहिती होती.

सोनूशेट म्हणाला–"लोकनाथ, तुझ्या जवळ तू राहतोस त्या झोपडीशिवाय काय आहे रे? तू एक हजार मागतो आहेस. मूळ तर सोडूनच दे; व्याजसुद्धा फेडायची तुझ्या अंगात शक्ती नाही. तुझ्या खोपटाची किंमत शे दोनशेच्या वर येणार नाही! म्हणून तू माझ्याकडे कधी तोंड वेंगाडायला येऊ नकोस.'

कर्ज तर दिलेच नाही, पण सोनूशेटने आपल्या झोपडीचा उद्धार करून आपला अपमान केल्याबद्दल लोकनाथला फार वाईट वाटले. तो घरी परत जात असतां वाटेत गावचे पाटील भेटले.

लोकनाथने पाटीलसाहेबांना त्याच्यावर आलेला प्रसंग आणि सोनूशेटने दिलेले उत्तर सांगितले. पाटील स्वभावाने चांगला होता. गांवकऱ्यांना काही मदत करता आली तर करीत असे. त्याने खूप विचार करून लोकनाथला एक उपाय सुचविला आणि म्हणाला–"जर का माझा प्रयत्न यशस्वी झाला तर अनेकांचा फायदाच होईल. नुकसान कोणाचेच होणार नाही. सोनूशेट सावकाराला सुद्धा चांगला धडा मिळेल."

एका आठवड्यानंतर लोकनाथला पुन्हा आलेला पाहून सोनूशेट कपाळाला आठ्या पडलेल्या स्थितीत काही बोलणार इतक्यात लोकनाथ म्हणाला–"मी आपल्या मुलीच्या लग्नाविषयी तुमच्याशी बोलायला किंवा त्या करिता कर्ज मागायला आलो नाही. पाटील साहेब मला म्हणाले की दरबारात त्यांचा कोणी मित्र आहे, त्याला दोन हजार रुपये दिले तर तो माझ्या मुलाला सरकारी नौकरी मिळवून देईल व चांगला सहाशे रुपये पगार मिळेल. तुम्ही मागाल ते व्याज मी द्यायला तयार आहे. तेवढे दोन हजार रुपये दिलेत मोठी कृपा होईल. सोनूशेट आश्चर्यचकित होऊन दोन मिनिटे काहीच बोलला नाही. नंतर लोकनाथला पुन्हां चार शिव्या हासडून माघारी पाठविले व तासाभराने पाटलाकडे स्वत:च पाटील-साहेबांना भेटायला गेला, म्हणाला–"पाटीलसाहेब, मला नुकतेच कळले की दरबारात तुमचा कोणी मित्र मोठ्या हुद्द्यावर आहे. तुम्हांला माहीतच आहे की सावकारीच्या धंद्यात बरीच देवघेव होते. म्हणून वाटले की दरबारच्या नोकरीत आपला कोणी असला तर बरं. मी दोन हजार रुपये देतो. ही रक्कम बक्षिस समजा माझ्या मुलाला या चिकटवून कोठे तरी!" असे म्हणत सोनूशेटनी दोन हजार रुपयांची थैली पाटलां समोर ठेवली.

पाटलांनी ऐटीत मान हलवीत थैली उचलली व म्हणाले–"ठीक, पाहातो प्रयत्न



करून, परंतु काम होईल की नाही हे ठरायला चारसहा महिने, वर्षसुद्धा लागेल!"

"ते मी तुमच्यावर सोडतों." असे सांगून सोनूशेट घरी निघून गेले.

पाटलांनी दुसऱ्याच दिवशी लोकनाथला एक हजार रुपये दिले व उरलेले एक हजार आणखी एका शेतकऱ्याला कमी व्याजाने दिले. त्याला बैलजोडी घ्यायला ती रक्कम हवी होती.

त्यानंतर सोनूशेट अनेकदां पाटलाच्या घरी गेले आणि दरखेपेस पाटलाला आठवण करून देत की त्याच्या मुलाला नोकरीवर लावून द्यावे. प्रत्येक वेळी पाटील सोनूशेटला सांगत की त्यांचा मित्र प्रयत्न करीत आहे व प्रयत्नांला यश मिळाण्याची शक्यता आहे. थोडा वेळ लागणार.

एक वर्ष लोटले पाटलांकडून ज्या शेतकऱ्याने एक हजाराचे कर्ज मागून नेले होते, त्याने कर्ज फेड करीत म्हटले–"पाटील साहेब, संकट समयीं तुम्ही मदत केलीत व ऐन वेळेला बैल विकत घेणे मला शक्य झाले. या वेळी चांगलं पीक निघालं. तुम्ही जे हजार रुपये दिलेत त्याचे व्याज व थोडे पैसे जास्त जोडून मी दोन हजार परत करीत आहे."

त्यानंतर दुसऱ्याच दिवशी पाटलांनी सोमूशेटला बोलावून दोन हजार रुपये परत दिले व म्हणाले–"माझ्या मित्राने खूप प्रयत्न केला. परंतु काम होऊ शकले नाही. त्याने हे पैसे परत आणून दिले."

सोनूशेटला पाटलांवर संशय आला. या या गृहस्थाने दोन हजार रुपयं बिन व्याजी वापरलेच आणि कोणाला कर्जाऊ देऊन व्याज फुकटाचं खाल्लं तर नाही?

सोनूशेटला घरच्या वाटेवर लोकनाथ भेटला. त्याला सोनूशेट म्हणाले–"मी आजपर्यंत पाटलाला एक थोर उदार माणूस मानत आलो. पण वर्षभर त्या गृहस्थाने माझे दोन हजार रुपये कोणाला तरी देऊन फुकटाचे व्याज खाल्लं की!"

लोकनाथ काही उत्तर न देतां नुसते स्मित करून पुढे निघून गेला.






गजानन पंडिताच्या घरी कामधेनूसारखी एक दुभती गाय होती. नंद नावाचा एक माणूस त्या गाईला चारा पाणी घालून तिचे दूध काढी व गजानन पंडिताला निर्भेळ दाट दूध आणून देई. स्वरकेसरीने नंदला लोभ देऊन त्याने काय करावयाचे ते त्याला चांगले पढवून ठेवले.

गणपतीचतूर्थी पासून अनंतचतूर्दशी पर्यंतचा गणेशोत्सव सुरु झाला. त्या उत्सवाला मुलगी, जांवई व नातूगणेश भट्ट सर्वांना घेऊन जवळच्या कल्याणी नगरी घेऊन यायला गजाननाची बायको गेली होती. त्यांना यायला उशीर झाला.

गजानन पंडितांचे गायन ऐकण्यासाठी व भक्तिरस पान करण्यासाठी दूरदुरून रसिक श्रोते वातापी नगरी येऊ लागले होते. त्या दिवशीच उत्सव प्रारंभ होणार होता. गजानन पंडितांचं गायन गणपती चतुर्थीला सुरु होणार होते.

नंदने स्वरकेसरीने सांगितल्याप्रमाणे पेल्यातल्या पाण्यात ताजे आणलेले दूध ओतून तो गजानन पंडिताला दिला.

गजानन पंडिताने पेल्यातले पाणी मिसळलेले दूध पाहिले व आश्चर्यचकित होऊन विचारले–"नंदा, हे काय रे? आज पर्यंत तू दुधात कधी पाणी घातले नाहीस."
गजानन पंडिताने विचारतांच नंद ओरडून म्हणाला–"तो गणपती साक्षी आहे. मी दुधात पाणी घालून आणले नाही. मी शपथ घेऊन सांगतो."

२०. गजानन पंडिताची कथा



गजानन पंडिताशी नम्रपणे बोलणारा वागणारा नंद त्या दिवशी असा निर्भयपणे ओरडत असलेला पाहून त्या वाटेने जाणारे लोक थक्क होऊन जागच्या जागी थबकले. त्याच वाटेने स्वरकेसरी जात होता. तो थोडा दूर उभा राहिला आणि मनात गुदगुल्या झाल्यासारखा पाहू लागला.

गजानन पंडिताने थोडयाशा रागानेच डोळे वटारून नंदाला विचारले–"तू शपथ घ्यायलाही तयार झालास काय? घे तरी कोणाची शपथ घेतोस ते? पाहू दे तरी!"

शपथच घ्यावी लागणार हे कळतांच नंदा मागेपुढे करू लागलेला पाहून गजानन पंडिताने दरडावून विचारले–"असं काय पहातो आहेस? शपथ कां नाही घेत?" नंदा घाबरल्यासारखा झाला.

दूर उभा असलेला स्वरकेसरी शिष्टा-सारखा पुढे येऊन म्हणाला–"तोंडातून निघाल्या बरोबर एवढा राग काढतां का त्याच्यावर? घे रे शपथ सांगितलेले सरळ बोल, समोरचा दिवा विझवून घे शपथ! भिण्याच कारण काय?" असे म्हणत त्याची समजूत घालीत असल्याचे त्याने सोंग केले.

नंदा स्वत:ला सावरण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत धीर करून समोरच्या खोलीत सोन्याच्या गणेशमूर्तीसमोर जळत असलेल्या दिव्या समोर जाऊन उभा राहिला कांपऱ्या आवाजात म्हणाला–"मी जर दुधात पाणी घालून आणलं असेल तर माझे दोन्ही हात गळून पडू देत, नाही तर तसं म्हटलं असेल तर माझा गळा पडू दे!" असे म्हणत त्याने दिवा विझविला आणि डोळे घट्ट बंद करून घेतले.

गजानन पंडित थक्क होऊन पहात राहला. त्याचा कंठावरोध झाला. त्याच्या तोंडावाटे शब्दच फुटेचनात.

"ओ हो, येथवर गोष्ट आली होती वाटतं!" असं चार माणसं बोलत असतां स्वरकेसरी म्हणाला–"शपथ घे म्हणून म्हणायचं म्हणजे थट्टा का हो?" नंदाने स्वरकेसरीचा आवाज ओळखून डोळे उघडले



आणि आपले हात जागच्या जागी असल्याचे पाहून घाईघाईने स्वरकेसरी होते तिकडे धावला.

त्याच वेळी बालगणेश भट्ट धांवत तेथे आला व म्हणाला–"आजोबा, मी गाडीतून उतरून धावत पुढे आलो. आजी वगैरे गाडीतून येत आहेत." असे म्हणत त्याने आजोबांकडे पाहिले व निश्चेष्ट उभा राहिला. तेथे जमलेल्या लोकांनी सांगि-तलेले ऐकल्यावर ओठ घट्ट दाबून आणि कंबरेवर दोन्ही हात ठेवून ताठ उभा राहून म्हणाला–"नंदा, थांब!"

स्वरकेसरी बरोबर निघालेला नंदा मंत्रमुग्ध झाल्यासारखा जागच्या जागी थांबला आणि खोलीत दिवा अजून तसाच तेवत असलेला पाहून घाबरला.

बाल गणेशभट्ट म्हणाला–"तू दिवा चांगला मालवलेला नव्हतास असं वाटतं. म्हणून पुन्हा शपथ घे पाहू!"

"काही भ्यायचे कारण नाही, जा पुन्हा शपथ घे रे," नंदाच्या पाठीला खूण करून स्वरकेसरीने जायला सांगितले.

बाल गणेशभट्ट त्याला म्हणाला–"नंदा, मी म्हणतो ते बरोबर ऐक. तू असे म्हण. 'मी जर पाण्यात दूध घालून दिले असेल तर माझे दोन्ही हात गळून पडू देत!' असे म्हणून दिवा मालव."



नंदाला त्याच्या डोक्यावर घागरभर पाणी ओतल्यासारखं झालं. तो थरथर कांपत कांपऱ्या आवाजात म्हणाला–"दादा, मी नाही शपथ घेत! या स्वरकेसरींनी मला सांगितल्या सारखं मी पाण्यात दूध घालून आणलं होते. दुधात पाणी घालून आणलं नव्हतं अशी मी शपथ घेतली होती. माफ करा, मी चुकलो!" असे म्हणत घाईघाईने जाऊन चांगल्या दुधाचा तांब्या घेऊन आला व तो बाल गणेशभट्टच्या समोर ठेवून गुडघे टेकून उभा राहिला.

तेथे जमलेले सर्व लोक हसू लागलेले पाहून स्वरकेसरी सर्वांची नजर चुकवून तेथून निस-टला, कित्येक जण त्याच्या शोधार्थ धावले.



तेव्हां बाल गणेशभट्ट जमलेल्या सर्व लोकांकडे पाहून म्हणाला–"पाहिलांत! या शपथा घेणारे आणि घेवविणारे सर्व लबाड आहेत! शब्द बदलून सत्यावर पांघरूण घालणारे लबाड आहेत. भोळ्याभाळ्या लोकांना फसविणारे फसवे लोक आहेत!"

"होय रे बाबा! तू लहान आहेस, परंतु तू म्हणालास ते बरोबर आहे, सर्वांचे डोळे उघडले!" या शब्दात मुलाची प्रशंसा करीत आणि गजानन पंडिताचा अवरोधलेला कंठ मोकळा झाल्या बद्दल आनंद मानीत सर्व लोक तेथून निघून गेले.

गणेशभट्ट म्हणाला–"आजोबा! तुम्ही इतके मोठे आणि विद्वान आहांत; तरी भोळ्या भाबड्या लोकांसारखे या आणाश-पथांवर कसा काय हो विश्वास करतां? आश्चर्यच आहे बुवा!"

गजानन पंडिताने बाल गणेशभट्टला पोटाशी घट्ट आवळून धरले व म्हणाले–"होय, बाबा गणेशा!" असे म्हणत असतां रस्त्यावर गाडी येऊन थांबली.

गजानन पंडिताने डोळे उघडून पाहिले, पण बाल गणेश नव्हता. त्याच वेळी बाल गणेश गाडीतून उडी मारुन बाहेर येत असलेला दिसला.

गजानन पंडिताच्या चेहऱ्यावर आनंदा-बरोबर एक ज्योती झळकली. "गणेशा!" असे म्हणत अत्यंत आनंदाने आनंदभैरवीचे स्वर काढीत असल्यासारखे ओरडले.

गोष्ट संपवीत पावन मिश्र म्हणाले–"मुलांनो, तर आतां सांगा प्रथम बाल गणेश भट्ट म्हणून आला होता तो कोण रे? सांगा पाहू!" असे त्यांनी म्हणतांच मुले म्हणाली–"आणखी कोण? आपला गणपतीच, वातापी गणपतीच!" त्यांच्या स्वरांत मोठ्यांनी ही आपला स्वर मिळ-विला, पावन मिश्र पुन्हां सांगू लागले–

"आजोबा!" असे म्हणत गणेश भट्ट हात पुढे करून येत असतां–"गणेशा!" म्हणत गजानन भट्टने नातवाला उचलून घेतले व नातवाला म्हणाले–"गणेशा!



गणपतीने आमच्यावर अनुग्रह करून तुझे रूप घेऊन आला आणि आपले घर पवित्र केले. हे गजाननचे देऊळ आहे!" असे म्हणत साठी उलटलेल्या त्या म्हाताऱ्याने लहान मुलांसारख्या उड्या मारायला सुरवात केली आणि "तांडव नृत्य करीत गजानन धिमिकिट..." म्हणत आनंदभैरवी राग म्हणायला सुरवात केली. त्यांच्या त्या गायनाचा प्रतिध्वनी घंटेचा आवाज होतो तसा सर्व गावभर दुमदुमला.

गावभर पसरलेल्या त्या आनंदभैरवाच्या स्वरात मग्न होऊन स्वरकेसरी धावत येऊन गजानन पंडिताचे पाय धरून म्हणाला–"गुरुदेव! आपण क्षमा केली असे म्हणे पर्यंत पाय सोडणार नाही."

गजानन पंडिताने चट्दिशी खाली वाकून स्वरकेसरीला दोन्ही हात धरून उभे केले व म्हणाले–"स्वरकेसरी! आपण निमित्त मात्र असतो. ही सर्व त्या गणपतीची लीला आहे! तुम्ही संगीत शास्त्राचे मंथन केलेले आहे. मी भक्ति व प्रेम यांना महत्व देऊन भक्तिरसात निमग्न होऊन गाणे म्हटले तरच संगीत उच्च दशेला पोचले असें मानतो, एवढेच. आतां या पुढे सोन्याच्या गणेशमूर्ती सर्व तुम्च्याच. हे सर्व सत्कार मला नकोसे वाटू लागले आहेत, या पुढे मी संगीत सभांतून कधी गाणे म्हणणार नाही."



असे म्हणतांच बाल गणेश भट्ट म्हणाला–"आजोबा! तुम्ही घरात बसून स्वतःच्या हौसेखातर गाऊ लागलात तर ते नाही चालणार.

गजानन पंडिताने हात जोडून गणपतीचे नमन केले व म्हणाले–"हे विघ्नहर्त्या गणनायका! तू माझ्या नातवाच्या तोंडी जो उपदेश केलास. आजपर्यंत मी तुझ्या इच्छे-प्रमाणेच गायन करीत राहलो. यापुढे तुझे स्तवन करण्यासाठीच गायन करीन. एक-णाऱ्याच्या हृदयात तू वास कर. सत्कार समारंभांपासून मात्र मला वांचव."

तेव्हां स्वरकेसरी म्हणाला–"गुरुदेव! आपण रचिलेली भक्ति गीते आपण म्हणतां




त्या पद्धतीने गाणाऱ्या व्यक्तीसच सुवर्ण मूर्ती लाभेल. अशा तऱ्हेने तरी आमच्या हृदयात तुमच्या सारखीच भक्ति भावना उत्पन्न होवो असा आशीर्वाद द्यावा!" असे म्हणत स्वरकेसरीने ओंजळ पुढे केली.

गजानन पंडिताची षष्ठ्याब्दी पूर्ती झाली. त्या संदर्भात ते नकोनको म्हणत असतांही त्या दिवशी संध्याकाळी वातापि गणपतीच्या समोरच्या पटांगणात एक मोठी सभा झाली पुष्पमालांनी सजविलेल्या सभा पीठावर षष्ट्ब्दीपूर्ती उत्सव समारंभ थाटामाटाने पार पडला.

गजानन पंडित हात जोडून म्हणाले– "कित्येक थोर पुरुषांनी संगीत आणि कविता भक्तीलाच अर्पण केली आणि तोच सन्मार्ग म्हणून मानले. त्या सर्वांना मी नमन करतो. माझाही तसाच विश्वास आहे. त्याहून जास्त माझ्यात स्वतःचं विशेष असे काही नाही." असे सांगून अनेक राग गुंफून रागगुच्छ गणपतीचे कीर्तिगान करीत गजानन पंडिताने प्रस्तुत केले. ते गायन ऐकत असतां नृत्य गणपतीचे जे स्वरूप श्रोत्यांच्या अंतरपटलावर अंकित झाले ते सर्वकाळ राहून गेले.

वातापि नगराच्या इतिहासात गजानन पंडिताचे चरित्र सुवर्णाक्षरांनी लिहिले गेले आहे, असे सांगून पावन मिश्राने गजानन पंडिताची कथा संपविली.

एके दिवशी बरीचशी मुलं व त्यांच्या पाठीमागे गर्दीकरून उभे राहूलेले मोठे लोक एका चित्रकाराला लक्षपूर्वक पहात होते व ते चित्र काय असावे या विषयी परस्परांना विचारीत होते. त्या चित्रात एक विचित्र हरिणाचे चित्र होते. ते हरिणाचे भूत असावेसे भासे. त्याच वेळी पावन मिश्रांनी सभा मंडपात पाऊल टाकले व मुले उत्सुकतेने व कुतूहलाने हरिणाचे चित्र पहात असल्याचे ओळखले व म्हणाले–"मुलांनो! या बसा, ती कथा मी सांगतो, ऐका!" असे सांगून गोष्ट सांगू लागले :

इंद्राने सगर चक्रवर्ती राजाच्या यज्ञासाठी म्हणून सोडलेला घोडा धरला आणि बांधून ठेवला. वृद्ध राजाचा यज्ञ निर्विघ्न पार पडला नाही. इंद्राने घोडा चोरून नेला.

वृद्ध महाराजांचा मुलगा असलेल्या अभिनंदन नावाच्या मुलाने इंद्राला त्याचा भाग न देता यज्ञाचा आरंभ केला. इंद्राला भयंकर राग आला व त्याने कालाला पोटभर खायला प्यायला घालून अभिनंदनाचा यज्ञ उध्वंस कर अशी विनंती केली.

काल हा वेळेचा अधिपती. प्राणिमात्राच्या जीवन मरणाचे मूळ कारण कालाला यम धर्मराज असे ही म्हणतात.

कालाने यज्ञपुरुषाचे आवाहन केले व अभिनंदनाच्या यज्ञाच्या होमकुंडातून एक महाभयंकर असे प्राणिस्वरूप भूत निर्माण केले. तसे भूत पूर्वी कधीकोणी पाहिले किंवा एकले ही नव्हते की त्याच्या विषयी काही माहीत ही नव्हते. म्हणून ऋत्विज अध्वर्यू वगैरे सर्व त्याला पाहून घाबरून पळाले यज्ञवेदिका नष्ट झाली.

अभिनंदन हा गणेशभक्त होता. त्याचे गुरु वशिष्ठ म्हणाले—"राजा, मध्ये असे विघ्न येईल असे समजूनच होमकुंडा समोर मोठे स्वस्तिका पीठ तयार करविले होते. स्वस्तिक हे गणेशाचे चिह्न आहे. गणपतीचे प्रतिरूप म्हणून हळदीची एक गोळी करून स्वस्तिकाच्या केंद्रस्थानी ठेव व तिला नमस्कार कर! ते स्वस्तिक हे विघ्न दूर करील राजाने तसे केले.

रांगोळीने काढलेल्या त्या स्वस्तिक केंद्रातून एका अत्यद्भुत नादाचे कंपन बाहेर आले व त्या महाभयंकर भूताला जणु काही गिळून टाकले. रांगोळीचे कण मोठ्या उंदरासारखे बदलले, कित्येक राक्षसी मुंग्या त्या भूताच्या सर्वांगावर चढल्या आणि त्याचा चावा घेऊ लागल्या ते भयंकर भूत जमिनीवर गडबडा लोळू लागले आणि क्षणार्धात अदृश्य झाले.





# भितरा युवराज

फार प्राचीन काळातील गोष्ट आहे, इराण देशात एक युवराज होता. तो सर्व तऱ्हेने योग्य होता, परंतु चंद्रावर डाग असतो तसा भितरेपणा त्याच्यात होता. युवराजाला विसावे वर्ष लागून गेल्यावर त्याचे वडील वारले. म्हणून त्याच्या राज्याभिषेकाची तयारी सुरू झाली.

त्या देशात एक प्रघात होता. जो कोणी युवराज गादीला वारस असे त्याला सिंहाशी द्वंद्व युद्ध करावे लागत असे. युवराजाशी द्वंद्व युद्ध करण्यासाठी मंत्र्यांनी एक सिंह तयार करून ठेवला. त्या सिंहाचा विचार मनात येताच युवराजाचे हातपाय गारठले. म्हणून उद्यांच राज्याभिषेक असल्याचे ऐकल्यावर युवराज आपल्या घोड्यावर बसून मध्यरात्र उलटल्यावर निघाला आणि देश सोडून निघून गेला. युवराज तीन दिवस सतत घोड्यावरून जात आणखी एका देशात येऊन पोंचला. त्या देशाचे सृष्टिसौंदर्य अद्भुत होते. गलगचुंबी वृक्ष वनस्पती, नद्या आणि पर्वत यामुळे तो प्रदेश फारच रमणीय दिसत होता. एका जागी मेंढरं चरत असलेली दिसत होती. जवळच एक धनगराचा मुलगा एका बांसुरीवर आनंदाने गाणे वाजवीत होता.

युवराजाने त्याला हाक मारली व त्याची ओळख करून घेतली. नंतर तो धनगर युवराजाला आपल्या धन्याकडे बोलावून घेवून गेला. तेथे म.लकाने युवराजाला जेवायला वाढलं व विचारलं—"आपण कोण! कोठले राहणारे?"

"अहो, मी एका देशाचा युवराज आहे. मी आपलं नाव नाही सांगणार. परिस्थिति अनुकूल नसल्याकारणाने मी देशभ्रमण करतो आहे. तूर्त मी कोठे एकाच जागी



"फार दिवस रहातही नाही." युवराज फार दुःखाने म्हणाला.

"तर मग आपण आमच्याच घरीं रहा की! तुम्हांला कोणत्याही वस्तूची उणीव भासू देणार नाही. केव्हांतरी चांगले दिवस येतीलच!" तो शेतकरी म्हणाला.

युवराजाने त्या शेतकऱ्याचे आतिथ्य स्वीकारले. तो दररोज धनगराच्या मुला-बरोबर मेंढरे चरायला कोठेतरी जंगलात किंवा धबधब्याजवळ जात असे.

एकदां युवराज मेंढरांबरोबर डोंगराच्या टोकापर्यंत गेला. तेथे पुष्कळ मेंढरांचे कळप व धनगरांची पोरे होती. त्याच वेळी दुरुन "सिंह! सिंह!" असा ओरडा ऐकू आला. धनगरांची सर्व मुलं हातांत जो दगड काठी आली ती घेऊन ओरडा ऐकू आला त्या दिशेला धावू लागले.

युवराज ज्या धनगराच्या मुलाबरोबर आला होता तो मुलगा युवराजाला म्हणाला—"चल आपण त्या सिंहाला ठार करू या!" परंतु युवराज तर भीतीनें गारठला जागचा हलला देखील नाही. तोंडावाटे शब्दही उमटला नाही. तो मुलगा क्षणभरच थांबला व युवराजाकरितां न थांबतां सिंहाला मारायला धावला.

थोड्या वेळाने धीर करून युवराज स्वतःचा जीव वांचविण्यासाठी झाडावर चढून पानांच्या आड लपून बसला काही वेळाने धनगरांची पोरे विजयोत्सवाने हसत परतली. त्यांनी मारलेल्या सिंहाला उच-लून बरोबर आणलं होते.

युवराजाने ते सर्व पाहिले व त्याला त्या मुलांसमोर यायला सुद्धा लाज वाटली. त्या धनगराच्या पोरात जेवढं धाडस आहे तेवढं देखील आपल्यात नाही या बद्दल तो फारच शरमिंदा झाला. मेलेल्या सिंहाला पाहून त्याचे पाय थरथर कापत होते. धनगरांची मुलं निघून गेल्यावर युवराज झाडावरुन उतरुन खाली आला आणि त्या गावात पुन्हां पाऊल न टाकतांच दुसऱ्याच दिशेने निघून गेला.



आणखी तीन दिवस प्रवास केल्यावर युवराज एका वाळवंटाच्या प्रदेशात आला. तेथें एका सैन्याचा पडाव पडलेला होता व त्यांचे तंबू वगैरे दिसत होते. त्या सैन्याच्या प्रमुखाने युवराजाला प्रेमाने बोलावून त्याच्या जेवणाखाण्याची व्यवस्था केली. शेतकऱ्याला त्याने सांगितले होते तसे तो देश भ्रमण करीत असल्यासे सांगितले व एका देशाचा युवराज असल्याचे ही सांगितले.

"आपण आमच्या सैन्यातले एक सैनिक म्हणून रहावे आपल्याला कोणतीही उणीव भासू नये याची आम्ही काळजी वाहू. चांगले दिवस कधी तरी येतीलच." सेनापती म्हणाला. युवराजाने त्या गोष्टीस होकार दिला.

तेथें त्याला कोणत्याही तऱ्हेचा त्रास झाला नाही. परंतु एके दिवशी सर्व सैनिक घोड्यावर बसून निघाले तेव्हां युवराजाला बरोबर निघायला सांगितले. त्याने विचा-रले—"तुम्ही कोठे निघालात?"

"शेजारच्या डोंगरात सिंह आहेत. त्यांची शिकार करायला निघालो आहो. कित्येक दिवस युद्ध करावे न लागल्यामुळे साहस व शौर्य दोन्हीत बोथटपणा येऊ लागला आहे. तो जाण्यासाठी शिकार ही एक उत्तम साधना आहे!" सैनिक युद्धो-त्साह दर्शवीत म्हणाले.



युवराजाला सुटकाच नव्हती. आतां जाणं भागच होतं. परंतु त्याची छाती धडधडत होती. आत्मरक्षणासाठी सुद्धा सिंहाशी झुंज द्यायला, साहस न करणाऱ्या युवराजाला, सिंहाला शोधत निघालेल्या लोकांना पाहून ते सर्व खरोखर साहसी व शूर असले पाहिजेत असे वाटले.

सैनिक डोंगरात शिरल्या बरोबर युव-राजाने आपल्या घोड्याला दुसऱ्याच दिशेने वळविले. काही दिवस प्रवास केल्यावर तो एका मोठ्या शहरात येऊन पोहोचला. हेरांच्याकडून त्या देशाच्या राजाला कळले की हा कोणी देशभ्रष्ट झालेला युव-राज आहे. तेव्हां राजाने युवराजाला



आपल्या वाड्यात बोलावून घेतले राजाला जो मानमरातब मिळायला हवा, तो सर्व त्याला दिला. चांगले दिवस येई पर्यंत त्याने त्याच्याचकडे रहावे, असे त्या नगराच्या राजाने सुचविले.

त्या राजाला एकुलती एकच मुलगी होती. ती सुंदर होती व हुशारही होती. या देशभ्रष्ट राजाला कोणत्याही प्रकारे दुःख होऊ नये यासाठी ती त्याच्या बरोबरच बोलण्यास व त्यांची करमणूक करण्यास त्याच्याकडे येऊ लागली.

युवराज त्या गावी आला. त्या दिवशी संध्याकाळी जेवणखाण झाल्यावर युवराज व राजकन्या दालनात बोलत बसले असतां त्या दालनाच्या बाहेर भयंकर आवाज आला. धडधडत्या छातीने युवराजाने राजकन्येला विचारले–"हा कसला आवाज ?"

ती म्हणाली–"काही नाही आमच्या काळ्या नोकराची जांभई आहे !"

युवराजाला वाटले की काळा नोकर म्हणजे कोणी निग्रो किंवा हबशी असावा. परंतु माणसाला जांभई आली तर इतका मोठा आवाज होतो हे कसं काय आणि असा आवाज करणाऱ्या नोकराला राजकन्या रागावत कशी काय नाही, याचे युवराजाला आश्चर्य वाटले.

आणखी काही वेळ बोलत राहिल्यावर राजकन्या म्हणाली–"झोपायची वेळ, झोपा आतां, स्वस्थ." आणि तिने दार उघडले. त्याबरोबर युवराजाच्या पोटात 'धस्स' झाले. दाराबाहेर काळा सिंह होता.

"घाबरू नका! भ्यालात तर रानटी जनावरे भिणाऱ्यावरच तुटून पडतात, माहीत आहे ना! हा तर माझा पाळलेला सिंह आहे! मीच त्याची देखरेख करते. नेहमी तो माझ्या बरोबरच हिंडतो-फिरतो." असे सांगून राजकन्येने सिंहाच्या आयाळीवर कुरवाळीत हात फिरविला.

युवराज काही वेळ निश्चेष्ट पडून राहिला. त्यानंतर राजकन्या सिंहालाबरोबर घेऊन निघून गेली.



त्या दिवशी रात्री युवराजाला झोपच लागली नाही आपल्याला झोप न येण्याचं कारण भय आहे, सिंह नाही, हे त्याच्या चांगले लक्षात आले. धनगराच्या पोरांनी सिंहाला ठार केले. सैनिकांनी सिंहाची शिकार केली. राजकन्येने स्वतः सिंहाला माणसाळले. त्यांना भय वाटलं नाही, मला वाटलं आहे.

हे कळल्यावर युवराज उजाडायच्या आतच घोड्यावर बसून कोणाला काही सांगितल्याशिवाय स्वदेशीकडे निघाला युवराजाला परत आलेला पाहून मंत्री नातेवाईक व दरबारी सर्वांना अत्यानंद झाला.

"मी सिंहाशी द्वंद्वाला तयार आहे. आवश्यक सर्व तयारी करा." युवराज म्हणाला. दुसऱ्याच दिवशी युवराज व सिंह यांच्या द्वंद्वासाठी तयारी करण्यात आली.

युवराज एक काठी घेऊन मैदानात येऊन उभा राहिला. तेथे सिंहाचा पिंजरा आणण्यात आला आणि सिंहाला बाहेर सोडण्य.त आले.

पिंजरा उघडतांच एक डरकाळी फोडून सिंह बाहेर उडी मारून मैदानात आला. युवराज जागचा हलला नाही. सिंह त्याच्या चारीबाजूला घिरट्या घालून त्याच्याजवळ येऊन बसला व युवराजाचे हात चाटू लागला. तो पाळलेला सिंह होता. ती गोष्ट मंत्र्यांनी युवराजाला प्रथम सांगितली नव्हती. युवराजाचे धैर्य व साहस सिद्ध झाले.

लगेच राज्याभिषेकाची निमंत्रणे राजे रजवाड्यांकडे पाठविण्यात आली. शेतकन्याकडे, धनगराच्या मुलाकडे, वाळवंटातल्या सेनापतीकडे, सैनिकांकडे, राजाकडे व त्याच्या मुलीकडे सुद्धा निमंत्रणे पोचती झाली, सर्वलोक आले.

राज्याभिषिक्त युवराजाला अहेर करण्यात आला, त्यावेळी राजा म्हणाला–"मी इतर कांहीं अहेर आणलेला नाहीं. मी फक्त मुलीलाच घेऊन आलों आहे तिचा स्वीकार कर." युवराजाने राजाकन्येशी विवाह केला आणि दीर्घकाळ सुखाने राज्य केले.





# भुतांना न भिणारा

नागराजचे आईवडील तो लहान असतांनाच निवर्तले. वीस वर्षे वयाचा होईपर्यंत तो गावातल्या कोणत्या तरी शेतकऱ्याकडे नोकरी करून आपला उदरनिर्वाह चालवीत असे. तो तसा हुशारही असल्याकारणाने शेतीच्या कामात निष्णात म्हणून ही त्याला गावात लोक विचारीत.

नागराज आतां लग्न करून घ्यावे व संसार थाटावा या विचारात होता. परंतु त्याला कोणी मुलगी द्यायला तयार होईना.

"येऊन जाऊन तू घरगडी. दिवसभर व कधी कधी रात्रभर तू आपल्या मालकाच्या घरी काम करणार. तुला मुलगी दिलीच तर तुझी व तिची भेट दिवसा किंवा रात्री होईल की नाही, शंकाच. तुला मान वर करायला तरी फुरसत मिळेल का? तू घरगड्याचं काम सोडून कोणाचं शेत खंडानं घेऊन करणार असशील तर आम्ही विचार करू तुला मुलगी द्यायला." असं एक दोघे म्हणाले.

त्याने मोठ्या शेतकऱ्यांकडून खंडाने शेत करतो म्हणून विचारून पाहिले, परंतु कोणी त्याला कबूल झाला नाही. म्हणून त्याच्या मनात तो ज्या गावात जन्मला, वाढला त्या गावाचा वीट आला. या गावात राहून उपयोग काय?

नागराज एके दिवशी सकाळी आपले गाव सोडून निघाला आणि तीन दिवस एका जंगलातून जात जात चवथ्या दिवशी एका गावी येऊन पोचला.

त्या गावाच्या चारही बाजूला हिरवी गार शेते होती. परंतु नागराज त्या गावात फिरत असतां त्याला एका जागी चांगलं पीक निघायच्या स्थितीत असलेल्या शेतांच्या मध्यभागी एक पडीत जमीन व एक जुनी पडकी विहीर दिसली.

बिनय कुमार

नागराजाने मोठी आशा लावून त्या जमिनीकडे पाहिले व विचार करू लागला की या जमिनीच्या मालकाने मला हे शेत खंडाने दिलं तर मी यात सोनं पिकवीन. असा विचार करून त्याने रस्त्याने जाणाऱ्या एकाला थांबवून ते शेत कोणाचे म्हणून विचारले. त्याने गावातल्या एका उंचवट्याकडे बोट दाखवून म्हटले—"त्या किल्ल्यात राहणाऱ्या जमिनदाराचं आहे!" आणि पुढे निघून गेले.



नागराज त्या जमिनदाराकडे गेला व आपली ओळख सांगून म्हणाला—"मालक, आपण ती जमीन पडीत सोडून दिलीच आहे. ती मला खंडाने दिलीत तर मी तुमचे उपकार मानून आपला उदर निर्वाह चालवीन म्हणतो!"

तो जमिनदार हसून म्हणाला—"बाबा रे, त्या जमिनीत भुतं आहेत. ही गोष्ट या पंचक्रोशीतल्या सर्व गावकऱ्यांना माहीत आहे. त्या जमिनीत भयंकर भुते येऊन रहात आहेत. त्या जमिनीत कोणी पीक काढणार असेल तर जमिनीतली अर्धी जमीन फुकट देतो अशी मी दवंडीसुद्धा पिटविली होती. स्वतःला हिंमती मानणारे रात्री तेथे गेले आणि जिवंत परतले नाहीत. म्हणून त्या जमिनीच्या वाऱ्यालासुद्धा जाऊ नकोस!"

नागराजाला भुतांची भीती मुळीच वाटत नसे. त्या जमिनीतून भुतांना पिटाळून लावलं तर अर्धी जमीन आपली होईल या आशेने त्याला उत्साह चढला. तो त्या दिवशी जमिनदाराच्या घरीच जेवला आणि काळोख पडताच एक जाडजूड काठी घेऊन त्या पडित जमिनीवर गेला आणि एका झाडाला टेकून बसला.

एक प्रहर रात्र लोटली असेल नागराजासमोर दोन भयंकर भुते येऊन उभी राहिली. नागराजने हातातली काठी घट्ट धरली आणि त्या भुतांकडे डोळे वटारून पाहू लागला—'पाहूया तरी ती काय करतात ते!'



दोन्ही भुते एक पाऊल मागे टाकून म्हणाली–"केवढा धीट दिसतो आहेस तू? मागे इकडे आलेल्या सर्वांचे डोळे आम्हाला पाहूनच पांढरे झाले होते. बरं, ते सोड, तू कोण हे सांग आधी!"

"मी कोण हे सांगेन मागाहून! पण तुम्ही काही तरी कामासाठी येथे आलेले दिसतां आहां. काय काम आहे? बोला." नागराजने दरडावून विचारले.

"हा आपलं भांडण मिटवून न्याय देऊ शकेलसे वाटतं आहे!" एक भूत दुसऱ्याला म्हणाले. दुसऱ्याने होकारार्थी मान हलविली.

"ह्या पडित जमिनीवर आम्हा दोघां पैकी कोणातरी एकाचा सर्व हक्क आहे. तो कोणाचा हे ठरवायचं आहे. आजपर्यंत आम्ही जीजीं बरी वाईट कामे केली ती ऐकून आमच्या पैकी कोण मोठा ह्या गोष्टीचा न्यायनिवाडा तू द्यायचा आहेस. तसे तू करू शकला नाहीस तर तू सकाळी गावात परत जाणार नाहीस, या विहिरीत जाशील!" दोन्ही भुते म्हणाली.

"ठीक, मी बरोबर न्यायनिवाडा करतो. मी स्वत: तुमचे शक्ति सामर्थ्य डोळ्यांनी पाहणार आहे. पूर्वी तुम्ही कोणती मोठ-मोठी कामे केलीत ती उपयोगाची नाहीत." नागराजने त्यांना निकराच्या शब्दात सांगितलं.

"ठीक, सांग तर आम्ही काय करून दाखवू?" भुतांनी त्याला विचारलं.

नागराजने आपल्या हातातल्या काठीने एका भुताच्या खांद्याला हळूच मारलं आणि म्हणाला–"तू या जमिनीत एक चांगलेसे घर बांधून दाखव. ते काम मध्यरात्रीच्या आधी पुरे झाले पाहिजे."

"हत तिच्या! एवढेच का?" असे म्हणत ते भूत निघून गेले.

नागराजने दुसऱ्या भुताच्या कंबरेला काठीचे टोक लावून म्हटले–"तुझ्या बरोबरा च्या भुताने घर बांधले की लगेच तू त्याच्या-चारी बाजूच्या आवाराला भिंत बांध आणि आत भाजीची झाडं आणि फुलझाडं लाव. हे काम कोंबडा आरवण्याच्या आत झालं पाहिजे."

"हे काय काम झालं?" असं म्हणत दुसरे भूतही निघून गेलं.

बरोबर मध्यरात्री पहिले भूत नागराज-जवळ येऊन म्हणालं–"घर बांधण्याचं काम पुरं झालं, मी मोठा आहे, असा निवाडा तू देशील ना, आता?"

नागराज क्षणभर थांबून म्हणाला–"तसाच निवाडा द्यायला हवा तर! परंतु दुसरे भूत मला जिवंत राहू देईल का?"

"तुला त्याची भीती बाळगण्याचे कारण नाही. माझ्याबरोबर चल. त्याला कसं ठार करायचं ते मी सांगतो." असं सांगून पहिले भूत नागराजला त्या जमिनीच्या एका टोकाला घेऊन गेले व एक झाड दाखवून म्हणालं–"याचं मूळ हाताला बांधून ठेव. याची काडी धुपासारखी जाळ-लीस की ते मरून तरी जाईल नाही तर पन्नास पाउणशे मैल दूर पळून जाईल."

"ठीक, उद्यां रात्री ये तर. निर्णय तुझ्याच बाजूचा होईल. त्या दुसऱ्यालाही उद्यां रात्री यायला सांगतो." नागराज म्हणाला.

कोंबडा आरवण्याच्या आत दुसरे भूत नागराजजवळ आलं आणि काम पुरं झाल्याचं उत्साहाने सांगू लागलं.

नागराजने त्याची खूप वाखाणणी केली व निर्णय त्याच्याच बाजूने होणार असे सांगून म्हणाला–"परंतु ते दुसरं भूत माझ्या



विरुद्ध भडकेल त्याला काय?" दुसऱ्या भुताला भिण्याचे कारण नाही असे सांगून नागराजला जमिनीच्या दुसऱ्या टोकाला नेले व जमिनीवर पसरणारा एक वेल दाखवून म्हणाले—"याच मूळ हाताला बांध. ते भूत तुझ्याजवळ आल्याबरोबर याची पाने विस्तवात टाक. त्यांच्या धुराने ते तत्क्षण मरेल. त्याला घेरी येईल व ते तडफडून मरेल."

नागराजने त्या झाडाचे मूळ व पाने घेतली आणि पहिल्या भुताला सांगितले तसंच सांगून दुसऱ्या दिवशी रात्री यायला सांगितले.

नंतर नागराजने जमिनदाराकडे जाऊन घडलेले वृत्त सांगितले. नागराज भुतांच्या पडीत जमिनीतून जिवंत परत आला हीच गोष्ट जमिनदाराला आश्चर्याची व आनंदाची वाटली.

नागराजने दुसऱ्या दिवशी भुतांनी सांगितलेल्या झाडांच्या मुळ्या काढून बांधून घेतल्या आणि काळोख पडल्याबरोबर एक शेगडी घेऊन जाऊन भुतांच्या पडीत जमिनीवर शेगडी पेटवून शेक घेत बसला. एक प्रहर रात्र झाल्यावर दोन्ही भुते विचारीत आली की काय तुझा निर्णय आहे?

त्याने भुतांना आणखी जवळ यायला सांगितले व म्हणाला—"मी दिवसभर न्याय शास्त्रावरचे ग्रंथ चाळत होतो. ही पडीत जमीन आपल्या तिघां पैकी जो जास्त शक्तिवान असेल त्याची असा निर्णय आहे. मीच जास्त शक्तिवान आहे!" असे म्हणत भुतांनी सांगितलेल्या काटक्या व पाने शेगडीत टाकली. लगेच धुराचा लोट बाहेर आला आणि दोन्ही भुते 'किचकिच' करीत नाहीशी झाली.

जमिनदाराने नागराजाच्या धीटपणाबद्दल त्याची पाठ थोपटली आणि त्या पडीत जमिनीतली अर्धी त्याला इनाम म्हणून दिली. नागराज भुतांनी बांधून दिलेल्या घरात राहून शेती करू लागला. काही दिवसांनी एका योग्य मुलीशी लग्न करून त्याने आपला संसार थाटला.






[११]

[भिल्ल रहात तो प्रदेश नरवाहन मिश्राने आपल्या अनुयायांना वाटून दिल्याचे कळल्यावर सर्व भिल्ल नायक संतापले. ते लांडग्यांच्या वस्तीत जमले आणि त्यांनी सर्वांनी नरवाहन मिश्राला तोंड द्यायचे ठरविले. वृद्ध भिल्ल नायकाने त्या पूर्वी युद्ध थांबविता आले तर प्रयत्न करण्याच्या हेतूने नरवाहनाकडे एक पत्र पाठविले. पुढे—]

लांडग्यांच्या वस्तीत सर्व भिल्लनायक जमल्यानंतर घडलेला सर्व वृत्तांत शिवदत्त पुढे सांगू लागला. मंदरदेव लक्ष देऊन ऐकत होता.

"मला ज्याचे भय वाटत होते, तेच झाले." शिवदत्त म्हणाला. दूतला गाढवावर बसून येत असल्याचे ज्या दोघां तरुणांनी पाहिले होते ते मैदानाच्या दिशेने धावले आणि काही वेळाने त्याला घेऊन परतले. त्याला कशा तऱ्हेने कष्ट व यातना सहन कराव्या लागल्या असतील त्यांची कल्पना मला होती.

दूताने त्याला जे जे कष्ट सहन करावे लागले होते, सर्व सविस्तर सांगितले. सैनिक त्याला धरून नरवाहनकडे घेऊन गेले. नरवाहनाने भिल्लनायकाने पाठविलेले पत्र वाचले व संतापला. त्याने दूताला पन्नास फटके देवविले. त्याचे डोके भादरविले.




त्याच्या तोंडाला काळे फासले आणि गाढवावर गावात सर्वत्र त्याची धिंड काढविली. 'नंतर तुझ्या त्या भिल्ल नायकाला माझं हे' असे म्हणत दूताच्या पाठीला बकऱ्यांचे एक कातडे बांधले त्यावर एका भिल्लाला नरवाहनाचा एक सैनिक सांखळदंडाने बांधून फरफटत ओढत नेत असल्याचे चित्र काढलेले होते.

त्या चित्रातला भाव ओळखून भिल्लनायक माझ्याकडे वळून म्हणाला–"आम्हांला गुलामीत तरी दिवस काढावे लागणार किंवा मरण पत्करावे लागणार. या शिवाय दुसरा उपाय नाही. मी मरण पत्करायला तयार आहे!" त्या वेळी त्याचे डोळे आग पाखडीत होते. ती परिस्थिती मला अनुकूल नसून ही तिचा परिणाम नरवाहनच्या विरुद्ध होणार हे मी ओळखले. समरसेन स्वर्गवासी झाल्यानंतर कुंडलिनी द्वीपात आपल्याला विरोध करणारा कोणी उरला नाही या गर्वाने फुलून गेलेल्या नरवाहनाला हे भिल्ल लोक चांगला धडा देऊ शकतील, असे मला वाटले.

"शिवदत्ता, तुमच्या या नरवाहनराजाने आपल्या गर्वाचे जे प्रदर्शन केले आहे ते तू पाहिलेस ना?" असे म्हणत भिल्ल नायकाने माझ्याकडे अर्थपूर्ण दृष्टीने पाहिले.

"म्हणजे तुम्ही युद्धाला तयार आहांत तर?" मी त्याला विचारले.

तो वृद्ध नायक एक क्षणभरच मान खाली करून काही विचार करून माझ्याकडे पहात म्हणाला–"त्या शिवाय मला दुसरा मार्गच दिसत नाही. मधां तुम्ही म्हणालात तसे त्याच्या चांगल्या सुशिक्षित सैनिकांशी समोरासमोर युद्ध धोक्याचे आहे. म्हणून गनिमी काव्याने लपून छपून युद्ध करीत त्याला 'नकोजीव' करणे जास्त बरे, नाही का?"

"परंतु त्या पद्धतीने जय मिळेलच असं मात्र नाही. कधी न कधी तुम्हांला राजधानीवर, किंबहुना राजवाड्यावर चालून जावे लागेल." मी म्हणालो.

त्या वृद्धनायकाने होकारार्थी मान हलविली. इतक्यात तीन चार भिल्ल तरुण धावत ओरडत आम्ही दोघं बसलो होतो, तिकडे आले. वृद्ध नायकाला नमस्कार करून म्हणाले–"नायक, शत्रू मोठे सैन्य घेऊन आमच्यावर चालून येत आहे. पायदळ, घोडेस्वार यांच्या शिवाय काही जण हत्तीवर चढूनही येत आहेत. हजारो लोक असावेत. तर आतां आम्हांला काय हुकूम आहे?"

"आपण त्या मोठ्या सैन्याशी समोरासमोर युद्ध करावयाचेच नाही." वृद्धनायक म्हणाला. "त्या सैन्याला या जंगलांत वाटेल तिकडे खुशाल जाऊ दे. परंतु संधी मिळेल तेव्हां गनिमी काव्याने त्यांच्यावर हल्ले करून त्यांना बेजार करून सोडावयाचे आहे!"

"आपण पाळलेल्या वाघासिंहांचा उपयोग यावेळी करतां येईल का?" एका भिल्ल तरुणाने विचारले.

"होय तर, निःशंक!" वृद्धनायक म्हणाला. विषारी बाण सोडा, विषारी साप सोडा, काही करून शत्रूला दहशत बसेल असे काही तरी केले पाहिजे!"

नायकाची ती आज्ञा ऐकून भिल्ल तरुण निघून गेले. शत्रूवर, पाळलेल्या वाघासिंहांना कसे ते सोडणार, मला कळेना.




विषारी बाणांची माहिती मलासुद्धा होती. जंगलात राहणाऱ्या अनेक आदिम जातीचे लोक शत्रूवर विषारी बाण सोडून त्यांचा संहार करीत असत. ते बाण शत्रूच्या अंगाला लागले की त्या बाणांच्या टोकांना लावलेले विष अंगात शिरून शत्रूचे हालहाल करी आणि शेवटी जखमी शत्रू तडफडून मरतोच.

"शिवदत्ता, मी तुला एका अत्यंत गुप्त स्थानी घेऊन जात आहे. तुझे अनुयायी सुद्धा निर्भयपणे तेथे जाऊन राहू शकतील." वृद्ध भिल्ल नायक म्हणाला.

ती गुंप्त जागा कोठे आहे व तेथे आम्ही जाऊन लपून राहण्याचे कारण काय?

आम्हांला कळेना माझ्या मनांतली ही शंका ओळखून वृद्ध नायक स्मित करून म्हणाला– "शत्रूपासून स्वतःचे रक्षण करण्यासाठी तुमच्यासारखेच आमच्याकडे सुद्धा लहान लहान किल्ले, खंदक व इतर गोष्टी आहेत. मी म्हणालो ते गुप्त स्थान आमच्या भिल्लांपैकी मोजक्या लोकांनाच माहीत आहे. सर्वांना माहीत नाही. शेकडों वर्षांपूर्वी एक डोंगरी किल्ला बांधला गेला. तो आतां जुनाट व पडका आहे. नरवाहनाशी आम्ही सुरू केलेल्या युद्धाचे संचालन तेथून होईल."

मी आपल्या अनुयायांसह निघालो. वृद्ध नायकाबरोबर काही तरुण भिल्लही होते. आम्ही सर्व मिळून दाट झाडीच्या दिशेने निघालो. आम्ही जात होतो त्या वाटेवर भिल्लांच्या अनेक वस्त्या होत्या. प्रत्येक वस्तीत युद्धाची तयारी चालू होती. हे तेथून येणाऱ्या आवाजांवरून स्पष्ट कळत होते.

एका वस्तीत काही तरुण भिल्ल चार पांच चित्त्यांच्या गळयात दोरखंड बांधून लहान लहान झोपड्यांतून त्यांना बाहेर ओढून आणीत असलेले दिसले. कित्येक दिवसांपासून पाळलेले ते वाघ पाळलेल्या कुत्र्यांसारखे त्या भिल्लांच्या बरोबर मुकाट्याने येत होते.

"शिवदत्ता, यांनाच आमचे भिल्ल वीर नरवाहनाच्या सैन्यावर सोडणार आहेत. असा मोकळा सोडलेला एक वाघ शंभर सैनिकां इतका धुमाकूळ माजवू शकतो ही गोष्ट लवकरच तुला दिसून येईल. नरवाहनाच्या हत्तींच्या सैन्याला पळवून लावायला एक सिंह पुरे. पायदळ सैन्याला पळवून लावायला आमच्या जवळ भरपूर शस्त्रास्त्र सामुग्री आहे." वृद्धाने आपल्या सैन्यबळाची शिवदत्ताला कल्पना यावी यासाठी हे सर्व वर्णन केले.

मी तेव्हां भिल्ल युवकांच्या धाडसीपणाची खूप प्रशंसा केली. त्या वृद्ध नायकाला जय मिळणार याचा जो आत्मविश्वास होता तो पाहून मी तर आश्चर्यचकितच झालो. वाघसिंहांना सोडल्यावर सैन्याची पळापळ झाली व विषारी बाण लागल्याने सुशिक्षित सैन्यातले काही लोक तडफडून मेले तरी युद्ध जिंकणे कठीण या गोष्टीची त्या भिल्ल नायकाला कल्पना नव्हती.

तो खूप विचारमग्न होऊन पुढे पुढे झपाझप चालत होता. वाटेत खाचखळगे तुडवीत व ओढे पार करून आम्ही दाट अरण्याच्या प्रदेशातून पुढे जात होतो. एका जागी दहा भिल्ल तरुण लहान लहान टोपल्यात असलेल्या मुळ्या एका मोठ्या टोपल्यात एकत्र करीत होते. त्या टाकतांना ते तरुण जी सावधगिरी बाळगीत होते ती पाहून मी तर चकितच झालो. त्या मोठ्या टोपल्यात ते घालत आहेत ते काय?" मी त्या वृद्ध नायकाला विचारले.

"सांप!" असे वृद्ध म्हणाला.













"विषारी साप का? त्यांचा उपयोग काय, हे तुम्हांला लवकरच दिसेल!" म्हणत वृद्ध नायक हसला.

त्या वेळी आम्ही एका डोंगराळ प्रदेशात येऊन पोंचलो. समोर ऊंच डोंगर असल्याची सूचना म्हणून खूप उंच झाडे व गवत दिसत होते.

"आपल्या समोर आहे तो अत्यंत उंच डोंगर आहे. त्यावर एक जुनाट किल्ला आहे, ही गोष्ट या कुंडलिनी बेटावरच्या अनेकांना माहीतच नाही. लहानपणापासून भटकणाऱ्या आमच्यासारख्या काही मोजक्या वृद्धांना त्या किल्ल्याची इत्थंभूत माहिती आहे." वृद्ध नायक म्हणाला.

मी मान हलवून होकार देत मौनपणे चालत होतो. जर या दाट अरण्यात असा किल्ला असेल तर त्या किल्ल्यात राहून नरवाहनाला येथून तोंड देणे फार सोपे जाईल, असे मला वाटले. साहसी व धाडसी अशा दोन तीन हजार भिल्ल तरुणांच्या मदतीने नरवाहनाला व त्याच्या सैन्याला नानाप्रकारे सतावून सोडतां येईल.

मी वृद्ध नायकाला विचारले–"किल्ला फार जुनाट व पडलेला आहे का?"

"पार पडून गेला आहे असं म्हणतां येणार नाही, परंतु तो जुना व पडका




मात्र आहे! आपण तो हस्तगत करून त्यावर आपले ठाणे बळकट करून बसलो तर शत्रूचे पायदळ सैन्य सोडून घोडदळ व गजबल वर चढून येणे शक्य नाही. यदा कदाचित शत्रू घोळका करून आलाच तर वरून दगड व खडक ढकलून शत्रूला ठार करणे सहजी शक्य आहे. एकाध दुसराच शत्रू आला तर तेथल्या झाडांवर लपून राहून त्यांच्यावर विषारी बाण वगैरे सोडून त्यांना ठार करतां येईल." वृद्ध नायक म्हणाला.

वृद्ध नायक म्हणाला ते ऐकून मला फार आनंद झाला. शेवटी विजय बलशाली नरवाहनाचा झाला तरी त्याच्या सैन्याचं

जे नुकसान होईल त्याची त्याला खूपच भरपाई करावी लागेल. त्याच वेळी राजधानीत नरवाहनाच्या अत्याचारांविरुद्ध प्रजेने बंड केले तर त्याचे पतन निश्चितच आहे!

आम्ही एकामागून एक डोंगराच्या चढणी चढू लागलो. त्या भागात लोकांची येजा कमी असल्याची खूण म्हणून कोठे पाऊल वाटही नव्हती. आमच्या पुढे पुढे चालत असलेले भिल्ल तरुण समोर येणारी झाडं झुडपें वेल वगैरे छाटीत आम्हांला वाट करून देत होते.

चांगली दुपार झाली. सूर्य डोक्यावर आला, त्या वेळी आम्ही डोंगर चढून किल्ल्याशेजारी पोचलो होतो. तो डोंगर किती उंच आहे हे आम्ही डोंगराच्या शिखरावर पोचेपर्यंत कळले नाही. तेथे घसरून पडलेल्या एका तटावर उभे राहून आम्ही पाहिले तर सर्व कुंडलिनी द्वीप व त्याच्या चारी बाजूला पसरलेला महासागर छान दिसत होता.

किल्ला कशा स्थितीत होता? यात राहून शत्रूपासून आपले रक्षण कोठवर करून घेतां येईल? खरोखरी ते इतक्या दूर येऊच शकतील का? या सर्व गोष्टी माझ्या डोक्यात घोळत होत्या.

एकेकाळी हा किल्ला किती बळकट होता याची साक्ष देणारे मोठे मोठे स्तंभ, बुरुज व भिंती होत्या. किल्ल्यात यायला जे भव्य द्वार होते, त्यातले एक उंच दार तुटलेल्या स्थितीत. बाजूला पडलेले होते. दुसरे गंज खाऊन खाली पडण्याच्या स्थितीत होते.

"शिवदत्ता! तुला किल्ल्यात जाऊन पाहून यायचं असेल तर मी आमच्या तरुण मंडळीपैकी एका दोघांना बरोबर पाठवीन." भिल्ल नायक म्हणाला. इतक्यांत आमचे कानाचे पडदे फोडून टाकणारा आरडा ओरडा आणि हत्तीचे चीत्कार ऐकू आले.

"हे काय बरे?" असे म्हणत वृद्ध नायक त्या आवाजाच्या दिशेने कानोसा घेऊ लागला.

(क्रमशः)





# [illegible]

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही; तो झाडाजवळ गेला व झाडावर लोंबकळत असलेले प्रेत खांद्यावर घेऊन तो स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतात असलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! कार्यसिद्धी साठी तू घेत असलेले कष्ट वाखाणण्याजोगे आहेत. कारण पुष्कळदा लोक मेहनत करून फळ हाती येण्याची चिन्हे दिसली नाहीत की हताश होऊन मध्येच हातपाय गाळून बसतात. तू मात्र अविश्रांत परिश्रम करीत आहेस. त्याचे कौतुक करावे तेवढे थोडे आहे. परंतु कार्यसिद्धी न झाल्यावर जाणून बुजून काही लोक अज्ञातवासात राहतात. तशीच [illegible] अवस्था होईल की काय अशी मला [illegible] वाटत आहे. परंतु काही वेळा असे होते की आपल्या दृष्टीने जो पराभव असतो तो इतरांच्या दृष्टीने विजय असतो. अशा













वेळी झालेल्या स्तुतीमुळे आपण आनंदित व्हावे की सत्य घटना सांगून टाकाव्यात असा प्रश्न निर्माण होतो. अशा समस्येवर प्रभाकर नावाच्या महाकवीने काय केले असेल त्याची गोष्ट मी तुला सांगतो. त्याने तुझा श्रमपरिहार होईल.'' असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

प्रवाळदेशाची राजधानी प्राकारपूर येथे प्रभाकर नावाचा एक कवी राहात होता. राजाश्रय मिळविणे तेव्हे सोपे नसते, तरी राजदरबारात स्थान मिळविण्यासाठी त्याने अनेक प्रयत्न केले. परंतु तेथे आधीपासूनच ठाण मांडून बसलेल्या स्वार्थी न मत्सरी पंडितांच्या मुळे त्याला तिथे प्रवेश मिळू शकला नाही. प्रभाकराचे वय अजून पंचवीस वर्षे ही नव्हते. तो एक विवाहित तरुण होता. उपजीविकेचे साधन कसे प्राप्त करावे या विवंचनेत तो असतानाच त्याची बायको मरण पावली. तिच्या अस्थी पवित्र गंगानदीत टाकण्यासाठी तो जो श्रीक्षेत्र काशीस गेला तो पुन्हा प्राकारपुरास परत आलाच नाही.

त्यानंतर बऱ्याच वर्षांनी युवराज प्रसेन प्रवाळ देशाचा राजा झाला. त्याला साहित्याची अतिशय आवड होती. कवी व पंडित तसेच विद्वानांचा तो आदर करीत असे, तो स्वत: जुनी ताडपत्रांवर किंवा भोजपत्रांवर लिहिलेली पुराणे व साहित्य नेहमी वाचीत असे. एकदा प्रभाकराने लिहिलेले एक जुने काव्य त्याच्या वाचण्यात आले. ते प्रसेन महाराजांना अतिशय आवडले.

अशा प्रकारे एकदा महाराजांना त्या कवीची महानता पटल्यानंतर ती गोष्ट इतर लोकांमध्ये पसरण्यास किती वेळ लागणार? थोड्या दिवसातच तो सर्व राज्यात प्रसिद्ध झाला. राज्यातील सर्व पंडित व विद्वान प्रभाकरास महाकवी मानू लागले व त्याच्या प्रत्येक रचनेस महाकाव्य मानू लागले. त्याच्या विविध काव्यसृष्टीची लोक स्तुती करू लागले. महाराज प्रसेन त्या साहित्यिक ग्रंथांवर खूष होते. प्रवाळदेशाचा राजकवी म्हणून प्रभाकरास सन्मान मिळाला. दरवर्षी प्रभाकराची आठवण म्हणून एक समारंभ केला जात असे. त्यात देशोदेशीचे कवी, पंडित, विद्वान भाग येत असत.

एकदा अशाच एका प्रसंगी सर्व पंडितवर्ग व विद्वानांत महाकवी प्रभाकराची स्तुती चालली होती. प्रभाकराच्या काव्यांतील वंशवर्णने वाचून काही विद्वान त्याला कुलीन म्हणत असत. त्याचे वडील, आजोबा सारेच विद्वान असतील म्हणून प्रभाकराची विद्वत्ता वंशपरंपरागत आहे, असे काही विद्वान म्हणत होते, तर इतर काही विद्वान असे म्हणत होते की त्याच्या काव्याचे कोणत्याही दृष्टिकोणातून पाहणी केली तरी त्यात चूक सापडायची नाही, तें आदर्श कवी आहेत. काही पंडित असे म्हणत होते की महाकवी प्रभाकराची बायको अतिशय सुंदर असावी म्हणून त्याच्या आधारेच त्याने सौंदर्यवर्णने इतकी सुंदर केली असावीत.

काही लोक स्वत:ची कीर्ती पसरावी यासाठी हपापलेले असतात व त्यासाठी लांच लुचपत करण्यासही तयार असतात. 'येन केन प्रकारेण प्रसिद्ध पुरुषोभवेत' ही म्हण प्रसिद्धच आहे. परंतु या विरुद्ध आणखी



काही खरे विद्वान प्रसिद्धी परांगमुखच असतात. तेच वास्तविकपणे थोर होत. जो स्वत:ला मोठा म्हणतो तो जगात कधीच मोठा होत नाही. परंतु ज्याला इतर लोक मोठा म्हणतात तोच थोर होय! हिऱ्याचे तेज कधी लपत नाही. ते सहजी प्रगट होते. परंतु हिऱ्याची पारख असायला हवी. नाही तर दगड म्हणून कोणी अजाण त्याला फेकून देईल. महाराज प्रसेन हे असेच एक रत्नपारखी होते.

त्याच वेळी त्या सभेतील एक वयोवृद्ध कवी उठून उभा राहिला. राजासह सर्वजण त्याच्याकडे अवाक होऊन पाहू लागले. तो वृद्ध पंडित हळू व नम्र आवाजात बोलू










लागला, "मी महाराज व इतर विद्वानांना प्रथम वंदन करतो. मला निवेदन करावयाचे आहे की, महाकवी प्रभाकराने निःसंशय चांगल्या काव्याची रचना केली असेल, परंतु त्यात नसलेल्या गुणांची अकारण स्तुति करणे योग्य नाही." सभेतील विद्वान त्याच्या या म्हणण्यावर आश्चर्यचकित होऊन त्याच्याकडे पाहू लागले.

त्याकडे संपूर्ण दुर्लक्ष करून वृद्ध कवी पुनः म्हणाला–"तुम्ही समजता त्याप्रमाणे महाकवी प्रभाकर कुलीन नाही. एका विचित्र परिस्थितीत एका खालच्या वर्गाच्या स्त्रीच्या पोटी त्याने जन्म घेतला आहे. ही गोष्ट त्याच्या वडिलांशिवाय कोणालाही माहीत नाही. त्याने रचलेल्या साहित्यात ही एवढी स्तुति करण्याइतके काहीच नाही. त्याच्या रचनांतील दोष तुम्हांपैकी एकाही विद्वानाच्या लक्षात येऊ नयेत हे आश्चर्यच आहे; त्यानंतर प्रभाकराची बायको अतिशय कुरूप होती. तिला अनेक प्रकारच्या व्याधी होत्या व त्यातच तिचा मृत्यू झाला."

त्या वृद्ध कवीचे म्हणणे ऐकून दरबारात गोंधळ व कुजबुज सुरू झाली. हा म्हातारा कवी प्रभाकरांविषयी वाटत असलेल्या ईर्ष्येमुळे असे काहीतरी बरळतो आहे. या माणसास एक क्षण देखील दरबारात राहू देता कामा नये. असे सारे दरबारी म्हणू लागले.

महाराज प्रसेन सुद्धा या वृद्धावर रागावले व म्हणाले–"एका महाकवीविषयी त्याचा अतिशय परिचय असल्यासारखेच तू बोलत आहेस. त्याच्या कुलीनत्वाविषयी, त्याच्या बायकोविषयी असे असभ्यपणाने बोलत आहेस. तू आहेस तरी कोण? खरे सांग नाहीतर तुला अत्यंत कठोर अशी शिक्षा करीन."

यावर तो वृद्ध कवी एकदा सर्व पंडित व दरबारी लोकांच्या कडे पाहून म्हणाला– "महाराज! येथील विद्वानांपैकी कांही व्यक्ती माझ्याच वयाच्या आहेत. कितीही जरी काळ लोटला तरी माझा परिचय करून दिल्यावर ते मला ओळखतील असे मला वाटते. विष्णु दीक्षितांशी माझा अधिक परिचय होता. महाकवी महाकवी म्हणून तुम्ही ज्याचा गौरव करीत आहात तो प्रभाकर मीच आहे."

वृद्धकवीचे हे उद्गार ऐकून दरबारातील इतर पंडितांनी त्याचा जयजयकार केला. महाराज प्रसेन यांनी सिंहासनावरून खाली उतरून त्याचा जयजयकार केला. त्याला अभिवंदन केलें.

इथपर्यंत गोष्ट सांगून काही वेळ वेताळ थांबला, पुढे म्हणाला–"महाकवी म्हणून साऱ्या दरबारात स्वतःचा गौरव व जयजयकार होत असताना स्वतःविषयीच्या अप्रिय परंतु सत्य गोष्टी तेथे सांगण्यामागे प्रभाकराचा काय हेतू असावा? म्हातारपणामुळे त्याची बुद्धी तर चळली नव्हती? या शंकेचे योग्य प्रकाराने समाधान न केल्यास तुझ्या डोक्याची शंभर शकलें होऊन तुझ्या पायावर लोळू लागतील."

यावर विक्रमादित्याने आपले मौन सोडून असे उत्तर दिले–"प्रभाकराच्या बोलण्याच्या पद्धतीवरून तो केवळ महाकवीच नव्हे तर सज्जन सत्वशील असल्याचेही स्पष्ट झाले. म्हणून बुद्धी चळण्याचा प्रश्नच निर्माण होत नाही. स्वतःविषयीची ही खरी परिस्थिती एका विशिष्ट कारणामुळे त्याने सांगितली. अज्ञातकवी म्हणून तो नगर सोडून गेला. महाराज प्रसेन व इतर विद्वान मंडळींनी ह्याच्या साहित्याबरोबर त्याचे व्यक्तिमत्व सुद्धा देदीप्यमान करून ठेवले होते. तेथे कांही खोट्या स्तुतीचा निर्माण होऊ नये म्हणून त्या सत्प्रवृत्त, सत्यशील महाकवीने खऱ्या गोष्टी तेथे सांगितल्या त्यामुळे त्याच्या वैयक्तिक जीवनाविषयी कांही मतभेद निर्माण होण्याची शक्यताच राहिली नाही."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होताच प्रेतातील वेताळ प्रेतासह राजाच्या खांद्यावरून नाहीसा होऊन झाडावर जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# प्रसंगावधान

फुलपूर नावाच्या गावात अविनाश नावाचा एक विद्वान मनुष्य राहात होता. वेद, शास्त्र पुराण साऱ्यांचा त्याने अभ्यास केला होता. त्याला कीर्तन करण्याची व नाटकात काम करण्याची हौस होती.

अविनाशचा आवाज गोड व खणखणीत होता. तो गाऊ लागला, की त्याचा आवाज गावातल्या कानाकोपऱ्यात ऐकू येई. त्याचे गाणे ऐकल्यानंतर त्याची स्तुती न करणारे लोकच नव्हते. आसपासच्या पंचक्रोशीत कोठेही कार्यक्रमासाठी जावयाचे असल्यास, तो घोड्यावर बसून प्रवास करीत असे. कारण तो प्रदेश डोंगराळ होता.

एकदा असाच तो एका शेजारच्या गावात कीर्तन वगैरे कार्यक्रमानंतर फुलपुरास परत येत होता. रस्त्यात घोडा कशाने तरी भेदरला व अविनाशला न जुमानता वाटेल तसा चौखूर उधळू लागला व असाच एके ठिकाणी दोन चोर झाडीतून आले व त्यांनी घोड्यास धरले.

अविनाशने मनोमन ओळखले की आता आपण या चोरांच्या तावडीत सापडलो. आता काय करावे या विचारात असतानाच त्या दोन चोरांपैकी एक जण सुरा दाखवून म्हणाला–"अहो कीर्तनकार महाराज! कृपा करून घोड्यावरून खाली उतरा व तुमच्या जवळ असलेले सर्व धन संपत्ती मुकाट्याने आम्हाला देऊन टाका."

अविनाशजवळ पैसे होतेच परंतु त्या शिवाय त्याच्या अभिनयावर खूप होऊन लोकांनी दिलेले काही सोन्याचांदीच्या भेटवस्तूही होत्या. असे अमूल्य धन आता चोरांना आयते मिळणार, आपण त्याला मुकणार याचे त्याला अतिशय वाईट वाटले.

तरीसुद्धा धीर धरून तो घोड्यावरून खाली उतरला. पैशांची थैली त्या चोरास दिली व पुढे म्हणाला–"माझ्याजवळचे सर्व धन मी तुम्हाला देतो, पण माझे एक म्हणणे तुम्ही ऐका. जंगलात या धोके बाज घोड्याने माझा रस्ता चुकविला. आजच्या रात्री माझा दुधगाव येथे कार्यक्रम होता. आता तर मला तेथे जाऊन कार्यक्रम करता येणार नाही. तेथे म्हणण्यासाठी मी आठ दिवस मेहनत करून गाणी पाठ केली आहेत. परंतु या दुष्ट घोड्याने उधळून जाऊन माझी वाट चुकविली आहे. आतां मला नाटकांत काम करतां येणार नाही. आता निदान तुमच्या समोर तरी म्हणून दाखवितो. तुम्हाला ती गाणी आवडली तर तुम्ही मला माझ्या गावचा रस्ता दाखवा, चालेल ना?"

चोरांनी त्याने दिलेली थैली घेतली व ते म्हणाले–"ठीक आहे. तू गाणी म्हणून दाखव. गाणी आवडली तरी व न आवडली तरी आम्ही तुला वाट दाखवू."

अविनाशने खड्या व चढ्या सुरात एक छान गाणे म्हटले. ते ऐकून चोरांना आश्चर्य वाटले ते म्हणाले–"अरेच्या! तू तर फारच छान म्हणतोस गाणे. अजून एक गाणे गाऊन दाखव पाहू."

यानंतर अविनाशाने पहिल्यापेक्षाही चढ्या स्वरात श्लोक म्हणण्यास सुरवात केली. त्याच्या सुरेल आवाजातील श्लोक व गीते ऐकून चोर आपले देहभान विसरून गेले. अविनाशने रंगभूमीवर म्हटल्यासारखे चढ्या सुरात आपले गायन चालूच ठेवले.



श्री शं. स. सरदेसाई

अशा प्रकारे एक तास गायन केल्यानंतर अविनाशने आपले गाणे थांबवले व त्या चोरांकडे पाहून स्मित केले. त्यावेळी मागे कशाचा तरी आवाज आला म्हणून चोरांनी माना वळविल्या तेव्हा तेथे चार बलदंड माणसे हातात कुन्हाडी घेऊन उभी असल्याचे त्यांना दिसले, त्यांना पाहून ते चोर भीतीने थरथर कापू लागले.

त्या चौघांनी मिळून दोन चोरांना दोऱ्यांनी बांधून टाकले. तेव्हा अविनाशने त्यांना विचारले–"चोरांना पकडण्यासाठी शस्त्रांसह येणारे तुम्ही कोण आहात?"

"आम्ही लाकूडतोडे. या जंगलात लाकडं तोडण्यासाठी नेहमी येत असतो आम्ही. तुमचा सुरेल आवाज ऐकून येथे आलो. हे चोर म्हणजे खंडू आणि दगडू नावाचे दोन कुप्रसिद्ध चोर आहेत." असे ती चार माणसे म्हणाली.

संतुष्ट मनाने अविनाश उद्गारला–"म्हणजे, माझे खड्या सुरातील गाणे उपयोगीच ठरले म्हणायचे! उंच आवाजात गायन करताना मला सारखं वाटत होते की माझा आवाज ऐकून मला वाचविण्यास कोणीतरी येईल आणि तसेच घडले."

लाकूड तोड्याचे गाव तेथून जवळच होते. ते चोरांच्या मुसक्या आवळून पुढे चालत होते व अविनाश त्यांच्या मागोमाग घोड्यावरून जात होता.

त्या गावातील लोकांनी अविनाशचे चांगले स्वागत केले व त्याच्या प्रसंगावधानाचे कौतुक केले व त्याला आग्रहाने आपल्या गावात ठेवून घेतले व म्हणाले-आमच्या गावात तुम्ही आज कीर्तन करा. फूल ना फुलाची पाकळी तुम्हाला काहीतरी बिदागी देवू."

अविनाशने मोठ्या आनंदाने ते निमंत्रण स्वीकारले व आपल्या सुमधुर स्वरात कीर्तन गायन करून गावकऱ्यांना सर्वतऱ्हेने खूष केले. माणसावर प्रसंग ओढवला की त्याने घाबरून न जाता, प्रसंगावधान राखून काम केले तर तो संकटातून आपली सुटका करून घेऊ शकतो.





# भिडस्त

**वी**रपूर नावच्या गावी रामराव नावाचे एक श्रीमंत गृहस्थ रहात असत. त्यांच्या बायकोचे नाव जानकी. ते एक आदर्श जोडपे होते. त्यांना मूलबाळ नव्हते आल्या-गेलेल्यांची चांगली विचारपूस करणारे म्हणून त्यांचा नावलौकिक होता.

एकदां त्यांच्या घरी गोपाळ नावाचा एक मुलगा आला. तो रामरावांच्या दूरच्या नात्यातला होता. गावात काही काम होते तो फक्त एकच वेळ रामरावांच्या घरी जेवे. त्यानंतर कोठेतरी जेवून येत असे.

गोपाळचा तो संकोचीपणा असावा असे वाटून जानकीबाई त्याला म्हणाल्या–"संकोच नको करूस, बाबा! आणखी एकासाठी सैंपाक करणे मला काही त्रासचं नाही बरं का? आम्हांला एकटयाला जेवायला घालणं जड जात असंही नाही, शिवाय तू काही परका नाहीस!"

जानकीबाईंनी किती सांगितलं तरी गोपाळ कोठून तरी खाऊनपिऊन यायचा आणि काही तरी सांगून वेळ मारून न्यायचा.

असे आणखी पांच एक दिवस लोटले. जानकीबाई पतीला म्हणाल्या–"हा मुलगा फार संकोची दिसतो आहे! आपल्या घरी राहून इतरांच्या घरी जाऊन जेवतो, मग नात्यातली माणसं नावं नाही का ठेवणार?"

"मग काय करायच? मला अजीर्ण रोग आहे नाही का? मी पोटभर जेवतही नाही. माझ्याबरोबर जेवायला बसला की त्याला पोटभर जेवायला संकोच होत असावा!" रामराव म्हणाले.

गोपाळ त्या गावी दहा दिवस राहून निघून गेला. त्यानंतर शेजारच्या गावी कोणी मोठे वैद्यबुवा आले आहेत, असे जानकीला कळले. त्या वैद्यबुवांकडे जाऊन



त्यांचे औषध ध्यावं असा जानकीबाईने आग्रह केला.

त्या गावात रामरावांचे दूरचे एक नातेवाईक रहात असत. बायको पाठीशीच लागली तेव्हां नाइलाजाने रामराव बायकोला घेऊन त्या गावी गेले आणि त्या नातेवाईकाकडे उतरले.

"काही नाही हो, मला नेहमी अर्जीण होते. बायकोने पाठीस लागून औषधपाणी करायला येथे आणले!" रामराव आपल्या नातेवाईकाला म्हणाले.

जानकीबाई मध्येच म्हणाल्या—"दादा, आतां तुम्हीच सांगा, आजाराचं नाव सांगून हे चार घास तरी खातील तर शपथ! कोणी घरी पाहुणा आला ती यांच्याकडे पाहून अर्ध्यापोटी पानावरून उठून जातो! निदान त्यांच्यासाठी तरी यांनी पोटभर जेवायला नको का?"

ते ऐकून तो नातेवाईक हसत म्हणाला—"हे पहा, वहिनी? आतां मी तुमचा भोळसटपणा म्हणू का ह्याला? नाहीतर आजकाल संकोच करणारे नातेवाईक कोठे आहेत हो? माझं म्हणाल तर मी जेवतो ते मलाही पचत नाही. तरी आमच्या घरी येणारे नातेवाईक विचारून सांगून एक न एक पक्वान्न खाऊनच जातात आणि आमच्या हिचं म्हणाल, तर गवतसुद्धा चांगल्या मसालेदार भाजीसारखं चवदार होतं."

त्या दिवशी रात्री रामराव पोटभर, मागून मागून वाढवून जेवले. जानकीबाईने सुद्धा सैपाक फार चांगला झाला असल्याचं प्रत्यक्ष पाहिलं. परंतु कधी चार घास न खाणारा पती त्यांच्या घरी भुरके मारून ओरपून खात आहे, हे पाहून तिला आश्चर्याबरोबर वाईट वाटले.

"या गावी येतांच यांना कोठून एवढी भूक लागली, त्या परमेश्वरालाच माहीत! कधी असे जेवलेले मी पाहिलं नाही!" नवऱ्याकडे डोळे वटारून पहात जानकीबाई आपल्या नातेवाईकाला म्हणाल्या.

"हे पहा, हे सर्व आमच्या हिच्या हातचं कसब आहे! मध्यंतरी गोपाळ नावाचा एकजण आला होता, तो तसाच! दररोज तो काहीतरी पक्वान्न करायला सांगायचा." रामरावाचा नातेवाईक म्हणाला.

"कोण हो गोपाळ म्हणतां?" जानकीबाईनी आश्चर्यचकित होऊन विचारलं.

नातेवाईकाने गोपाळविषयीची माहिती सांगितली तीवरून त्यांच्या घरी आलेला गोपाळच यांच्या घरी येऊन काही दिवस राहिला आणि खाण्यापिण्याच्या बाबतीत त्यानं कोणत्याही प्रकारचा संकोच दाखविला नाही, हे जानकीबाईनी ओळखले.

तो नातेवाईक काही वेळ थांबून जानकीबाईना म्हणाला—"अजीर्णाचा आजार सांगून औषधाणी करण्यासाठी तुम्ही या गावी आलात, ही तर माझ्यामते तुमची फारच मोठी चूक झाली. मी कायमचा रोगी होतो किती औषधे केली. परंतु आमच्या सौभाग्यवतीने केलेल्या रुचकर पक्वान्नां मुळे मला चांगले पथ्य लाभले. येथेच राहिले तर रामरावांनासुद्धा चांगले पथ्य लाभेल."

हे सर्व ऐकल्यावर जानकीबाईना त्यांचा अपमानच झाल्यासारखे वाटले. त्या दिवशी रात्री त्या आपल्या पतीला



म्हणाल्या—"तुमचे नातेवाईक आपल्या बायकोची एवढी वाखाणणी करीत आहेत आणि तुम्ही माझ्याविषयी एक शब्द की कसे ते बोलला नाहीत की हो?" म्हणतां म्हणतां त्यांच्या डोळ्यांना पाणी आले.

"मी काय म्हणू म्हणतेस? माझा स्वभाव जात्याच संकोची. तो वाखाणणी करतो तशी वाखाणणी माझ्या बायकोची माझ्याकडून नाही व्हायची!" रामराव म्हणाले.

"तुम्हांला खरोखरचाच संकोच असेल तर जेवणाच्या वेळी तो नाही दाखविलात ते? पुन्हां मागून घेतलत की सर्व! घरी कधी असं केलत का?" बायकोनं विचारलं.

"त्याला कारण, खरे म्हणशील तर संकोचच तो तर आपल्या बायकोच्या सैंपाकाची एवढी वाखाणाणी करतो आहे. ती ऐकून गप्प बसणे योग्य होईल का? म्हणून मी भाजी एका वेळी वाढलेली पुन्हां मी मागितली." रामराव म्हणाले.

"ते सर्व काही नाही. तुम्ही मला दुध-भोळी मानून घालू नका. तो गोपाळ आणि आतां तुम्ही सुद्धा जाणूनबुजून या घरात माझी मान खाली करण्यासाठी हे सर्व नाटक खेळलात. तो आणि हे सुद्धा माझ्या नात्यातले नाहीत. तुमच्याच नात्यातले आहेत ना?" असे म्हणत जानकीबाई मुसुमुसु रडू लागल्या.

रामराव बायकोची समजूत घालीत म्हणाले—"तुला वाईट वाटेल म्हणून मी इतके दिवस बोललो नाही. मी खरोखर भिडस्त आहे हे मी आत्तां शाबित करून दाखवितो."

जानकीबाई लगेच आपले रडणे आवरून म्हणाल्या—"तुम्ही ते कसे सिद्ध करणार ते ऐकू दे तरी!"

रामराव एकदोन मिनिटे स्तब्ध राहून व स्वताला सावरून म्हणाले—"खरं सांगू, मला अजीर्ण नावाचा आजार नाहीच! तुझा सैंपाक मला आवडत नाही. ती गोष्ट मी सांगितली तर तुला वाईट वाटेल म्हणून तू वाढत होतीस ते तुझ्या करितां म्हणून चार घास गिळून तुला कळविल्या-शिवाय खानावळवाल्या बाईच्या घरी जाऊन पोटभर जेवत होतो. लग्नाच्या बायको जवळ मी भिडस्तपणा दाखवीत होतो, योबद्दल आणखी जास्त प्रमाण ते काय देऊ?"

जानकीबाईंचा चेहरा पांढरा फट्ट पडला दुसऱ्याच दिवशी दोघं आपल्या गावी निघून गेली. दोन दिवसांनीच जानकीबाईंनी एका उत्तम सैंपाकिणीला नेमले. ती सर्व तऱ्हेची पक्वान्ने करण्यात निष्णात होती त्यानंतर रामरावांनी त्याला अजीर्ण होत असल्याची तक्रार कधी बायकोजवळ केली नाही व ते व्यवस्थित घरीच जेवू खाऊ लागले.





# अराजक

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां उत्तर पांचाल देशची राजधानी कांपिल्य येथे पांचाल राज्य करीत होता. तो भोगविलासात बुडून गेला होता आणि नीति अनीतीचा विचार त्याच्या मनाला कधी शिवलाही नाही. त्याचं राज्य-कारभारात मुळींच लक्ष नसे. यथा राजा तथा प्रजा या म्हणी प्रमाणे राजा सारखेच त्याचे मंत्रीसुद्धा नीति अनीतीचा मुळीच विचार करीत नसत. प्रजेवर दिवसंदिवस कर भार वाढतच गेला. राज्यात सर्वत्र अराजक माजल.

राज्यात अराजकच माजल्यावर प्रजेच्या जीवनातही फार फेरबदल झाले. दिवसां राजाच्या शिपायांचा उपदव्याप आणि रात्री चोरांचा त्रास वाढतच गेला. म्हणून नागरिक आपल्या घरांना कुलुपे घालून आणि फाटकांवर कांटेरी झाडें घालून बायकापोरांना घेऊन रानात जाऊन राहू लागले. ते दिवसभर जंगलात रहात व रात्री आपल्या घरी येत.

अशा समयी बोधिसत्वानी नगरा बाहेरच्या तिदुक वृक्षाचे अधिष्ठान दैवत म्हणून अवतार धारण केला. राजा दरवर्षी त्या वृक्षाची पूजा करीत असे व त्यासाठी एक हजार माड (दोन रुपयांचं एक नाणं) खर्च करीत असे.

"बाप रे बाप! माझी इतक्या श्रद्धा-भक्तीने पूजा करणारा राजा अविवेकी-पणाने वागून आपल्या राज्यात अराजक माजवायला कारणीभूत व्हावा ना! याला सदुपदेश करणारा माझ्याशिवाय दुसरा कोण असू शकेल?" तिंदुक वृक्षाच्या अधिष्ठान देवतेला वाटले.

तो एक दिवशी रात्री राजा झोपल्यावर त्याच्या स्वप्नात येऊन म्हणाला—"राजा,



मी तिदुकदेव आहे रे! तुला काही उपदेश करावा म्हणून आलो आहे."

राजाने नम्रपणे नमस्कार करून विचारले—"देवा, कोणताही उपदेश करावा!"

"राजा, तू श्रद्धापूर्वक राज्य करीत नाहीस. म्हणून तुझं राज्य नष्ट होऊ लागलं आहे. जो राजा राज्यकारभार लक्ष देऊन श्रद्धापूर्वक पहात नाही तो इहलोकी स्वतःचे राज्य घालवून बसतो व परलोकी नरकवास उपभोगतो." तिदुकदेव म्हणाला.

राजाने विचारले—"तर देवा, मी आतां काय करू म्हणतोस?"

"उशिरां का होईना, यापुढे तरी तू राज्यकारभार तू स्वतःच पहात जा. राज्यतलं अराजक नाहीसं कर आणि राज्याचं रक्षण कर." असा उपदेश करून तिदुकदेव अंतर्धान पावला.

राजाच्या हृदयात ज्ञानोदय झाला. आपले राज्य कसं आहे हे स्वतः पाहायचे त्याने ठरविले. दुसऱ्याच दिवशी उजाडतांच त्याने आपल्या सर्व मंत्र्यांना बोलाविले आणि त्यांना त्याने आपापली कामे नियमितपणे करायला बजावले. नंतर त्याने आपल्या पुरोहितला बरोबर घेतले व पूर्वेकडच्या दाराने बाहेर वेष पालटून तो राज्याची पाहाणी करायला निघाला.

नगराबाहेर एका घरासमोर त्याला एक वृद्ध गृहस्थ भेटले. ते आपल्या घराला कुलूप लावून व दारावर कांटेरी झाडे उभी करून आपल्या बायको व मुलांसह जंगलात निघून गेले. काळोख पडल्यावर ते पुन्हां घरी परतले आणि दार उघडू लागले तेव्हां त्यांच्या गुडघ्याला एक काटा लागला. ते जमिनीवर बसले व गुडघ्यात मोडलेला काटा काढीत म्हणाले—"माझ्या गुडघ्यात हा कांटा मोडला तसा युद्धात आमच्या राजाच्या गुडघ्याला बाण लागो!"

तो शाप ऐकून राजाचा पुरोहित त्या गृहस्थांजवळ गेला व त्यांना विचारले—"काहो, तुम्ही तर फार वृद्ध दिसतां आहां. तुम्हांला बरोबर दिसत नाही म्हणून तुमचा पाय कांट्यावर पडला तर त्यात राजाचा काय हो दोष?"

"राजा अनीतिकर असल्याकारणाने त्याचे सर्व अधिकारी दुष्ट झाले आहेत. दिवसा राजाच्या शिपायांचा त्रास आणि चोरांचा सुळसुळाट; म्हणून दारांवर कांटेरी झाडे आडवी ठेवून प्रजा बायको पोरांसह रानात पळून जात आहेत. नाही तर माझ्या पायात हा कांटा मोडायचं कारणच काय होतं?" तो वृद्ध म्हणाला.

राजा व पुरोहित आणखी एका गावी गेले. तेथे त्यांना एक स्त्री भेटली. तिला दोन मुली होत्या. त्यांचं लग्नाचं वय झालं होतं, परंतु त्यांची लग्ने झाली नव्हती. त्यांना जंगलात घेऊन जाणं बरोबर वाटलं नाही म्हणून ती त्यांना घरातच ठेवी व घरात लागणारी लाकडे, पाने वगैरे तीच स्वतः आणून देई. ती यावेळी कसली तरी पाने काढायला म्हणून झाडावर चढली असतां खाली पडली व म्हणाली—"हा राजा मरत कां नाही? हा जिवंत असेपर्यंत मुलींची लग्ने सुद्धा होतील की नाही शंकाच!"

ते ऐकून पुरोहित जवळ जाऊन तिला विचारू लागला—"काय ग म्हातारे, कशी मूर्ख आहेस तू? राज्यातल्या प्रत्येक मुलीला नवरा शोधून देणं हेच का राजाचं काम आहे?"



"दिवसां राजाच्या शिपायांची भीती. रात्री चोरांची भीती! मुलींना वरशोधनाचं काम कसं व्हायचं?" ती बाई म्हणाली.

राजा व पुरोहित तेथून आणखी पुढे निघून गेले.

शेत नांगरीत असलेला एक शेतकरी त्यांना दिसला. तो नांगरीत असतां नांगराची दांडी खुसपली गेल्याने बैल खाली पडला. लगेच तो शेतकरी संतापून म्हणाला—"या पांचाळ देशाच्या राजाच्या छातीत भाला भोसकला जाऊन तो कां नाही पडत? आमचे कष्ट तरी थांबतील!"

पुरोहिताने जवळ जाऊन त्या शेतकऱ्याला विचारले—"काय रे, तुझ्या निष्काळजीपणा-

मुळे तुझ्या बैलाला लागलं व तो खाली पडला तर त्यात राजाची चूक काय ?"

"राजाची चूक नाही तर कोणाची हो? शासक दुष्ट असेल तर बाजूला असणारे वांचतील का? दिवसा राजाच्या शिपा-यांची भीती व रात्री चोरांची!

"माझी बायको माझ्यासाठी दुपारचे जेवण घेऊन येत होती, दुष्टांनी ते हिसका-वून घेऊन खाऊन टाकलं. पुन्हां संपाक करून ती केव्हा आणते व पोटाची खळगी केव्हां भरतो म्हणून मी पहात असतां सोन्यासारखा बैल दांडी लागून खाली पडला." शेतकरी म्हणाला.

तेथून राजा व पुरोहित निघाले ते राज-धानीच्या दिशेने चालू लागले. वाटेत त्यांना एक दृश्य दिसले. एका डबक्यात बेडूक होते. ते जिवंतच असतांना कावळे चोची मारून मारून त्यांना खात होते.

त्या बेडकांतला एक रागाने म्हणाला– "हे कावळे आम्हांला जिवंतपणीच जसे टोचून टोचून खात आहेत त्या प्रमाणे पांचाल देशाच्या राजाला व त्याच्या मुलांना त्याचे शत्रू टोचून लचके मारून खाऊ देत!"

"मूर्ख बेडका! लचके तोडून खाणाऱ्या कावळ्यांना तुम्ही काही करू शकत नाही म्हणून राजाला शाप देतो आहेस का?" पुरोहित बेडकाला म्हणाला.

बेडूक म्हणाला–"राजाच्या मनाचे समाधान करण्यासाठी पुरोहित असेच म्हणणार, त्यात आश्चर्य काय? देशात कावळ्यांना सुद्धा पोटभर खायला मिळत नाही म्हणून ते जिवंत बेडकांना खायला जातात. अशा देशाचा राजा मेला तर किती बर होईल!"

ते ऐकून राजा म्हणाला–"मला बेडूक सुद्धा शाप देत आहेत. आतां थांबण्यात अर्थ नाही. राजधानीत जाऊ या आणि जे अराजक आहे ते नेस्तनाबूद करू या!"

तेव्हांपासून राजा राज्यकारभारात लक्ष घालू लागला. राज्यात पुन्हां शांतता नांदू लागली व सुव्यवस्था स्थापित झाली. त्याने त्यानंतर अनेक वर्षे राज्य केले.



# चितोडची राणी पद्मिनी

तेराव्या शतकात मेवाडची राजधानी चितोड येथे होती. ती एक उंच डोंगरावर बांधलेल्या बळकट किल्ल्यात होती. किल्ल्याच्या चहूकडील प्रदेश हिरवागार व रमणीय होता. मेवाडच्या राजाला राणा म्हणत असत.



तेरावे शतक संपत आले असतां तेथे राणा रत्नसेन राज्य करीत होता, त्याची राणी पद्मिनी त्रिलोक सुंदरी होती. सर्व राजघराण्यात तिच्या सौंदर्याची ख्याती होती.





त्या काळात अल्लाउद्दीन खिलजी हा दिल्लीचा सुलतान होता. त्याने गुजरातचा फार मोठा भाग जिंकला. आपण फार मोठे विजयी राजे असल्याचा त्याला गर्व होता. त्याने दरबारात नृत्य करणाऱ्याच्या तोंडी पद्मिनीच्या सौंदर्याचे वर्णन ऐकले. संपन्न अशा राजस्थानाला जिंकण्याचे त्याने योजले व व्यूह रचना केली.



अल्लाउद्दीनाला राज्याकांक्षाकार आपण एक चक्रवर्ती झाले पाहिजे व राणी पद्मिनी आपली बेगम झाली पाहिजे अशी तो स्वप्ने पाहू लागला. तो एक मोठे सैन्य घेऊन तो चित्तोडचा किल्ला जिंकणे त्याला साध्य झाले नाही.

पराक्रमी राजपूत वीरांनी शौर्याने युद्ध करून अल्लाउद्दिनाला धूळ चारली. अल्लाउद्दीन आश्चर्य चकित झाला. त्याने त्यापूर्वी इतक्या शूर शत्रूला पाहिलेच नव्हते त्याला सैन्यासह माघार घ्यावी लागली.





त्याने युद्ध निराळ्यात्हेने करायाचे ठरविले. त्याने चित्तोडचा किल्ला ज्या डोंगरावर होता त्या डोंगरालाच वेढा दिला व किल्ल्यात रसद व शस्त्रास्त्रे जाण्या येण्याचा मार्गच बंद केला. अशा तऱ्हेने राजा शरण मागायला येईल असे त्याला वाटले. कित्येक महिने लोटले तरी तसे झाले नाही. आता पुढे काय या विचारात

शेवटी त्याने राणाकडे एक संदेश पाठवून त्यात फक्त एकदा राणी पद्मिनीला पहायला मिळाले तर वेढा काढून दिल्लीला जाईन असे लिहिले. आपला पराभव लपविण्यासाठी ही युक्ती अल्लाउद्दीनाने काढल्याचे राणाने ओळखले. त्याने मंत्र्यांचा व राणी पद्मिनीचा सल्ला घेतला.





अल्लाउद्दीनाने एका आरशात राणीचे प्रतिबिंब पहायला हरकत नाही असे ठरले. अल्लाउद्दीनाने ते मान्य केल्यावर त्याला त्याचा मान मरातब राखून एका खोलीत नेण्यात आले. तो एका खिडकी समोर असलेल्या आरशा समोर उभा राहिला.

त्या आरशाच्या पाठीमागे असलेल्या सरोवरात एक राजवाडा होता. राणी पद्मिनी गच्चीवरच्या अर्ध्याभिंतीजवळ येऊन उभी राहिली. त्यात राणीचे प्रतिबिंब पाहून अल्लाउद्दीन थक्कच झाला. थोड्याच वेळात ते प्रतिबिंबही अदृश्य झाले.





राजपुतांच्या संप्रदाया प्रमाणे राणा रत्नसिंग आपल्या पाहुण्याला निरोप द्यायला किल्ल्याच्या दारापर्यंत गेला. अल्लाउद्दीन वरकरणी मैत्रीचा हात पुढे करून राणाला बरोबर काही पायऱ्या उतरून किल्ल्याबाहेर घेऊन गेला.

अशा तऱ्हेने अल्लाउद्दीनाने त्याना डोंगराच्या पायथ्या पर्यंत नेले. तेथे झुडकाआड लपलेल्या अल्लाउद्दीनाच्या सैनिकानी अकस्मात पुढे येऊ राणा रत्नसिंहाला अटक केली आणि अल्ला-उद्दीनाच्या शिबिरात घेऊन गेले.





अल्लाउद्दीन इतका विश्वासघात करील याची कल्पनाही किल्ल्याच्या मुख्य-द्वारावर उभे असलेल्या सैनिकाना नव्हती ते थक्क होऊन पाहू लागले. सैन्याने अल्लाउद्दीनच्या शिबिरावर हल्ला केला. हल्ला केल्यास राणाला वध करण्याची धमकी देवविली. राजपूत सैनिक ते ऐकून काही करणे धोक्याचे समजून स्तब्ध उभे राहिले.

–(पुढच्या अंकात समाप्त)

# सैनिकाचा सदुद्देश

एका शहराकडे जाणाऱ्या राजमार्गाच्या बाजूला एका आमराईत एक साधू आपल्या शिष्यांना उपदेश करीत होता. शिष्यांपैकी काहीजण लक्षपूर्वक गुरु सांगे ते ऐकत होते. इतर काही तिकडे दुर्लक्ष करीत व कुजबुज करीत बसले होते.

त्याच वेळी तेथे एक घोडेस्वार युद्धात पाय तुटलेल्या स्थितीत शहराकडे जात होता. तो साधूला पाहून थांबला व ज्ञान बोध करीत होता तो ऐकू लागला.

गुरूच्या उपदेशाकडे दुर्लक्ष करणाऱ्या शिष्यांपैकी एकजण त्या सैनिकाला थट्टेत म्हणाला– "आमच्या गुरूचा महिमा फार थोर आहे! त्यांना विनंती केली तर ते तुझा तुटलेला पाय पुन्हा पहिल्यासारखा करतील असे तुला वाटते आहे का?"

तो लंगडा सैनिक त्या शिष्यांकडे शांतपणे पहात म्हणाला–"माझं आयुष्य कष्टाचंच आहे. कोणाच्या दयादाक्षिण्यावर जगायची माझी इच्छा नाही. मी येथे थांबलो तो साधू मला माझा पाय जसाच्या तसा करून देतील म्हणून नसून मी लंगडा असलो तरी सुखासमाधानाने जगायचं कसं या विषयी काही ज्ञानबोध करून माझ्या मनाला कदाचित धीर देतील या हेतूने. असे सांगून त्याने घोड्याला टाच दिली आणि पुढे निघाला.

ते ऐकून आपण किती मूर्खपणा केला असे वाटून त्या शिष्यांच्या माना लाजेने खाली झाल्या.





# नणंदेचा वांटा

चंद्रपुर येथे धनशेट नावाचा एक वाणी रहात असे. त्याच्या बायकोचे नाव लक्ष्मी होते.

धनशेटचे वय झाले तेव्हां त्याने आपला- सर्व व्यापार धंदा दोघां मुलांवर टाकला व बायकोला म्हणाला–"तू सुद्धां आतां संसाराची जबाबदारी सर्व सुनांवर टाक व माझ्याबरोबर चल. दररोज पुराण ऐकायला जाऊ या."

"चला, येते की! पुराण ऐकायला पैसे कां लागतात, मी नाही म्हणायला?" असे म्हणत ती त्या दिवसापासून दररोज सांबाच्या देवळात नारायण शास्त्र्यांचं पुराण प्रवचन ऐकायला जाऊ लागली.

पुराण सुरवातीपासून शेवट पर्यंत धनशेठ श्रद्धा व भक्तिपूर्वक ऐके, परंतु कधी-कधी तिला कंटाळा येई व परत जावेसे वाटे. तरी शेवटपर्यंत बसलं तर प्रसाद मिळतो म्हणून तो जाऊ देता कामा नये अशी मनाची समजूत घालून शेवटपर्यंत सहनशीलता दाखवून बसून राही.

प्रसाद म्हणून भिजवलेली मुगाची डाळ किंवा पपनसाची एखादी फोड मिळे किंवा केळ्याचे दोन एक तुकडे मिळत. ते ती संभाळून नेऊन आपली मुलगी रूपा हिच्या हातात ठेवी. नेहमी ती मुलीच्याच हातात देई, परंतु चुकून एखाद दिवशी सुद्धा सुनांना हाकमारून हे घ्या ग मुलींनो, म्हणून कधी त्यांना दिला नाही.

शेवटी एकदां धनशेट स्वतःच तिला म्हणाला–"कधी सुनांच्या हातावर प्रसाद तू ठेवीत नाहीस की ग! इतका पक्षपात सासू करते असं त्यांना नाही का वाटणार? सुनांना सुद्धां मुलीसारखं पाहिलं पाहिजे बरं का?" नवरा असं म्हणाल्यावर पुरुषांना सुद्धा आपलं गुपित कळलं वाटतं? सुनांना नीट पहात नाही, ही गोष्ट मुलांना कळली तर आपल्या विषयी त्यांच्या मनातला आदर कमी होईल, म्हणून देण्या घेण्यात जास्त सावध राहिले पाहिजे असं तिने ठरविले.

तिने तसा निश्चय केला त्याच्या दुसऱ्याच दिवशी नारायण शास्त्र्यांनी पुराण सांगतांना श्रीरामचंद्राच्या जन्माची कथा सांगितली.

"पुत्र संतान व्हावे म्हणून दशरथ राजाने पुत्रकामेष्टी यज्ञ केला तेव्हां होम कुंडातून अग्निहोत्राने प्रगट होऊन राजाला म्हटले–"राजा हे पायस (खीर) आपल्या राण्यांना दे. त्या गरोदर होऊन त्यांच्या पोटी पुत्र जन्माला येतील. असे सांगून देवाने खीर भरलेले एक पात्र दशरथाला दिले आणि अंतर्धान पावला. दशरथाने त्या खिरीचे दोन वाटे केले आणि एक पट्टराणी कौसल्या हिला दिला आणि लाडकी राणी कैकेयी हिला दिला. सुमित्रेला काहीच दिलं नाही. परंतु त्यात काय? कौसल्येने तिच्या अर्ध्या भागातला अर्धा भाग सुमित्रेला दिला. कैकेयीने तसेच केले. अशातऱ्हेने तिला शेवटी जास्त पायस मिळाले. सुमित्रेला दोन भाग मिळाले म्हणून तिला दोन मुलगे झाले. कौसल्येला आणि कैकेयीला एकेक मुलगाच झाला."



ही कथा ऐकून लक्ष्मीला एक गोष्ट चांगली पटली. दशरथाचे सुमित्रेवरच जास्त प्रेम होतं तरी पट्टराणी कौसल्येवर व लाडकी राणी कैकेयीवर जास्त प्रेम असल्याचे दर्शवून शेवटी खऱ्या लाडक्या सुमित्रेचाच जास्त फायदा करून दिला. चातुर्य असावे तर असं. तिला बोध मिळाला तो हा होता. तिने सुद्धा दशरथा सारखं चातुर्य दाखवून मुलीपेक्षां सुनांवर तिचे जास्त प्रेम आहे हे दाखविले पाहिजे!

त्या दिवशी पुराण संपल्यावर प्रसाद म्हणून प्रत्येकाला एकेक मोसंबे देण्यात आलं धनशेटने नेहमीप्रमाणे त्याला मिळालेलं प्रसादाचं फळ लक्ष्मीच्या हातात दिलं.

लक्ष्मीने घरी गेल्यावर नित्याच्या संवयी प्रमाणे ती फळे रूपाच्या हातात दिली नाहीत. मोठी सून सोनूबाई हिला बोलवून तिच्या हातात एक फळ दिले आणि दुसरी सून पुतळी हिला बोलावून तिच्या हातात दुसरे मोसंबे दिलं. दोन्ही मोसंबी दोन्ही सुनांना देऊन टाकली रूपाला काहीच दिले नाही.

दोघी सुना आश्चर्य चकितच झाल्या. दररोज रूपाला देत होत्या सासुबाई, आज आपल्या हातात कसा काय प्रसाद दिला?" असं त्यांनी स्पष्ट विचारलंही.

तेव्हां सासुबाई म्हणाल्या–"आतां पर्यंत आणलेला प्रसाद नेहमी एवढासा तर असे. तो तुमच्या हातावर ठेवला असतां तर हात चिकट झाले असते तोंड उष्टावण्या शिवाय पडजिभेला सुद्धा ते कळलं नसते. म्हणून पोरीच्या हातावर ठेवीत होते. आज पहिल्याने एकेक फळ हाती लागलं. म्हणून तुम्हांला दिलं."

"तसं ठीक आहे हो, पण वन्सना दिल्या शिवाय आम्हांला का?" दोघी सुनांनी विचारले. "वन्संना निराळावाटा कसला ग? दोघींनी अर्धा अर्धा दिला तरी पुरेकी!" सासू न अडखळता म्हणाली.

"होय सासूबाई, ते नाही सुचलं आम्हांला!" असं म्हणत सोनूबाईने व पुतळीबाईने आपल्यातला अर्धा अर्धा वाटा कापून रूपाला दिला.

लक्ष्मीने सुनांच्या हातात एकेक फळ देतांना धनशेटने पाहिल होते, तो व त्याच्या दोघां मूलांनी तिच्या औदार्याचं कौतुक केलं आणि निघून गेले. परंतु त्यानंतर काय झाल ते त्यांना कळलंच नाही.

लक्ष्मी आपला डाव छान साधला म्हणून मनातल्या मनात स्वतःची स्तुती करीत म्हणाली–"पुराण प्रवचन ऐकलं म्हणूनच मला ही युक्ती सुचली! पुराण प्रवचन ऐकावं असं थोरामोठ्यांनी सांगितलं ते उगीच का? असा फायदा होतो म्हणून तर ऐका म्हणतात!"





# चतुर गृहिणी

पति दिवाकर कामावर गेल्यानंतर पत्नी सुनेत्रा आपले घर आवरीत होती. नुकतेच त्या घरात आल्यामुळे घर भर पसारा पसरलेला होता.

इतक्यात 'करं करं' आवाज करून मधले दार उघडल गेले. एक बाई चौफेर नजर फिरवीत आत आली. ती म्हणाली–घाबरू नकोस मुली! माझे नाव पार्वतीकाकू आहे. मी येथेच शेजारच्या वाड्यात राहते. तुला तुझे नवे घर आवडले ना?"

सुनेत्राने आपल्या कुटुंबाविषयी काही माहिती पार्वतीकाकूस दिली. ती ऐकून त्या म्हणाल्या–"तुला काम उरकत नाही म्हणतेस, तू स्वयंपाक केव्हा करतेस? तर मग असे करू या, तू घर आवरण्याचे काम बघ, मी स्वयंपाक करते."

ते पाहून सुनेत्रास आपला भार हलका झाल्यासारखे वाटले. व तिने पार्वती काकूस स्वयंपाकची खोली दाखवली. पार्वती काकूने स्वयंपाक घराचा ताबा घेतला व त्या म्हणाल्या–"आता तुझ्या मामंजीसाठी वेगळा व आपल्यासाठी वेगळा असा दोनदा स्वयंपाक कशाला करायचा? त्यांचाही स्वयंपाक येथेच करून टाकते आपल्या स्वयंपाकात."

"ठीक आहे तसेच करा." सुनेत्रा म्हणाली.

सुनेत्राचा पति दिवाकर घरी येण्यापूर्वी पार्वती काकू स्वतःसाठी व आपल्या पतीसाठी भाज्या वगैरे सारा स्वयंपाक घरी घेऊन गेल्या. काही वेळाने दिवाकर घरी आला. त्या दोघांना पार्वती काकूनी केलेला स्वयपाक खूप आवडला. अशी शेजारीण मिळाल्याचा त्या दोघांना खूप आनंद झाला.

दुसऱ्या दिवशी शेजारी काम करण्याऱ्या मोलकरणीस सुनेत्राने विचारले-"तू आमच्या



घरी काम करशील का? तुला मी दहा रुपये पगार देईन."

त्या मोलकरणीने काम करण्याचे कबूल केलेच नाही. त्यावर आश्चर्याने सुनेत्राने विचारले–"ते काय?"

"या घरात राहणारे कुणीच दहा दिवसांच्यावर राहात नाहीत. अशा कामाला नमस्कार असो. थोडं लक्ष दिलेस तर त्या चोरट्या पार्वती काकूंची हकीकत तुला आपोआपच छान चांगली कळेल." ती मोल करीण म्हणाली.

तिच्या म्हणण्यावर विश्वास ठेवावा की न ठेवावा याचा विचार करीत ती स्वयंपाकघरात गेली व सर्व डब्यांची झाकणं काढून पाहिली. सर्व डब्यांतले निम्मे सामान नाहीसे झाले होते.

सुनेत्रा मनाशीच म्हणाली–"ती चोरटी आहे काय? पण तिला कसा धडा शिकवायचा ते आता मला बघावे लागेल."

दिवाकर कामावर जाताच पार्वती काकू आत आल्या. आल्या आल्या त्यांनी विचारले–"नव्या घरात तुला स्वस्थ झोप आली की नाही?" असे म्हणत म्हणतच ती आरशाजवळ गेली व तेथील खोबऱ्याचे तेल शक्य असेल तेवढे घेऊन तिने डोक्याला चोपडलं व म्हणाली–"आता पुन्हा घरी जाऊन चूल पेटवून त्यावर पाणी तापवण्याचा मला कंटाळा येतो आहे. तू चुलीवर पाणी ठेव पाहू. मी येथेच न्हाऊन घरी जाईन."

सुनेत्राने मुकाट्याने पाणी तापवले व न्हाणीघरात नेऊन ठेवले. तेथील शिकेकाईच्या पुडीमध्ये तिने तिखट मीठ मिसळून ठेवले व बाहेर निघून आली.

ती पूड लावून पार्वती काकूंनी स्नान केले. त्यांच्या अंगाचा प्रचंड भडका उडाला. वेदनेने आरडा ओरडा करीत त्या न्हाणी घराच्या बाहेर आल्या.

अतिशय भोळेपणाचा आव आणून सुनेत्रा म्हणाली–"मी मुद्दाम तयार केलेली ही पूड काही जणांना मानवत नाही असं दिसतंय."

तेथे स्नान केल्याचा पार्वती काकूंना पश्चाताप आला. घरी जाता जाता त्या सुनेत्रास म्हणाल्या–"आज मी कालवण करायचे विसरले आहे तेव्हा एका पातेल्यात थोडी भाजी भरून दे."

"माझा स्वयंपाक तरी तुम्हाला पचतो की नाही कोण जाणे." सुनेत्रा म्हणाली.

"म्हणजे काय? खाण्यासारखा नसलेला पदार्थ कोणीतरी करील का?" असे म्हणून पार्वती काकू खदखदल्या.

सुनेत्रा स्वयंपाकघरात गेली व तिने फोडणी घालून परतलेल्या भाजीत एरंडेल घालून ती एका वाटीत भरून पार्वती काकूंना दिली.

पार्वतीकाकू घरी निघून गेल्या.

दुसऱ्या दिवशी पार्वतीकाकू तिला म्हणाल्या–"धन्य आहे तुझ्या स्वयंपाकाची अजूनही तुझी भाजी मला पचली नाही."

एके दिवशी माझ्या नवऱ्याचे मित्रमंडळ घरी येणार आहे, असे सांगून ती सुनेत्राच्या घरातील घडीची खुर्ची घेऊन गेली ती चार दिवस झाले तरी आणून दिली नाही.

पाचव्या दिवशी संध्याकाळी सुनेत्रा पार्वतीकाकूंच्या घरी गेली व तिने विचारले–"आमच्या मोडक्या खुर्चीच्या आवाजामुळे तुमची झोपमोड तर होत नाही?"

आश्चर्याने पार्वतीकाकूंनी विचारले–"घडीची खुर्ची आवाज करते म्हणजे काय?"

"अरेच्चा! तुम्ही लक्ष दिलं नाही वाटतं! माझे सासरे जिवंत असताना नेहमी याच





खुर्चीवर बसत असत. ते मेल्यानंतर सुद्धा त्यांचं मन या खुर्चीत अडकलं होतं. त्यामुळे पुष्कळ वेळा ती खुर्ची रात्रीच्या वेळी आपोआपच हालत डुलत राहते." सुनेत्रा म्हणाली.

पार्वती काकूंनी एवढासा चेहरा करून ती खुर्ची तावडतोब सुनेत्राच्या बैठकीत नेऊन ठेवली.

त्या रात्री सुनेत्राने आपल्या पतीस पार्वती काकूंच्या साऱ्या करामती सांगितल्या. सर्व ऐकून दिवाकर म्हणाला–"तू तिच्यावर कुरघोडी करण्याऐवजी माफच करतेस. तिच्या लक्षात राहील असा धडा तिला शिकवायला हवा."

"ठीक आहे. ते शुभ कार्य मी उद्याच करते." सुनेत्रा म्हणाली.

दुसरे दिवशी दुपारी सुनेत्रा पुन: पार्वती काकूकडे गेली व म्हणाली–"काकू! आमच्या ह्यांना अगदी कशाची म्हणजे कशाचीच भीती नाहीय. पेटीत माझे सर्व दागिने आहेत, त्यांच्या जोडीला ह्यांनी माझ्या वन्संचे दागिनेही आणून ठेवले आहेत. काही नवीन नमुन्याचे दागिने ते माझ्यासाठी बनवणार आहेत म्हणे आणि आजकालचे दिवस कसे विचित्र आहेत. चोरांचा सुळसुळाट आला आहे."

"अगदी बरोबर बोललीस बरं! बरी आठवण केलीस. आमचे हे आज मित्राकडे झोपायला जाणार आहेत. इथे एकटी झोपण्याऐवजी मी तुझ्याकडेच झोपेन तू मधल्या दाराची कडी काढून ठेव." पार्वतीकाकू म्हणाल्या.

सुनेत्रा घरी गेली. तिला असे वाटत होते की पार्वतीकाकू तिच्या नसलेल्या दागिन्यांची तिच्या पतीच्या मदतीने चोरी करण्याचा प्रयत्न करील. तिने ही गोष्ट दिवाकरला सांगितली व रात्री जागे राहण्याचे सुचविले.

त्या रात्री सुनेत्राने झोपेचे सोंग घेतले होते. आपली तिजोरी असलेल्या खोलीत अपरात्रीच्या वेळेस एक काळी छाया येत असलेली दिसली सुनेत्रास. तो गृहस्थ पार्वतीकाकूंचा नवरा असल्याचे त्या दोघांनी ओळखले. सुनेत्रा मांजराच्या पावलांनी बाहेर गेली व त्या खोलीचे दार तिने अजिबात आवाज न करता बाहेरून बंद केले.

त्यानंतर ती तशीच पार्वती काकूंकडे गेली व त्यांना झोपेतून उठवून म्हणाली–"अहो काकू! बघा ना तिजोरी असलेल्या बैठकीत कोणीतरी चोर शिरला आहे. मी तात्पुरती बाहेरून् कडी लावली आहे. बाहेर जाऊन तुम्ही शेजाऱ्यांना वगैरे बोलावून आणा बरे."

ते ऐकून पार्वतीकाकूंच्या तोंडचे पाणी पळाले. आपली व आपल्या पतीची जी फजिती होईल तिची कल्पना करूनच त्यांचा थरकाप उडाला. तिने चटकन् सुनेत्राचे पाय धरले व ती क्षमा मागू लागली–"मला क्षमा करा. तो चोर दुसरा तिसरा कोणी नसून माझे पतीच आहेत. त्यांना या कामासाठी मीच तयार केले. दहा जणात आमच्यावर कृपा करून अपमान करू नका."

दिवाकर व सुनेत्राने त्या दोघांना सोडून दिले. यानंतर त्या दोघांना त्या वाड्यात राहण्याची इच्छा नसल्यामुळे पार्वतीकाकू आपल्या पतीसह रातोरात ते घर रिकामे करून कोठेतरी निघून गेल्या.

त्यानंतर दुसरे दिवशी, शेजारच्या घरी काम करणारी मोलकरीण आली व सुनेत्रास म्हणाली–"मालकीण बाई! मी मागे एकदा तुमच्याकडे काम करीत नाही म्हणाले होते; पण आता मी काम करीन. या घरात राहणारे सर्व भाडेकरू पार्वतीकाकूंच्या चोरटेपणास घाबरून पळून गेले. तुम्ही मात्र तिलाच घर सोडायला भाग पाडलेत यात काय रहस्य आहे हो?"

"यात रहस्य ते काय असणार. माझी बायको अतिशय चतुर आहे." हसत हसत दिवाकर म्हणाला.





# राजद्रोही

विशाल देशावर विजय नावाचा राजा राज्य करीत होता. या देशात नव्या इमारती बांधताना, तलाव बांधताना, व्यापारासाठी कालवे बांधताना जे खोदकाम होत असे तेव्हा विविध काळातील जुने शिलालेख सापडत असत. विविध काळा-तील असल्यामुळे ते शिलालेख वेगवेगळया भाषात असत.

हे शिलालेख राजभाषेत भाषांतरित व्हावेत यासाठी राजाने राजदरबारात त्या त्या भाषांवर प्रभुत्व असलेले पंडित व विद्वान नेमले होते. त्या शिलालेखांद्वारे राजकामास उपयोगी अशा कितीतरी गोष्टी राजाला समजत असत. कांही शिलालेखां-तून तर जागोजागी पुरून ठेवलेल्या गुप्त-धनाचा शोध लागत असे.

एकदा विशालदेशाची राजधानी कमला-पूर येथे रामाचे देऊळ बांधायचे राजाने ठरविलें देऊळ बांधताना पाया खणीत असतां सिंधी भाषेतील एक पुरातन शिला-लेख सापडला मंत्रीमंडळाने महाराजांना तो दाखविला.

महाराजांनी त्याची नीट पाहणी करून सांगितले की हा निश्चितच सिंधी भाषेतील शिलालेख आहे. मी लहानपणी गुरुकुलात असताना माझ्या बरोबर सिंध राज्याच्या सामंताचा पुत्र होता. म्हणून सिंधी भाषेच्या लिपीची मला माहिती आहे. पण सिंधी भाषेतून आपल्या राजभाषेत भाषांतर करणारा पंडित आपल्या दरबारात नाही.

मंत्री म्हणाला–"कांही हरकत नाही फारसी व सिंहल भाषेतून भाषांतर कर-णाऱ्या भूषण नावाच्या पंडितांना सिंधी भाषाही येत असणार!"

"भूषणला सिंधी भाषा येत असेल व तो आपल्या भाषेत भाषांतर करू शकेल.

श्री प्रभाकर

ते मला माहीतच नव्हतं." राजा म्हणाला.

"पण मला ही गोष्ट आधीच माहीत झाली होती. मी हा शिलालेख घेऊन तुम-च्याकडे येत असताना मला रस्त्यात भूषण भेटला व त्यानेच मला सांगितले की त्याला सिंधी भाषा येते." मंत्री म्हणाला.

राजाने मंत्र्यास विचारले–"असं! आपल्या राज दरबारातील विद्वानांविषयी कांही तक्रारी येत असल्याचे मी तुम्हाला पूर्वीच सांगितले होते. ते आपल्या विद्येचा व अधिकाराचा उपयोग स्वतःचा स्वार्थ-सिद्ध करण्यासाठी करतात! तुम्ही त्या विषयी काही चवकशी केली आहे का? त्या बाबत कांही प्रगती झाली आहे काय?"



यावर मंत्री स्मित करून म्हणाला–"ह्या सगळया तक्रारी आपल्या पंडितांचा मत्सर करणाऱ्या लोकांनी केलेल्या आहेत. यात काहीच अर्थ नाही."

"ठीक आहे! भूषण यांना एका आठ-वड्या नंतर मला भेटण्यास सांगा." राजा म्हणाला.

ठीक एक आठवड्यानंतर भूषण राजास भेटण्यास गेला. तेव्हा राजाने एका फड-क्यात गुंडाळलेले कांही ताम्रपत्र दिले. त्यावर कांहीतरी कोरलेले होते. राजा म्हणाला–"काल आपल्या राजवाड्यातील बागेत माळ्यास हे तुकडे सापडले. हे सुद्धा सिंध देशाच्या लिपीत आहेत असे मला वाटते यात काय लिहिले असावे, ते तुम्ही मला सांगा पहा."

भूषणने ते वाचले व तो म्हणाला–"महाराज! एका जमीनदाराने त्याच्या-नंतर त्याची इस्टेट त्याच्या मुलांनी कशी संभाळावी व वांटून घ्यावी, ते यावर सविस्तर लिहिले आहे."

"एवढंच! आता तुम्ही जाऊ शकता." राजा म्हणाला.

भूषण जाताच महाराजांनी मंत्र्याला बोलावले व तो म्हणाला–"आपल्या राज्याच्या दक्षिणेस जे स्मशान आहे तेथे एक भले मोठे वडाचे झाड आहे. तेथे

तावडतोब शिपायां पाठवा. तेथे भूषण आला तर त्याला कैद करा, म्हणावे."

मंत्री गुणसेनाचा आश्चर्ययुक्त चेहरा राजाच्या लक्षात आला. पण तो म्हणाला– "आधी मी सांगतो तसे करा, म्हणजे पंडिताविषयी येणाऱ्या तक्रारींचे रहस्य तुम्हांला समजेल. अशिक्षित मत्सर करणाऱ्या लोकाच्या तक्रारीतही काही अर्थ असतो हे तुम्हांला कळेल."

त्या दिवशीच संध्याकाळी मंत्री मुसक्या बांधलेल्या भूषण पंडिताला घेऊन राजाच्या समोर आला. तो म्हणाला–"महाराज! पंडित भूषण त्या वडाच्या झाडाखाली कुदळ, फावडे व पहार घेऊन आलेल्या स्थितीत आपल्या शिपायांना सापडला.

राजाने शिपायांना भूषणला कैदखान्यांत टाकण्याची आज्ञा दिली.

तो मंत्र्याला म्हणाला–"भूषण पंडिताने काही शिलालेखातील मूळ मजकूर लपविला व वेगवेगळ्या ठिकाणचे गुप्तधन काढून घेतल्याची बातमी मला समजली होती. माझा सिंध देशातील जुना मित्र काल आला. त्याच्या हातून 'स्मशानातील झाडाखाली एक हजार सुवर्णमुद्रा आहेत.' असे एका दगडावर मी लिहवून घेतले. ते माळ्याला सापडले असे मी भूषणला सांगितले व ते वाचण्यास सांगितले. त्याने सगळा मजकूर वेगळाच सांगितला पण ते गुप्तधन घेण्यासाठी तो स्मशानात गेला व तेथे त्याला कैद करविले.

ते ऐकून प्रधानास अतिशय वाईट वाटले व रागही आला. तो म्हणाला–"ह्या भूषणास आयुष्यभर कैदेत ठेवावयास हवे. आपल्या दरबारातील इतरांनाही धाक बसेल."

कधी कधी एखाद्यावर फार विश्वास ठेवला तर त्याचे दुष्परिणाम होण्याची ही शक्यता असते. म्हणून प्रत्येकाने, त्यातल्या त्यात राजकर्त्या पुरुषाने फार सावध राहिले पाहिजे. विजयने ती सावधगिरी दर्शविली होती.





# गणेश पुराण

होमाग्नीतून जन्मलेला भयंकर प्राणी अदृश्य होतांच काळाने विघ्नासुराचे रूप धारण करून कालपाश फेंकला. कालपाश गरगर फिरत प्रळयासारखा सर्व प्रदेशावर पसरला. अभिनंदनाने पराक्रम दाखवून त्याला तोडून टाकण्यासाठी यत्न केला. कालपाशाचे तांडव वाढतच गेल्याचे पाहून व सर्व प्राणिमात्रात हाहाकार उडालेला पाहून वसिष्ठादी सप्तर्षी व इतर ज्यांच्या हृदयात लोककल्याणाची चिंता होती अशा सर्व ऋषींनी मिळून ब्रह्मदेवाची प्रार्थना सुरू केली.

ब्रह्मदेव म्हणाला–"कालपाशातून कोणी ही सुटणे शक्य नाही. कालप्रभाव थांबवू शकणारा आणि कालाला आवरू शकणारा एकटा गणनायक आहे. त्यानंतर ब्रह्मदेवासह सर्वांनी मिळून जगतावर आलेले संकट टळावे म्हणून गणनायकाची प्रार्थना केली.

महागणपती स्वास्तिक पीठावर बसला व सर्वांना त्याचे दर्शन घडले. त्याने आपल्या हातातील पाश सोडला. गणेशाच्या पाशाने कालपाशाचे तुकडे तुकडे करून ते गणेशासमोर आणून टाकले.

कालाचा अशा तऱ्हेने पराभव होताच त्याने आणखी भयंकर अशा विघ्नासुराचे रूप धारण केले आणि कालदंड धारण करून त्याने प्रहार करायला सुरवात केली. गणेशाने त्यावर आपला अंकुश फेकला. तो अंकुश विघ्नासुराच्या कण्यातच शिरला. विघ्नासुराला अंकुश लागताच निरुपाय



होऊन इकडे तिकडे कोलांट्या खात, आतां विघ्नेश्वराच्या हातून आपली सुटका नाही हे ओळखून, त्याने गणेशाच्या पायावर लोटांगण घातले. त्याचा बंदी असल्यासारखा निश्चेष्ट पडला. गणेशाने आपल्या दोन्ही पायांनी एक दोनदां लत्ताप्रहार केला.

तेव्हां काळ विघ्नासुराचं रूप फेकून देऊन गणेशाचे पाय धरून विनवण्या करू लागला—"गणेशा! तुझ्या भयंकर विश्व पाशासमोर पृथ्वीवर फक्त सूर्योदय व सूर्यास्त समयी प्रगट होणारा माझा पाश कोठे? सर्व विश्वाला वश करू शकणाऱ्या तुझ्या अंकुशांसमोर माझा कालदंड काय टिकू शकणार? पर्वतासारख्या भव्य भुतांना तुझ्या इवल्याशा चिटुकल्या मूषकवाहनाने धुळीत मिळविले. तू विघ्नासुराला काबूत ठेवणारा विघ्ननाशक विघ्नेश्वर आहेस. देवा, तू मला क्षमा कर!" या शब्दात काळ गणेशाची प्रार्थना करू लागला.

गणेश त्याला रागावून म्हणाला—"काळा, इतरांची कामे आपल्या शिरावर घेण्याचे मनात आणून तू स्वतःचा जीव संकटात लोटलास. तू आपलं काम व्यवस्थित कर म्हणजे झाले."

काळाने दोन्ही कान धरले. तीन उठाबश्या काढल्या व तोंडात मारून घेऊन म्हणाला—"बुद्धि आली बुद्धि आली! माझी बुद्धी त्या इंद्राचं ऐकून गवत चरू लागली होती. पण आता ठिकाणावर आली! तुझ्या भक्तांच्या व तुझे स्मरण करणाऱ्यांच्या वाटेस मी कधी जाणार नाही. त्यांना आधी व्याधींचा त्रास होणार नाही." असे सांगून काळाने गणपतीचा निरोप घेतला.

गणपतीने काळाचा गर्वभंग करतांच काळाच्या पाशामुळे जमिनीवर पडलेले अभिनंदन महाराज वगैरे सर्व सजीव झाले व झोपेतून जागे झाल्यासारखे उठून उभे राहिले. त्यांच्यावर आकाशातून पुष्पवृष्टी झाली. तेव्हांपासून कोणतेही मंगल कार्य किंवा सत्कार्य करायचं झालं की रांगोळीचे



स्वस्तिक काढून गणपतीचे सांकेतिक रूप म्हणून हळदीची गोळी ठेवून तिची पूजा करण्याची रीत चालू झाली.

"कालपुरुषाचा गर्वभंग करून त्याला पादाक्रांत करणाऱ्या विघ्ननाशक गणनायकावर ज्यांचा पूर्ण विश्वास आहे ते कालप्रवाहाच्या विरुद्ध दिशेने पोहोत जाऊनही पाय रोवून उभे राहतात व त्यांना कार्यसिद्धी सहजी प्राप्त होते." असे सांगून पावन मिश्र गप्प झाले.

एके दिवशी एक लहान मुलगी पावन मिश्रांची करंगळी धरून त्यांना एका चित्राजवळ घेऊन गेली.

त्या चित्रात एक अत्यंत रूपवती मुलगी गणपतीच्या मूर्तीसमोर गुडघे टेकून नमस्कार करीत होती. पावन मिश्र तिची गोष्ट सांगू लागले. एका पुण्यवान दंपतीला गणपतीची आराधना केल्यावर प्रसाद म्हणून एक कन्यारत्न झाले. जन्मतांच ती मुलगी समोरच्या कोनाड्यातल्या गणेशमूर्तीकडे टक लावून पाहू लागली. ती आपल्याला बोलावतो आहे असे वाटून रडू लागली. काही वेळाने हंसू लागली. त्या मुलीचे नाव सुंदरी ठेवले. नावाला साजेल अशीच ती सुंदर होती. सौंदर्याबरोबर ती हुशार चतुर व प्रेमळही असल्यामुळे तिला सर्वजण ज्ञानसुंदरी म्हणू लागले.

तिच्या सौंदर्याची चर्चा जवळपासच्या पंचक्रोशीत होत असे. सर्व म्हणत की ती कोणी देवकन्या किंवा अप्सरा असावी. शापामुळे ती या मर्त्यलोकी आली असावी. तिच्याशी लग्न करून घ्या म्हणून मोठेमोठे श्रीमंत लोक मागण्या घालू लागले. राजेरजवाड्यांमध्येही तिचे पाणिग्रहण करण्यासाठी चुरस लागली. त्या देशाचा राजाच स्वतः तिला आपली राणी करून घेण्यासाठी आपल्या लव्याजम्यासह राजधानीहून निघाल्याची बातमी आली.

ज्ञानसुंदरी दररोज ज्या गणेशाची पूजा करी ती गणपतीची मूर्ती नदीच्या घाटावर होती. ती त्या गणेशमूर्तीसमोर गुडघे टेकून



बसे आणि डोळे मिटून म्हणे—"विघ्नेश्वरा! मी आपल्या शैशवावस्थेपासूनच तुझी आराधना करीत आले. लग्न करून संसार करण्याची मला इच्छा नाही. मला म्हातारी कर. मला ज्ञानसंपदेचा अनुग्रह कर. माझा जन्म सार्थक व्हावा, असं काही तरी काम माझ्या हातून घडू दे!" असं म्हणत ती ध्यान लावून बसली असतां तिचा काळाभोर अंबाडा चांदीसारखा चकाकू लागला. तिच्या सुंदर गालावर सुरकुत्या पडल्या. तिच्या कपाळावर सुरकुत्या आल्या. नदीवर जे कोणी आले ते तिचे ते विकृत रूप पाहून थक्कच झाले. एक सुंदर तरुणी एक म्हातारी आजी झाली.

"मुली, मुली, ज्ञानसुंदरी! हे असं काय ग झालं?" असं म्हणत रडत तिचे आई वडील आले त्यांना ती म्हणाली—"मी आतां मुलगी राहिले नाही. मी सुंदरी राहिले नाही, मी आजी झाले. तुम्हां सर्वांना आनंद व्हायला पाहिजे आणि तुम्ही असे रडतां काय? तुम्ही मला आपल्या पोटी जन्म दिलात तो सार्थक व्हावा असा गणपतीने मला आशीर्वाद दिला आहे. माझ्याहून जे अज्ञानी आहेत त्यांना मला माहीत आहे तेवढे ज्ञान मी त्यांना देईन. जे माझ्याहून ज्ञानवान आहेत त्यांच्याकडून शिकण्यासारखं असेल ते मी शिकेन. अज्ञान अवस्थेत जे आहेत ते वयाने किती ही मोठे दिसत असले तरी ते कुकुली बाळेच आहेत. ती सर्व माझीच मुले नातवंडे आहेत व मी त्यांची आजी आहे!"

"मी जन्मले तो हाच दिवस नाही का? हाच माझा वाढदिवस! मी आतां पायी तीर्थयात्रेला निघत आहे. मला सर्व आशीर्वाद द्या." असे म्हणत ती आजी झालेली सुंदरी उठली. तिने झाडाची एक काठी टेकायला म्हणून करून घेतली.

त्याच वेळी तेथे त्या देशाचा राजा आला. त्याला ती आजी म्हणाली—"प्रजेचे धन, प्राण व गौरव आणि त्यांच्या मुलींचे रक्षण करण्याचा भार तुझ्यावर आहे आणि तूच एका कन्येला उचलून घेऊन जायला आला आहेस का? गावे, घरे चोरून नेणारा तू चोर लुटेरा आहेस की राजा आहेस?" तिने राजाला विचारले.

राजा शरमिंदा होऊन अर्धमेला झाला. त्याने आपला किरीट व तलवार बाजूला काढून ठेवली व आजीच्या पायां पडून म्हणाला—"देवी, अव्वा! तुझ्या दर्शनाने माझे अज्ञान नाहीसे झाले. मी राज्यकारभार सोडून प्रजेचा सेवक म्हणून काम करतो."

अव्वा म्हणजे आजी तीर्थयात्रेला निघाली तेव्हां राजाने तिच्यासाठी एक पालखी व इतर सर्व तयारी करून दिली.

तेव्हां अव्वा सर्वांस नकार देत म्हणाली—"राजा, ज्यांना पायात घालायला चपला किंवा वहाणा देखील नाहीत अशा कष्टाने आयुष्य कंठणाऱ्या सामान्य प्रजेकडे मी पालखीत किंवा रथात बसून कोणत्या तोंडाने जाऊ आणि त्यांना ज्ञानबोध करू? तू प्रजेला विद्यादान कर आणि सुखी कर. तू आपले काम कर. मी सामान्य प्रजेसारखी सामान्य लोकात मिसळून त्यांची जी सेवा करता येईल ती करीत राहीन. विघ्नेश्वर व त्याचा धाकटा भाऊ सुब्रह्मण्यम् माझी सर्व काळजी वाहतील!"

अव्वाने काठी घेतली व पायी निघाली. ती ज्ञानपीठ नावाच्या एका मठात आली.



पीठाधिपतीला नमस्कार करून म्हणाली—"स्वामी! मला ज्ञानोपदेश करावा!"

पीठाधिपती संकोच करीत म्हणाला—"आई, तुमची स्त्रीजात, ज्ञानोपदेश घेतल्याचा तुम्हांला काय उपयोग?"

अव्वा म्हणाली—"पाणी आणि दिवा फक्त पुरुषां करितांच का, स्त्रीला काही उपयोगाचे नसतात का? त्यांना त्यांचा उपयोग करतां येणार नाही का? आंधळ्याच्या हातातला दिवा इतरांना वाट दाखवीत नाही का? प्राणिमात्रात 'मी' हे ज्ञान फक्त नरालाच असते का, की स्त्रीलाच असते? काहीच नव्हते ते सर्वच झाले शून्यातून जग निर्मिले गेले. चहूकडे आहे



ते एकच आहे, असे जन्माबरोबर म्हणत असतां ही कमी व जास्त योग्य व अयोग्य यांची निवड करणे फक्त ज्ञानी लोकांचेच काम का?"

पीठाधिपति नम्रपणे म्हणाला–"देवी! ज्ञानपीठावर मी नाही, तू असायला हवी होतीस!"

अव्वा–"ही पीठें आणि मठ हवेत कशाला? सर्वांना सहजी कळेल अशा तऱ्हेने जवळ जाऊन ज्ञानोपदेश करणं बरं नाही का? पंच पक्वान्ने, खीर, पुरी वगैरे राजभोग एकाला वाढण्यापेक्षा खाण्या-लायक जे असेल ते दहा जणांना वाटले तर काय हरकत?"

पीठाधिपती म्हणाला–"होय, मी त्याच प्रमाणे वागेन!" असे म्हणत मान वाकवून त्याने नमस्कार केला.

अव्वा अशीच पुढे जात असतां एका गोड पाण्याच्या विहिरीजवळ चार बायका पाणी काढून घेऊन जाण्याविषयी एक बाई काही सांगत होती व इतर ऐकत होत्या. ती अधिकारवाणीने म्हणत होती–"कोणी आधी आली किंवा मागाहून आली तरी मीच पहिल्याने पाणी काढणार. नंतर या बाई, नंतर या आणि त्यानंतर ती बाई!"

दूर एक मुलगी दीनवाण्या आवाजात ओरडत होती–"पाणी घाला बाई! घसा कोरडा पडला आहे!"

चौघी बायका एकदम ओरडल्या–"जा ग, दूर हो! इकडे जवळपास येऊच नकोस!" त्या किंचाळून तिला सांगत होत्या आणि ती दूर उन्हांतून चालत आलेली मुलगी जीव कासावीस झाल्यामुळे घेरी येऊन पडली.

त्याच वेळी अव्वाने पुढे जाऊन आपल्या झारीतील पाणी त्या बिचाऱ्या मुलीच्या तोंडात घातले व उरलेले पाणी स्वतः पिऊन तहान भागविली. ते पाहून त्या चौघीजणींनी तोंड फिरवून म्हटले–"काय ग बाई तरी! म्हातारे, तिला तू पाजलेस

त्यातलं उरलेलं तू पितेस? ती खालच्या जातीची आहे!"

अव्वा शांतपणे म्हणाली–"अहो बायांनो, मला तर मुळात कोठलीही जात नाही. त्या मुलीच्या व माझ्या शरिरात, आमच्या नाड्यात जे पाणी वाहाते आहे, ते एकच आहे!" असं म्हणत ती त्या बायकांच्या घागऱ्यांतलं पाणी पाहून चकित होऊन म्हणाली–"तुमच्या अंगात फक्त दूधच असतं असं वाटतं? मग तुम्हांला पाणी कशाला? प्यायला तर नाहीच ना? मग बायांनो तुम्ही दूधच प्या, पाणी आम्हांला सोडून द्या!" असे म्हणत आपला तांब्या भरून पाणी भरून घेतले.

त्या बायकांना म्हातारी म्हणाली त्यातले तत्व कळले व त्यांची बुद्धी ठिकाणावर आली.

अव्वा अशीच पुढे जात असतां एका गावी प्राण्यांचे बळी दिले जात होते. लोक घाबरून गेले होते आणि देवाची प्रार्थना करीत होते.

अव्वा त्यांना पाहून म्हणाली–"केवढा मोठा अन्याय चालविला आहे हा, माते! हे लोक स्वतः तर छान शिजवून मांस खातात आणि तुला मात्र, कच्चं रक्त पिऊन जगणाऱ्या क्रूर जनावरांसारखे, वागवीत आहेत. हे सर्व मातेचा अपमान करणारी मूलं झाली आहेत!"

"अहो नको, असं नका म्हणू! मातेला राग आला तर सर्वनाश करील!" असं त्यांनी म्हणतांच अव्वा म्हणाली–"लांच दिली नाही म्हणून कोणी आई झाली तरी मुलांना ठार करील का? तुम्ही उगाच भितां आहां. भयाला भक्ति मानता आहां! आपल्या वासना देवीवर लादतां आहां! तुमच्या मनात माते-विषयी खरी भक्ती ज्या दिवशी उत्पन्न होईल त्या दिवशी तुमच्या मनात भय म्हणून राहणार नाही! तुमच्यावर संकटे येणार नाहीत!" असे म्हणत तिने त्यांना समजेल अशा भाषेत भक्ति मार्गाचा उपदेश केला.





# चतुर चोर

फार पूर्वी अरबस्तानातील एका शहरात दोन चोर रहात असत. त्यां पैकी एक दिवसा चोऱ्या करी. तो लोकांचे खिसे कापी. दुसरा रात्री चोऱ्या करी. तो लोकांच्या घराच्या भिंतीला भोक पाडून आत शिरून मूल्यवान वस्तू चोरून नेई.

त्या दोघां चोरांचे प्रेम एका सुंदर मुलीवर होते व तिच्याशी लग्न करण्याची इच्छा दोघांच्याही मनात होती. तिच्यावर दोघांचेही उत्कट प्रेम असल्या कारणाने दोघांपैकी कोणाशी लग्न करावयाचं, याचा निश्चय करणे तिला कठीण वाटले. दोघे तिच्या पाठीस लागले की माझ्याशी लग्न कर, माझ्याशी लग्न कर, म्हणून तिने त्यांना एकदां सांगून टाकले–"तुम्ही दोघे ही चोऱ्या करून आपली उपजीविका चाल-वितां आहां. दोघे मला संभाळणार. परंतु तुमच्या पैकी कोण जास्त हुशार व चतुर आहे हे कळल्यावर मी त्याच्याशी लग्न करीन. म्हणून तुम्ही दोघांनी आपली हुशारी सिद्ध करा मग मी कोणाशी लग्न करणार हे ठरवीन."

म्हणून दोघां चोरांनी आपली हुशारी जास्त असल्याचे दुसऱ्याला सिद्ध करून दाखवायचे ठरविले.

खिसेकापू चोर म्हणाला–"मी पहिल्याने आपले चातुर्य दाखवितो, नंतर तू आपले चातुर्य मला दाखव. त्यानंतर आपणां दोघांत कोण जास्त चतुर आहे हे ठरवू."

रात्री चोरी करणाऱ्या चोराने त्या गोष्टीस होकार दिला. दोघे सराफ बाजा-रात गेले. तेथे एक सावकार, त्याला एका कर्जदाराकडून मिळायचं व्याज व मुद्दल वसूल करून चालू लागलेला दोघांना दिसला.

"त्या सावकाराला पहा, त्याच्या खिशात एक पिशवी आहे. तीत खूप पैसे आहेत.



"मी ती पिशवी काढून आणतो, पहात रहा." खिसेकापू चोर दुसऱ्याला म्हणाला.

ते ऐकून रात्रीच्या चोराला आश्चर्यच वाटले. खिसेकापू चोर सावकाराशेजारून चार सहाच पावले चालला असेल, त्याने सहज त्या व्यापाऱ्याच्या खिशातली पिशवी लांबविली. त्यात मोहोरा होत्या. ती पिशवी लांबवून तो आपल्या मित्राशेजारी परत येऊन चालू लागला.

"खरोखरच बाबा, तू अट्टल चोर आहेस खरा!" रात्री चोरी करणारा चोर म्हणाला.

परंतु खिसेकापू चोर म्हणाला—"माझी चतुराई ती पिशवी लांबविण्यात नाही. ही पिशवी माझीच आहे, हे न्यायाधिशाकडून म्हणविण्यात आहे. तू पहात रहा. मी तसं केलं नाही तर शिपाई मी चोरी केली हे सिद्ध करून मला तुरुंगात टाकतील. म्हणून मी हे पैसे माझेच आहेत हे मी आधीच सिद्ध करून दाखविणार आहे."

"ते शक्य आहे का?" रात्रीच्या चोराने विचारले.

"तू स्वतःच पहा ना!" असे म्हणत खिसेकापू चोर रात्रीच्या चोराला घेऊन एका गल्लीत शिरला. तेथे त्याने पिशवी सोडून तिच्यातल्या मोहोरा मोजल्या. बरोबर पांचशे मोहोरा होत्या. त्यातल्या दहा काढून त्याने आपल्या खिशात टाकल्या आणि खिशातलं एक तांब्याचं नाणं काढून पिशवीत टाकून ती पिशवी बांधून टाकली.

नंतर तो पुन्हां सराफ बाजारात गेला आणि त्या सावकाराच्या मागोमाग काही अंतर चालत राहून त्याने ती पिशवी सावकाराच्या खिशात घातली.

या वेळेपर्यंत सावकार आपल्या दुकानापर्यंत येऊन पोचला होता. इतक्यात खिसेकापू चोर मोठ्याने ओरडला—"चोर, चोर! पकडा!" आणि त्याने त्या सावकाराला पकडून दोन चार गुद्दे सुद्धा दिले.

त्या जागी पुष्कळ मोठी गर्दी झाली. खिसेकापू चोर लोकांना म्हणाला—"हाच तो चोर! आणि पहा कसा संभवितासारखा बोलतो आणि वागतो आहे तो!"

सावकाराचं तोंड पाहताच लोकांना चीड येतेच. म्हणून सर्व म्हणाले—"खेचा त्या बदमाषाला कोर्टात!" खिसेकापू चोराने त्याला धरून न्यायालयात नेले व न्यायाधिशाला म्हणाला—"या म्हाताऱ्याने माझी मोहरांची पिशवी लांबविली हो! आपण न्याय करून मला माझी पिशवी देववावी."

"चोरलेली पिशवी कोठे आहे?" न्यायाधिशाने विचारले.

व्यापाऱ्याने खिशात हात घालून पाहिलं तर पिशवी होती. सावकार घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला—"सरकार, ही पिशवी माझीच आहे! मी कर्ज वसूल करून येत होतो, तर हा माणूस भांडायला आला आहे."

न्यायाधिशाने विचारले—"ही पिशवी तुझीच असेल तर ह्या पिशवीत काय काय आहे, सांग पाहू!"

सावकार म्हणाला—"या पिशवीत बरोबर पांचशे मोहोरा आहेत, आणखी काही नाही!"

"नाही, खोटे! पिशवीत चारशे नव्वद मोहोरा व फक्त एक तांब्याचं नाणं आहे! हा चोर खोटं बोलतो आहे!" खिसेकापू चोर म्हणाला.

पिशवी सोडून पाहिली तर तीत चारशे नव्वद मोहोरा व एक तांब्याचं नाणं



निघालं. न्यायाधिशाने ती पिशवी खिसेकापू चोराला देवविली व सावकाराला शंभर फटक्यांची शिक्षा सुनावली.

पिशवी घेऊन पुन्हां रात्रीच्या चोराकडे येत खिसेकापू चोर म्हणाला—"पाहिलंस माझं चातुर्य!"

"होय बाबा, चोरी करण्यात तुझं चातुर्य वाखाणण्यालायकच आहे निःसंशय! आतां काळोख्या रात्री कशी चोरी करतो, हे मी आज तुला दाखवितो. त्यानंतर आपल्या पैकी जास्त हुशार कोण हे ठरेल!" रात्रीचा चोर म्हणाला.

त्या दिवशी रात्री एक प्रहर रात्र लोटल्यावर रात्रीचा चोर खिसेकापू चोराला



बरोबर घेऊन एक दोरीची शिडी खाकेत घालून राजवाड्याजवळ आला.

"म्हणजे, तू राजवाड्यातच शिरणार वाटतं? खिसेकापू चोराने घाबऱ्या आवाजात विचारले.

"होय तर! सामान्य घरात चोरी केली तर त्यात काय मोठेपण? असे म्हणत चोराने दोरीची शिडी राजवाड्याच्या चारी बाजूला असलेल्या कोटाच्या भितीवर फेंकली. ती शिडी भितीला अडकल्यावर रात्रीचा चोर शिडीवर चढू लागला व खिसेकापू चोराला शिडीवर चढून पाठोपाठ यायला सांगितले. खिसेकापू चोराच्या जिवात जीव उरला नाही.

दोघे राजवाड्याच्या आवारात पोचले. रात्रीच्या चोराने राजवाड्याचे एक दार वर उचलून बाजूला ठेवले आणि आत शिरला आणि राजाच्या झोपायच्या खोलीकडे निघाला. दोन्ही पायांना कापडे भरले असतां खिसेकापू चोर त्याच्या पाठोपाठ निघाला.

शैयागृहात राजा झोपलेला होता. एक गुलाम राजाचे पाय चेपीत पेंगत बसला होता. खिसेकापू चोराला पलीकडच्या खोलीत रहायला खूण करून रात्रीचा चोराने पायाच्या पंजांवर चालत जाऊन त्या गुलामाला पाठीमागून जाऊन धरले. एका हाताने त्याचे तोंड बंद केले आणि दुसऱ्या हाताने त्याला दोरीने बांधले. नंतर तोंडात बोळे कोंबून खोलीत एका कोपऱ्यात फेंकून दिले आणि स्वतः त्याच्या जागी बसून राजाचे पायचेपू लागला.

त्याने जाणून बुजून पाय जोराने दाबले म्हणून राजाची झोप मोडली. नंतर तो बारीक आवाजात म्हणाला—"महाराजांची झोप मोडल्यासारखी दिसते आहे. एक लहानशी गोष्ट सांगतो हां! आट पाट नगर होते. तेथे एक राजा होता. त्या गावात एक खिसेकापू व एक रात्री चोरी करणारा असे दोन चोर होते. त्या दोघांत कोण अधिक चतुर हा प्रश्न उभा राहिला.

पहिल्याने खिसेकापू चोर आपल्या मित्र चोराला आपले चातुर्य दाखवायला एका सराफ बाजारात घेऊन गेला." असे सांगत सर्व गोष्ट सांगितली.

शेवटी रात्रीचा चोर स्वतः महाराजांच्या झोपण्याच्या खोलीत शिरला आणि गुलामाला बांधून बाजूला टाकले आणि त्याच्या जागी स्वतः बसून मग राजाला विचारले—"महाराज; आपणच आतां सांगावे की या दोघां पैकी कोण जास्त हुशार आहे हो, खिसेकापू चोर की रात्री चोरी करणारा?"

ही सर्व गोष्टच आहे असे समजून राजा म्हणाला—"रात्री चोरी करणारा जास्त हुशार!" राजा म्हणाला. ते पलीकडच्या खोलीत उभा असलेल्या खिसेकापू चोराने ऐकले. राजाला चांगली झोप लागे पर्यंत चोर पुन्हां पाय चेपीत बसला आणि त्यानंतर आपल्या मित्राबरोबर राजवाड्यातून बाहेर आला.

दुसऱ्या दिवशी सकाळी राजा उठला व त्याच्या गुलामाला कोपऱ्यात बांधलेल्या स्थितीत पडलेला पाहिले. तेव्हां त्याला आठवले की रात्री आपण ऐकली ती गोष्ट नव्हती आणि आपल्याला गोष्ट सांगणारा आपला नोकर नसून रात्री चोरी करणारा चोरच होता. त्याच्या हुशारीचे राजा कौतुक करू लागला. त्यानंतर राजाने दवंडी पिटविली की रात्री राजवाड्यात जो चोर शिरला होता त्याला मी दंड तर करणारच नाही, उलट त्याला राजदरबारात नोकरी देईन.

ती दवंडी ऐकून रात्री चोरी करणारा चोर राजाला जाऊन भेटला राजाने वचन दिल्याप्रमाणे त्याला दरबारात नोकरी दिली.

राजाने स्वतःच रात्री चोरी करणारा जास्त हुशार असल्याचा निवाडा दिला होता व खिसेकापू चोराने तो ऐकला असल्याकारणाने तो त्या गोष्टीस नाकबूल करू शकला नाही. म्हणून रात्री चोरी करणाऱ्या चोराशीच त्याच्या प्रेमिकेने लग्न केले आणि मोठ्या हुद्यावर काम करणाऱ्या सरकारी अधिकाऱ्याची बायको झाली.













# चांदोवा

संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी

या महिन्याची वेताळ कथा "परक्याचे वैभव" ही आहे. माणसाने त्याला जी मिळकत आहे तीवर मनाचे समाधान करून घेऊन व आपल्या शक्ति व सामर्थ्यांच्या आधारे आपली मिळकत वाढविण्याचा प्रयत्न करणे शहाणपणाचे आहे. तसे न करितां एकदम श्रीमंत व्हायची हाव धरणे धोक्याचे असते, हे 'लोभाचा डोंगर' या गोष्टीवरून कळते.

## अमर वाणी

मातापितृभ्यां जामात्रा भ्रात्रा पुत्रेण भार्यया ।
दुहित्रा दासवर्गेण विवादं न समाचरेत ॥

[आई वडिलांबरोबर, जांवई, मुलगा, भाऊ, मुलगी व नोकर यांच्या बरोबर भांडण करू नये !]

वर्ष : ३२ डिसेंबर १९८२ अंक : ६

एक प्रत : १-७५ :: वार्षिक वर्गणी : २१-००



मैदानात घेऊन गेला. त्याला त्याने दोन कातड्याच्या पिशव्या दिल्या. त्यांपैकी एकीत प्यायचे पाणी भरून दिले व दुसरी रिकामीच होती. तो म्हणाला.

"गोपाळशेट, याच्या पुढे सर्व वाळवंटच आहे. तुम्ही त्या पायवाटेने चालत जा. दुपारच्या सुमारास तुम्हांला या वाळवंटाच्या मधोमध एक डोंगर लागेल. त्या डोंगराच्या गुहेत सोन्याच्या मोहोरा ढीगच्या ढीग दिसतील. या रिकाम्या पिशवीत त्या भरून घ्या. दुसऱ्या पिशवीतले पाणी तुम्ही परत येईपर्यंत तुम्हांला प्यायला पुरेल परत आल्यावर मी सोन्याने भरलेली अर्धी पिशवी घेईन बाकी तुमची !" गोपाळशेट आनंदाने दुपार होई पर्यंत लोभाच्या डोंगरापर्यंत पोचला पाण्याची पिशवी अर्धी रिकामी झाली होती.

डोंगरांतल्या गुहेतले सोने पाहून गोपाळशेट थक्कच झाला. त्याने हावरटासारखे रिकामी पिशवी भरुन सोने घेतले. नंतर तो विचार करू लागला की दुसऱ्या पिशवीतले पाणी ओतून टाकून ती पिशवी भरुन ही सोने घेऊन जावे, भिल्लाच्या वस्तीत पोचेपर्यंत तहानेवर थोडा ताबा ठेवला म्हणजे झाले.

त्या प्रमाणे त्याने पाण्याची पिशवी सुद्धा रिकामी करून घेतली आणि ती भरून सोने घेतले. त्याने दोन्ही पिशव्या खांद्यावर ठेवल्या आणि परत निघाला. खाली पाय व वर डोके उन्हाने तापत होते. तसाच तो काही अंतर चालून गेल्यांवर त्याला खूप तहान लागली. दोन पिशव्या दोन्ही खांद्यांवर होत्या. म्हणून खांदे दुखत होते. कोठे प्यायला थोडे पाणी मिळाले तर पहावे म्हणून गोपाळशेट चहूकडे नजर फिरवू लागला.

इतक्यांत त्याला त्याच वाटेने येणारा एक माणूस दिसला. त्याच्या खांद्याला एक पाण्याची सुरई लोंबकळत होती.

मोठ्या आशेने गोपाळशेट त्याच्या कडे पहात म्हणाला—"अहो, माझा घसा

तहानेने अगदी कोरडा पडला आहे. थोडे प्यायला पाणी द्याल का?"

"म्हणून तर आलों आहे! एक पेला भर पाण्याची किंमत दोन पेले सोने आहे. हवंतर देतो." तो माणूस म्हणाला.

गोपाळशेटने काही वेळ मागे पुढे करीत शेवटी तहानेने जीव कासावीस झाल्यामुळे दोन पेले सोने दिले आणि एक पेला पाणी प्याला. आणखी एका तासाभराने पुन्हां फार तहान लागली. त्याच वेळी आणखी एक माणूस त्याला दिसला. गोपाळशेटने त्याला ही पहिल्या माणसाला विचारले होते तसेच विचारले.

तो म्हणाला—"एक पेलाभर पाण्याला-चार पेले सोने द्यावे लागेल."

गोपाळशेट क्षणभर विचारात पडला. परंतु नाइलाजाने चार पेले सोने देऊन त्याला एक पेला पाणी मागून घ्यावे लागले.

आणखी काही अंतर चालून गेल्यावर पुन्हां जोराची तहान लागली. कोणी माणूस दिसतो का गोपाळशेट पाहू लागला. सुदैवाने एक माणूस दिसला. त्याला विचारतां तो एक पेलाभर पाण्याची किंमत आठपेले सोने सांगू लागला. गोपाळ-शेट म्हणाला—"एवढयाशा पाण्याची इतकी किंमत का? नको मला." आणि त्या माणसाला शिव्या देत पुढे निघाला. तो माणूस गोपाळशेटच्या मागे मागे येऊ लागला. गोपाळशेट थोडासा घाबरून त्या






[ १२ ]

[ भिल्ल नायकाने पाठविलेल्या दूताला अपमान करून नरवाहनाने त्याला परत पाठविल्या नंतर भिल्लाने युद्धाची तयारी सुरू केली. डोंगरी किल्ल्यात राहून तेथून गनिमी काव्याने युद्ध करायचे त्यांनी ठरविले. नरवाहनाने किल्ल्याला वेढा देण्यासाठी सैन्य पाठविले. युद्ध सुरू झाले. त्यानंतर···]

किल्ल्याच्या खालच्या भागात सुरू झालेली नरवाहनच्या सैन्याची गडबड आणि हत्तींचा चीत्कार ऐकून दोघे भिल्ल तरुण तटावर उभे राहून किल्ल्याच्या खालच्या भागाकडे पाहू लागले व ओरडून सांगू लागले—"शत्रू लांडग्यांच्या वस्तीपर्यंत येऊन पोहोचले आहेत. ते हत्तींवर आहेत." हे सांगत ते टाळ्या वाजवू लागले. मी धावत धावत ते दोघे तरुण होते तेथपर्यंत आलो.

असे सांगून शिवदत्त पुढे सांगू लागला. हत्तींवर बसून विजय गर्वाने नरवाहनचे सैनिक पुढेपुढे येत होते. त्यांच्या पाठी-मागून पायदळ सैन्य येऊ लागले. आम्हांला ते स्पष्ट दिसत होते. जवळ जवळ लांड-ग्यांच्या वस्तीच्या आसपासच भिल्ल तरु-णांनी त्या हत्तींवर झाडीच्या आडून आपले पाळलेले सिंह सोडले. भयंकर गर्जना करीत समोरून येणाऱ्या सिंहांना पाहून

हत्ती मागे फिरले आणि वाट फुटेल तिकडे पळू लागले. पायदळ सैन्य हत्तीच्या पायां-खाली तुडवले. आणि सिंहांच्या जबड्यात जाऊ नये म्हणून सैरावैरा पळू लागले.

"छान केलेस!" मी आपल्या शेजारच्या तरुण भिल्लांना म्हणालो.

"परंतु काय रे पुन्हां या सिंहांना आवरून शत्रूवर सोडायचे झाल्यास तुम्हांला सोडतां येईल का?" मी विचारले.

"सर्व सिंहांना पकडून पुन्हां ताब्यात आणणे सोपे काम नाही. काही सिंह जंगलात पळून जातील." ते म्हणाले.

ते ऐकून अशा तऱ्हेच्या युद्धावरचा माझा विश्वास थोडा कमी झाला. सुशिक्षित आणि शस्त्रधारी सैनिकांवर अशा सिंहा वाघांना सोडून काय फायदा? एक दोनदां शत्रु सैन्य पळून जाईल. परंतु पुन्हां पुन्हां असेच वाघसिंह येणार असतील तर त्यांचा बंदोबस्त करण्याची व्यवस्था करूनच शत्रू सैन्य पळून जाईल. परंतु पुन्हां पुन्हां असेच वाघसिंह येणार असतील तर त्यांचा बंदो-बस्त करण्याची व्यवस्था करूनच शत्रू स्वारी करील. वाघां सिंहांना मारून टाक-ण्याची योग्य तयारीसुद्धा करून येईल.

त्या दिवशी मी सूर्यास्त होईपर्यंत त्या जंगली प्रदेशात अशाच काही विचित्र विचित्र गोष्टी मी पाहिल्या. एका जागी नरवाहनचे सैनिक जमा होऊन खाण्या-पिण्यात गर्क होते. अशा समयी एकदम त्यांच्यावर एक टोपले येऊन पडले. झाडा-



वरून ते भिल्लांनी फेकले होते. तत्क्षण त्या टोपल्यांतून शेकडो लहान मोठे साप 'भुस्स' करीत बाहेर पडले आणि शत्रु सैन्यावर धावले. नरवाहनचे सैनिक आपा-पली शस्त्रास्त्रे जेथल्या तेथे टाकून देऊन जीव वांचवायला पळू लागले. साप जेथे जेथे बिळं दिसली त्यात शिरले, काही झाडावर चढून गेले.

अशा तऱ्हेचे युद्ध करून नरवाहनला जिंकणे शक्य नाही हे मी भिल्ल नायकाला त्या दिवशी रात्री सांगितले. एकाच वेळेसच उपयोगी पडणारी ही युद्ध तंत्रे वापरून लढाई जिंकणे कठीण आहे हे मी सांगित-ल्यावर वृद्ध भिल्ल नायकालाही ते पटले. रात्री बराच वेळ विचार केल्यावर मी एक गोष्ट मनानी ठरविली. भिल्ल नाय-काला मला शक्य झाले तेवढे सविस्तर समजावून सांगितले. शत्रु सैन्याला या भागात आकर्षित करून गनिमी काव्याने शत्रु सैन्याचा नाश करायचा. या किल्लयात राहून चौपट पांच पटजरी शत्रु सैन्य असले तरी त्याचा फडशा उडविणे तेवढी कठीण गोष्ट नाही.

आता शत्रूचा नाश करण्याची जबाबदारी माझ्यावर येऊन पडली. मी तेथे जमलेल्या सात आठ भिल्ल नायकांनाजवळ बोलावून पुढे युद्ध कसे करावयाचे हे सविस्तर समजावून सांगितले. शत्रू शक्तिशाली आहे, त्याच्याजवळ सुशिक्षित सैन्य आहे. परंतु डोंगरी किल्लयावर हत्तीचे व





घोड्यांचे सैन्य घेऊन येणे त्याला शक्य होणार नाही. म्हणून शत्रूला आपल्या पायदळ सैन्याचा उपयोग करूनच या पडक्या किल्लापर्यंत यायला ज्या वाटा आहेत त्या अडवून ठेवण्याचा निकराचा प्रयत्न केला पाहिजे. शत्रू वर चढून येऊ लागला की त्याच्यावर मोठमोठे दगड व खडक वरून ढकलले पाहिजेत. नंतर झाडांवर चढून आपल्या सैनिकांनी आपल्या बाणांनी शत्रु सैनिकांना टिपले पाहिजे. इतके करूनही शत्रु किल्ल्यापर्यंत येऊ शकला तर आपल्याला काहीच करता येणार नाही.

आतां मी दुर्ग रक्षणाचे काम करण्याची जबाबादारी घेतली म्हणण्यापेक्षा किल्ल्याच्या चारीबाजूच्या प्रदेशाचे रक्षण करण्याची जबाबदारी घेतली असे म्हणावयास हरकत नाही. या किल्ल्यात रक्षण करण्यासारखे काहीच नव्हते. परंतु आम्ही किल्ल्याच्या रक्षणासाठीच प्रयत्न करीत आहोत असे दाखवून किल्ल्यावर येण्याच्या वाटांवर आम्ही रहायचे ठरविले.

तीरंदाजीत निष्णात असलेल्या तरुण भिल्लांना मी झाडावर चढून वर येणाऱ्या वाटांचे रक्षण करण्यासाठी पाहाऱ्यावर नेमले. वृद्ध भिल्लांना मोठमोठ्या खडकां आड लपून शत्रूवर येतांना दिसला की अकस्मात त्यांच्यावर तुटून पडण्यास सांगितले.

सूर्य ठीक पश्चिमेकडे वळला त्यावेळी मी ठरविलेला युद्धाचा कार्यक्रम तयार झाला. सर्व धष्टपुष्ट भिल्ल सैनिक त्यांना आज्ञा दिल्याप्रमाणे जागोजागी खडकाआड जाऊन लपून बसले. त्याचवेळी शत्रूचे पायदळ सैनिक किल्ल्यावर येण्याच्या प्रयत्नाला लागले.

शत्रुसैनिक शिस्तीने त्यांच्या नायकाच्या आज्ञेप्रमाणे एका जागी जमा होण्यापूर्वीच मी झाडावर चढवून नेमलेल्या भिल्ल तरुणांनी शत्रूवर बाणांचा वर्षाव सुरू केला. कोणी माणूस तर दिसत नाही. आणखी बाण मात्र अकस्मात येऊन लागत [illegible]

परंतु त्यामुळे त्या सैन्यात गडबड मात्र फार उडून गेली. तरी काही शत्रु सैनिकांनी ज्या दिशेने बाण येत होते त्या दिशेला नेम धरल्याशिवायच बाण मारायला सुरवात केली.

त्याच वेळी नरवाहनचे काही सैनिक तलवारी उपसून डोंगर चढून जाऊ लागले. त्या सैनिकांवर मी जागोजागी नेमलल्या भिल्लांनी दगडा आडून हल्ला करून किंवा मोठ मोठे दगड व खडक ढकलून दिले. एक तर वाट चिंचोळी, आजू बाजूला सरकायला जागा नाही, म्हणून शत्रू सैनिक त्या दगडा खडकां खाली चेंगरून मरू लागले.

अशा तऱ्हेने युद्ध भयंकर रूप धारण करू लागले. हे युद्ध सुमारे चार पांच तास चालू होते, मध्यंतरी नरवाहनचे सैनिक पुष्कळसे डोंगर चढून पडक्या किल्ल्याच्या जवळपास येऊन दाखल झाले. झाडावर चढून बाण सोडणाऱ्या भिल्ल युवकांना खाली उतरवून मदतीला किल्ल्यावर आणणे अशक्यप्राय असल्याचे मला कळत होते. झाडावरुन विषारी बाण सोडणाऱ्या तरूण भिल्लाना ठार करण्याची एक नवीन युक्ती नरवाहनच्या सैनिकांच्या एका नायकाने अवलंबिली.



हत्तीवर चढून येणाऱ्या सैनिकांना त्या झाडांजवळ नेण्यात आले. माहूताने खूण करायची खोटी हत्ती आपल्या सोंडांनी झाडांच्या फांद्या धरून तोडून टाकू लागले. झाडाच्या फांद्या धडाधड खाली पडू लागल्या आणि त्या फांद्यांवर लपलेले भिल्ल तरुण जमिनीवर आदळू लागले. अशा भिल्ल तरुणांना शत्रु सैनिक भाल्यांनी किंवा तलवारींनी भोसकून ठार करीत होते, काही वेळ असेच युद्ध होत राहल्यावर सर्व भिल्लवीर नरवाहनच्या सैनिकांच्या हाती ठार तरी झाले किंवा जखमी झाले. आतां अडवणारे कोणी उरले नाही ही खात्री झाल्यावर नरवाहनचे

सैनिक टोळच्या टोळचांनी आपापल्या वाहनांवर किंवा पायी डोंगर चढून येऊ लागले.

हत्ती आणि घोडयांवर बसून डोंगर चढण्याचा त्यांचा प्रयत्न किती मूर्ख-पणाचा, होता, हे त्यांच्या डोक्यात थोडे उशिरा शिरले. मी तर आश्चर्य चकितच झालो. माहूतांच्या अंकुशांचा वार असह्य झाल्याने हत्ती वर चढण्याच्या प्रयत्नात कोणत्यातरी दगडावर पाय देत व घसरून पडत होते आणि घसरून डोंगरावरून खाली घसरत जाऊ लागले. त्यांचा भयंकर आवाज आसमंतात दुमदुमत होता आतां घोडयांची जी दुर्दशा झाली त्याचे वर्णनच करण्याची गरज नाही.

मी आपल्या अनुयायांसह जे जिवंत राहिले त्या भिल्लवीरांना बरोबर घेऊन किल्लयाच्या आश्रयाला धावलो. किल्लया-च्या दारावरच तो वृद्ध भिल्लनायक मला भेटला. तो म्हणाला–

"शिवदत्ता, आपण युद्ध जिंकणे शक्य नाहीसे दिसू लागले आहे." त्याच्या चेहऱ्यावर किंवा आपणांत मला त्या बदल दुःख किंवा भय मुळीच दिसले नाही. "समजा आपण हारलोच, तरी प्रतिकार केल्या शिवाय गुरां ढोरां सारखे आम्ही त्या नरवाहनांसमोर वाकलो नाही, ह्या विचारने आमची मान ताठ राहील! तेवढेचपुरे! या पडक्या किल्लयात शेवटची निकराची लढाई होईल तू आपल्या अनुयायांसह कोठे सुरक्षित जागी जावयाचे असल्यास अवश्य जावे, अशी माझी सूचना आहे!"

तो वृद्ध भिल्ल नायक हे म्हणाला त्याच वेळी किल्लयाच्या चारी बाजूच्या प्रदेशात नरवाहनच्या सैन्याच्या त्याच वेळी आरोळचा ऐकू येत होत्या. सर्वस्व पणाला लावून भिल्ल तरुणवीर किल्लयाच्या तटावर उभे राहून शत्रूशी युद्ध करीत होते भिल्ला नायकाने आतापर्यंत त्याच्या हातात जो अधिकार दंड होता तो दूर फेकला आणि तलवार उपसून शत्रूवर चालून गेला.

त्या वेळी जे युद्ध झाले ते वर्णनातीतच होते. तळहातवर प्राण घेऊन भिल्ला-युवकांनी आपल्या शौर्य व साहसाची शिकस्त करून शत्रु सैन्यांचा जणू नरसंहारच सुरू केला. परंतु शत्रुसैन्य दहापट तरी असेल, म्हणून शत्रुसैन्य भिल्ल तरुणांना मागे रेटीत किल्लयात शिरलेच.

मी आपल्या अनुयायांसह मागे फिरलो आणि तट ओलांडून बाहेर पडलो. वृद्ध भिल्ल नायकानं अगदी शेवटचे म्हणून जे म्हटले होते ते अद्याप माझ्या कानात निनादत होते. बहुत करून त्याला या वेळे पर्यंत वीरगती ही मिळाली असावी! मी मागे वळून किल्ल्याच्या तटाकडे पाहिले. एका पडक्या बुरूजावर तो शत्रूच्या कोंडीत सापडला होता. त्याचे ते युद्धोत्साहाचे परिपूर्ण रूप मला दिसले. तलवारीचे वार करीत तो आपल्या अनुयायांना प्रोत्साहन
















देत होता. त्याला नरवाहनचे पंचवीस एक सैनिक घेरून त्याच्यावर वार करीत होते व तो न कचरतां शौर्याने त्या सर्वांना तोंड देत होता, त्या वृद्ध भिल्ला नायकाचे शौर्य व साहस, निश्चयी स्वभाव मी जन्म भर विसरणार नाही. त्याची मला नेहमीच आठवण येत राहिल.

मी आपल्या अनुयायांसह डोंगर उतरून समुद्राच्या दिशेने धांवलो आतां या बेटावर राहणे कोणत्याही परिस्थितीत सुखाचे नाही घोक्याचेच आहे. हे मनाशी ठरविले. माझ्या भाग्याने एकदम पाठ फिरविली नाही याची जणू सूचनाच म्हणून समुद्र किनाऱ्यावर मला दोन पडाव दिसले. आपल्या अनुयायांसह मी त्या पडावांत बसलो आणि समुद्रात दिशेचे काही भान न ठेवतां निघालो. कसे व कोठे जायचं हे मला माहीतच नव्हते. वाटेत तुम्ही भेटलात. मंदरदेव महाराज अशी आमची कथा आहे! तुम्हाला ऐकूनच आश्चर्य वाटले असेल तो?"

"समरसेन आणि तू तुमच्या दोघांची कथा दोन निरनिराळया व अद्भुत कथाच आहेत!" मंदरदेव म्हणाला.

शिवदत्त त्यावर कांहीच बोलला नाही. उत्तरादाखल फक्त स्मित केले. इतक्यात आमच्या पडावांतील एक सैनिक उठून उभा राहिला आणि ओरडून म्हणाला– "ते पहा, तिकडे कसाला तरी उजेड दिसतो आहे!"

मंदरदेव त्या दिशेला पाहून म्हणाला– "शिवदत्त, ते कोणते तरी बेट असावे से वाटते! आपण या महासागरात दिशेचे काही ज्ञान नसतां जात राहण्यापेक्षां कोणत्या तरी बेटावर जाणे बरे होईल, नाही का?"

"होय, आपण आपले पडाव व नाव त्याच दिशेने नेऊया. ते बेट मनुष्य वस्तीला अनुकूल असेल तर हरकतच नाही. परंतु जर का ते एखादे भयंकर द्वीप निघाले..." शिवदत्त बोलतां बोलतां थांबला व थोडा हंसून म्हणाला.



# परक्याचे वैभव

हाती घेतलेले काम तडीस नेल्याशिवाय स्वस्थ न राहणें हा विक्रमादित्याचा गुण त्याने आपला हट्ट सोडला नाही. ते झाडाजवळ गेला झाडावरून प्रेत काढून ते खांद्यावर घेतले व नेहमीप्रमाणें मौन धारण करून स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतांत असलेला वेताळ विक्रमादित्याला म्हणाला–" राजा, कुणाच्या भल्या साठी तूं एवढे श्रम करीत आहेस हे तर मला ठाऊक नाही, पण हाती घेतलेले काम साधल्या नंतर ते हितकर होणार की त्रासदायक, याची कल्पना आधी करणें अवघडच असले तरी तुला सावध करण्यासाठी पितापुत्राची एक कहाणी सांगतो. लक्षपूर्वक ऐक." असे म्हणून वेताळ कहाणी सांगू लागला : गोविंदपुर नांवाच्या एका गांवी नारबा नांवाचा शेतकरी रहात असे. त्याची अतिशय सुपीक अशी दहा एकर जमीन



होती, रमाकांत हा त्याचा एकुलता एक मुलगा. गांवांतील इतर मुलांच्या मानाने रमाकान्ताला अभ्यासांत जास्तच गोडी होती. त्यामुळे वयांत येतायेताच त्याला गावांतील शहाणा, शिकला-सवरलेला अशी ख्याती प्राप्त झाली.

रमाकांताला शेती-वाडींत रस नव्हता, पित्याचे बोलणे दुर्लक्षून त्याने राजधानीच्या नगरींत जाऊन राजदरबारी नोकरी मिळविली लग्न सुद्धा केले.

वर्षामागून वर्षं सरली पण निदान बापाला भेटण्यासाठी म्हणून सुद्धा रमाकांत एकदांही गांवांकडे फिरकला नाही.

नारबा मात्र कुणी ओळखीपाळखीचा माणूस राजधानीच्या शहरीं जाणार असला की त्याच्याकरवीं मुलाला एकदां भेटून जाण्यासाठी गांवी येण्याचा निरोप पाठवीत असे.

रमाकान्त, वडिलांचा निरोप कळला की म्हणायचा–"त्या खेड्यांत काय पडले आहे? बाबांनाच इकडे येऊन रहायला काय हरकत आहे?"

अखेर मुलावरील प्रेमापोटी नारबा स्वतःच शहरांत जायला निघाला व त्याने ही गोष्ट गावांतील हीरालाल सावकाराला सांगितली नारबा आपला पैसाअडका हीरालाल जवळ जपून ठेवायचा.

नारबा गांवाला जाणार हे ऐकून हीरालाल म्हणाला–"राजधानीकडे जाण्यासाठी घाटाचा रस्ता सोडून दुसरी वाट नाही, घाटांत दरोडेखोरांची एक टोळी आहे. तुझ्या जवळचा पै-पैसा ते लुबाडून घेतील. तरी मी मजजवळची एक पेटी तुला देतो त्या पेटीचे झाकण उघडतांच त्यांतून एक विशिष्ट प्रकाराचा वायु बाहेर पसरतो व त्यामुळे आजू-बाजूला असलेले लोक मूर्छित होतात पण ज्याच्या तोंडात हिरड्याचे फळ असेल त्याच्यावर त्या वायूचा प्रभाव पडत नाही."

त्या पेटीची किंमत एक स्वर्ण-मुद्रा होती. नारबाने एक स्वर्ण-मुद्रा देऊन ती पेटी विकत घेतली. थोडे हिरडे विकत घेऊन ते सुद्धा थैलीत ठेवून नारबा राजधानीच्या शहराकडे निघाला.

वाटेने जात असता त्याची एका माणसाबरोबर गांठ पडली. त्या माणसाजवळ जड थैल्या होत्या, खांद्यावरुन एक बरेच मोठे गाठोडे घेऊन तो सारखा खोकत-खोकत चालून थकल्यामुळे झाडाखाली विश्रांती घेत असतांनाच तो नारबाच्या दृष्टीस पडला.

नारबाने त्याला खोकल्याची उबळ कमी व्हावी म्हणून एक हिरडा दिला. हिरडा चघळल्या बरोबर कांही क्षणांतच त्याचा खोकला छू-मंतर झाला.

ते दोघे थोड्या अधिक उत्साहाने व वेगाने तोंडांतील हिरडे चघळतच पुढे निघाले. बोलत-बोलत जात असतांना नारबाला कळले की त्या माणसाचे नांव रत्नसेन असून तो अतिशय धनाढ्य होता. जंगलाच्या मार्गाने प्रवास करण्याची ही त्याची पहिलीच वेळ, तो घोड्यावर स्वार होऊन मार्ग आक्रमित असतांना त्याला खोकल्याची असह्नीय उबळ आली तेव्हां घोड्यावरून उतरून फारच थकून तो एका झाडाखाली टेकलां असतां अचानक कुण्यातरी वन्य पशूची डरकाळी ऐकू आली त्यामुळे घाबरून लगाम झटकून घोडा उधळून पळून गेला.



अशा कष्टप्रद परिस्थितीत नारबाची गांठ पडल्यामुळे रत्नसेनाला फारच आनंद झाला होता.

घाटांतील एका वळणावर त्या दोघांना चार लुटारूंनी अडवले. आधी रत्नसेनाने आपली गांठोडी मोकळी केली. त्यांत बहुमोल रत्नें भरलेली होती. लुटारूंनी नारबाला त्याच्या जवळचा पैसा अडका काढण्याचा हुकूम केला.

हीरालाल कडून घेतलेली पेटी दाखवीत नारबा म्हणाला–"मजजवळ सुद्धा कांही बहुमोल रत्नें आहेत." व त्याने पेटीचे झाकण उघडले, क्षणार्धात ते चारही लुटारू मूर्छित होऊन पडले. या दोघांवर हिरड्या-









मुळे त्या वायूचा परिणाम झाला नाही. दोघांनी आपल्या सामानासह अतित्वरेने शहर गांठले.

रत्नसेन नारबाला आपल्या मनांतील कृतज्ञता व्यक्त करीत म्हणाला, आपण माझ्याघरी येऊन कांही दिवसतरी रहा. आपल्या घरी पाहुणचार घेण्याचा आग्रह करूं व लागला.

नारबा आपल्या मुलाला भेटण्यासाठी अधीर झाला होता, पण त्याच्याच्याने रत्नसेनाचे मन मोडवले नाही. तो त्याच्या घरी जाऊन राहिला.

रत्नसेनाच्या घरीं नारबाचे आदरातिथ्य अतिशय ऐश्वर्यानें होऊं लागलें. दोन सेवक अहोरात्र त्याच्या दिमतीस असत. पंच-पक्वान्नांचे जेवण व मऊ गाद्या-गिर्द्यांवर झोपणेंच नव्हे तर नारबाच्या मनोरंजना-साठी उत्तमोत्तम नाच-गाण्यांचे कार्यक्रमही होत असत.

अशा प्रकारे तीन दिवस गेल्यानंतर नारबानें रत्नसेनाजवळ आपल्या मुलाकडे जाण्याची इच्छा व्यक्त केली. तेव्हां रत्न-सेन म्हणाला—"तुम्हाला इथे कांही त्रास आहे का? तुमच्या मुलालाच इकडे बोला-वून घेण्याची व्यवस्था करीन, तुम्ही रहाल तितके दिवस तो सुद्धा इथेच राहील."

ही गोष्ट नारबाला पटली नाही व त्यानें मुलाकडे जाण्याचे ठरवले, तेव्हां शेवटी रत्नसेन म्हणाला—"ठीक आहे, तुम्ही मुलाकडे अवश्य जा, पण एक गोष्ट मानाल का, की एक दिवस मुलाकडे राहून जर तिथे बरे वाटले तर तिथेच रहा, पण जर बरे वाटले नाही तर मात्र अवश्य मजकडे या. तुम्हांला आग्रह करून भिडेस घालणें मला बरे वाटत नाहीं म्हणून मी तुमच्या घरी बोलवायला येणार नाही पण तुम्ही निरोप करतांच तुम्हांला आणण्यासाठी रत्नजडित पालखी पाठवीन, आपले घर समजून या."

"अवश्य," म्हणून नारबा मुलाकडे निघाला रत्नसेनानें त्याला पालखींत बसवून निरोप दिला.

घरासमोर, रत्नजडित पालखींतून वडि-लांना उतरतांना बघून रमाकान्ताला आश्चर्य वाटले. घरांत येऊन नारबाने त्याला सर्व हकीकत सांगितली.

नारबानें मुलाच्या घरांतील वैभव बघितले. घरांत लहान-मोठ्या कामासाठी दास-दासी आहेत. राजदरबारांतून कामाच्या निमित्तानें येणारी माणसं मोठ्या विनयानें हात जोडून मुलाशी बोलताहेत. मुलाचे जीवन सुखाचेच आहे!

नारबा मुलाच्या घरांत मनमोकळे पणानें हिंडला-फिरला, मुलाबरोबर सून-बाईबरोबर मन भरून बोलणे झाले. बरोबर आणलेला पैसा-अडका त्यांना दिला. दुसऱ्या दिवशी रमाकान्त वडिलांना म्हणाला—"एक दिवस मजकडे राहिलांत, आज रत्नसेनाला निरोप धाडून रत्नजडित पालखी मागवतां का?"

यावर नारबा म्हणाला—"वेड्या! स्वतःच्या गांवी, स्वतःच्या हक्काच्या घरांत मिळणारा आनंद दुसरीकडे मिळतो का? माझ्यामुळे रत्नसेनाची लक्षावधी रुपयांची मालमत्ता वांचली म्हणून त्याने माझा हा आदर-सत्कार केला. ते वैभव परक्याचे? स्वतःचे नसलेले वैभव कधी तरी कुणाला शाश्वत आनंद देऊं शकेल का?"

या नंतर आठवड्याभरांतच एक दिवस रमाकान्त नारबाला म्हणाला—"बाबा मी राजदरबारांतील जागेचा राजीनामा दिला



आहे. आपण आपल्या गांवी निघून जाऊं या!"

मुलाचा हा निर्णय ऐकून नारबाला अतिशय आनंद आला.

ही कहाणी सांगून वेताळ म्हणाला— "राजा! रमाकान्ताचे हे वागणें अविचारचे नव्हे काय? सहजा-सहजी प्राप्त न होणारी राजदरबारची नौकरी त्याने मिळवली होती. त्यामुळे त्याला पैसाच नव्हे तर प्रजेकडून मान-मरातब सुद्धा मिळत होता. अशा परिस्थितींत, नौकरी सोडून स्वतःच्या गांवी जाऊन राहण्याचा निर्णय अविचार-पूर्णच नव्हे तर मूर्खपणाचाच नव्हे काय? माझ्या या प्रश्नाचे उत्तर माहीत असून सुद्धा तू न दिलेस तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होऊन तुझ्या पायावर पडतील."

यावर विक्रमादित्य म्हणाला—"रमा-कांताचा निर्णय अविचारी पणाचा किंवा मूर्खपणाचा नव्हे तर विवेकपूर्णच होय. कारण, स्वतःमुळे रत्नसेनाला पुष्कळ लाभ झाला असला तरी त्याने देऊ केलेल्या वैभवाचा, मानाचा नारबाने अव्हेर केला होता कारण ते "परक्याचे वैभव" होते. ही गोष्ट नारबाने रमाकांताला सुचवली होती. त्यांतील गर्भितार्थ रमाकांतला कळला होता, राजदरबाराची चाकरी करतांना मिळणारे वैभव व मानमरातब स्वतःचा नव्हे हे त्याने ओळखले. कधी अचानक राजाचा रोष झाला तर नौकरी तर सुटूं शकतेच पण नौकरी बरोबरच मिळणाऱ्या आदराला पारखे होऊन अप-मानाचे दुःख सहन करावे लागेल हा विचार रमाकांतानें केला होता. म्हणूनच स्वतःच्या हक्काच्या गांवी असेलेली शेती करून कशाही प्रकारची काळजी व व्याप नसलेले सुखी जीवन जगण्यासाठी हा निर्णय पूर्ण विचारांती घेतला होता."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हां झाडास लोंबकळूं लागला.

(कल्पित)





# मत्सराचे फळ

अमरेन्द्रपुरचा राजा विजयकांत याची राणी कांचनमाला हिजकडे अतिमौल्यवान असा एक रत्नजडित कंबरपट्टा होता. एके दिवशी रूपवती कांचनमाला हा पट्टा आपल्या नाजूक कंबरेला बांधत होती. तेव्हां जुना झालेला असल्या कारणाने तो तुटला.

कांचनमाला देवीला हा आवडत असे म्हणून तो तुटल्यामुळे तिला फार वाईट वाटले. तिने ही गोष्ट आपल्या नवऱ्याला सांगून एखाद्या कुशल सोनाराकरवी कंबर-पट्टा जोडवून घेण्याची इच्छा व्यक्त केली.

राजा विजयकांतने ही जबाबदारी आपल्या मंत्र्यावर सोपवली. मंत्र्याने चौकशी केली तेव्हां मणिभूषण हा एक कुशल सोनार असल्याचे त्याला कळले. इतर बरेचसे सोनार हे काम आपल्याला मिळावे म्हणून मंत्र्याला भेटून गेले होते. पण मंत्र्याने या कामासाठी मणिभूषणाचीच निवड केली व कंबरपट्टा त्याला देऊन एका आठवड्यांत हे काम पूर्ण करावयास सांगितले.

मणिभूषणाला महाराणीच्या दागिन्याचे काम मिळाल्याचे कळल्यामुळे मकरभूषण नांवाच्या सोनाराला हेवा वाटूं लागला कारण राजमहलांत दाग-दागिने घडवण्याचे काम अधून-मधून त्याला मिळत असे, मकर-भूषणच्या कारागिरीबद्दल कांही दिवसांपूर्वी राणी सरकारने नाक मुरडले होते ही गोष्ट मंत्र्याच्या लक्षांत होती म्हणून यावेळी कंबरपट्ट्याच्या बाबतीत त्याला कळवण्यांत सुद्धा आले नव्हते.

मणिभूषणाने कंबरपट्टा दुरुस्त करून दोन आठवड्या नंतर मंत्री महोदयांजवळ दिला. मध्यंतरी आठवडाभर त्याची प्रकृती बरी नसल्यामुळे काम पूर्ण करण्यास एक आठवडा उशीर झाल्याबद्दल त्याने मंत्र्याकडे माफी मागून घेतली.

राणी कांचनमालेस, मणिभूषणाची कारागिरी बघून आश्चर्य वाटले. इतक्या जुन्या कंबरपट्टास त्याने नुसते दुरुस्तच केले नव्हते तर अगदी नव्यासारखे केले होते. राजाने त्याला एक हजार वराह देऊन त्याच्या कार्यकुशलतेचा गौरव केला.

यामुळे तर मकरभूषणाचा मत्सराग्नि जास्तच भडकला. एके दिवशी त्याने राजाची भेट घेतली व म्हणाला–"महाराज, मणिभूषणाने महाराणी सरकारचा कंबरपट्टा एका आठवड्यांत परत केला नाही. याचे कारण आत्तांच कळले आहे. ह्याची बायको एक आठवडाभर राणी सरकारचा कंबरपट्टा घालून मोठ्या दिमाखाने मिरवत होती. राणीसरकारचे दागिने एका य:कश्चित् बाईने वापरणें हा अक्षम्य गुन्हा नाही काय?"

हे ऐकून राजा विजयकांत फारच संतापला, पण घाईने निर्णय न घेता मकरभूषणाने सांगितलेल्या बातमीतील खरे खोटेपणाचा पत्ता लावण्याची कामगिरी त्याने मंत्र्यावर सोपवली.

दुसऱ्या दिवशी मंत्र्याने राजास भेटून निवेदन केले–"महाराज, मणिभूषण आणि त्याची बायको निरपराधी आहेत हे निस्संदेह खरे आहे. मकरभूषणाने केवळ मत्सरापोटी केलेल्या या खोट्या आरोपाबद्दल त्याला शंभर फटक्यांची शिक्षा देण्यांत यावी."

राजाने विचारले–"मणिभूषण निरपराधी आहे हे कशावरून ठरवण्यांत आले आहे? त्याचा निर्दोषीपणा सिद्ध करूं शकाल काय?"

मंत्र्याने लगेच एका शिपायांकरवीं मणिभूषणास निरोप पाठवला–"पत्नीस राणीच्या महाली घेऊन यावे."

थोड्याच वेळांत आलेल्या मणिभूषणाच्या पत्नीस बघतांच महाराणीनेच नव्हे तर तिच्या दासींनी सुद्धा आपले हंसू महत्प्रयासाने दाबले. कारण ती अतिशय लठ्ठ होती.

केवळ मत्सरापोटी मणिभूषणावर खोटा आरोप लावणाऱ्या मकरभूषणास शंभर फटक्यांची शिक्षा ठोठावण्यांत आली.



# न्यायघंटा

चंपक देशाचा राजा शूरसिंह न्यायी म्हणून प्रसिद्ध होता. त्याने राजमहालाच्या प्रवेशद्वारापाशी एक न्यायघंटा लाविली होती. ज्याच्यावर अन्याय झाला असेल अशा कुण्याही नागरिकाला अन्याया विरुद्ध दाद मागण्यासाठी ही घंटा वाजवावयाची मुभा होती. घंटेचा आवाज ऐकून राजा बाहेर येऊन तत्काळ न्यायदान करीत असे.

वीस वर्षांपूर्वी तपश्चर्या करण्यासाठी हिमालयांत गेलेले शूरसिंहाचे गुरु परत आले होते. राजा शूरसिंहाने त्यांना आपल्या राजवाड्यावर सन्मानपूर्वक बोलाविले होते. तो त्यांना आपल्या शासनासंबंधीची सविस्तर माहिती देत होता.

त्याचवेळी राजमहालाचा पर्यवेक्षक अधिकारी तिथे येऊन म्हणाला–"महाराज, न्यायघंटा फारच झिजली असल्यामुळे तिचा आवाज नीट येईनासा झाला आहे. नवी घंटा लावणें आवश्यक झाले आहे."

"देशांत न्याय घंटेची आवश्यकता नसलेला नागरिक दिसेनासा झाला आहे त्यामुळेच न्यायघंटा लवकर झिजत आहे." पर्यवेक्षक म्हणाला.

"तर मग यावेळी चांगल्या प्रतीचे धातु वापरून थोड्या मोठ्या आकाराची घंटा तयार करवून घ्या," राजाने आज्ञा दिली.

त्यांच्या या संवादावर हंसत गुरु म्हणाले–"राजा! आतां लोकांना गरज न्यायाची आहे, न्यायघंटेची नव्हे! देशांत किती न्यायालयं आहेत, किती बंदिशाळा आहेत, किती दवाखाने आहेत; याला महत्व नसते लोकांना त्यांची किती कमी गरज भासते व ते किती सुखी होतात याला महत्व असते."

गुरुचे शब्द ऐकून राजाचे डोळे उघडले, त्याला आपल्या शासनांतील न्यून कळले.





# काजीची युक्ती

एका नवाबाच्या हाताखाली एक वजीर होता. त्याने एके दिवशी एका अत्यंत रूपवती गुलाम स्त्रीस विकत घेतले. ही गोष्ट नवाबास कळली व त्याच्या मनांत तिला बघण्याची अनावर इच्छा झाली. त्याने वजिराकडे निरोप पाठवला—"आज रात्री मी आपल्या घरी खाना घेण्यास येत आहे!"

वजिराने नवाबासाठी शाही मेजवानीचा बेत केला. उंची खाद्यपदार्थ व मद्याची व्यवस्था केली. मद्य पुरवणारी साकी म्हणून आपल्या नव्या दासीला ठेवले. खाना आटोपून नवाब व वजीर मद्याचा आस्वाद घेत बोलत बसले. साकी मद्याचे प्याले भरून देत होती.

अचानक नवाब म्हणाला—"वजीर साहब, तुम्ही मला तुमची ही गुलाम दासी विका, तुम्ही जो दाम दिलाय याच्या दुप्पट रक्कम मी तुम्हांला देईन."

"गुस्ताखी माफ असावी हुजूर!" वजीर अत्यंत विनयाने म्हणाला—"या दासीला विकण्याचा माझा मुळीच मानस नाही."

"तर मग, मला ही मुलगी नजराणा म्हणून द्या." नवाब म्हणाला.

भीड न बाळगता वजीर म्हणाला—"तसाही माझा मुळीच विचार नाही सरकार!"

वजिराचे असे उद्धटपणाचे वागणे बघून नवाबास भयंकर संताप आला. संतापाच्या भरांत तो म्हणाला—"जर तू मला ही दासी विकत अथवा भेट म्हणून देणार नसशील तर अल्लाची कसम मी माझ्या बेगमला तलाक देईन."

नवाबाची शपथ ऐकून वजीर ही हट्टास पेटून म्हणाला—"मी माझ्या बायका-मुलांस सोडून देईन, पण ही दासी तुम्हांला विकणार नाहीं, देणार नाहीं. जर माझे म्हणणें खोटें झाले तर मी खुदाच्या दरबारी गुन्हेगार झालो, समजा."

दोघांनी ही जिभेला हाड नसल्याप्रमाणें इरेस पडून आधी शपथा घेतल्या. नंतर दोघांनाही पश्चात्ताप होऊं लागला.

"आतां काय करावे?" नवाबाने म्हटले—"आपल्या दोघांच्याही शपथा न मोडतां या पेचांतून सुटण्याचा मार्ग काय?"

"या पेचांतून सुटण्याचा मार्ग एकटा काजीच सुचवूं शकेल, हुजूरांचा हुकूम असेल तर त्याला येण्याचा निरोप पाठवीन." वजीराने नवाबास म्हटले.



नवाबाने, "ठीक आहे!" म्हणतांच वजिराने काजीकडे तांतडीचा निरोप पाठवला. काजी आला. याने समग्र माहिती ऐकली व म्हणाला—"ही कांही फार मोठी समस्या नव्हे. वजिराने नवाबास अर्धी दासी विकावी व अर्धी "नजराणा" म्हणून द्यावी, म्हणजे हा प्रश्न सहज सुटेल."

ही युक्ती ऐकून नवाबास फारच खुशी झाली, "वाह, बहोत खूब." तो म्हणाला—"अजून एका बाबतींत आपल्या सल्ल्याची गरज आहे मौलवी साहब, या मुलीची गुलामगिरींतून सुटका झाली तरच मी हिला माझ्या जनानखान्यांत सामिल करूं शकेन आणि कायद्यानुसार गुलामगिरींतून मुक्त होण्यास ही मुलगी एका पायावर तयार होईल. तरी या बाबतींत एखादा सुलभ उपाय लवकर सुचवा.

काजीने आपल्या टकलावरून हात फिरवीत क्षणभर विचार केला व म्हणाला—खाविंद, यासाठी एकच सोपा उपाय आहे. तो म्हणजे, जर आतां हिचे कुणाबरोबर तरी लग्न लावून दिले तर तत्क्षणीं हिची गुलामगिरींतून मुक्तता होईल. नंतर लगेच त्या माणसाकरवीं हिला तलाक देववून, मर्जीप्रमाणें या मुलीस आपल्या जनानखान्यांत भरती करता येईल."

"बहोत अच्छे, वजीर साहब, एखाद्या नोकराला बोलवा." नवाब म्हणाला.

वजिराने आपल्या एका नौकराला बोलावले. काजीने त्या नौकराबरोबर त्या गुलाम मुलीचा निकाह लावला व म्हणाला–"आतां ही गुलाम राहिली नसून स्वतंत्र झाली आहे. तरी आतां हिला लगेच तलाक देववूं या."

पण तो नौकर या गोष्टीला तयार झाला नाही तो म्हणाला–"माझी ही बीबी फारच सुन्दर आहे. हिला तलाक द्यायला मी मुळीच तयार नाहीं." नबाबाने व वजिराने कितीही जरब दाखविला तरी तो नमला नाही. नबाबाच्या तळपायाची आग मस्तकाला भिडली. तो भडकून काजीला म्हणाला–"अरे नतदृष्ट! हाच काय तुझा सोपा उपाय! आतां या पेंचातून मार्ग न काढलास तर तुझे शीर धडावेगळे करून वेशीवर टांगेन."

काजी म्हणाला–"हुजूर, आपण उगाच बेचैन होत आहांत या क्षुल्लक पेचाची मातब्बरिच ती काय? वजीर साहेबांनी या नौकराला जर गुलाम म्हणून मला दिले तर सगळ्या पेचांतून सुटतां येईल. तो पण काम मला सांग म्हणजे मी तुला देतो त्याने कानात काहीतरी सांगितले.

"दिलं, घे!" वजीर म्हणाला. काजी त्या मुलीकडे वळून म्हणाला–"हा नौकर माझा गुलाम आहे. मी याला गुलाम म्हणून तुला देत आहे. तू स्वीकारशील ना?" ती खूप आनंदीत होऊन म्हणाली.

"हो, स्वीकारते." ती मुलगी म्हणाली.

"बस्स! झाले तर मग, कायद्यानुसार तुझा गुलाम, तुझा नवरा होऊं शकत नाहीं. हे लग्न रद्द झाले! अन् मी आलेले कार्य सुद्धा सिद्ध झाले आतां मी येतो." असे म्हणत काजी उठला.

नबाबाने त्याला थांबवीत म्हटले–"आम्हाला सल्ला आणि न्याय दिल्याबद्दल मी तुम्हाला सन्मानार्थ ही भेट देत आहे घ्या." असे म्हणून नबाबाने त्याला सोन्याच्या दीनारांनी भरलेली एक थैली दिली. ती थैली घेऊन काजी आपल्या रस्त्याने निघून गेला.





# पंचकल्याणी

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी एक उत्तम जातीच्या घोड्याच्या रूपे अवतार धारण केला. राजाच्या तबेल्यातल्या घोड्यांमध्ये तो घोडा पंचकल्याणी नामे ओळखला जाई. म्हणून त्याच्या खाण्या पिण्याची, वस्त्राभूषणाची व खोगीर वगैरेची राजेशाही थाटात व्यवस्था करण्यात येत असे.

राजाच्या तबेल्यातील फक्त त्या घोड्याला जुन्या धान्याचा दाणा देण्यात येई. तिसऱ्या वर्षापासून त्याची देखरेख स्वतंत्रपणे केली जाऊ लागली. त्याला जो दाणापाणी देण्यात येई तो इतर सामान्य घोड्यांसारखा नसे. एक हजार मोहोरा खर्च करून तयार केलेल्या सोन्याच्या ताटात त्याला दाणा दिला जाई. तो राही त्याचा तबेला सुगंधी द्रव्यांनी शिंपडलेला असे. त्या तबेल्याच्या चारी बाजूला सुंदर पडदे लावलेले होते. शिवाय सोनेरी फुलांच्या काठाची चमकदार चांदणी लावलेली होती. चारही भिंतींवर सुवासिक फुलांच्या माळा सोडलेल्या होत्या. रात्रं दिवस त्या तबेल्यात सुवासिक उदबत्त्यांच्या धूप दरवळत होता. सर्व वातावरण कसे शोभिवंत व प्रसन्न होते. अशा तऱ्हेने त्यां घोड्याचा तबेला सजवलेला असे.

अशा तऱ्हेने अश्वाला शोभिवंत करून ठेवलेले पाहून काशी राजाच्या सामंतांना त्याचा हेवा वाटू लागला. त्याचा पाणउतारा कसा करतां येईल याचा ते सारखा विचार करू लागले. एकदां सात मोजक्या प्रमुख सामंत राजांनी मिळून एक कारस्थान रचले. त्यांनी एक पत्र लिहून एका दूताला काशी राजाकडे पाठविले. त्या पत्रांत त्यांनी लिहिले होते की तुम्ही आपले



राज्य आम्हांला देऊन तरी टाकावे, नाही तर युद्धाला तयार रहावे. लगेच काशी राजाने आपल्या सर्व मंत्र्यांची सभा बोलाविली आणि आलेल्या प्रसंगाला कसे तोंड द्यावयाचे या विषयी त्यांचा सल्ला विचारला. मंत्री म्हणाले—"महाराज! आपण स्वत: युद्धाला जाण्याची गरज नाही. आपण आपले सेनापती वीरवर्मा यांस युद्धाला पाठविले तरी पुरे! ते युद्ध जिंकून येतील. त्यांना शक्य झाले नाही तर पुढे काय करावयाचे याचा विचार करता येईल."

म्हणून काशी राजाने सेनापतीला बोलाविले व म्हणाला—"सेनापती! आपल्यावर सात सामंत राजे चालून आले आहेत. त्यांना जिंकणे तुम्हांला शक्य आहे का?"

सेनापती म्हणाला—"महाप्रभू! महाराजांचा अत्यंत प्रिय असा पंचकल्याणी घोडा आपण देऊ शकलात तर या सातही सामंतांनाच नव्हे तर सर्व देशभरचे लोक आले तरी जिंकणे अशक्य नाही." वीरवर्मा राजाला आत्मविश्वास पूर्वक म्हणाला. राजाला ते ऐकून फार आनंद झाला. त्याने अत्यंत आनंदाने पंचकल्याणी घोडा देऊन आणि सेनापतीला प्रोत्साहन देऊन निरोप दिला.

राजाचा निरोप घेऊन सेनापती लगेच पंचकल्याणी घोड्यावर बसून युद्ध करायला रणांगणावर गेला.

वीरवर्मा विजेसारखा किल्ल्यातून घोड्यावर बसून शत्रूवर तुटून पडला. त्याने पहिल्या सामंतशी शौर्य साहसाने युद्ध करून त्याला कैद केले. नंतर तो पुन्हां रणांगणावर येऊन दुसऱ्या सामंताला आणि त्यानंतर क्रमाने पांच राजांना जिंकून त्यांना कैद केले.

सहाव्या राजाशी युद्ध करीत असतां त्याच्या घोड्याला एक जबर जखम झाली आणि जखमेतून रक्त येऊ लागले.

वीरवर्माने आपल्या पंचकल्याणी घोड्याला एका दाराजवळ बांधून ठेवले आणि आणखी एका घोड्यावर बसून युद्धाला जायचा विचार करू लागला. म्हणून तो पंचकल्याणी घोड्याचे खोगीर व लगाम वगैरे काढू लागला.

तेव्हां पंचकल्याणी रूपात असलेल्या बोधिसत्वांनी सेनापती काय करीत आहेत ते डोळे उघडून पाहिले. "अरे रे, हे शूर सेनापती! तू किती भोळा आहेस रे! मला जखम लागलेली पाहून तू दुसरा घोडा तयार करू लागलास? सातव्या शत्रुसैन्याचा व्यूह भेद करून सातव्या सामंताला कैद करणे त्या घोड्याला शक्य तरी होईल का? तू दुसऱ्या घोड्याला घेऊन गेलास तर आतांपर्यंत मिळविलेला जय व्यर्थ होईल. तू निष्कारण शत्रूच्या हाती कैद होशील व शत्रू हाल हाल करून तुला ठार करील आणि आपले दोघांचे मालक काशीराज शत्रूच्या हातांत अगदी सहजी कैद होतील. सातव्या सामंताला जिंकणे फक्त मलाच साध्य होईल, आणखी कोणत्याही घोड्याला ते शक्य नाही. हे तुला कसे कळत नाही!" असा विचार करीत पंचकल्याणी घोडा फार दुःखी झाला.

तो तेवढ्यावर थांबला नाही. त्याने वीरवर्मालाजवळ बोलाविले व म्हणाला—"हे वीरवर! सातव्या राजाला जिंकणे हे काम माझ्या शिवाय इतर कोणत्याही घोड्याला शक्य नाही! मी आतांपर्यंत साध्य करून घेतलेले काम व्यर्थ करू नकोस! कोणत्याही परिस्थितीत धैर्य व



साहस सोडतां कामा नये. तसाच आत्मविश्वासही सोडून चालणार नाही. म्हणून माझ्यावरच पूर्ण विश्वास ठेवून, मला जखम झाली एवढ्यावर घाबरून जाऊन मला सोडू नकोस. माझ्या जखमेवर पट्टी बांध व लवकर माझ्यावर स्वार होऊन रणांगणावर जा." अशा तऱ्हेने अनेक प्रकारे समजावून सांगितले.

वीरवर्माने लगेच आपल्या पंचकल्याणी घोड्याच्या जखमेला पट्टी बांधली व त्याला तयार केले. तो त्याच्यावर बसून निघतांच तो विद्युत् वेगाने निघाला. त्याने सहावाच नाही तर सातवा व्यूहही भंग केला. वीरवर्माने सातव्या सामंताला जिंकून त्यालाही कैद केले. अशा तऱ्हेने वीरवर्माला त्या युद्धातही जय मिळाला.

सातही सामंतांना कैद करून वीरवर्माने काशी राजाच्या समोर नेऊन उभे केले. पंचकल्याणी घोडासुद्धा तेथे आला आणि राजाला म्हणाला–"प्रभो! हे सातही सामंत राजे तुम्च्याच सारखे राजेच आहेत. त्यांचा वध करणे योग्य होणार नाही. त्यांचा अपमान करणेसुद्धा रास्त नाही. तू त्यांना कोणत्याही एका अटीवर सोडून देणेच श्रेयस्कर होईल! राजा, उदारतापूर्वक शत्रूला क्षमा करून न्याय व धर्माने राज्य कर!" पंचकल्याणी घोड्याने या शब्दात राजाला उपदेश केल्यावर सैनिकांनी पाठीवरचे खोगीर व तोंडातून लगाम काढला. आणि घोड्याच्या अंगावरचे दागिने काढले. ते काढीत असतांनाच पंचकल्याणी घोड्याने अंग टाकले आणि त्याचे पंचप्राण, पंचतत्वात लुप्त झाले!

त्यानंतर काशी राजाच्या आज्ञेने सर्व गौरव व मानमरातबाने त्या घोड्याची उत्तरक्रिया करण्यात आली. वीरवर्माचा राजदरबारात सत्कार झाला. सातही सामंत राजांना आदरपूर्वक त्यांच्या त्यांच्या राज्यात परत पाठविण्यात आले. त्या दिवसापासून बोधिसत्वांना मान्य असलेल्या धर्म व न्याय पद्धतीने राजाने राज्य करून कीर्तीसंपादन केली.



# चितोडची राणी पद्मिनी-२

अल्लाउद्दिनाच्या दगलबाजीपणाचा प्रत्येक रजपूत वीराला भयंकर राग आला. पद्मिनीमात्र क्रोधाविष्ट न होता राजाला सोडविण्याला काय युक्ती करावी याचा विचार करू लागली. तिने आपले चुलते इतर सरदार यांची भेट घेऊन एक उपाय योजला.



एका रजपूत सरदाराला अल्लाउद्दिनाकडे दूत म्हणून पाठविण्यात आले. त्याने सुलतानाला त्याच्या शिबिरात भेटून पद्मिनी त्याला भेटायला येणार असल्याचे सांगून तिला एका राणीच्या इतमामाप्रमाणे तिच्या सखी व दासीसह मेण्यात बसून येण्यास परवानगी द्यावी अशी विनंती केली.





सुलतान अल्लाउद्दिनाने त्या विनंतीस आनंदाने होकार दिला. संध्याकाळी चितोडच्या किल्ल्यांतून सातशे मेणे अल्लाउद्दिनाच्या पडावाकडे निघाले. सुलतान व त्याचे सरदार कुतूहलपूर्वक त्या मेण्यांकडे पहात राहिले.



सर्वांत पुढे असलेल्या मेण्यातून एक तरुण स्त्री बाहेर येऊन सुलतानाला ती पद्मिनीची सर्वांत मोठी सखी असल्याचे व राणी आपल्या यजमानांची शेवटची भेट घेऊन येणार असल्याचे सांगून त्या गोष्टीस परवानगी मागितली. सुलताने होकार दिला.

शूर गोराने राणी पद्मिनीचे सोंग करून राणा रत्नसेनाला भेटला व आपला स्त्रीवेष टाकून मेण्यात असलेल्या सर्वांस खूण केली.





सातशे मेण्यांतून स्त्रीवेषांत असलेले चवदाशे वीर आणि मेणा उचलून आणणारे प्रत्येक मेण्याला चार प्रमाणे असलेले २७०० रजपूत वीर मेण्यांतून लपवून ठेवलेली शस्त्रास्त्रे काढून सज्ज झाले.



ते पाहून सुलतान व त्याचे सरदार थक्क झाले. राणा रत्नसेन काही रज-पूत सरदारांसह पळून गेला. रजपूत सुलतानाच्या शिबिरावर तुटून पडले. त्याने अनेक शत्रूंना कापून काढले आणि जे शरण मागू लागले त्यांना त्यांनी सोडून दिले.

सुलतान व जे जिवंत होते अशा आपल्या अनुयायांसह पळून गेला. चित्तोडच्या किल्ल्यात राणा परत आल्या बद्दल आनंदोत्सव होऊ लागला.





सुलतान आपला अपमान व पराभव झाल्याबद्दल निरुत्साहित न होता चिडून गेला. त्याने पूर्वी गुजरात व इतर प्रदेशांवर केलेल्या स्वाऱ्यांत जे अलोट धन मिळविले होते ते खर्च करून मोठे सैन्य उभे केले आणि क्रूर मुसलमान सरदारांना आपल्या सैन्यात भर्ती करून घेतले.

अशा तऱ्हेने दोन वर्षांनी सर्व तयारी करून सुलतानाने पुन्हां एकदा चितोड-वर स्वारी केली. यावेळी त्याने आपल्या सैनिकांना उत्तमोत्तम शस्त्रे दिली होती, क्रूर सरदारांच्या हाती नायकत्व दिले होते.





तरी राजपूत सरदारांनी शौर्य पराक्रम दाखवून सुलतानाच्या अफाट सैन्याला तोंड दिले. गोरा व बादल किल्ल्याच्या मुख्य द्वारावर आपल्या सैन्यानिशी उभे होते. निकराची लढाई झाली व दोघांस वीरगती मिळाली. त्या भयंकर युद्धात किल्ल्यात असलेला प्रत्येक पुरुष युद्ध करून धारातीर्थ पडला.

शत्रूचा विजय झाल्याची वार्ता कळ-ताच राणी पद्मिनी व किल्ल्यातील सर्व स्त्रियांनी जोहार करून अग्निप्रवेश केला. अल्लाउद्दिनाने किल्ल्यात पाऊल टाकले तेव्हां त्याला राखेच्या एका ढिगाऱ्या शिवाय काहीच नजरेस आले नाही.





# दुर्दैव

एका गांवांत दोन भाऊ होते. दोघांची लग्नें झाली. वडिलांच्या संपत्तीची समान वाटणी करून घेऊन दोघांनी वेग-वेगळे संसार थाटले. जसाजसा काळ जाऊ लागला तसतशी त्यांच्या नशीबाची पावलं वेगळ्या मार्गाने पडूं लागली. मोठ्या भावाला सुदाम्या प्रमाणें दरवर्षी एक मूल होत गेले. संपत्तीला आहोटी लागत राहिली. धाकट्याला अनुकूल दिवस येत राहिले व तो फार मोठा श्रीमंत झाला.

परिस्थिती फारच हलाखीची झाली. त्याला त्याच्या बायकोला व मुलांना अंग झाकण्या पुरती वस्त्रेसुद्धा नव्हती. कित्येक दिवसांत पोटभर जेवण तरदूर पेजसुद्धा पोटभर मिळाली नाही. मुलांची उपासमार बघून मोठ्या भावानें स्वाभिमान बाजूला ठेवला व धाकट्या भावाकडे जाऊन म्हणाला—"देवाच्या दयेनें तुला कांही कमी नाही तरी यावेळी मी तुझ्या शिवाय कुणा-पुढे हात पसरूं? तुला जमेल तशी मदत करून आम्हाला उपासमारीतून सोडव."

धाकट्याने थोडा विचार करून म्हटलें—"मदत करायला कांही हरकत नाही, पण तूर्त मी सुद्धा फार मोठ्या खर्चांत अडकलो आहे. उद्यां माझा वाढदिवस आहे. त्या निमित्ताने गांवांतील मोठ-मोठ्या लोकांना आमंत्रण दिले आहे. मोठ्यांना आधी तर बोलवूंच नये अन बोलावले तर त्यांच्या इतमामांस शोभेसा थाट केल्याशिवाय गत्यंतर उरत नाही. किती खर्चाचे हे काम आहे. तूंच विचार कर हो, या सोहळ्या नंतर हातांत जर कांही उरले, तर फूल ना फुलाची पाकळी तुला देण्यांत मला आनंदच वाटेल. उद्यां मात्र तूं वहिनी व मुलांना घेऊन अवश्य ये. नंतर या बाबतीत आपण सविस्तर बोलू !"



मोठ्या भावाने विचारांत पडून म्हटलें— "तू एवढ्या समारंभपूर्वक आपला वाढदिवस साजरा करीत असतांना जुन फाटकं नेसून आमचे येणें कशाला रे बाबा!"

"हे काय बोलणें झाले? मला मोठेपण आले तेवढ्याने आपल्या रक्ताच्या नात्यांत फरक पडतो थोडाच? तुम्ही अवश्य या." असे म्हणून धाकटा भाऊ निघून गेला.

धाकट्या भावाच्या बोलण्यांनी अतिशय सुखावलेला मोठा भाऊ घरी जाऊन बायकोला म्हणाला—"अगं! उद्या माझ्या भावाच्या वाढदिवसानिमित्ताने फार मोठा समारंभ आहे. त्याने आपल्याला जेवणाचे आमंत्रण दिले आहे.

"छे! अशी लक्तर अंगावर घेऊन आपण तिथे जाणें म्हणजे चार-चौघांत हंसे करून घेणें होय, त्यापेक्षा न जाणें बरे." त्याची बायको म्हणाली.

त्यावर वडील भाऊ समजावणीच्या स्वरांत म्हणाला—"न जाणें बरे दिसत नाही आणि आपली परिस्थिती लोकांना माहीत नाही असे थोडेच आहे?"

दुसऱ्या दिवशी मोठा भाऊ बायको मुलांसह भावाच्या घरी गेला. घरभर बडी-बडी मंडळी होती. थाटाने घर जगमगत होते. त्याची किंवा त्याच्या कुटुंबाची कुणीच दखल घेतली नाही. शेवटच्या पंक्तीतसुद्धा त्यांना जागा मिळाली नाही.

त्यांची निराशा झाली, मुलां-बाळांसह तो उपाशी पोटी परत आपल्या झोपटांकडे निघाला.

त्याची बायको चाहूल ऐकून म्हणाली— "आपल्या मागे कुणीतरी येतय, सगळ्या जगानं आपल्याला तोडलंय अन हा मेला आपल्या मागे लागलाय."

"आपल्या दुर्दैवाशिवाय आपल्या मागे कोण येणार?" नवरा म्हणाला.

ते खरेच होते, तो माणूस त्यांचे 'दुर्दैव' होता. तोंवर त्यांनी त्याला बघितले नव्हते पण तो नेहमी त्यांच्या मागेच असायचा.



दुसऱ्या दिवशी सकाळी वडील भाऊ घराबाहेर येऊन बघतों तर दुर्दैव अंगणांतच बसून होते.

तो मोठ्या भावाला म्हणाला—"या जगांत सुख नांवाची गोष्ट नाही. मग विचार कां करतोस? चल, आपण दारू प्यायला जाऊं या दारूंत सर्व दुःख बुडवून टाकू या."

"अरे, पण दारू प्यायला मजकडे पैसा नाही ना!"

"तुझी जुनी कांबळी आहे ना, ती विकून टाक. आतां हिवाळ्याचे दिवस संपलेयत पुन्हां हिवाळा येईल तोंवर जगलों-वाचलों तर तेव्हांचा विचार तेव्हां करूं." दुर्दैव म्हणालें.

मोठ्या भावाने खोपटांतून जुनी कांबळी आणली. ती विकून आलेल्या पैश्यांनी ते दारू प्याले.

मग, अशाच सवंयीने घरांतील एकेक चीजवस्तू विकून तो दुर्दैवाबरोबर दारू पीत राहिला.

शेवटी विकण्यासाठी घरांत कांहीच उरले नाही तेव्हां मोल मजूरी करून चार पैसे कमवून आणावेत असा विचार त्याने केला. नेहमी प्रमाणें दुर्दैवाने त्याला निरुत्साहित करायचे सोडले नाही. पण मोठ्या भावाने विचार केला—"जोंवर मी याच्या विरोधाला न जुमानतां पुढे पाऊल टाकणार नाहीं तोंवर माझी स्थिती सुधारणें शक्य नाही.

एके दिवशी तो कामावरून परत येत होता. दुर्दैव त्याच्या मागे होतेच ते दोघे शेतांतून चालत असतांना मोठ्या भावाची नजर बाजूच्या मोकळ्या चराईंत पडलेल्या एका मोठ्या शिळेवर पडली तो विचार करूं लागला—"आजबाजूला पहाड-डोंगर नसतांना ही शिळा इथे कशी काय आली असावी? कुणी तरा मुद्दाम ही इथे आणली असावी असे वाटतें. कदाचित हिच्याखाली गुप्तधन तर नसेल?" त्याने हा विचार बोलून दाखवतांच दुर्दैव म्हणाले—"हा सगळा तुझा भ्रम आहे. इथे धन कोण








पुरून ठेवणार? आणि समज, असले तरी ते तुझ्या-माझ्या नजरेला कसे पडणार? आपल्या नशिबाला असे कांही शक्य तरी आहे का?"

पण आतां त्याचे ऐकायचे नाही. हे मोठ्या भावाने ठरवले होते. तो लगेच गांवांतील एका ओळखीच्या शेतकऱ्याकडे गेला आणि एक बैलगाडी थोड्यावेळासाठी मागून आणली. जातांना आणि येतांना दुर्दैवाचे निरुत्साहित करणें चालूच होते पण त्याने तिकडे लक्षच दिले नाही.

शिळेजवळ बैलगाडी थांबवून तो उतरला त्याने शिळेला हात घातला व दुर्दैवाला म्हणाला–"बघतोस काय जरा एक धक्का दे, हा दगड हलवूं या."

कुर-कुरतच दुर्दैवाने हात लावला. अखेर थोडा घाम गाळल्या नंतर शिळा बाजूला झाली. याने कल्पना केल्या प्रमाणें शिळे-खाली खोल पोकळींत सोन्याची नाणीं होती. दोघांनी ती नाणी काढून गाडींत भरली अंधार वाढत होता.

"निघण्या आधी अजुन कांही नाणीं आंत राहून तर गेली नाहीत नां बघून ये" मोठ्या भावाने त्या दुर्दैवाला म्हटलें.

"कांही बघायची गरज नाही. आतां त्यांत कांही उरले नाही."

"खड्डयांत उतरून पोकळींत हातांनी नीट चांचपून बघ, एक-दोन नाणी असतील तर ती तरी कां सोडायची चल उतर!" मोठा भाऊ म्हणाला.

इतके सोने मिळाले, एक-दोन नाणीं गेली तर काय हरकत आहे..." असे कुर कुरतच दुर्दैव खड्डयांत उतरले. तोंओणवा होऊन हातांनी चांचपडूं लागला. तेव्हां मोठ्या भावाने चपळाईने ती शिला पूर्वी प्रमाणें खड्डयाच्या तोंडावर बसवून टाकिली व सोन्याच्या नाण्यांनी भरलेली बैलगाडी घेऊन घरी आला. त्याच्या मागे लागलेल्या दुर्दैवा पासून त्याची कायमची सुटका झाली.

त्यानंतर तो मुलां-बाळांसह सर्व प्रकारे सुखी जिवन जगूं लागला.





## फरारी नवरा, लक्ष्मीसारखी बायको

भल्या पहाटे उठून, घागर घेऊन, राधा पाणी आणण्यासाठी गांवाबाहेर असले-ल्या मळ्यांतील विहिरीवर निघाली. अंधार असला तरी सरावाच्या पायऱ्या उतरून राधेने घागर भरली पण अचानक तिच्या हातून घागर सुटून विहिरींत बुडाली.

यामुळे अस्वस्थ चित्ताने पायऱ्या चढून वर येऊन, कुणी मदतीसाठी मिळेल कां? या आशेने ती इकडे-तिकडे बघूं लागली. इतक्यांत शेजारच्या आंब्याच्या झाडाआडून एक युवक बाहेर येत म्हणाला–"इतकी गांव बघितली पण तुमच्या गांवची सर कोणत्यात गांवाला नाही डोंगराच्या कुशीत फळांच्या राईंनी, रम्य वनश्रीने नटलेले हे गांव फारच आवडले बुवा आपल्याला." क्षणभर थांबून तिच्याकडे निरखून बघत म्हणाला–"इतक्या पहाटे, एका बाईने एकटीनेच अशा निर्जन जागी येणें."

भांबावलेल्या अवस्थेंत त्याच्याकडे क्षण-भर बघून स्वत:ला सांवरत राधा म्हणाली–"दररोज माझी आत्याच पाण्याला येते, पण तिला ताप येतो आहे, जागी झाली तर मला पाणी आणूं देत नाही. म्हणून अंधार असतांनाच पाणी न्यायला आले होते, पण माझी घागर हातांतून सुटून विहिरींत बुडाली आहे. तुम्हांला पोहतां येत असेल तर घागर काढून देतां कां?"

"पोहणे? अहो, मी तर पट्टीचा पोहणारा आहे." असे म्हणत त्या तरुणाने आपला अंगरखा काढून झाडावर लटकवला व त्या विहिरींत सूर मारला व कांही वेळांतच भरली घागर घेऊन वर आला.

राधेला आनंद झाला, घागर डोक्यावर ठेवीत–"तुम्ही मजवर फार मोठा उपकार केला आहे" असे ती म्हणाली व तिने घराचा रस्ता धरला.



अंगात सदरा घालीत म्हणाला–"मदत करणाऱ्याला आपले नांवसुद्धा सांगितले नाहीत, माझे नांव मोहन आहे."

पुढे पुढे जात असतांना राधा ओरडून म्हणाली–"माझे नांव राधा."

दुसऱ्या दिवशी सुद्धा भल्या पहाटे पाण्याला येऊन राधेने विहिरींतून घागर भरून घेतली व पायऱ्या चढून वर येत असतां शेजारच्या बकुळीजवळ उभा असलेला मोहन तिच्या दृष्टीस पडला पण पाहिला-सारखे करून ती पुढे निघाली. तेव्हां मोहन हंसत म्हणाला–"तुमच्या आत्याचा ताप कमी झाला नाही. देव माझ्या नवसाला पावला. मी तुम्हाला पुन्हा बघूं शकलो!"

"दुसऱ्याला त्रास व्हावा असे ज्यांना वाटले त्यांच्या तोंडी देवाचे नांव?" असे राधा उद्गारली.

यावर मोहन म्हणाला–"माझ्या नवसा-मुळे तुम्हाला त्रास होतोय की तुमच्या आत्या बाईला?"

"माझ्या आत्याला तुमच्याबद्दल अजून कांही माहीत नाहीं, जर कळले तर डिव-चल्या गेलेल्या वघिणीसारखी चवताळून उठेल. आमच्या घराण्यांत बायका परक्या माणसाबरोबर अशा बोलत नाहीत." असे म्हणत राधा झपाटयाने निघून गेली.

नंतर दररोज सकाळी विहिरीजवळ बोलून चार दिवसांत मोहनने तिचा विश्वास संपादन केला व एके दिवशी सकाळी म्हणाला–"मी हे निसर्गरम्य गांव सोडून उद्या परत जात आहे. हे गांव, इथले निसर्ग सौंदर्य वातावरण मला फारच आवडले आहे. तू तर या सगळ्याहून जास्त आवडली आहेस. म्हणून उद्यां परत गेल्यानंतर आमच्या घरच्या वडील मंडळीस तुझ्या घरच्या मोठ्या माणसांशी बोला-चाली करण्यासाठी घेऊन येईन व तुला नेहमीसाठी आमच्या गांवीं घेऊन जाईन."

राधा कांहीच न बोलतां अडखळणाऱ्या पायांनी घरी पोंचली. तिचे मन अतिशय बेचैन झाले होते. अशा वेळी बहुधा ती आपल्या मैत्रीणीकडे–नंदिनीकडे–जात असे. त्या दिवशी तिच्या मनाची चलबिचल ओळखून नंदिनीने त्या बेचैनीचे कारण विचारले. राधेने तिला अथपासून इति पर्यन्त सर्व कांही सांगितले व त्याची आपल्या बरोबर विवाहबद्ध होण्याची इच्छा असल्याचे सुद्धा सांगितले.

हे सर्व ऐकून नंदिनी म्हणाली–"वेडे, ही तर आनंदाची गोष्ट आहे, अशी हताश कां होत आहेस?" यावर विषाद युक्त स्वरांत राधा म्हणाली–"तो राजाच्या शिपायांची नजर चुकवून फिरणारा आरोपी आहे!"

तिच्याकडे आश्चर्य व अविश्वासाने पहात असलेल्या नंदिनीला तिने एक चिट्ठी दाखविली. नंदिनीने चिट्ठी वाचली–

"मोहन! तुझ्यासाठी राजाचे शिपाई शोध शोध करीत आहेत. कुण्या तरी अज्ञात गांवी निघून जा." असा मजकूर वाचून ती स्तब्ध राहिली. पण तिच्या चेहऱ्यावरचे प्रश्न चिह्न कायम होते. राधा तिला म्हणाली–"ही चिट्ठी पहिल्याच दिवशी त्याने आपला सदरा काढून झाडावर टाकला तेव्हां त्यांतून खाली पडली होती व मी कुतुहलाने ती उचलून स्वतःजवळ ठेवली."

क्षणभर विचार करून नंदिनी म्हणाली–"तो गुन्हेगार आहे, शिपाई त्याच्या मागा-वर आहेत, हे कळून सुद्धा तू त्याच्याशी बोलत राहिलीस, यावरून सिद्ध होते की हा तरुण तुला आवडला आहे. तर आता असे कर, उद्यां सकाळी तो भेटेल तेव्हां















त्याला, 'लग्ना आधी आपणांस एकमेकाची संपूर्ण माहिती असणे इष्ट, तेव्हां तुमची सगळी माहिती सांगा', असे म्हण."

मैत्रिणीच्या सल्ल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी राधेने मोहनला तसे विचारले. त्यावर किंचित् हंसून तो म्हणाला–"हे मात्र छान आहे, स्वतःबद्दल किती सांगितलंस तू मला? आईवडिलांना पारख्या असलेल्या तुला तुझी आत्या नानाप्रकारे छळते, हे साधे सत्य तरी तू मला सांगितलेस का?"

हे ऐकतांच राधेचे डोळे भरून आले, तिने आपले तोंड हातांनी झाकले.

समजावून सांगण्याच्या सुरांत मोहन म्हणाला–"तुझ्याबद्दल सर्व माहिती कळल्या-बरोबर मी तुला जीवन-संगीनी बनवण्याचा निश्चय केला आहे. इतका जाच सहन करीत तू हंसतमुख कशी राहतेस, देव जाणे!"

डोळे पुसत निश्चयी स्वरांत राधा म्हणाली–"नशिबी जे कष्ट आहेत ते सहन करतांना खचून जाणे बरे नव्हे."

मोहन म्हणाला–"तुझ्या या सद्‌गुणांवर मोहित होऊनच तर मी तुझ्याशी लग्न करू इच्छितोय."

त्याच्याकडे भेदक नजरेने बघत राधा म्हणाली–"तुम्ही म्हणताय त्या लक्षणांनी युक्त असलेली मुलगी एका फरारी गुन्हेगाराशी लग्न करण्यास तयार होईल असे तुम्हाला कसे वाटले?"

या प्रश्नामुळे आश्चर्यचकित झालेल्या मोहनला तिने ती चिट्ठी दाखविली. चिट्ठी पाहून जोराने हंसत म्हणाला–"ह्यांत लिहलेला मजकूर मला उद्देशूनच आहे, पण ही चिट्ठी कुणी लिहिली कां लिहिली हे तर जाणून घे." असे म्हणत मोहनने स्वतः बद्दलची समग्र माहिती सांगण्यास सुरवात केली.

त्याचे वडील लक्षाधीश असून त्यांना पैशा पलीकडे कांहीच महत्वाचे वाटत नाही. आईचा स्वभाव मात्र एकदम विरुद्ध, वडिलांनी घरांत कुणालाही न विचारतां मोहनचे लग्न गांवांतील एका फार श्रीमंत व्यापाऱ्याच्या मुलीबरोबर ठरविले. ती मुलगी अतिशय कुरूप होती. मोहनला त्या मुलीशी लग्न करण्यापेक्षा संन्यास घेणे इष्ट वाटले. मुलाचे मन आईला कळत होते, तिने सल्ला दिला की चार दिवसावर मुहूर्त घेऊन ठेपला आहे. हे चार दिवस मोहनने कुण्यातरी मित्राकडे लपून रहावे-म्हणजे मुलीचा बाप ऐन वेळी इभ्रत वाच, विण्यासाठी वाटेल तितका पैसा खर्चून आपल्या मुलीचे लग्न कुणाशी तरी लावून देईल व त्याच्या मागची पीडा टळेल. त्यानुसार मोहन गावांतील एका मित्राकडे लपून राहिला होता, पण त्याच्या वडिलांनी आपला मुलगा बेपत्ता असल्याची फिर्याद सरकार दरबारी नोंदविली. मोहनच्या आईला हे वृत्त कळतांच तिने विचार केला की गावांतच राहिल्यास राजाचे शिपाई त्याला शोधून काढल्याशिवाय राहणार नाहीत, म्हणून कुण्यातरी दूर ठिकाणी पळून जाऊन लपून राहण्याबद्दल आपल्या एका वृद्ध व विश्वासू सेवका हाती आईने 'ती' चिट्ठी पाठविली होती.

"ही आहे माझी समग्र माहिती. आता तुला सर्व सविस्तर कळले आहे, आतां तरी आपल्या विवाहास तुझी संमती आहे ना?" खाली मान घालून पायाच्या बोटांनी जमीन उकरीत असलेल्या राधेस मोहनने विचारले.

राधेने हंसत विचारले–"मी मूर्ख म्हणा की अडाणी म्हणा, पण जेवढे कळणे आवश्यक आहे ते समजून घेण्याची अक्कल तर देवाने मला दिली आहे ना?"

"या प्रश्नाचे उत्तर लग्नानंतर माझी आईच देऊ शकेल, वडील मात्र, स्वतःबरोबर लक्ष्मी घेऊन येणारी सून न मिळाल्याची नाराजी विसरू शकतील व त्यांना आनंद होईल ही खात्री मला आहे, कारण त्यांना लक्ष्मीसारखी सून लाभली आहे." असे सांगून मोहन म्हणाला–"आतांच निघतो आणि आई-वडिलांना घेऊनच पुढील गोष्टी ठरविण्यासाठी घेऊन येतो" आणि गांवी जाण्यासाठी निघाला.



# अन्याय आणि दुर्दैव

गोपाळ नांवाचा एक माणूस देशाटन करीत निघाला. फिरत-फिरत तो विजयपुरी या राज्यांत आला तेथे बलवंतवर्मा नांवाचा राजा राज्य करीत होता. एका गांवी जात असतां कांही चोरांनी त्याला गावाच्या वेशीवरच अडविले आणि त्याच्याजवळ असलेला पैसाअडका घेऊन पसार झाले.

गोपाळने त्या गावांतील पोलीस पाटलांकडे फिर्याद केली. पोलिस पाटलाने गोपाळकडे रागाने पाहिले व म्हणाला–"भल्या गृहस्था! चोरांची उपजीविकाच चोरी, लूटमारीवर चालते ते नाही करायचे तर त्यांनी काय उपाशी रहावे?" व वर चार शिव्या हासडल्या.

गोपाळला त्या राज्याचा व राजा बलवंतवर्माचा अतिशय राग आला, तो राजधानीत पोंचताच–"बलवंतवर्माजवळ राज्य चालवण्याची लायकी नाही, तो निव्वळ मूर्ख आहे, देशांत चोर-लुटारूंचा सुळसुळाट झाला असून ते देशाचा घात करतील." असे तावा-तावाने बोलूं लागला.

राजाच्या शिपायांनी त्याला पकडून नेले व राजद्रोही म्हणून त्याला दहा वर्षांसाठी कारागृहात डांबण्यात आले.

दहा वर्षांचा तुरुंगवास भोगून बाहेर पडल्याबरोबर पूर्वानुभवाने शहाणपण शिकल्या-मुळे तो उत्साहने ओरडू लागला–"राजा बलवंतवर्मा फार विवेकी व राजधर्माचा पालन करणारा आहे; बलवंतवर्मा महाराज की जय" वगैरे.

त्याला पुन्हा पकडण्यांत आले व यावेळी राजदरबाराने त्याला वीस वर्षांच्या बंदिवासाची शिक्षा ठोठावली त्याला आश्चर्य वाटले, मागच्या वेळी राजाविरुद्ध बोलल्यामुळे दहा वर्षांची शिक्षा अन् आतां राजाला चांगले म्हणाल्यामुळे दुप्पट शिक्षा!

गोपाळ दहा वर्षांसाठी तुरुंगांत असतांना राजा बलवंताच्या सेनापतीने बंड केले व त्याला हटवून स्वतःच राजा झाला होता. ही गोष्ट गोपाळला नंतर कळली.





# रहस्याचे रहस्य

आनंदपुरचे जागीरदार कुलशेखर महाराज यांचे आपल्या धर्मपत्नीवर अत्यंत प्रेम होते. त्यामुळे केवढी महत्वाची व रहस्यमय गोष्ट असली तरी, ती बायकोला सांगितल्या वाचून त्यांना राहवत नसे आणि बायकोमुळे ती रहस्यें चार चौघांत जाहीर झाल्याशिवाय रहात नसत. या बाबतींत किती बोलले, रागावले तरी उपयोग नव्हता.

जागीरदाराचे रामाजी आणि सोमाजी नांवाचे दोन विश्वासू सेवक होते. कुलशेखर यांनासुद्धा कधी-कधी आपली कांही रहस्ये सांगत असत. रामाजीला सांगितल्या गोष्टी चार लोकांत पसरत असत, पण सोमाजीला सांगितलेली कोणतीही गोष्ट पट्कर्णी होत नसे. जागीरदार रामाजीला अनेक प्रका सांगत. रागावीत असत की ही रहस्ये बाहेर कां पडतात? तेव्हां तो म्हणें–"महाराज, आपण सांगितलेले रहस्य मी बायकोशिवाय कुणाला सांगत नाही, पण तिचा स्वभावच असा आहे, तिच्या तोंडी तीळ भिजत नाही."

एके दिवशी त्यांनी एकट्या सोमाजी-लाच बोलावून विचारले–"लग्न झाले तेव्हां बायकोच्या गळ्यांत मंगळ-सूत्र बांधून सर्व सुख-दुःखांत मी तुझा सहभागी आहे. 'धर्मेच, अर्थेच, कामेच नातिचरामी' अशी शपथ तू सुद्धा घेतली आहेस. तेव्हां स्वतःला कळलेल्या गोपनीय गोष्टीं तिला न सांगणे हे अधर्माचरण नव्हे काय?"

"महाराज मी तर हिच्यापासून कांहीच लपवीत नाही. मला कळलेली सगळीच रहस्ये मी तिला नेहमीच सांगत असतो" सोमाजीचे हे सांगणे जहागीरदाराला खोटे वाटले व खरा प्रकार समजून घेण्यासाठी त्याने या दोघां सेवकांची परीक्षा घ्यायचे ठरविले.












एके दिवशी त्यांनी सोमाजीला सांगितले–"माझ्या पोटांत एक व्रण उठला आहे व त्यामुळे मी जास्त दिवस जगणार नाही, असे वैद्यराजांनी सांगितले आहे. आतां वारसाची निवड करणे आवश्यक आहे."

सोमाजी निघून गेल्यानंतर त्यांनी रामाजीला बोलवले व म्हणाले–"तुला मी एक अतिरहस्याची गोष्ट सांगावी म्हणतोय दोन दिवसांपूर्वी माझे विरोधक मला वीष घालून मारण्याचा कट रचत असतांना पकडले गेले आहेत. तूर्त या कटांत सामील असणाऱ्यांची नांवे मी गुप्तच ठेवणार आहे."

आठवड्या भरांतच रामाजीला सांगितलेली गोष्ट सर्वांच्या तोंडी झाली, पण सोमाजीला सांगितलेली वार्ता कुणालाही कळली नाही.

महाराजांनी आपल्या एका दासीला सोमाजीच्या घरी जाऊन "आपल्या आजाराबद्दल सोमाजीच्या बायकोस कांही कळले आहे का," ही बातमी काढून आणण्यासाठी पाठवले. तिने येऊन सांगितले की–"महाराज, ही बातमी आठवड्या भरा आधीच तिला कळली आहे."

ते ऐकून कुलशेखर महाराजांस आश्चर्य वाटले. त्यांनी सोमाजीला बोलावून–"तुझ्या पत्नीसारखी स्त्री या दिवसांत असणे कठीणच." असे म्हणून घडलेला सर्व वृत्तान्त सांगितला.

यावर हंसून सोमाजी म्हणाला–"यांत आश्चर्य करण्याजोगे कांहीच नाही महाराज! कुणालाही एखादी गोष्ट रहस्यमय म्हणून सांगितली की ती इतर कुणालातरी सांगितल्याशिवाय त्याला चैन पडत नाही. मी माझ्या बायकोला सगळीच रहस्ये सांगतो. म्हणून ती तिकडे विशेष लक्ष देत नाही व इतर कुणाला सांगत नाही."

रहस्याचे खरे रहस्य कळल्यामुळे, जहागीरदार महाराजांना आनंद झाला. त्यांनी सोमाजीला इनाम देऊन त्याचा बहुमान केला. या नंतर त्यांनी आपल्या बायकोला सांगितलेली रहस्ये कधीच घटकर्णी झाली नाहीत.





# गणेश पुराण

अव्वा एके दिवशी फलवृक्षांनी भरलेल्या मार्गाने जात असतां एक सुंदर मुलगा झाडावर बसून छान गात होता. झाडावर फळांचे घोसच्या घोस होते आणि फळे ही पिकलेली होती.

त्या मुलाशी हाक मारुन बोलावेसे अव्वाला वाटले. ती म्हणाली ही–"बाबा रे! एक फळ माझ्याकडे नाही टाकणार का? तोंडाला पाणी सुटले आहे, बघ!"

मुलगा हसत म्हणाला–"अव्वा! तुला कोणते फळ हवे आहे? झाडावर खूप फळे लागली आहेत! तुझे म्हातारपण नाहीसे करणारे फळ देऊं का? तुझ्या मृत्यूला दूर पळविणारे फळ हवे आहे का? तुला धनाच्या राशी मिळतील असे फळ हवे आहे का? कसले फळ हवे आहे?"

तो मुलगा सुब्रह्मण्येश्वर कार्तिक स्वामी असावा असे अव्वाला वाटले. तिने हात उचलून नमस्कार केला व गुडघे टेकून म्हणाली–"सुब्रह्मण्य स्वामी! किती वाटले तरी कमी न होणारे अपार ज्ञानधनराशी देणारे फळ मला दे, बाबा! ज्ञानफळाचा अनुग्रह कर!"

सुब्रह्मण्य कार्तिकेय प्रभू आपल्या स्व-स्वरूपात दंड धारण करून मोरावर बसून प्रगट झाला. अव्वाच्या डोक्याला आपल्या दंडाच्या टोकाने हळूच स्पर्श करून तिच्या वर अनुग्रह केला. तेव्हां अव्वाला एकदम विराट रूप धारण केलेले ओंकार तत्व, ब्रह्मज्ञान, जीवनमुक्ति मार्ग गवसला आणि



अपार ज्ञान प्राप्ती झाली. सुब्रह्मण्यप्रभूने अव्वाला आशीर्वाद दिला आणि अंतर्धान पावला.

अव्वा पायीच एका गावाहून दुसऱ्या गावी चालत घरघर ज्ञान, भक्ति, उत्तम जीवन धर्म जनसामान्याला कळेल अशा सोप्या भाषेत सांगत व प्रचार करीत देश भ्रमण करू लागली.

अव्वाच्या तोंडी निघालेली मधुर वचने काव्य रूप पावून गीतांत बदलून सामान्य जनता जनार्दनपर्यंत पसरू लागली. आणि चिरस्थायी झाली.

अव्वा अशीच भ्रमण करीत एके दिवशी काळोख पडायच्या सुमारास अरण्यमार्गावर आली. आकाशात काळे ढग दिसू लागले आणि सर्वत्र काळोखी आली. मधून मधून विजा चमकू लागल्या. अव्वाच्या पायाला ठेच लागली व ती खाली पडली. तिच्या हातातली काठी दूर जाऊन पडली.

त्या काळोखात कोणीतरी येत असल्याची चाहूल आली. अव्वाने मान वर करून पाहिले. त्याच वेळी वीज चमकली. त्या विजेच्या उजेडात एक गोड मुलगा पावले टाकीत पुढे येत असलेला दिसला. त्याचे पोट गोल व थोडे मोठेच होते. त्या मुलाने अव्वाला हात देऊन उभे केले आणि तिची काठी आणून तिच्या हातात दिली. अव्वाने धरलेली काठी हालूडूल न देतां घट्ट धरून तो मुलगा तिला म्हणाला–"अव्वा! कोठे निघालीस? कोणत्या तरी क्षेत्रात तीर्थ दर्शनाला चालली आहेस का?"

अव्वा म्हणाली–"बाबा रे, ही सर्व पृथ्वीच मला एक दिव्य क्षेत्र आहे. तीर्थ दर्शन करण्याची माझी तेवढी इच्छा नाही. तरी एक क्षेत्र दर्शन व्हावे असे वाटते, तेथे पोचायचे त्याची वाट दिसत नाही. परंतु तू कोण हे नाही सांगितलंस? तू एवढासा मुलगा दिसतोस या काळोखात कसा काय आलास?"

"अव्वा, मी तुझा लहानपणा पासूनचा मित्र नाही का? मला जन्मल्या पासून ओळखतेस. पण तू कोणत्या क्षेत्र दर्शनास निघालीस हे नाही सांगितलेस!" तो म्हणाला.

"सांगून काय उपयोग? तू घेऊन जाशील का? ते शंकराचं निवासस्थान असे महाक्षेत्र आहे!" अव्वा म्हणाली.

"हत् तिच्या! एवढेच ना! ते काही मोठे काम नाही! मी तुझा हात पकडून घेऊन जातो. चल!" असे म्हणत त्या मुलाने अव्वाचा हात पकडला आणि पुढे पाऊल टाकले. दुसऱ्या हातात काठी धरून अव्वा पुढे निघाली तेव्हां एक मोठी वीज चमकली. त्या उजेडात आपला हात आपल्या सोंडेत धरून चालविणाऱ्या गणपतीला पाहून अव्वा डोळे मिटून ती मनात म्हणाली–"देवा! तू मला लहानपणापासूनच चालवीत आहेस. मी डोळे उघडून चालले काय, किंवा मिटून चालले काय, एकच!" ती डोळे उघडल्या शिवाय अव्वा गणपती चढवीत नेत होता त्या पायऱ्या ती चढून चालली होती. किती पायऱ्या चढून गेली किती काळ लोटला तिला कळले नाही.

अशी जात जात असतां अव्वाला गणपती म्हणाल्याचे ऐकू आले–"अव्वा आपण शिवसन्निधीजवळ आलो आहों!" तिने डोळे उघडले.



तेथे प्रकाशाशिवाय दुसरे काही दिसले नाही. खाली पाहिले तर अनेक नक्षत्र मंडले पायऱ्या सारखी व जिन्या सारखी दिसली. कित्येक सूर्य मंडळे व अनेक छोटे नक्षत्रे वायुरूपे फिरत असलेली आणि नित्य वाढत असलेल्या ज्योती, नित्य फिरत असलेली प्रकाशवलये तिला आपल्या पायाखाली डोळ्यांना चकित करून सोडणारी दिसली.

गणपतीने अव्वाचा हात सोडून म्हटले– "अव्वा! तू शिव सान्निध्यात पोचली आहेस. येथे काळ वेळ नावाची वस्तू नाही. नाश, नश्वर असे काही नाही. सृष्टी, स्थिती आणि लय विरहित अशी शिव सन्निधी आहे. म्हणजे खरे खरे कैलास!



विश्वेश्वर अशा शिवाचे दर्शन कर!" असे सांगून गणपती अंतर्धान पावला.

अव्वाला खालीवर सर्वत्र व्यापून टाकून टाकणारी लिंगाकार ज्योति दिसली. त्या ज्योतीत शिवाचे गण शिवस्तुती करीत असलेले ओंकार ध्वनिरूपे ऐकू येत होते. विश्वेश्वर शिवाचे दर्शन घडले. त्याच्या दोन्ही बाजूला गणपती, पार्वती व कुमार-स्वामी नंदी भृंगी वगैरे होते.

अव्वाला शंकराचा साक्षात्कार घडला. शंकराने आपला अभय हस्त अव्वाच्या मस्तकावर ठेवून तिच्यावर अनुग्रह केला. अव्वाला शिवसायुज्य मुक्ती लाभली. सभामंडपातल्या एका चित्रात गणपतीच्या हातात उसाचे एक कांडं होतं आणि एक शेतकरी कुतूहलपणे त्याच्याकडेपहात होता. ते चित्र पाहून मिश्र कथा सांगू लागला.

एकाद्या राजासारखे मोठे जमिनदार दरवर्षी विनायकाची पूजा, उत्सव वगैरे मोठ्या थाटामाटाने करीत. त्याला भक्त शिरोमणी म्हणून लोक म्हणत त्याच्या कडे पिके निघत. उसाचा मळाही होता.

त्या मळ्यात काम करणारा एक गडी होता. तो गणपतीचा भक्त होता. दर वर्षी शेतात काम सुरू करते वेळी प्रार्थना करीत असे–"देवा, यावर्षी चांगले पीक येऊ दे!" त्याप्रमाणे उसाचे पीक फारच छान येत असे व ते वाढतच होते.

तो गडी त्याची बायको व त्याचा दहा वर्षाचा मुलगा खूप काबाडकष्ट करून शेतात काम करीत. परंतु जमिनदार त्यांना फार कमी मजुरी देत असे. तीसुद्धा नियमित देईच असेही नाही. तो गडी भोळा भाबडा होता, अल्पसंतोषीही होता.

जमिनदाराची बायको चांगली होती. बरं वाईट सर्व गणेशाला निवेदन करीत असे. नवरा गड्याला पगार मजुरी देण्यात कुचराई करी तेव्हां ती म्हणे–"ते किती काबाडकष्ट करतात आणि तुम्ही त्यांना काय देता? बरोबर देत जा!"

"तुला सल्ला द्यायला काय जातं? अशी काटकसर करतो म्हणून तर आप-ल्याला गणपति उत्सव करायला काही उरतं!" तो तिला म्हणे.

ती मनात म्हणे–"काबाडकष्ट करणा-ऱ्यांच्या तोंडात माती कोंबून गणपतीची पूजा आणि उत्सव करण्यापेक्षा ते नाही केले तर काय बिघडणार आहे? आमच्या ह्यांना देवा, चांगली बुद्धी दे?"

त्या वर्षी ऊस हत्तीच्या सोंडेसारखा जाडजूड आणि लांब सडक आला. हजारो ऊस बांधलेले भारच्या भार जमिनदाराच्या आवारात येऊन पडत होते.

"ही सर्व गणेशाची कृपा! पूजा अर्चा आणि उत्सव फुकट जातात का? आपण हे सर्व कशाला करतो मग?" जमिनदार म्हणाला.

"एवढेच का? म्हणजे आपल्या गड्याने जी एवढी मेहनत केली ती काहीच कामाची नव्हती, असे म्हणावयाचे आहे का तुम्हांला?" बायकोने विचारले.

"बरंच झालं की, तुझी ही फुकटाची कीव आणि उदारता? आपण जर नोकरां-चाकरांना असे मानू लागलो तर पुढे आपल्याला त्यांच्या पाठोपाठ हिंडावे लागेल. माणसाच्या हातून काय घडणार? सर्व त्या विनायकाची करुणा आहे!"



जमिनदार म्हणाला. जमिनदारणीने मना-तल्या मनातगणेशाची प्रार्थना केली–"हे विघ्नेश्वरा! यांच्या मनांत ज्ञानोदय तुझ्याच करुणेने झाला तर होणार?"

गड्याच्या मुलाची गणपतीवरच अपार भक्ती होती. गणेशचतुर्थी आली की तो हिंडून फिरून पांढरी तांबडी कमळे हुडकून आणी फुले, पत्री जमा करी आणि पूजे-साठी आणून देई.

त्या वर्षीची गणेशचतुर्थी आली. नेहमी-प्रमाणे उत्साह या वर्षीही वाढला. जमिन-दाराच्या आवारात उसाचे भारे टाकीत असलेल्या वडिलांकडे जाऊन तो म्हणाला–"बाबा, आपणसुद्धा एक ऊस गणपतीला



वाहू या. ऊस घेऊन जाऊ या का?" गड्याने एक ऊस काढून मुलाच्या हातात दिला. तो घेऊन तो घरी निघाला. तेव्हा त्याला जमिनदाराने पाहिले.

जमिनदाराने एकदम नरसिंहावतार धारण केला व ओरडला—"काय रे, माझा ऊस घरी पळवून नेतो आहेस का?" असे म्हणत तोंडाला आले ते गड्याला बोलला आणि कोरड्याने त्याला मारू लागला. जमिनदाराच्या घरची माणसं व गावकरी ते पाहून गप्प राहिली, कोणी हुं की चूं केलं नाही. जमिनदाराचा असा धाक होता गावात. त्याने काय वाटेल ते केले तरी चाले, कोणी विचारणारा नव्हता.

गडी असह्य वेदनेने म्हणाला—"मालक, गणेश चतुर्थी नाही का, एक ऊस घेऊन जा म्हटलं—एकच एक ऊस!"

"तुम्हां खालच्या जातीतल्यांना गणेश चतुर्थीची पूजा काय?"

"खालची जात झाली म्हणून गणेशाची भक्ति असत नाही का?"

जमिनदार त्याची थट्टा उडवीत म्हणाला—"तोंड पहा, भक्ति करणाराचं! कोल्हा म्हणे स्वर्ग लोकाला जायची उम्मेद करतोय! तो ऊस टाक इकडे!"

"एका उसासाठी तुम्ही इतके रागवतां काय मालक? मी गाड्या भरभरून ऊस आणून टाकला आहे येथे!" एका उसाने काय कमी होणार आहे?" गडी म्हणाला.

"किती उर्मटपणान बोलतो आहेस रे! एकच काय, दहा, शंभर किंवा हजार मला सारखेच! तू उद्यां सकाळी उजाडायच्या आत एक हजार ऊस खाल्ले पाहिजेस सगळा चोथा मला दिसला पाहिजे, नाहीतर एकेक उसाबद्दल तुला हजार कोरडे बसतील!" असे म्हणत त्याने गड्याला एका खांबाला बांधून ठेवले आणि नोकरांकरवी त्याच्यासमोर एक हजार ऊस टाकून ठेवविले.

जमिनदार तसाच हट्टी होता. त्याच्या मनात येईल तेच खरं! त्याने गड्याला एका खांबाला बांधून ठेवले त्याच्यावर

पाहऱ्याला शिपाई उभे केले. जमिनदाराच्या बायकोने गणेशाचे स्मरण करून मनातल्या मनात त्याला आळवीत म्हटले–"देवा, गडी अगदी भोळा भाबडा आहे. ऊस खायचे त्याने ठरविले तर निष्कारण मरेल. खाऊ शकला नाहीतर माझे यजमान त्याची चामडी लोळवितील. त्याचं कसं ते रक्षण कर!"

गड्याला काय करावे सुचेना. करायला काहीच नव्हते. देवाचे स्मरण करून डोळे मिटून पडून राहिला आणि त्याला झोप लागली.

उजाडतांच जमिनदाराने जाऊन पाहिले तर त्याच्या आवारात हिमालयासारखी चोथ्याची पांढरी रास पडलेली होती. मानेवर भूत बसल्यासारखा तो मोठ्याने ओरडत जागच्या जागी 'आ' वासून उभा राहिला.

त्याच्या ओरडण्याचा आवाज ऐकून त्याची बायको धावत आली. तिला तो म्हणाला–"सर्वस्वाचा नाश झाला. आपल्या आवारात एक ऊसही उरला नाही, सर्व चोथा होऊन पडला आहे! गडी म्हणजे भूत आहे भूत! आपणां सर्वांना खाऊन टाकील. चल, पळून जाऊ या!" तो ओरडून सांगत होता. ते ऐकून स्मित करून ती म्हणाली–"तो भूत नाही व त्याने ऊस खाल्लाही नाही. मी स्वतःच्या डोळ्यांनी पहात होते तेवढे उजाडलं नव्हते आणि हत्तीचा चीत्कार ऐकून माझी झोप मोडली. मी खिडकीतून पाहिलं एक मोठा हत्ती ऊस खातखात नाहीसा झाला."

"हत्ती काय म्हणतेस? तोंड तुझं! या पंचक्रोशीत हत्ती असल्याचं मी या जन्मात कधी ऐकलं नाही." असं जमिनदार सांगत असतां काही जण उत्सव मंडपातून धावत आले आणि सांगू लागले, 'रात्री आम्ही पूजा केली ती गणपतीची मूर्तीच अदृश्य झाली आहे. चहूकडे शोधून पाहिले.' असे म्हणत असतां त्यांचं लक्ष ठेवलेल्या पडवीकडे गेले आणि सर्व ओरडू लागले–"ती पहा! ती पहा!" आणि त्या बाजूला धावले.





"पैशाचं कधी ओझं होईल का? हे पैसे असले की संकटात पडलेल्यांना मदत नाही का करतां येणार?" दोन्ही भुते म्हणाली.

"ओहो! तुम्ही दोघं सत्ययुगातील भुतं दिसत आहां! तुमच्यासारखे लोक स्वतःवर संकट ओढवून घेतात तुम्हांला येथे जागा नाही मिळणार!"

"बरं तर आम्ही कोठे ही जाऊन राहूं निदान ही आमच्या धनाची पिशवी तुमच्या या झाडाच्या ढोलीत ठेवून द्याल का?" दोघां नवराबायकोंनी विचारले.

त्या गोष्टीस वडाच्या झाडावरची भुतं कबूल झाली. म्हणून आपली पैशाची पिशवी त्या झाडाच्या ढोलीत ठेवून हे भुतांचं जोडपं सविताच्या घराच्या परसांतल्या चिंचेच्या झाडावर येऊन राहू लागलं.

त्या भुतांच्या जोडप्याला दररोज सविता त्या झाडाखाली येऊन अश्रू ढाळीत बसलेली दिसायची ती दोघं एकदां राधाबाईच्या घरात शिरून तेथे काय होते हे पाहण्यासाठी गेली. त्यांनी सर्व परिस्थिती पाहूली. त्यानां सविताबद्दल खूप दया आली.

"इतर सुनांसारखं सविताने हुंडा व भेटी आणल्या नाहीत म्हणून ती भांडखोर सासू या मुलीला छळते आहे?" भूत बाई आपल्या नवऱ्याला म्हणाली.

"तो हुंडा काय तो आपल्या मुलीला पुरविला तर तिला थोडी मदत केल्या सारखं होईल. पण ते कसं करायचं?" नवरा म्हणाला.

दोघं भुतं त्यानंतर बराच वेळ आपसात बोलून व काही ठरवून स्मशानातून आपलं धन आणायला गेली.

वडावरच्या भुतांनी त्यांना पाहतांच विचारले–"ओहो, परोपकारी जोडपं आलं वाटतं? कसंकाय, येण्याचं कारण?"

"बिचारी एक मुलगी कष्टात आहे, तिला मदत करावयाची आहे. ढोलीत ठेवलेल्या पिशवीतून थोडं काही घेऊन जाव

म्हणून आलो आहों!" भुतांचं जोडपं म्हणालं.

"फसाव्या माणसांच्या जातीतल्यांना मदत? ठीक आहे, पैसे तुमचे आहेत घेऊन जा!" झाडावरची भुते म्हणाली.

दुसऱ्या दिवशी सविता अंगणात सडा घालीत होती तेव्हां एक वृद्ध जोडपं आलं आणि विचारू लागलं—"अग मुली सविता, बरी आहेस का ग?"

सविताने मान वर करून त्यांच्याकडे पाहिलं व चकित झाली. कारण तिने त्यांना त्या पूर्वी कधी पाहिलं ही नव्हतं. म्हातारी रेशमी जरी काठी लुगडं नेसली होती आणि अंगभर दागिने घातले होते तिने. म्हातारा रेशमी धोतर नेसलेला होता आणि त्याच्या खांद्यावर जरी काठी उपरणं होतं. त्याच्या बोटांत सोन्याच्या अंगठ्या होत्या. श्रीमती आंगोपांगी झळकत होती. त्याच वेळी बाहेरच्या उंबरठ्या पर्यंत आलेल्या राधाबाईने त्यांना पाहिलं व चकित झाली. म्हातारीजवळ येऊन म्हणाली—"तू ल्हान असतांना आम्ही तुला पाहिलं होतं. म्हणून तू आम्हाला ओळखलं नाहीस मी तुझी वेणूमावशी ग!"

तो पर्यंत राधाबाई स्वतःला सावरून म्हणाल्या—"काय ग हे? त्यांना बाहेर रस्त्यावरच उभे करून तू अशी पहाते आहेस? घरात बोलाव!"

सवितेच्या पाठोपाठ ते वृद्ध जोडपं घरात आलं, म्हातारी राधाबाईला



पारले

'मी मोठी झाल्येना,
की माझी एक खोली असेल
बाहुल्यांची आणि
दुसरीत असेल रास बिस्किटांची...






छोट्यांना पसंत पारले ग्लुको—
स्वादिष्ट पौष्टिक आहार.

पारले